# श्रीसयाजीगौरवग्रंथ



संपादक व प्रकाशक,

वाढदिवस--मंडळ,

बडोदें व मुंबई.



१९३३



किंमत तीन रुपये

# निवेदन

**सत्यसंकल्पाचा दाता भगवान**
**सर्व करी पूर्ण मनोरथ** ॥ तुकाराम.

श्री एकनाथ षष्ठीचे सुमूहूर्तावर म्हणजे बडोद्याचे विद्याप्रिय महाराज श्री. सयाजीराव गायकवाड ह्यांच्या जन्मदिवशीं संकल्पाप्रमाणें हा ग्रंथ वाचकांचे हातीं देण्यास आम्हांस संतोष वाटत आहे.

या ग्रंथाची योजना ता. ८ डिसेंबर १९३२ रोजीं निश्चित करण्यांत आली, व ता. ६ फेब्रुवारी १९३३ रोजीं ग्रंथाचें तयार झालेलें हस्तलिखित आम्हीं छापण्यासाठीं छापखान्याचे हवालीं केलें. म्हणजे सुमारें अवघ्या दोन महिन्यांच्या आंत माहितीची जुळवाजुळव करणें, निरनिराळया लोकांशीं पत्रव्यवहार करून त्यांना लेख, आठवणी, कविता पाठविण्यास विनंति करणें इत्यादि गोष्टीं करण्यांत आल्याचें वाचकांस दिसून येईल.

या ग्रंथाची साधनें आमच्या अपेक्षेप्रमाणें आम्हांस एके ठिकाणीं मिळालीं नाहींत. तीं सर्वत्र विखुरलेलीं आढळलीं, व त्यामुळें त्यांची जुळवाजुळव करण्याचे कामीं आम्हांस त्रासाशिवाय फार विलंब झाला. श्री. महाराजसाहेबांनीं आपल्या ५८ वर्षांच्या कारकीर्दीत अनेक उपयुक्त सुधारणा केल्या, पण त्या करतेवेळीं त्यांना किती त्रास झाला, लोकमतावर त्यांचा कसा परिणाम झाला इत्यादि गोष्टी कळण्यासाठीं बडोद्यांतील व बडोद्याबाहेरील वर्तमानपत्रांच्या फाइली व चिकटबुकें मिळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण दुर्दैवानें त्यांत आम्हांस यश आलें नाहीं. अधिक वेळ मिळतां तर आमच्या प्रयत्नास थोडेसें यश येतें.

एका दृष्टीनें महत्वाचीं अशीं वरील साधनें आम्हांस न मिळाल्यानें श्री. महाराजसाहेबांची प्रसिद्ध चरित्रें, भाषणें व सरकारी रिपोर्ट यांवरच आम्हांस आमची भूक भागवावी लागली. त्यांचा अल्पावधींत जो उपयोग करतां आला तो उपयोग आम्हीं केला आहे.

गेल्या पन्नास वर्षांत श्री. महाराज साहेबांचा हिंदुस्थानांतील व हिंदुस्थानाबाहेरील अनेक लोकांशीं अनेक गोष्टींत संबंध आला. त्यापैकीं बरीच मंडळी

आज दुर्दैवानें हयात नाहींत. जी थोडी मंडळी आज विद्यमान आहेत त्यांचीं नांवें मिळवून त्यांचे हल्लींचे पत्ते हुडकून काढण्यांत आमचा बराच वेळ गेला. त्यानंतर लेख किंवा आठवणी पाठविण्यास त्यांना विनंतिपत्रें धाडण्यांत आली. यांपैकीं ज्यांचेकडून वेळेवर म्हणजे ता. ८ मार्च १९३३ पर्यंत लेख किंवा आठवणी आल्या त्यांचा या ग्रंथांत समावेश केला आहे. गोलमेज परिषद्, सर्वपक्षीय परिषद् अशा महत्वाच्या कार्यांत बरीच मंडळी सध्यां गुंतली असल्यानें त्यांचेकडून लेख किंवा आठवणी वेळेवर येऊं शकल्या नाहींत.

अशा परिस्थितींत हा ग्रंथ तयार झाला असल्यानें त्यांत बऱ्याच उणीवा राहिल्या आहेत. आणि तो घाईनें छापला असल्यानें त्यांत **अनेक मुद्रणदोष** राहिले आहेत. त्याबद्दल श्री. महाराज साहेब व वाचकवर्ग क्षमा करतील अशी आशा आहे. दुसऱ्या आवृत्तीचा योग आल्यास ह्या व इतर चुका दुरुस्त करण्यांत येतील हें सांगणें नकोच.

आतां राहतां राहिलें एक काम, आणि तें म्हणजे आभार प्रदर्शनाचें. पण तें करण्यापूर्वी ग्रंथाच्या मांडणीविषयीं दोन शब्द लिहिल्यास ते अप्रासंगिक ठरणार नाहींत असें वाटतें.

ग्रंथाचे प्रारंभीं पहिल्या भागांत श्रीमंत महाराजांचें चरित्र दिलें आहे. श्रीमंत महाराजसाहेबांच्या आयुष्यांतील वेंचक प्रसंग घेऊन त्यांचें वर्णन रा. दाते यांनीं आपल्या या चरित्रलेखांत दिलें असल्यानें चरित्राची कसोटी त्यांस लावून उपयोगी नाहीं. दुसऱ्या भागांत श्रीमंत महाराजसाहेबांच्या गुणवर्णनपर पण त्यांच्या कार्यविस्ताराची व महनीय कामगिरीची कल्पना आणून देणाऱ्या लेखांचा संग्रह केला आहे. हे सर्व लेख आम्हीं प्रारंभीं जाहीर केलेल्या विषयानुक्रमानें दिले आहेत. श्री. महाराज साहेबांनी आपल्या कारकीर्दीत ज्ञानप्रसारार्थ जे अविरत परिश्रम केले ते सर्व हिंदुस्थानच्या दृष्टीनें अपूर्व व अनुकरणीय असल्यानें तद्विषयक लेखांस साहजिकपणेंच आम्हीं अग्रस्थान दिलें आहे. त्यानंतर श्रीमंतांनी कोणकोणत्या सामाजिक सुधारणा केल्या याची माहिती दिली असून तीवरून समाजसुधारणेच्या बाबतींतहि श्रीमंतांनीं सर्व हिंदुस्थानच्या पुढें कशी अघाडी मारली आहे हें दिसून येईल. हा भाग वाचून इतर समाज सुधारकाप्रमाणें श्रीमंत केवळ बोलके सुधारक नाहींत, त्यांची या

बाबतींतील कामगिरी " आधीं केलें, मग सांगितलें " या कोटींतील आहे, असेंच प्रत्येकजण म्हणेल. उद्योगधंदे, रेल्वे व रस्ते, सहकारी पतपेढ्या, स्थानिक स्वराज्य, आरोग्यरक्षण, इत्यादि लोकोपयोगी बाबींसाठीं श्रीमंतांनी आजवर तनुमनधनें करून काय काय प्रयत्न केले हें यापुढें सांगून त्यांनी राज्यकारभारांत केलेल्या सुधारणांची यापुढें माहिती दिली आहे. व्यापारमंदीमुळें आज सर्वत्र हलाखी आहे, ब्रिटिश हिंदुस्थानची व कांहीं देशी संस्थानांची सांपत्तिक स्थिति समाधानकारक नाहीं. अशा स्थितींत बडोदें संस्थानाची सांपत्तिक स्थिति समाधानकारक आहे, हें वाचून प्रत्येकजण श्री. महाराजसाहेबांस त्यांच्या दूरदर्शी व मितव्ययी कारभाराबद्दल धन्यवाद देईल, याबद्दल आम्हांस मुळींच संशय वाटत नाहीं. महाराजांची राज्यकारभारांतील काटकसरीची स्पृहणीय वृत्ति दानधर्माच्या बाबतींत कशी उदार व ' दरिद्रां भर कौंतेय, मा प्रयच्छेश्वरे धनम् " या भगवदुक्तीनुसार आहे, आणि दानधर्माच्या पद्धतींत त्यांनीं काय सुधारणा केल्या, हें यापुढें सांगितलें आहे. यानंतर श्रीमंतांची प्रवासाची आवड व व्यायामप्रियता याची माहिती देऊन दुसराभाग येथें संपविला आहे.

तिसऱ्या भागांत आशीर्वचनांचा व महाराजविषयक संकीर्ण लेखांचा संग्रह केला आहे. दुसऱ्या भागासाठीं योजिलेल्या पण उशीरा हातीं आलेल्या लेखांचा या भागांतच समावेश केला आहे. चवथ्या भागांत श्रीमंतांच्या गुणवर्णनपर, कविता देऊन पांचव्या भागांत त्यांच्या इंग्रजी, मराठी, व गुजराथी भाषणांतील व प्रसिद्ध हुकमांतील कांहीं सूक्ति, व सहाव्या भागांत त्यांच्या संबंधीच्या कांहीं आठवणी दिल्या आहेत. हा भाग आम्हांस जास्त सजवितां आला असता, पण वेळेच्या अभावीं तसें करणें शक्य झालें नाहीं.

वरील सर्व लेख मराठी, गुजराती व इंग्रजी अशा तीन निरनिराळ्या भाषांत लिहिले असल्यामुळें त्यांची मिसळ न करितां त्यांचे भाषावार स्वतंत्र भाग पाडणें जरूर होतें असा सकृद्दर्शनीं कोणी आक्षेप घेईल. पण ग्रंथाची विषयवार मांडणी केली असल्यानें असें करणें अपरिहार्य असल्याचें विचाराअंतीं वाचकांस आढळून येईल.

वाचकांस ग्रंथ योजनेची स्थूल कल्पना आणून देण्यास वरील हकीगत पुरेशी आहे. या विशिष्ट मांडणीमुळें ग्रंथांत बरीच पुनरुक्ति झाली आहे, हें

आम्हीं जाणतों. पण ती अपरिहार्य असल्याचें पुस्तक चाळतांच वाचकांचें ध्यानीं येईल.

गौरवग्रंथाची कल्पना निघाल्यापासून ती यशस्वी करण्याच्या कामीं आम्हांस अनेक मित्रांनी बहुमोल साहाय्य केलें आहे. त्यांत या पुस्तकासाठीं लेख, कविता व आठवणी पाठविणाऱ्या आमच्या लेखकमित्रांचा प्रथम साभार उल्लेख केला पाहिजे. या मित्रांनीं जर अल्पावधींत लेख वगैरे पाठविले नसते तर आमची योजना इतक्या लवकर पार पडली नसती, हें उघड आहे.

ग्रंथासाठीं आलेला मजकूर तपासणें, शुद्ध करणें व संपादणें, इत्यादि कामें आमचे मित्र महाभारताचार्य श्रीयुत चिंतामण विनायक वैद्य, प्रो. चिंतामण विनायक जोशी, प्रोफेसर रोमन्स व सोयरेस वगैरेनीं केलें, त्याबद्दल आम्हीं त्यांचे ऋणी आहोंत. तसेंच आमचे परममित्र रा. विष्णु पांडुरंग नेने यांनीं अनेक अडचणी उपस्थित झाल्या असतांनाहि अहर्निश मेहनत करून या ग्रंथनिर्मितीच्या कामीं आम्हांस बहुमोल मदत केली आहे त्याबद्दल आम्हीं त्यांचे आभारी आहोंत.

महाराज साहेबांविषयीं प्रेम व आदर बाळगणारे लोक अनेक आहेत. त्यांपैकीं वाढदिवस मंडळाचे सदस्य व इंदुप्रकाश छापखान्याचे उत्साही मालक रा. दामोदर सांवळाराम यंदे, गुजराती सयाजीविजय पत्राचे चालक व संपादक श्रीयुत राजरत्न माणेकलाल अंबाराम डॉक्टर, महाराष्ट्र शब्दकोशाचे संपादकद्वय–रा. दाते व कर्वे–या मंडळींनीहि आम्हांस सुरवातीपासून अखेर-पर्यंत साहाय्य केलें आहे. तसेंच ग्रंथाची प्रेस कॉपी तयार करणें, प्रुफें तपा-सणें वगैरे कामीं रा. रामचंद्र चिंतामण भावे, रा. दि. ना. पुरंदरे, रा. पट्टण-कर, प्राविण्याचे संपादक रा. ताम्हणकर रा. पां. वा. नेने वगैरे मंडळींच्या परिश्रमांचा ऋणनिर्देश येथें करावासा वाटतो.

केसरी, कप्तान, जागृति, सकाळ, नवाकाळ, श्रीसयाजीविजय, विविधवृत्त, ज्ञानप्रकाश व नवगुजरात इत्यादि नियतकालिकांनीं आमची विनंतिपत्रें व योजना मोफत छापल्याबद्दल वाढदिवस मंडळ त्यांचे आभारी आहे.

वरील मंडळींच्या मदतीस छापखानेवाल्यांचें जर साहाय्य नसतें तर हा ग्रंथ एवढ्या थोड्या अवधींत छापून प्रसिद्ध करतां आला नसता. या ग्रंथाचा मोठा भाग मुंबई वैभव प्रेसमध्यें छापला आहे. केवढेंहि मोठें काम असलें तरी

हा प्रेस तें अल्प मुदतींत सुबक रीतीनें छापून देतो असें आम्हीं ऐकलें होतें. त्याची प्रचीती आम्हास या प्रेसचे मॅनेजर रा. सिद्धये व त्यांच्या हाताखालील इतर कामगार मंडळी यांनीं आणून दिली, ही गोष्ट आम्हीं येथें आनंदानें नमूद करतों. लक्ष्मीनारायण प्रेसचे मालक रा. अनंतराव मोरमकर व इंदुप्रकाश छापखान्यांतील रा. नरहरपंत, रघुनाथराव, वसंतराव यंदे व शिवाजीराव घोरपडे यांनीं आपआपलीं कामें वेळेवर उत्तम रीतीनें करून मुंबई वैभव प्रेसप्रमाणेंच आपला लौकिकहि कायम राखला, हें नमूद करण्यास आम्हांस आनंद वाटतो. मनोरंजन प्रेसचे रा. दा. र. मित्र यांनींहि कांहीं चित्रें छापून आम्हांस उपकृत केलें आहे.

या पुस्तकांत छापलेल्या बऱ्याचशा चित्रांचे ठसे खानगी कचेरीनें दिलेल्या फोटोवरून रा. विद्वांस, नेरॉय व दवणे यांनीं अल्पावधींत करून दिले त्याबद्दल त्यांचे व श्रीसयाजीविजय प्रेसचे मालक श्री. राजरत्न माणेकलाल डॉक्टर यांनीं आपल्याजवळचे कांहीं ठसे दिल्याबद्दल त्यांचे आम्हीं आभारी आहोंत.

सरतेशेवटीं श्रीमंत महाराजसाहेबांनीं हा ग्रंथ स्वतःस अर्पण करण्यास उदारमनानें आम्हांस परवानगी दिली त्याबद्दल त्यांचे आभार मानून व या मंगल प्रसंगीं त्यांना उदंड आयुरारोग्य लाभो असें इच्छून हें निवेदन पुरें करतों.

मुंबई,
ता. ८ मार्च १९३३.

**रामचंद्रराव शामराव माने पाटील.**
कार्याध्यक्ष, वाढदिवस मंडळ.

# श्री महाराज सयाजीराव गायकवाड
# वाङ्मयदिवस मंडळ
## मुंबई व बडोदें.

* रामचंद्रराव शामराव मानेपाटील बी. ए., एल्एल् बी.—कार्याध्यक्ष.
दामोदर सांवळाराम यंदे, मुंबई,
* प्रो. चिंतामण विनायक जोशी एम्. ए.
यशवंत रामकृष्ण दाते बी. ए., एल्एल्. बी. पुणें.
गोकुळदास मथुरादास शहा बी. ए., एल्एल्. बी.
* विष्णु पांडुरंग नेने बी. ए.,—चिटणीस.



श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड.

श्री

पतितपावन श्रीमंत सरकार

# सर सयाजीराव महाराज

# गायकवाड, सं. बडोदें,

सेना खासखेल, समशेर बहादुर,

जी. सी. एस्. आय्., जी. सी. आय्. ई., एल्एल्. डी.

यांस

त्यांचे एकाहत्तरावे वाढदिवसानिमित्त

## श्रीसयाजीगौरवग्रंथ

## सादर समर्पण



वाढदिवस मंडळ,

बडोदें व मुंबई.

# अनुक्रमणिका

## भाग पहिला

### चरित्र–लेख



## भाग दुसरा

### महाराजांचा कार्यगौरव

# भाग तिसरा

## संकीर्ण लेख

# भाग चवथा

## कवितासंग्रह



# भाग पांचवा



# भाग सहावा

## आठवणी

# चित्रें

# शुद्धिपत्र.

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| १८ | ८ | २७-५-१७८५ | २७-५-१८७५ |
| २५ | १९-२० | तंजावरच्या राजकन्येशीं | तंजावर येथील श्री. मोहिते यांच्या कन्येशीं |
| ७८ | ४-५ | पण लवकरच प्रकृति नादुरुस्त...अभ्यास अर्धवट सोडून हिंदुस्थानास परत यावे लागले. | तेथे बी. ए. चा अभ्यास यशस्वी रीतीने पुरा करून, त्या विद्यापीठाची उच्च पदवी संपादून ते स्वदेशीं परत आले. |
| 201 | 12 | Slowly | slowly |
| 203 | 21 | lilrary | library |
| 208 | 8 | G. S. Audalkar | J. S. Kudalkar |
| 212 | 13 | Parids | Faris |
| 225 | 11 | Perspecun | Perspective |
| 225 | 12 | Pednelive Lozic | Deductive logic |
| २२८ | २ | दीघनिकत्य | दीघनिकाय |
| 229 | 12 | Dictioinary | Dictionary |
| २३१ | १९ | महारजानां | महाराजांना |
| २१७ | १४ | (श्री. सौ. महाराणी साहेबांचे मातापिते) | (श्री. सौ. महाराणीसाहेबांचे वडील ) |
| ५०६ | | परिशिष्ट २ | परिशिष्ट १ |
| ५०६ | | परिशिष्ट ३ | परिशिष्ट २ |

श्री

# श्रीसयाजीगौरवग्रंथ

## भाग पहिला

# श्रीमंत सयाजीराव महाराज यांचें चरित्र

( लेखकः—श्रीयुत यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए., एल्‌एल्. बी.
मुख्य संपादक, महाराष्ट्र शब्दकोश, पुणें ).

## १. पूर्ववृत्त

समाजसंस्थेच्या इतिहासाकडे नजर फेंकल्यास असें दिसून येईल कीं, समाजाची अखंड प्रगति होत राहण्यासाठीं समाजांतील व्यक्तींनीं आपल्यांतील शक्तीचा एक एक बिंदू एकत्र करून जी एकमुखी व प्रातिनिधिक अशी सत्ता निर्माण केली तिचेंच नांव राजसत्ता होय. सर्व जगांत इतर कोणत्याहि संस्थेपेक्षां राजसंस्थेचा समाजाची राजकीय, धार्मिक, सामाजिक, आर्थिक उन्नति करण्याचे कामीं फार मोठा उपयोग झालेला आहे. इंग्लंड, जपानसारख्या देशांनीं राजसंस्था नाममात्र कां होईना राहूं दिली यांतलें इंगित हेंच होय. राजसत्ता यदृच्छेनें एकदां एकाकडे व दुसऱ्यांदा दुसऱ्याकडे अशी फिरती न ठेवतां ती एकाच कुलाकडे ठेवल्यामुळें तिच्यांत परंपरेचा अभिमान उत्पन्न होऊन त्यांतून श्रेष्ठ, श्रेष्ठत्तर अशा व्यक्ति—राजे निर्माण झाले. सारांश, कोणत्याहि राष्ट्राचा किंवा त्यांतील विशिष्ट समाजाचा किंवा एखाद्या घराण्याचा इतिहास पाहिला तरी हीच गोष्ट सत्य असल्याचें आढळून येईल. हिंदुस्थानच्या इतिहासांत गायकवाड घराण्यानें अशा कांहीं श्रेष्ठ व्यक्तीस जन्म

देऊन राष्ट्रोन्नति व समाजोन्नतीच्या कार्यास पुष्कळच हातभार लाविलेला आहे. त्या सर्व व्यक्तींमध्यें श्रीमंत सयाजीराव महाराज ( तिसरे ) हे अग्रगण्य होत. त्यांच्या घराण्याच्या पूर्ववृत्ताकडे थोडेंसें लक्ष देऊं या.

पुणें जिल्ह्यांतील खेड तालुक्यांत दावडी म्हणून एक गांव आहे, तें गायकवाडांचें मूळ गांव होय. या घराण्याचें नांव 'गायकवाड' पडण्याबद्दल अशी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे कीं, नंदाजी नांवाचा एक इसम भोर संस्थानांत एका किल्ल्याचा अंमलदार होता. एके दिवशीं एक मुसलमान खाटिक किल्ल्याजवळून कांहीं गाई घेऊन चालला असतां नंदाजीस त्यांची दया येऊन त्यानें किल्ल्याचें कवाड ( दार ) उघडून कांहीं गाई आंत घेऊन त्यांचा जीव वांचवला. म्हणून त्याचें गायकवाड हें नांव पडलें. हा नंदाजी म्हणजे गायकवाड घराण्याचा संस्थापक दमाजी याचा आजा होय.

दमाजी गायकवाड हा सेनापति खंडेराव दाभाड्याच्या सैन्यांतला एक सरदार होता. इ. स. १७२० सालीं बाळापूर मुक्कामीं निजामाशीं झालेल्या लढाईत दमाजीनें विशेष पराक्रम केल्यामुळें शाहूनें खंडेरावाच्या शिफारसीवरून दमाजीस 'समशेर बहाद्दर' हा किताब दिला. तो अजूनहि बडोद्याचे राजे आपल्या नांवापुढें लावतात. दमाजी इ. स. १७२० च्या अखेरीस मरण पावला. त्यानंतर त्याचा पुतण्या ( झिंगोजीचा पुत्र ) पिलाजी याची सेनापतीच्या मुतालिकाच्या जागीं नेमणूक झाली. पिलाजी प्रथम खानदेशांत वस्ती करून राहिला होता, परंतु पुढें गुजराथेंत 'सोनगड' येथें एक किल्ला बांधून तें त्यानें आपलें कायमचें वसतिस्थान बनविलें. तेथें राहून आसपास स्वारी करून पिलाजीनें बरीच लूट व मुलूख संपादन केला. तसेंच इ. स. १७२४ मध्यें मोंगल सुभेदार हमीदखान यास त्याच्या शत्रूविरुद्ध मदत करून महीनदीच्या पलीकडील भागांवर चौथ बसविण्याचा हक्क मिळविला. हमीदच्या पक्षास कंठाजी कदम बांडे याचीहि मदत असल्यामुळें गुजराथच्या चौथाईबद्दल बांडे व गायकवाड यांत तंटा माजला; परंतु अर्धा चौथ घेण्याच्या करारावर दोघांचा सलोखा झाला. छत्रपति शाहूस यापैकीं कोणाचेंच करणें पसंत पडलें नाहीं. याच सुमारास बाजीराव पेशवा व त्रिंबकराव दाभाडे यांच्यांत वांकडें येऊन भिलापूरच्या लढाईत त्रिंबकराव दाभाडे मारला गेला व पिलाजी जखमी झाला. परंतु पुढें त्रिंबकरावाचा मुलगा यशवंतराव दाभाडे यास सेनापतीपदाचीं वस्त्रें शाहूकडून मिळालीं व पिलाजी गायकवाडास पूर्वी-

प्रमाणें त्याचा मुतालिक नेमण्यांत आलें; आणि शिवाय त्यास 'सेनाखासखेल' हा नवीन किताबहि मिळाला.

मराठ्यांच्या प्रगतीस मोंगल सुभेदार सरबुलंदखान यानें कांहींच अडथळा केला नाहीं. सबब दिल्लीच्या बादशहानें त्यास परत बोलावून जोधपूरचा राजा अभयसिंग याची गुजराथच्या सुभ्यावर नेमणूक केली. अभयसिंगानें बडोदें शहर काबीज केलें व तह करण्याचें आमिष दाखवून विश्वासघातानें पिलाजीचा खून केला. परंतु याचा तादृश फायदा त्यास बिलकूल झाला नाहीं. आसपासच्या भिल्ल व कोळी लोकांनीं बंड केलें तें मोडण्यांत अभयसिंगाचें शक्तिसर्वस्व खर्ची पडलें. इकडे पिलाजीचा भाऊ महादजी यानें बडोदें शहर काबीज केलें ( इ. स. १७३२ ). तेव्हांपासून बडोदें शहर गायकवाडांची राजधानी झाली.

पिलाजीचा वडील मुलगा दमाजी यानें याच सुमारास सोनगडाहून गुजराथेंत चाल करून बराच मुलूख जिंकिला. इ. स. १७३७ सालीं त्यानें गुजराथच्या नवीन सुभेदारास मदत करून अहमदाबाद शहराची अर्धी सत्ता व वसूलीचा हक्क संपादन केला. तसेंच बाजीराव पेशवा उत्तरेकडे गेला आहे असें पाहून सबंध गुजराथचा अर्धा वसूल, विरमगांव जिल्ह्यांतील वसुलाचा कांहीं भाग मिळवून त्यानें माळव्यांत प्रवेश केला. सन १७४८ मध्यें रघूजी भोंसले व बाळाजी बाजीराव पेशवा यांच्यांत जी तडजोड झाली त्यांत दमाजीनें माळव्यांतून जी खंडणी घेतली तिचा हिशेब त्यानें पेशव्यांस द्यावा असेंहि शाहूनें गायकवाड व पेशवे यामध्यें वितुष्ट येऊं नये म्हणून ठरविलें.

दमाजीस गुजराथेंत स्वैरसंचार करण्यास पुष्कळ वाव मिळाला व त्यानें बादशाहाची गुजराथेंतील सत्ता जवळजवळ नामशेष केली, ही त्याची प्रशंसनीय कामगिरी होय. शाहूच्या मृत्यूनंतर दमाजी ताराबाईच्या पक्षास मिळाला. फौजेसह साताऱ्यास येत असतां पेशव्यानें त्याजवर हल्ला करून त्यास पकडून कैदेंत ठेविलें. परंतु दमाजीचा भाऊ केदारजी यानें या आणिबाणीच्या वेळीं गुजराथ प्रांत सांभाळला. सर्व व्यवस्था नीट राखून सुरत जिल्ह्याच्या वसुलाचा कांहीं भाग मिळविला. दमाजीस कैदेंत ठेवूनहि गुजराथपासून कांहीं लभ्यांश प्राप्त होईल असें चिन्ह पेशव्यास दिसेना. तेव्हां दमाजीशीं तह करणेंच श्रेयस्कर वाटलें. यावेळीं १५ लक्ष रुपये

देऊन दमाजीनें मागील बाकी निकालांत काढावी; गायकवाडाकडे जो मुलूख होता व ते पुढें जिंकतील त्याचा अर्धा वांटा पेशव्यास द्यावा; पेशव्यास सैन्याची मदत करावी आणि पेशव्यानीं अहमदाबाद शहर जिंकून गायकवाडांच्या हवालीं करावें असें ठरलें.

याप्रमाणें सन १७५५ सालीं राघोबादादा व दमाजी या दोघांचें लष्कर अहमदाबादेवर चालून जाऊन, तोफांच्या भडिमारानें त्यांनीं तें शहर काबीज केलें, आणि त्याचा अर्धा वसूल पेशवे व गायकवाड यांनीं वांटून घ्यावा असें निश्चित करण्यांत आलें. सालअखेरीस खंबायतच्या नबाबानें अहमदाबाद जिंकून घेतलें, पण लागलीच दमाजीनें त्यास हुसकून लाविलें.

इ. स. १७६१ सालीं पानपतचें घनघोर युद्ध झालें; त्यांतून जी मंडळी जीव बचावून परत येऊं शकली त्यांत दमाजी हा होता. त्यानंतर दमाजीनें काठेवाडांतील बराच मुलूख हस्तगत केला. लाठी संस्थानच्या राजाच्या मुलीशीं लग्न केल्यामुळें त्यास आसपासचा बराच मुलूख आंदण म्हणून मिळाला.

माधवराव पेशव्याविरुद्ध दमाजीनें आपला मुलगा गोविंदराव यास राघोबाच्या मदतीस पाठविलें. परंतु धोडप येथें सर्वांचा पराभव झाल्यामुळें माधवरावानें दरसाल १५ लाख जादा खंडणी, २३ लाख रुपये दंड, पुण्यास नेहमीं ३ हजार फौज व युद्धप्रसंगीं जास्त ४ हजार सैन्य इतक्या गोष्टी गोविंदरावापासून कबूल करवून त्याची सुटका केली ( १७६८ ). याच सालीं दमाजी मरण पावला.

पिलाजी व दमाजी या दोन पुरुषांनीं गायकवाड घराणें उदयास आणिलें, आणि गुजराथेंत गायकवाडांची सत्ता अबाधित स्थापन केली. दमाजीनें मोठ्या मुत्सद्दीपणानें वागून पेशव्यांस गुजराथ आपल्या हाताखालीं घालण्यास संधि दिली नाहीं, व इतर भानगडीमुळें गुजराथकडे पेशव्यांस फारसें लक्ष पुरवितां आलें नाहीं हेंहि खरें. त्यावेळीं प्रत्येक माणूस आपल्यापुरतें पाहात होता. अशा धामधुमीच्या काळांत वेळ पडेल तसें वागणें आणि वारा वाहील तशी पाठ फिरविणें हेंच मुत्सद्दीपणाचें राजकारण असे. दमाजीनें या संधीचा चांगल्या रीतीनें उपयोग केला, व त्याच्या मृत्यूनंतर जो गृहकलह माजला तो उत्पन्न झाला नसता तर गायकवाडांची सत्ता गुजराथ, खानदेश, माळवा, काठेवाड, राजपुताना ह्या प्रदेशांत निष्कंटक पसरली असती.

दमाजी मरण पावला त्यावेळेस त्यास चार मुलगे होते. सर्वांत वडील सयाजी हा दुसऱ्या बायकोचा, पहिल्या बायकोचा मुलगा गोविंदराव हा दुसरा मुलगा आणि तिसऱ्या बायकोचे मानाजी व फत्तेसिंग. दमाजीच्या मरणसमयीं गोविंदराव हा पेशव्यांचे अटकेंत होता, हें मागें सांगितलेंच आहे. त्यानें पेशव्याच्या सर्व अटी कबूल करून आपल्या बापाची जागा व सेनाखासखेल हें पद मिळविलें. परंतु फत्तेसिंग यानें सयाजी हा वडील मुलगा असल्यानें त्याचा हक्क रुजू व्हावा याविषयीं खटपट चालविली. पेशवाईंतील सुप्रसिद्ध न्यायाधीश रामशास्त्री यांनीं दिलेल्या निकालावरून इ. स. १७७१ सालीं सयाजीस सेनाखासखेल ही पदवी मिळाली व फत्तेसिंग त्याचा मुतालीक बनला. यामुळें गोविंदराव व फत्तेसिंग यांत वैर जुंपलें. इतक्यांत राघोबास पेशवाई पद प्राप्त झाल्यामुळें त्यानें गोविंदरावास पुन्हा सेनाखासखेल हें पद दिलें व गोविंदरावानें आपला अंमल बसविण्यासाठीं बडोद्यास वेढा घातला. याचवेळीं पुण्यांत बारभाईचें कारस्थान होऊन राघोबा पदच्युत झाला. मदतीसाठीं दादा गोविंदरावाकडे आले, परंतु त्यांच्या पाठोपाठ पेशव्यांची फौज घेऊन सेनापति हरिपंत फडके हेहि चाल करून आल्याकारणानें गोविंदरावास बडोद्याचा वेढा उठविणें भाग पडलें. इकडे फत्तेसिंग व हरिपंत यांची सैन्यें एकत्र होऊन त्यांनीं महीतिरीं दादासाहेब व गोविंदराव यांचा पराजय केला. तेव्हां गोविंदराव पालनपूराकडे पळून गेला व राघोबादादा इंग्रजांचे आश्रयास गेला.

राघोबासह इंग्रजी फौज कर्नल कीटिंगच्या हाताखालीं गुजराथेंत उतरली व गोविंदरावाच्या विनंतीवरून त्यांनीं बडोदें घेण्याचें ठरविलें. तेव्हां कठिण प्रसंग जाणून फत्तेसिंगानें त्यांच्याशीं समेट केला व राघोबास पैसा व लष्कर यांची मदत करण्याचें अभिवचन दिलें. राघोबादादानें गोविंदरावास दक्षिणेंत जहागीर द्यावी व इंग्रज सरकारास या तहनाम्याच्या जामिनकीबद्दल भडोच व इतर परगण्यांचा वसूल द्यावा या अटी ठरल्या. या तहानें इंग्रजांचा पुष्कळच फायदा झाला.

पुरंदरच्या तहानें इंग्रज मराठे यामधील युद्ध थांबलें. त्या तहांत असें एक कलम होतें कीं, फत्तेसिंगास पेशव्यांच्या हुकुमावांचून कांहींहि देण्याघेण्याचा अधिकार नाहीं असें शाबीत झाल्यास फत्तेसिंगानें इंग्रजांस दिलेले मुलूख परत घ्यावे. फत्तेसिंगास पेशव्यांचें श्रेष्ठत्व अमान्य नव्हतें, परंतु

त्यांच्या संमतीवांचून कोणासही मुलूख तोडून देतां येणार नाहीं ही गोष्ट त्यास कबूल नव्हती. इंग्रजास भडोच वगैरे मुलूख मिळाला याबद्दल पुरंदरच्या तहाच्या आधारें फत्तेसिंगानें पुष्कळ तक्रार केली, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. इ. स. १७७८ मध्यें त्यानें ५ लक्ष रुपये नजराणा पेशव्यास देऊन सेनाखासखेलीची वस्त्रें मिळविलीं.

याच सालीं इंग्रज व मराठे यांच्यांत पुनः युद्ध सुरू झालें. इंग्रज सेनापति जनरल गॉडर्ड हा बहुतेक गुजराथ व्यापणार असें ओळखून फत्तेसिंगानें इंग्रजांशीं दोस्तीचा तह केला. ( २६ जानेवारी १७८० ). या तहानें फत्ते-सिंगानें तापीच्या दक्षिणेकडील मुलूख, भडोचचें उत्पन्न, नर्मदाकाठांवरील सिनोर हीं इंग्रजांचे हवालीं करावींत आणि त्यांस ३,००० स्वारांची मदत करावी असें ठरलें. इंग्रजांनीं फत्तेसिंगास मही नदीच्या उत्तरेकडील प्रदेश देण्याची, व त्याच्या राज्याचे संरक्षणाची हमी घेतली. अशाप्रकारें हा तह चढावाच्या व बचावाच्या स्वरूपाचा करण्यांत आला.

यावेळीं फत्तेसिंग अत्यंत सावधपणानें व मोठ्या कौशल्यानें राजकारणी डाव खेळत होता. इंग्रजांची फौज वरचढ आहे असें पाहून त्यानें इंग्रजांशीं दोस्ती केली. नाहीं तर इंग्रजांनीं हां हां म्हणतां बडोदें राज्य आक्रमण केलें असतें. पुढें सालबाईच्या तहांत फत्तेसिंगाजवळ असलेला सर्व मुलूख तसाच रहावा मात्र त्यानें पेशव्यास नियमित खंडणी द्यावी असें ठरलें. यानंतर मरेपर्यंत फत्ते-सिंगानें राज्य सुरळीत चालविलें ( १७८९ ).

फत्तेसिंगाच्या मृत्यूनंतर गोविंदरावानें आपणास बडोद्याचा कारभार मिळावा अशी पुणें दरबारास विनंति केली. परंतु ती विफल होऊन त्याचा भाऊ मानाजी यासच अधिकार मिळाला. पुढें महादजी शिंद्यानें मध्यस्ती करून पेशव्यांकडून मानाजीची नेमणूक रद्द करविली. त्यानें इंग्रजांकडे मदत मागितली. परंतु सालबाईच्या तहान्वयें इंग्रजांनीं या प्रकरणांत हात घाल-ण्याचें नाकारलें व पेशव्यांनीहि तसें करूं नये म्हणून खलिता पाठविला. इ. स १७९३ सालीं मानाजी वारल्यामुळें गोविंदराव एकटाच वारस होता तरी त्यास कांहीं करतां आलें नाहीं. नंतर गोविंदराव बडोद्यास गेला व थोडीशी चकमक होऊन सयाजीचा मुतालिक म्हणून सर्व राज्यकारभार त्याच्या हातांत आला.

आबा शेलूकर नांवाचा इसम पेशव्यातर्फें गुजराथेंत सुभेदार होता. त्यानें गायकवाडी मुलुखांत वसुलीसंबंधीं तंटा आरंभिला, परंतु गोविंद्रावानें कोणाच्याहि विरोधास न जुमानतां त्यास कैद् केलें. याच सुमारास पेशव्यानीं गुजराथच्या वसुलाचा भाग पांच वर्षाच्या करारानें गायकवाडास दिला. इ. स. १८०० मध्यें गोविंद्राव मरण पावला.

भावाभावांच्या भांडणांत तिऱ्हाइतांचें चांगलेंच फावतें ही गोष्ट सत्य आहे. इंग्रज व पेशवे यांनीं गायकवाडांतील गृहकलहामुळें बराचसा मुलूख व खंडणी उकळली. भाऊभाऊ जर समजुतीनें वागते तर गायकवाडांची सत्ता अबाधित टिकली असती.

गोविंद्रावाच्या मृत्यूमुळें राज्यांत बरीच दुही माजली. गोविंद्रावाचा मुलगा आनंद्राव नाकर्ता असल्यामुळें अनौरस पुत्र कान्होजी यानें गादी बळकावली. परंतु आनंद्रावाचा दिवाण रावजी अप्पाजी यानें इंग्रजांची मदत घेऊन कान्होजी व आनंद्रावाचा चुलता मल्हारराव यास हुसकून लाविलें. इंग्रजांनीं दोघांसहि कैदेंत ठेविलें.

इ. स. १८०२ सालीं रावजी अप्पाजीशीं इंग्रजांनीं एक खासगी गुप्त करारनामा करून, त्याच्या वंशजाच्या रक्षणाची हमी घेतली व गायकवाडावर तैनाती फौज लादली. प्रजा या प्रकाराबद्दल रावजीस घरभेद्या, स्वामिद्रोही म्हणूं लागली. परंतु इंग्रज म्हणतात कीं, त्यानें राज्याच्या हिताचा मार्ग स्वीकारला. इंग्रजांनीं अरब सैन्याचें वर्चस्व पगाराची बाकी मिटती करून नाहींसें केलें.

याच सुमारास पेशव्यानीं ब्रिटिशांशीं वसईचा तह करून त्यांत पेशवे व गायकवाड यांच्यांतील तंटे ब्रिटिशामार्फत तोडावे ही गोष्ट कबूल केली. वसईच्या तहानें तीन महत्वाच्या गोष्टींचा निकाल लागला. ( १ ) गायकवाड हे बडोद्याचे राज्यकर्ते ठरले. ( २ ) पेशव्यांची सत्ता चोहींकडून संपुष्टांत आली. ( ३ ) हिंदुस्थानच्या राजकारणांत इंग्रजांचें पूर्ण वर्चस्व प्रस्थापित झालें आणि ते ' म्हणतील तें धोरण व बांधतील तें तोरण ' ही गोष्ट सर्वांस सूर्यप्रकाशाइतकी उघड झाली. गायकवाडांच्या संरक्षणाची हमी घेऊन त्यांनीं मेजर वॉकर याची रेसिडेंट म्हणून बडोद्यास नेमणूक केली.

दिवाणपदाच्या बाबतींत रावजी नंतर त्याचा भाऊ बाबाजी व पुत्र सीताराम यांच्यांत तंटा लागला. आनंद्राव मतिमंद असल्यानें रेसिडेंट वॉकर यानें सर्वत्र

आपली छाप बसविली. 'रेसिडेंटचें सर्वांनीं ऐकावें' असें आनंदरावांनीं हुकूम काढून जाहीर केलें. आनंदरावास हाताशीं धरून रेसिडेंटनें काठेवाडांतील मांडलीक संस्थानिकांकडून यावयाच्या खंडणीची कायमची व्यवस्था लाविली. नवानगर, पोरबंदर, ओखामंडळ या भागांत माजलेली बंडाळी मोडली व चोहींकडे शांतता व सुव्यवस्था अंमलांत आणली. राज्याची व्यवस्था लागल्यामुळें इंग्रजांचे गायकवाडाकडे जें कर्ज होतें तें बहुतेक फिटलें होतें, तरी पण इंग्रजांनीं रेसिडेंट तसाच ठेवून दिला होता. वॉकरनें गायकवाडाच्या खासगी गोष्टींतहि ढवळाढवळ केली होती. गोविंदरावाचा दासीपुत्र मुकुंदराव व औरसपुत्र मुरारराव यास नेमणुका ठरवून दिल्या. सीताराम याचा दिवाणगिरी मिळविण्याबाबतचा अर्ज नामंजूर करून बाबाजीस दिवाणगिरी देवविली. इ. स. १८११ मध्यें कोडिनार गायकवाडास मोबदल्यांत मिळालें, परंतु तें फारसें महत्त्वाचें नाहीं.

सन १८१४ मध्यें काठेवाडची खंडणी व अहमदाबादच्या इजाऱ्याचा पट्टा जेव्हां पुरा झाला तेव्हां पेशव्यानें नवा करार करून देण्याचें नाकारलें इतकेंच नव्हे तर गायकवाडांना खंडणी देऊं नये असें काठेवाडांतील संस्थानिकांस अप्रत्यक्षपणें चिथविलें. या गोष्टींचा निकाल करण्याकरतां गायकवाडांनीं आपला दिवाण गंगाधरशास्त्री यास पुण्यास पाठविलें. त्याच्या संरक्षणाचा जिम्मा जरी इंग्रजांनीं घेतला होता तरी त्याचा पंढरपूर येथें खून झाला. इंग्रजांनीं या प्रकाराबद्दल पेशव्यास गायकवाडावरील सर्व हक्क सोडण्यास भाग पाडिलें. पुढें १८१८ त पेशव्यांचें राज्यच लयास गेल्यामुळें त्यांच्या सर्व देण्याघेण्यापासून गायकवाड मुक्त झाले.

गंगाधरशास्त्र्यांच्या खुनांत रावजीचा मुलगा सीताराम यांचें अंग असल्याचें उघडकीस आल्यावरून इंग्रजांनीं त्यास कैद केलें. इ. स. १८०६ मध्यें रीजंट म्हणून नेमलेला फत्तेसिंग आतां स्वतंत्रपणें वागूं लागला. इंग्रजांची सत्ता त्यास खपेना. त्यावेळचा रेसिडेंट कार्नाक यानें आपल्या पसंतीचा दिवाण नेमण्याबद्दल आग्रह धरला व लागलीच ही गोष्ट स्वतः अमलांत आणली. ओखामंडळांत याच वेळीं बंड झालें. तेव्हां अव्यवस्थेच्या सबबीवर इंग्रजांनीं सर्व ओखामंडळ (द्वारकेशिवाय) खालसा केलें व संस्थानिकांच्या खंडणीवसुलीचा अधिकारहि त्यांनीं बजाविण्यास सुरवात केली. पेशवाई अस्तंगत झाल्यावर

फिरून गायकवाडाशीं तह करून तैनाती फौजेच्या वाढीबद्दल बराच मुलूख इंग्रजांनीं हस्तगत केला.

या सर्व प्रकारावरून बडोद्याच्या राजकारणी लोकांत इंग्रजाविषयीं आदर नाहींसा झाला याच सुमारास आनंदराव ( १८१८ ) व फत्तेसिंग ( १८१९) दोघेहि मरण पावले व सयाजीराव दुसरे गादीवर आले. फत्तेसिंगाची बायको राधाबाई व तख्ताबाई यांनीं रीजंट होण्याचा प्रयत्न केला, परंतु सयाजीरावांनीं स्वतःच रीजंटचे अधिकार घेण्याचें ठरविलें. सयाजीराव हे अत्यंत हुषार व पाणीदार निघाले.

प्रजेला अत्यंत आवडते, अतिशय धूर्त, चाणाक्ष, दृढनिश्चयी, बाणेदार उद्योगी, स्वतःचे अधिकार बजावण्याविषयीं तत्पर, काटकसरी, न्यायी व नीतिमान् अशा प्रकारचे थोरले सयाजीराव असून त्यांनीं मोठ्या चातुर्यानें व मोठ्या चिकाटीनें आपले गेलेले हक्क ब्रिटिशांकडून पुनः मिळविले. आपलें सैन्य इंग्रजांनीं वापरल्याबद्दल कांहीं तरी रक्कम आपणास मिळावी अशी मागणी केली व संस्थानच्या अंतर्गत कारभारांत अतःपर ब्रिटिशांनीं हात घालूं नये असें मुंबईचे गव्हर्नर एलफिन्स्टन यास कळविलें.

इ. स. १८२०-२१ सालीं सयाजीराव व एलफिन्स्टन यांची जी भेट झाली तींत (१) कर्ज फेड करणें, (२) इंग्रजाशीं खुला व्यापार व व्यवहार ठेवणें, (३) परराष्ट्राशीं इंग्रजांच्या संमतीशिवाय व्यवहार न करणें या तीन अटी एलफिन्स्टनसाहेबांनीं पुढें केल्या व या पाळल्यास आपण गायकवाडींतील अंतर्गत कारभारांत हात घालणार नाहीं असें सांगितलें. सयाजीरावांनीं हें सर्व कबूल केलें. यावेळीं दौलतीस जवळजवळ एक कोटीचें कर्ज होतें. त्याबद्दल रेसिडेंट व सयाजीराव यांमध्यें बराच वादविवाद झाला. अखेरीस अर्ध्या रकमेबद्दल इंग्रज जिम्मेदार राहिले व अर्धी रक्कम सयाजीरावांनीं आपल्या खासगींतून द्यावी अगर सावकारांना राज्यांतील महाल लावून द्यावे असें इंग्रजांचें म्हणणें होतें. सयाजीरावांनीं शेवटपर्यंत लढा लढविला, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. कोर्ट ऑफ डायरेक्टर्सच्या खलित्यावरून एलफिन्स्टननें पुनरपि २० लाखांचें कर्ज गायकवाडावर उकरून काढिलें व इंग्रजांच्या सांगण्याप्रमाणें व्यवस्था अंमलांत न आणल्यास सर्व राज्याचा वसूल करण्याचें काम आपणास करावें लागेल अशी निकड लाविली. सयाजीरावांचा कारभारी वेणीराम यांस इंग्रजांनीं राज्यकारभारांतून काढून

टाकून विठ्ठल देवजीस दिवाण नेमिलें, ही गोष्ट सयाजीरावास आवडली नाहीं. कर्जाबद्दल नऊ महाल पांच वर्षांपुरतें इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेऊन कर्ज वारलें. तसेंच तैनाती फौजेकरितां पुनः कांहीं महाल आपल्या अधिकारांत घेतले.

याच सुमारास सर जॉन मालकम ह्यांच्या जागीं लॉर्ड क्लेअर हे मुंबईचे गव्हर्नर झाले. त्यांनीं सयाजीरावांशीं सलोख्याचें धोरण ठेवलें. त्यावर सयाजीरावांनीं आपल्या खासगींतून २५ लाखांची भरती करून दौलतीच्या कर्जदारांची फेड केली. त्यामुळें तारण घेतलेले नऊ परगणे क्लेअर यांनीं सयाजीरावास परत दिले. तरी पण बडोद्याच्या अंतर्गत व्यवहारांत मधून मधून हात घालण्याचें धोरण इंग्रजांनीं चालूंच ठेविलें होतें. इ. स. १८४७ सालीं सयाजीराव मृत्यू पावले. त्यांनीं सतीची चाल व गुलाम विकण्याची पद्धत बंद केली. एकंदरींत त्यांच्या कारकीर्दींत इंग्रजांनीं निरनिराळ्या सबबीवर जप्त केलेला मुलूख त्यांच्या प्रयत्नानें व जबर चिकाटीनें सोडविण्यांत आला व गायकवाडास आपला कारभार करण्याचें स्वातंत्र्य मिळालें.

सयाजीरावांच्या नंतर त्याचे तिघे मुलगे गणपतराव ( १८४७–१८५६ ), खंडेराव ( १८५६–१८७० ), व मल्हारराव (१८७०–७५ ) अनुक्रमें गादी-वर बसले. त्यांत खंडेरावांची कारकीर्द बरीच यशस्वी झाली. गणपतराव महाराजांच्या कारकीर्दींत सुप्रसिद्ध बी. बी. सी. आय्. रेलवे बांधली गेली. खंडेराव महाराज यांच्या कारकीर्दींत मर्दानी व मैदानी खेळास विशेष उत्तेजन मिळालें. यांनींच मकरपुरा राजवाडा बांधला; मौल्यवान् हिरे, जड-जवाहीर यांचा नमुनेदार संग्रह केला; चांदीच्या तोफा ओतल्या; त्याच-प्रमाणें शिकारीसाठीं एक राखीव जंगल ठेविलें. सध्यां साठमारीचे खेळ होतात तो अगडहि यांनींच बांधला. इ. स. १८५७ सालीं शिपायांच्या बंडांत महाराजांनीं ब्रिटिशाशीं राजनिष्ठ राहून बहुमोल मदत केली व तिची परतफेड म्हणून त्यांना दत्तक घेण्याचा हक्क व थोरल्या सयाजीरावांचे कारकीर्दींत बस-विलेली जादा ३ लाखांची खंडणी माफ करण्यांत आली. ता. २८ नोव्हेंबर १८७० सालीं खंडेराव महाराज मरण पावले व त्यांचे बंधु मल्हारराव हे गादीवर आले.

खंडेरावांच्या पश्चात् त्यांच्या पत्नी महाराणी जमनाबाईसाहेब या गरोदर होत्या. त्या प्रसूत होईपर्यंत मल्हारराव यांना रीजंट नेमण्यांत आलें. खंडेराव

महाराज व मल्हारराव यांचीं मनें एकमेकांबद्दल शुद्ध नसल्यामुळें जमनाबाई साहेबांच्या जिवास अपाय होण्याचा संभव होता. मल्हाररावांनीं तर त्यांच्यावर अनेक कुभांडें रचलीं. शेवटीं राजवाड्यांत राहणें सुरक्षित नाहीं असें समजून इ. स. १८७१ च्या मार्च महिन्यांत त्या रेसिडेंट कर्नल बारसाहेब यांच्या आश्रयास जाऊन राहिल्या. ता. ५ जुलै १८७१ रोजीं त्या प्रसूत होऊन कन्यारत्न झालें. त्या प्रिन्सेस ताराराजे होत. पुत्र झाला असतां तर खंडेराव महाराजांच्या मागून त्यांसच बडोद्याची गादी मिळाली असती; पण तशा प्रकारचा योगायोग नसल्याकारणानें मल्हाररावास आतां राज्याचा पुरा अधिकार मिळाला. परंतु ते भोळे भाबडे व उतावळ्या स्वभावाचे असल्याकारणानें स्वार्थसाधु व खुशामती लोकांस ही अनायासें एक संधिच प्राप्त झाली. खंडेरावांच्या पक्षाच्या लोकांचा पुरा नायनाट करण्याचा त्यांनीं जणूं काय विडाच उचलिला ! खंडेरावांचा दिवाण भाऊ शिंदे यांस ताबडतोब कारागृह दाखविण्यांत आलें आणि तुरुंगांतच त्यांचा अंत झाला. ज्यांनीं मल्हाररावांचा हुकूम जुमानला नाहीं त्यांना भर चवाठ्यावर फटक्यांच्या शिक्षा देण्यांत आल्या. याबद्दल इंग्रजाकडे पुष्कळ बोभाटे गेले. खुशामती लोक दूर करून चांगला हुशार मनुष्य दिवाण नेमावा म्हणून सूचना झाल्या. इ. स. १८७३ च्या मार्च महिन्यांत कर्नल बारच्या जागीं कर्नल रॉबर्ट फेअर हा रेसिडेंट म्हणून बडोद्यास आला. त्यानें राज्यांतील अव्यवस्थेबद्दल मल्हाररावांची सडकून कानउघाडणी केली व हिंदुस्थानसरकारासहि बडोद्याच्या राज्यकारभारांत हात घालावा अशी सूचना केली. तेव्हां हिंदुस्थानसरकारनें कर्नल रिचर्ड मीड ( अध्यक्ष ), मि. रेवेन्स्क्राफ्ट, नबाब फैझअल्लीखान व कर्नल एथरिज यांचें कमिशन नेमिलें. कमिशननें बडोद्यांतील अंदाधुंदी, जुलूमजबरी व बेजबाबदारीचें रसभरीत वर्णन करून वरिष्ठ सरकारकडे रिपोर्ट सादर केला. त्यावरून व्हाईसरॉय लॉर्ड नार्थब्रूक यांनीं मल्हाररावास एक खरमरीत पत्र लिहून राज्याची सुधारणा करण्याविषयीं फर्माविलें व यांत कसूर झाल्यास ब्रिटिश सरकारास कारभारांत हात घालणें भाग पडेल अशी धमकी दिली; आणि ब्रिटिश सरकारच्या पसंतीचा दिवाण नेमण्यास सुचविलें, व सुधारणा घडवून आणण्यासाठीं १८ महिन्यांची मुदत दिली. आतां बाजू अंगावर येते असें पाहून मल्हाररावांनीं सुधारणा करण्याचा प्रयत्न चालविला. पूर्वीचे दिवाण

नाना खानवेलकर यांना कमी केलें व सुप्रसिद्ध दादाभाई नौरोजी या पारशी गृहस्थांना दिवाण नेमलें ( ४ ऑगस्ट १८७४ ). परंतु आपल्या सल्लयानें त्यांना नेमण्यांत आलें नाहीं याचा रेसिडेंटास राग आला. ' नवीन दिवाणांना बडोदें संस्थानची सुधारणा करतां येणें अशक्य आहे ' असें आपलें मत रेसिडेंटनें वरिष्ठ सरकारास कळविलें. याच-सुमारास मूल नाहीं या सबबीवर मल्हाररावांनीं लक्ष्मीबाई नांवाच्या अकुलीन स्त्रीशीं दुसरें लग्न केलें. परंतु रेसिडेंटनें लग्नास येण्याचें नाकारलें. म्हणून ता. २ नोव्हेंबर १८७४ रोजीं मल्हाररावांनीं हिंदुस्थान सरकारकडे रेसिडेंटास परत बोलावण्याबद्दल लिहिलें. फेअर यास बदलून त्याचे जागीं सर ल्युइ पेली के. सी. एस्. आय. याची स्पेशल कमिशनर व हिंदुस्थानसरकारचे एजंट म्हणून नेमणूक करण्याचें आधींच ठरलें होतें व त्याप्रमाणें ते बडोद्यास येऊन दाख-लहि झाले होते. ता. ९ रोजीं फेअरसाहेब यांनीं प्यालेल्या सरबतांत अर्सेनिक व हिरकणी यांचा थर प्याल्याच्या तळाशीं बसलेला रेसिडेन्सी डॉक्टरचे नजरेस आला. परंतु रेसिडेंटास अपाय मात्र झाला नाहीं. आजारांतून बरा झाल्यावर कर्नल फेअर आपल्या कामाचा चार्ज सर ल्युइ पेली यास देऊन निघून गेला. यानंतर ब्रिटिशांच्या गुप्त पोलिसांनीं रेसिडेन्सींतल्या दोघां नोक-रांकडून रेसिडेंटास विष घालण्याबद्दल मल्हाररावांकडून मोठा लांच घेतल्याचा कबुलीजबाब लिहून घेतला व सर्व प्रकरण हिंदुस्थानसरकारकडे पाठविलें.

ता. १४ जानेवारी १८७५ रोजीं हिंदुस्थानसरकारनें मल्हाररावांस कैद केल्याचें जाहीर केलें व त्यांना ब्रिटिश सैन्याच्या पाहाऱ्यांत ठेवण्यांत आलें. संस्थानी सैन्याच्या बेशिस्त वर्तनाबद्दल सैन्याधिकारी जनरल डेवीन यास जबाबदार धरण्यांत येईल अशी त्यास सक्त ताकीद देण्यांत आली. सैन्याची मागील सर्व बाकी मात्र चुकती करण्यांत आली. नाना खानवेलकर व दामोदर-पंत यांनाहि अटक करण्यांत आली.

रेसिडेंटास विषप्रयोग केल्याच्या आरोपाची चौकशी करण्यासाठीं ब्रिटिश सरकारनें सर रिचर्ड कूच ( चीफ जस्टिस बंगाल ) यांच्या अध्यक्षतेखालीं एक चौकशी कमिशन नेमिलें. त्यांत सर रिचर्ड मीड, मि. पी. एस. मेलविल, ग्वालेरचे महाराज जयाजीराव शिंदे, जयपूरचे महाराज व राजा सर दिनकर-राव राजवाडे वगैरे सभासद होते. मल्हाररावांच्यातर्फे सार्जंट बॅलेंटाइन, सॉलिसिटर यांना वकीलपत्र घेण्यास ब्रिटिश सरकारनें परवानगी दिली व

त्याकरतां ७,५०० पौंड खर्चहि मंजूर केला. कमिशनपुढें जो पुरावा आला तो अत्यंत असमाधानकारक व परस्परविरोधी होता. साक्षीदारांच्या जबानींत धरसोड व परस्पर ताळमेळ नाहीं असें दिसून आलें. ब्रिटिश कमिशनर्सनीं मल्हाररावाचा रेसिडेंटास विषप्रयोग करण्याचा हेतु होता असें मत दिलें, तर हिंदी कमिशनर्सनीं तसा आरोप शाबीत धरतां येत नाहीं असें जाहीर केलें. याचवेळीं महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं हिंदुस्थान सरकारास अर्जद्वारें विनंति केली कीं, महाराणी व्हिक्टोरिया यांच्या जाहीरनाम्यान्वयें खंडेराव महाराजांस ( आपल्या पतीस ) दत्तक घेण्याचा हक्क मिळाला होता, परंतु त्याचा उपयोग त्यांना करून घेतां आला नाहीं; तरी या बाबतींत दत्तक घेण्याचा अधिकार स्वतःला ( म्हणजे जमनाबाईसाहेब यांना ) मिळावा. हिंदुस्थानसरकारनें यावर स्टेट सेक्रेटरी लॉर्ड साल्सबरी यांस बडोदें राज्यांत गोंधळ व बखेडा माजविल्याबद्दल मल्हाररावांना गादीवरून काढून खंडेराव महाराजांच्या पत्नी महाराणी जमनाबाईसाहेब यांच्या मांडीवर कोणी तरी दत्तक देण्यांत यावा अशा प्रकारची शिफारस केली. स्टेट सेक्रेटरीकडून तशा प्रकारची मंजुरी मिळाल्यावरून ता. १९ एप्रिल १८७५ रोजीं सरकारनें जाहिरनामा काढून मल्हाररावास राज्यावरून दूर केल्याचें व त्यांच्या वंशाचा हक्क नष्ट केल्याचें सर्व लोकांस कळविलें आणि लागलीच तीन दिवसांनीं त्यांना मद्रासेकडे नेण्यांत आलें. रेसिडेंट सर ल्युइ पेली यानें बडोद्यांतील प्रमुख सरदार, मानकरी, मुत्सद्दी, व्यापारी यांस एकत्र जमवून इंग्लिश सरकारचा हुकूम व जाहीरनामा वाचून दाखविला आणि संस्थान खालसा करण्याबद्दलच्या सर्व अफवा निराधार असल्याचें सर्वत्रांस कळविलें. तरी पण ता २८ एप्रिल रोजीं बडोद्यांत दंगेधोपे झालेच. असिस्टंट रेसिडेंट कॅप्टन जॅकसन व सेनापति जनरल डेवीन याजवर हल्ले झाले. ब्रिटिश शिपाई आणून सर रीचर्ड मीडनें सर्व स्थिरस्थावर केली व मल्हाररावाच्या दोन्ही राण्यांस मुंबईस पाठविलें. ता. २ मे १८७५ रोजीं महाराणी जमनाबाईसाहेब यांना बडोद्यास आणण्यांत आलें आणि सर टी. माधवराव यांस दिवाण नेमून राज्याची कुलमुखत्यारी दिली. त्यानंतर महाराणी जमनाबाईसाहेब यांच्या मांडीवर एखादा मुलगा दत्तक घेण्याचें काम ब्रिटिशसरकारकडून सर टी. माधवराव व खुद्द महाराणीसाहेब यांच्या पसंतीवरच सोंपविण्यांत आलें व नवीन राजवट सुरू झाली.

## २. बालपण

मल्हारराव महाराजांच्या कारकीर्दींत राज्यांत बराच गोंधळ माजला होता. परंतु ‘ धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ’ अशी ग्वाही देणारा भगवान् जणूं द्रवला आणि त्यानें वटोदरस्थ समाजाची विस्कळीत झालेली घडी पुनरपि नीट बसविण्यासाठीं एका तेजस्वी, दैदीप्यमान् व पराक्रमी बालकाची या कामीं योजना केली. हें बालक दुसरें तिसरें कोणी नसून हल्लींचे बडोद्याचे महाराज श्रीमंत सयाजीराव हे होत. आजमितीस त्यांचें नांव उत्तम राज्यकर्ते, सुधारणांचे निस्सीम भोक्ते, शिक्षणाचे अध्वर्यु, स्वातंत्र्यदेवतेचे उपासक म्हणून आसेतुहिमाचल दुमदुमत आहे. त्यांच्या आयुष्यांत रोमांचकारक प्रसंग आहेत, सुवर्ण महोत्सवा ( Jubilee ) सारखे आनंदातिशयाचे प्रसंग आहेत, मनोधैर्य कसोटीस लावणारे प्रसंग आहेत, राजकारणांत उद्भवणाऱ्या अडचणीचे प्रसंग आहेत. कौटुंबिक आपत्ति व मानसिक व्यग्रतेचे प्रसंग आहेत, सर्व कांहीं आहे. परंतु लोकोत्तर, आदर्शवत् व भरतभूला ललामभूत नृपति म्हणून त्यांच्या चरित्राचें प्रत्येकानें किती मनन करण्यासारखें आहे व मनोन्नति व समाजोन्नति करणारांस त्यांचें चरित्र कितपत मार्गदर्शक आहे, हें दाखविण्याचा प्रस्तुत चरित्रपर लेखाचा उद्देश आहे.

श्रीमंत सयाजीराव महाराजांचा जन्म १७ मार्च १८६३ रोजीं नाशिक जिल्ह्यांत मनमाडपासून सुमारें १८ मैलांवर असलेल्या कवळाणें नांवाच्या गांवीं झाला. बहुधा महापुरुषाचा जन्म असाच खेडेगांवांतील झोपडींत अगर रानावनांत झालेला असतो. सयाजीराव हे गायकवाड घराण्यांतील सुप्रसिद्ध दमाजी गायकवाड यांच्या प्रतापराव नांवाच्या भावापासून पांचव्या पिढींतील काशीराव गायकवाड यांचे द्वितीय चिरंजीव होत. दमाजीनें आपला भाऊ प्रतापराव यास खानदेशांतील एका स्वारींत मिळविलेली ४७ गांवें देऊन त्यांची व्यवस्था करण्यासाठीं ठेविलें होतें. परंतु हीं गांवें पेशव्यांनीं आपल्या ताब्यांत घेऊन त्या ऐवजी नवसारी प्रांताचा कांहीं भाग गायकवाडास दिला. या कारणानें प्रतापरावाचे वंशजांस यापुढें निव्वळ शेतीवर उपजीविका करून रहावें लागलें व बडोद्याच्या गायकवाडांस त्यांची आठवणहि राहिली नाहीं. सयाजीराव महाराज यांचे वडील काशीराव यांची स्थिति श्रीमंतींची नव्हती; परंतु तें कुटुंब कवळाणें गांवीं कुलीन,

अब्रूदार, खाऊनपिऊन सुखी म्हणून मानलें जात असे. काशीराव यांचा स्वभाव अतिशय मायाळू व दिलदार; 'अंतरीं निर्मळ, वाचेचा रसाळ'; आणि बोली गोड व वागणूक सौजन्याची. उत्तम व नामांकित पेहेलवान म्हणून त्यांची सर्वत्र ख्याति पसरलेली होती, परंतु खेडेगांवांतील परिस्थितीमुळें त्यांस शिक्षण मिळालेलें नव्हतें.

काशीरावांचे दोघे बंधु उखाजी व सखारामराव यांनीं गरिबीस कंटाळून व बडोद्याच्या गायकवाडाशीं असलेलें आपलें नातें लक्षांत घेऊन, बडोद्यास जाऊन महाराजांची भेट घेण्याचा निश्चय केला. त्यावेळीं खंडेराव महाराज गादीवर होते. उखाजीनें त्यांची भेट घेतली व महाराजांनींहि त्यांचा चांगल्या तऱ्हेनें मानमतराब ठेविला. परंतु दुर्दैवानें उखाजीस प्रत्यक्ष कांहीं मदत मिळण्यापूर्वींच खंडेराव महाराज निवर्तले. मल्हारराव गादीवर आल्यावर पुनरपि उखाजीनें त्यांची भेट घेतली व त्यांनींहि त्यास पोषाख देऊन भरदरबारांत उखाजीचा बहुमान करण्याचा विचार ठरविला; परंतु उखाजीनें हा मान आपला वडीलभाऊ काशीराव यास मिळावा अशी इच्छा दर्शविल्यावरून मल्हारराव यांनीं काशीराव यास आणवून पोषाख व थोडे पेन्शन देऊन त्याची बोळवण केली.

काशीरावास आनंदराव, गोपाळराव व संपतराव असे तीन पुत्र होते. त्यापैकीं आनंदराव हे गोपाळरावाहून पांच वर्षांनीं वडील व संपतराव हे २ वर्षांनीं लहान. गोपाळराव म्हणजे प्रस्तुत लेखाचे चरित्र नायक श्रीमंत सर सयाजीराव गायकवाड, बडोद्याचे महाराज होत. त्यांच्या लहानपणाची हकिकत आजमितीस फारशी उपलब्ध नाहीं, व त्यांनाहि आपलें बालपण फारसें स्मरत नाहीं. इ. स. १९२६ सालीं जेव्हां महाराज बडोद्याहून प्रथम आपल्या मूळगांवीं आले त्यावेळीं त्यांस पूर्वीं बालपणांत ज्या गोष्टी फार मोठ्या व भव्य होत्या असें वाटत होतें त्या अगदीं लहान दिसूं लागल्या. जेथें पूर्वीं मोकळें मैदान होतें तेथें गायकवाड घराण्यांतील निरनिराळ्या लोकांनीं बांधलेलीं घरें दिसून आलीं. लहानपणापासून सयाजीराव महाराज अत्यंत चलाख, पाणीदार, तेजस्वी असल्यामुळें हे पुढें मोठे भाग्यशाली निपजतील असें सर्वत्रांस वाटत असे. भाग्यवान् पुरुषाचे गुण त्याच्या बाल्यावस्थेंतच दृग्गोचर होतात. तीच गोष्ट सयाजीरावांची. अर्थात् त्यांच्या बालपणाचें मातापितरांस विशेष कौतुक वाटत असल्यास नवल काय ?

इ. स. १८७५ सालीं महाराणी जमनाबाईसाहेब यांच्या मांडीवर दत्तक देऊन त्या मुलास राज्याधिकार देण्याचें इंग्रजसरकारनें विलायत सरकारच्या सल्याबरहुकूम ठरविलें आणि दत्तकाची निवड करण्याचें नाजूक व महत्त्वाचें काम महाराणीसाहेबावर सोपविण्यांत आलें हें मागें सांगितलेंच आहे. खुद्द बडोद्यास गायकवाड घराण्यापैकीं सदाशिवराव, मुरारराव, गणपतराव, खंडेराव असे चौघेजण परंतु सुमारें २३–२४ वयाचे कुमार होते. इंग्रज सरकारची इच्छा[1] अशी होती कीं, फार मोठा मुलगा राज्यावर न बसवतां एखादा लहानसा मुलगा निवडल्यास कांहीं वर्षें त्याच्या अज्ञानपणांत मुखत्यारीचीं जाऊन राज्यांत सुव्यवस्था स्थापन करण्यास ठीक पडेल व त्या मुलासहि चांगलें शिक्षण देऊन राज्यकारभारास योग्य करतां येईल. त्यामुळें हे कुमार नापसंत करण्यांत आले. याशिवाय कांहीं कुमार नाशिक व खानदेश जिल्ह्यांतहि होते. अर्थात् दूरवर दृष्टी पोंचवून मुलाची निवड करण्याचें काम किती अवघड होतें हें यावरून दिसून येईल.

'न रत्नं हि अन्विष्यति मृग्यते हि तत्' असें एका विख्यात कवीचें अर्थपूर्ण वचन आहे. त्यास अनुलक्षूनच कीं काय गायकवाड घराण्यांतील कुमाररत्नांची चौकशी करण्यासाठीं याच वेळीं एक पोलीस पार्टी अकस्मात् कवळाणें गांवीं आली व त्यांनीं गायकवाड आडनांवाच्या सर्व पुरुषमंडळींची चौकशी करून काशीराव व त्याचीं तीन मुलें यांस नाशिक येथें आपल्याबरोबर नेलें. तेथें कर्नल एथरिज यानें त्यास बडोद्याचे मल्हारराव महाराज यास पदच्युत केलें असून गायकवाड घराण्यांतील एखादा योग्य मुलगा दत्तक घ्यावयाचा आहे व त्याकरतां ही चौकशी चालू असल्याचें कळविलें.

कवळाणें येथील गायकवाडांचा बडोद्याच्या गायकवाडाशीं कांहीं संबंध आहे किंवा काय या संबंधी बरीच चौकशी करण्यांत आली. नाशिक येथें 'प्रेसकॉट' नांवाच्या पोलिस अंमलदारानें तेथील उपाध्यायांच्या चोपड्यांतून यासंबंधानें कांहीं माहिती मिळविली व काशीराव आणि त्याचे तीन मुलगे, यांचा तसा निकट व जवळचा संबंध असल्याचें निदर्शनास आल्यावरून त्या सर्वांस बडोद्यास नेण्यांत आलें. याच वेळीं उखाजी व त्याचा मुलगा दादासाहेब हे बडोद्यासच होते. यावेळीं काशीरावाचे तीन मुलगे व उखाजीचा मुलगा अशा चार

१ राईस, प्रथम खंड पृ. ३१.

मुलांतून निवड व्हावयाची होती. बडोद्यास असलेले इतर गायकवाड घराण्यांतील कुमार नापसंत करण्यांत आलें. अखेरीस काशीरावांच्या तीन मुलांपैकीं मधले गोपाळराव यांस ता. २७ मे १८७५ रोजीं पसंत करून 'सयाजीराव' या नांवानें दत्तक घेण्याचें ठरलें. यावेळीं गोपाळरावांचें वय १३ वर्षांचें होतें.

यासंबंधानें अशी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे कीं, महाराणी जमनाबाई साहेब यांनीं काशीरावांच्या तिघां मुलांस 'तुम्हांस येथें कां आणण्यांत आलें हें ठाऊक आहे काय ?' असा प्रश्न विचारला असतां सर्वांत वडील आनंदराव यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं; कनिष्ठ संपतराव यांनी 'मला माहीत नाहीं असें सांगितलें, परंतु गोपाळराव यांनीं चटकन् 'मी राजा होण्यासाठीं आलों' असें चुणचुणीत उत्तर दिलें. दुसरी एक गोष्ट अशी सांगतात कीं, तिन्ही मुलांना खिरीच्या वाट्या देण्यांत आल्या त्यावेळीं गोपाळरावांनीं नेमकी सुवर्णाची वाटीच आपल्या वाट्यास घेतली. भोजनाचे वेळीं महाराणी जमनाबाईसाहेब ज्या पद्धतीनें जेवतात, त्याकडे लक्ष ठेवून गोपाळरावांनींहि तीच रीत उचलली. या सर्व गोष्टींवरून हीं राजचिन्हें आहेत असें महाराणीसाहेबांनीं जाणून गोपाळरावानांच दत्तक घेण्याचें निश्चित केलें असें म्हणतात.

मल्हारराव महाराजांस धरून नेल्यानंतर ता. २ मे १८७५ रोजीं महाराणी जमनाबाई साहेब यानीं मोतीबाग राजवाड्यांत प्रवेश केला. यावेळीं ब्रिटिश सरकारनें बडोदें संस्थानचा राज्यकारभार सुरळीतपणें हाकण्यासाठीं अत्यंत लायक व कर्तबगार दिवाणाची योजना केली होती. हे दिवाण दुसरे तिसरे कोणी नसून प्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी सर टी. माधवराव हे होत. अव्वल ब्रिटिश अमदानींत सर सालरजंग, राजा सर दिनकरराव राजवाडे, सर जंगबहादूर व सर टी. माधवराव हे त्यावेळीं साडेतीन शहाणे म्हणून गाजत होते.

सर टी. माधवराव यांचा जन्म इ. स. १८२८ सालीं मद्रास इलाख्यांत तंजावर येथें झाला. मद्रास येथील कॉलेजांत त्यांचें शिक्षण होऊन ते कांहीं दिवस युनिव्हर्सिटी प्रोफेसर होते. नंतर त्यांची त्रावणकोर संस्थानचे दिवाण म्हणून नेमणूक झाली. तेथें त्यांनीं एकंदर १४ वर्षें प्रधानपदाच्या अधिकाराचा उपभोग घेतला. त्या राज्यांतहि त्यांनीं पुष्कळ सुधारणा केल्या. त्या नंतर दोन वर्षें इंदूर संस्थानचे दिवाण म्हणून त्यांनीं काम केलें व आतां खुद्द ब्रिटिश

सरकारनें आपल्या खास विश्वासांतील लायक इसम म्हणून इंदूर सरकार-कडून मागून घेऊन त्यांची बडोद्याच्या दिवाणगिरीवर नेमणूक केली.

सर टी. माधवरावांच्याच सल्ल्यानें महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं काशीरावाच्या तिघां मुलांना बडोद्यास आणविलें. त्यापैकीं, हुषारी, पाणीदार-पणा, बुद्धिमत्ता, समयसूचकता वगैरे बाबतींत मधले पुत्र गोपाळराव यांच्या भाषणाची व वागणुकीची महाराणी जमनाबाईसाहेबावर उत्तमप्रकारें छाप बसली, व ताबडतोब त्यांनीं गोपाळरावासच दत्तक घेण्याचें ठरविलें, आणि ह्या गोष्टीची खबर एजंटसाहेबास दिली. ता २७-५-१८७५ रोजीं सुमुहूर्तानें गोपाळरावास विधिपूर्वक दत्तक घेऊन मोठा दरबार भरवला. त्यावेळीं सर्व सरदार, दरखदार, असामदार, सरकारी ऑफिसर्स, शेटसावकार, वगैरे हजर असून ब्रिटिश सरकारचे एजंट सर रीचर्ड मीड हेहि उपस्थित होते. एजंट साहेबांनीं आपल्या भाषणांत गोपाळरावांचें अभिनंदन करून ब्रिटिश सरकारनें त्यांस तिसरे सयाजीराव, बडोद्याचे महाराज म्हणून गादीवर बसविल्याचें जाहीर केलें. याप्रमाणें गोपाल हा खरोखरच ‘ गोपाल ’ म्हणजे ‘ पृथ्वीपाल ’ झाला. नंतर तोफांची सलामी, नजराणे होऊन दरबार बरखास्त झाला. रेसिडेंटनें महाराणी जमनाबाईसाहेब यांची गांठ घेऊन सयाजीरावांच्या शिक्षणाची व एकंदर राज्याची व्यवस्था सर टी. माधवराव यांचे सल्ल्यानें करावी असें सुचविलें. ता २९ रोजीं बडोद्यांतील प्रमुख देवालयांत जाऊन महाराजांनीं देवतांचें दर्शन घेतलें व रेसिडेंट साहेबांची सरकारी व सार्वजनिक रीत्या भेट घेतली. अशा रीतीनें महाराजांच्या १२ व्या वर्षींच त्यांस राजपद प्राप्त झालें व त्यांच्या आयुष्यांत विलक्षण स्थित्यंतर घडून आलें.

---

## ३. विद्यार्थी दशा

सयाजीरावांच्या शिक्षणाला ता. ७ जून १८७५ रोजीं प्रारंभ झाला. त्या दिवशीं सरस्वतीचें पूजन करून त्यांस केशवराव पंडित व भाऊ मास्तर यांच्या स्वाधीन करण्यांत आलें. सरकार वाड्याच्या वरच्या मजल्यावर त्यांची शाळा करण्यांत आली. आणि तेथें दोघेहि शिक्षक आळीपाळीनें त्यांस सुमारें ५ तास शिक्षण देत असत. यावेळीं त्यांच्याबरोबर त्यांचे धाकटे बंधु संपतराव व चुलतभाऊ दादासाहेब यांचें शिक्षण चालू होतें.



श्री. महाराज, श्री. महाराणी जमनाबाई व श्री. ताराराजे.

आरंभीं फक्त मराठी भाषाच शिकविण्यांत येत असे. नंतर कांहीं दिवसांनीं गुजराती व ऊर्दू भाषांचाहि अभ्यास सुरू करण्यांत आला.

रेसिडेंट सर रिचर्ड मीड यांचेंहि महाराजांच्या शिक्षणाकडे लक्ष्य होतेंच. सरकार वाड्यांतील जागा व तेथील भोंवतालचें वातावरण हीं महाराजांच्या शिक्षणास अनुकूल नव्हती. यामुळें सरदार व इतर मोठे कामगार यांचीं महाराजांच्याच वयाचीं मुलें एकत्र करून त्यांस शिक्षण देणारी राजपुत्रांची एक शाळा असावी व तिचा प्रिन्सिपॉल एखादा अनुभवशीर व तज्ज्ञ युरोपियन असावा असें रेसिडेंटसाहेबांनीं मुंबई सरकारास कळविलें. ही सूचना मान्य होऊन ती अंमलांत आणावयाचें काम नंतरचे रेसिडेंट मेलविलसाहेब यांनीं पार पाडलें.

उत्तम, कार्यक्षम, व कर्तबगार विद्यार्थी निपजावयास ज्या अनुकूल साधनांची जरूर असते त्यामध्यें विद्यादान करणाऱ्या गुरूची भूमिका अत्यंत जबाबदारीची व महत्त्वाची असते. श्रीशिवछत्रपतींचा उदय होण्यास राजमाता जिजाबाई व गुरु दादोजी कोंडदेव यांचें शिक्षणच कारणीभूत झालें. तद्वतच श्रीमंत सयाजीराव यांचे पहिले गुरु व नंतरचे गुरु मि. इलियटसाहेब यांनीं सयाजीरावांच्या शिक्षणासंबंधी अत्यंत प्रशंसनीय, कळकळीची व आस्थापूर्वक मेहनत किती घेतली हें पुढें समजेलच.

महाराजांच्या शिक्षणास सुरवात झाल्यावर, नोव्हेंबर महिन्यांत प्रिन्स ऑफ-वेल्स ( सातवे एडवर्ड ) यांचें हिंदुस्थानांत आगमन झालें व तन्निमित्त एक दोन महिने महाराजांचें शिक्षण बंदच होतें. रेसिडेंट सर रिचर्ड मीड, महाराणी जमनाबाईसाहेब, व महाराज दिवाणसाहेबासमवेत आक्टोबर २५ रोजीं मुंबईस येऊन दाखल झाले. युवराजांच्या स्वागतासाठीं व्हाइसरॉय लॉर्ड नॉर्थब्रूक हेहि मुंबईस आले होते. त्यांच्या आणि महाराणी जमनाबाईसाहेब व महाराज यांच्या मुलाखतीहि झाल्या. ता. ९ नोव्हेंबर रोजीं जेव्हां युवराज मुंबई मुक्कामीं येऊन दाखल झाले तेव्हांहि श्रीमंत सयाजीराव यांच्या व त्यांच्या शिरस्त्याप्रमाणें भेटी व परतभेटी झाल्या. युवराजांनीं महाराजांस एक तरवार, चाबूक, रत्नजडित तपकिरीची डबी व एक आंगठी इतक्या वस्तु भेटीदाखल दिल्या आणि बडोद्याच्या सैन्याचीहि पहाणी केली.

यानंतर एकाएकी युवराजांचा बडोद्यास भेट देण्याचा विचार ठरला. त्यामुळें त्यांचें स्वागत करण्यासाठीं महाराजांची स्वारी मोठ्या तांतडीनें

बडोद्यास आली व स्वागतसमारंभाची जंगी तयारी सुरू झाली. ता. १९ रोजीं युवराज बडोद्यास उपस्थित झाले त्यावेळीं महाराज, सर टी. माधवराव, नवीन रेसिडेंट पी. एस्. मेलविलसाहेब यांनीं त्यांचें स्टेशनवर चांगलें स्वागत केलें. नंतर प्रिन्स साहेबांची सोन्याच्या अंबारींतून खास सरकारी हत्तीवरून मिरवणूक काढण्यांत आली. रेसिडेन्सींत पानसुपारी, हारतुरे वगैरे समारंभ होऊन महाराजांनीं युवराजांची रजा घेतली. दुपारीं युवराजांनीं सरकारी रीत्या महाराणी जमनाबाईसाहेब व सयाजीराव महाराज यांची मोतीबाग राजवाड्यांत भेट घेतली. या प्रसंगीं साठमारी, कुस्त्या, बैलांच्या टकरा वगैरे खेळ त्यांच्या स्वागतासाठीं मुद्दाम करण्यांत आले होते ते युवराजांनीं पाहिले. ता. २० नोव्हेंबर रोजीं युवराजांनीं चित्त्याची शिकार केल्यानंतर मोतीबाग राजवाड्यांत त्यांस मोठ्या थाटाची मेजवानी देण्यांत आली. त्यावेळीं उत्तरादाखल भाषण करतांना युवराजांनीं आपलें चांगलें स्वागत केल्याबद्दल महाराजांचे आभार मानले व महाराजांनीं शिक्षणांत उत्तरोत्तर प्रगति करून आपल्या संस्थानाची सर्वांगीण सुधारणा पुढें घडवून आणावी अशी आशा प्रदर्शित केली. युवराज साहेबांचें भविष्य आजमितीस तंतोतंत खरें ठरलें, हें महाराजांच्या आतांपर्यंतच्या उज्वल कारकीर्दीवरून आपणास स्पष्ट दिसत आहे.

जमनाबाईसाहेबांनीं युवराजांच्या पत्नीस आपल्या जवाहीरखान्यांतील एक रत्नजडित मोत्यांचा हार व एक जडावाचा कंठा असे दोन जुने मौल्यवान् अलंकार नजर केले.

याप्रमाणें मेजवान्या, दरबार, भाषणें, शिकार, नजराणे वगैरे आगतस्वागताचे सर्व शिष्टसंमत प्रकार व पाहुणचार घेऊन युवराजांची स्वारी ता. २३ नोव्हेंबर रोजीं रात्रीच्या गाडीनें मुंबईकडे रवाना झाली.

राज्यकर्त्याला आवश्यक असें शिक्षण देण्यासाठीं एखादा युरोपियन शिक्षक महाराजासाठीं नेमण्याची योजना मुक्रर झाली. रेसिडेंट मेलविलसाहेब यांनीं त्यांचे एक मित्र रत्नागिरीचे डिस्ट्रिक्ट जज्ज मि. एच्. एम्. बर्डवुड यांची या बाबतींत सल्लामसलत घेतली. बर्डवुडसाहेबांनीं मद्रासच्या पूर्वीच्या ॲक्टिंग गव्हर्नरचे चिरंजीव एफ्. ए. एच् इलियटसाहेब I. C. S. यांचें नांव सुचविलें. इलियटसाहेबांनीं कांहीं दिवस रत्नागिरीस ॲसिस्टंट कलेक्टरचें व वऱ्हाडच्या शाळाखात्याच्या डायरेक्टरचें काम केलें होतें. मेलविलसाहेबांना ही सूचना

मान्य झाली व इलियट साहेबांस महाराजांचे शिक्षक नेमण्यांत आलें. ता.१२ डिसेंबर १८७५ रोजीं ते बडोद्यास येऊन दाखल झाले.

इलियटसाहेब आल्यानंतर महाराज, त्यांचे बंधु, चुलतबंधु व इतर कांहीं सरदारांची मुलें यांच्या शिक्षणक्रमास नियमितपणें सुरुवात झाली. परंतु १८७६ च्या अखेरपर्यंत शिक्षण प्राथमिकच होतें. इलियटसाहेब लिहितात, 'शिक्षणाचा प्रारंभ मी अत्यंत सावकाशपणेंच केला; कारण पुष्कळ गोष्टी महाराजांच्या मनावर बिंबविण्याच्या होत्या.' सर टी. माधवराव लिहितात, 'महाराजांच्या शिक्षणासंबंधानें मातुश्री महाराणी जमनाबाईसाहेब अत्यंत काळजी घेतात. महाराजावर जरी त्यांची ममता असली तरी त्यांच्या शिक्षण-क्रमाच्या आड त्या येत नाहींत. त्यांच्या शिक्षणाच्या ज्या सोयी त्यांनीं करून दिल्या आहेत त्याहून जास्त चांगल्या सोई, कोणत्याहि देशी संस्थानांत आढळावयाच्या नाहींत. त्यांच्या शारीरिक व नैतिक शिक्षणावर महाराणी-साहेबांची चांगली देखरेख आहे."[1]

जानेवारी १८७७ मध्यें भरणाऱ्या दिल्ली दरबारास जावें लागल्यामुळें महाराजांच्या अभ्यासांत कांहीं काळ खंड पडला. ता. ७ डिसेंबर रोजीं महा-राज, मातुश्री जमनाबाई साहेब, रेसिडेंट, दिवाण यांच्यासमवेत बडोद्याहून निघून ता. १४ रोजीं दिल्लीस पोंचले. ता. २९ डिसेंबर रोजीं कलकत्त्याच्या लाटसाहेबांनीं सयाजीराव व जमनाबाई साहेब यांच्या छावणींत जाऊन त्यांस परत भेट दिली. ता. १ जानेवारी रोजीं दिल्लीस टोलेजंग दरबार झाला. सर्व राजेरजवाड्यांसमक्ष व्हाइसरॉय लॉर्ड लिटन यांनीं सयाजीरावांना इंग्लं-डच्या व्हिक्टोरिया महाराणीसाहेबानीं 'फर्जंद–इ–खास–इ–दौलत–इंग्लि-शिया' (इंग्लिश साम्राज्याचे खासे पुत्र) हा किताब दिला असल्याचें जाहीर केलें. दिल्लीस यावेळीं निजाम, शिंदे होळकर व म्हैसूरचे महाराज यांच्याशीं सयाजीरावांच्या भेटी झाल्या. दिल्लीहून निघाल्यानंतर लखनौ, आग्रा, काशी, प्रयाग, गोकुळ, वृंदावन वगैरे इतिहासप्रसिद्ध, पुराणप्रसिद्ध क्षेत्रें व शहरें पाहून व बऱ्याच ठिकाणीं यथायोग्य दानधर्म करून महारा-जांची स्वारी ५ फेब्रुवारी १८७७ रोजीं बडोद्यास येऊन पोंचली. बडोद्यास आल्यावर नवीन किताब देऊन ब्रिटिश सरकारनें महाराजांचा बहुमान केला

---

[1] Ruler of Baroda p. 33.

याबद्दल ठिकठिकाणीं निरनिराळ्या संस्थांतर्फे महाराजांचें अभिनंदन करण्यांत आलें. यानंतर त्यांच्या शिक्षणास पुनरपि जारीनें सुरुवात झाली.

ता. २६ जुलै १८७७ रोजीं महाराजांचे वडील काशीराव मृत्यु पावले. त्यामुळें महाराजांस बरेंच दुःख झालें; परंतु शिक्षणांत फारसा व्यत्यय आला नाहीं. मेलविलसाहेब लिहितात कीं, महाराजाकरतां अर्थशास्त्र, रसायनशास्त्र, इंग्रजी, गुजराती या भाषा, इंग्लंड व हिंदुस्थान देशांचा इतिहास आणि संभाषणात्मक इंग्रजी या विषयांचा अभ्यासक्रम आखला. इंग्रजीसुधारण्यासाठीं मधूनमधून इंग्रजी निबंध लिहवून घेण्यांत येत असत. त्यांचें गणित मात्र अतिशय कच्चें. विद्यार्थीदशेंतली त्यांची एक ठोकळ मानाची दिनचर्या मि. फिलिफ सार्जंट यांच्या पुस्तकांत दिली आहे. ती अशीः—

सकाळीं ६ वाजतां निजून उठणें
,, ८ वाजेपर्यंत घोड्यावरून फेरफटका, नंतर १ तास अभ्यास.
,, ९ वाजतां महराणीसाहेबांच्या बरोबर छोटी हजिरी.
,, १०॥ राजवाड्यांतून घोडेस्वारांच्या सरंजामाबरोबर शाळेंत जाणें.
१०॥ ते ५ वाजेपर्यंत शाळा; मध्यंतरी १ तासाची फराळासाठीं सुट्टी.
५ ते ७॥ शाळेच्या मैदानावर हिंदी खेळ, कवायत, पोहणें इ० व्यायाम घेणें.
७॥ ते ८॥ दुसरे दिवशींचा अभ्यास करणें.
९ ते १० पर्यंत भोजन
१० वाजतां निद्रा.

महाराजांनीं बिलियर्डस् खेळण्याचाहि परिपाठ ठेविला होता व पंधरवड्यांतून एकदां शिकारीस जाण्याचा क्रम सुरू केला होता. *

अशा प्रकारचा साधा कार्यक्रम जरी होता तरी आपण महाराजे आहोंत ही गोष्ट लक्षांत वागवण्याविषयीं त्यांना नेहमीं उपदेश केला जाई. यामुळें अर्थात् त्यांना कोणी जिवाभावाचा मित्र नव्हता. ठराविक अभ्यास पुरा करण्यासाठीं त्यांना कांहीं जादा वेळ अभ्यासाकडे द्यावा लागे आणि आरंभीं अक्षर फारसें चांगलें नसल्यामुळें तें घटविण्याकडे वेळ जास्त जात असे.

---

* Ruler of Baroda p. 36



राजा सर टी. माधवराव व त्यांचे सहकारी अधिकारी.

तरुण गायकवाड सरकारांच्या शिरावर पुढें जी जबाबदारी पडणार आहे ती पत्करण्यायोग्य असेंच शिक्षण त्यांना मिळालें पाहिजे असें सर टी. माधवरावांचें मत होतें व त्याप्रमाणें त्यांनीं अभ्यासनीय विषयांची एक याद मि. इलियट यांच्याकडे पाठविली. व महाराजाबरोबर त्यांच्या बुद्धिमत्तेच्या तोडीस येईल असा एखादा हुषार मुलगा असावा असेंहि सुचविलें. तदनुसार माधवराव गोडबोले नांवाचा एक ब्राह्मण विद्यार्थी आरंभीं महाराजाबरोबर अभ्यास करीत असे. परंतु पुढें त्यासहि सरकारी हायस्कूलांत पाठविण्यांत आलें.

यानंतर महाराजांना राज्यकारभाराचें ज्ञान लवकर मिळावें म्हणून निरनिराळ्या विषयांवर व्याख्यानें देण्याची पद्धत निघाली. त्यापैकीं २३ व्याख्यानें राज्यकारभार, राजपुत्रांची वागणूक या संबंधाची सर टी. माधवराव यांनीं दिलीं. २७ व्याख्यानें काजी शहाबुद्दीन ( रेवेन्यू कमीशनर ) यांनीं जमीनमहसूल या विषयावर दिलीं.

| व्याख्यानें | विषय | व्याख्याते |
|---|---|---|
| १८ | जमिनीचा कायदा | करसेटजी रस्तुमजी. |
| ७ | हिंदु लॉ. | जे. एस्. गाडगीळ, हायकोर्ट जज्ज. |
| ६ | पोलिस व्यवस्था | व्ही. जे. कीर्तने, नायब दिवाण. |
| ९ | मिलिटरी व सेटलमेंट खातें | पेस्तनजी जहांगीर |

याशिवाय हिशेब व इतर कायदेकानू यासंबंधाचे कांहीं पाठ मि. ए. एच् ताम्हने व सी. आर. ठाणावाला यांनीं दिले असें सांगतात.

सर टी. माधवरावांचीं सुयंत्रित राज्यकारभारासंबंधीं महाराजांस दिलेलीं व्याख्यानें निःसंशय बहुमोल आहेत. ‘ मायनॉर हिंट्स् ’ म्हणून त्यांचें एक खासगी मुद्रित गायकवाडी दप्तरांत ठेवलेलें आहे. “ ब्रिटिश रेसिडेंटाशीं कसें वागावें, आपल्या हक्कास कसें जपावें, दिवाणगिरी कोणास द्यावी, अधिकारी नेमतांना कोणतें धोरण डोळ्यापुढें ठेवावें, नोकरांचाकरांशीं, हुजऱ्याशीं, स्वतःच्या कुटुंबीयाशीं व आप्तस्वकीयाशीं कसें

वागावें व त्यांच्याकडून आपलीं कामें कशी करून घ्यावीत, भेटीस येणाऱ्या मंडळींपैकीं कोणास जवळ करावें व कोणास दूर करावें, सार्वजनिक पैशाचा व्यय कसा करावा, शिल्लक कशी व कोठें गुंतवावी, सार्वजनिक कार्यास किती व कशी मदत करावी, वर्तमानपत्रें कोणती व केव्हां वाचावींत, इतर संस्थानांचे व ब्रिटिश रियासतीचे वार्षिक अहवाल वाचल्यानें कोणते फायदे होण्यासारखे आहेत व ( त्यांच्यापासून ) आपणास काय शिकावयाचें " * इत्यादि महत्वाची माहिती सर टी. माधवरावांनीं आपल्या शिष्यास या व्याख्यानद्वारां करून दिली.

इ. स. १८८१ च्या डिसेंबर महिन्यांत महाराजांचा शिक्षणक्रम संपला. महाराज आपल्या एका पत्रांत लिहितात, 'अजून मला दोन तीन वर्षे अभ्यास करतां आला असता, तर फार बरें झालें असतें. कारण बारीक सारीक गोष्टी अजून पुष्कळ शिकण्यासारख्या व लक्षांत ठेवतां येण्यासारख्या होत्या;' व ही गोष्ट उतार वयांत नेहमीं त्यांच्या मनांत येते. अल्प वयांत राज्यकारभाराची पडलेली जबाबदारी जर त्यांस दोनतीन वर्षे पुढें ढकलतां आली असती व तेवढा वेळ तयारी करण्यांत घालवतां आला असता, तर त्यांच्या पुढील आयुष्यावर व विशेषतः मानसिक व शारीरिक स्वास्थ्यावर फार मोठा परिणाम झाला असता. याबद्दलची त्यांना वरचेवर जाणीव होते.

एकंदरीनें पाहतां इलियट साहेबांच्या शिक्षणाचा महाराजांच्या मनावर योग्य सुपरिणाम झाला. कांहींच्या मतें आंग्लविद्येनें भारल्यामुळें महाराज नास्तिक बनले. पण महाराजांस सर्वांगीण शिक्षण मिळालें, ही गोष्ट कोणासहि नाकबूल करतां येणार नाहीं. महाराजांची बुद्धि जसी चौरस तशी त्यांची दृष्टीहि अत्यंत व्यापक परंतु सूक्ष्म होती. इंग्रजी शिक्षणानें व इतिहासाच्या परिशीलनानें त्यांच्या बुद्धीचा विकास झाला. स्वतंत्र विचार करण्याची शक्ति त्यांस प्राप्त झाली. बुद्धिरूपी तराजूंत प्रत्येक बाब तोलून जिकडे तिचा ( बुद्धीचा ) कांटा झुकेल तीच गोष्ट करण्याची त्यांस संवय झाली. दृढनिश्चय, उद्यमशीलता, बाणेदारपणा, कडक शिस्त, दुसऱ्यास हुकुमांत ठेवण्याची कला या गोष्टी ते आपल्या युरोपियन शिक्षकापासून शिकले. राजकीय परिस्थितीचें यथायोग्य आकलन व निरीक्षण करून

* सहविचार, आक्टोबर १९३०

त्यांतील व्यंगें काढून टाकून सुयंत्रित कारभार चालविणें हें त्यांचें ध्येय ठरलें. केवळ रूढी, अंधश्रद्धा, किंवा परंपरागत समजूत म्हणून एखादी गोष्ट मान्य करावयाची नाहीं, तर सुराज्यास परिपोषक असें असेल व बुद्धीस पटेल तेवढेंच ठेवावयाचें, निरुपयोगी भाग नाहींसा करावयाचा हें धोरण महाराजांनीं आखलें. आजकालच्या बडोद्यांतील सुधारणा म्हणजे महाराजांस मिळालेल्या सुशिक्षणाचें दृश्य फल होय हें कोणीहि कबूल करील.

---

## ४. गृहस्थाश्रमांत प्रवेश

यानंतर महाराजांच्या आयुष्यांतील विशेष महत्वाची गोष्ट म्हणजे त्यांचा विवाह ही होय. मातुश्री जमनाबाईसाहेब यांच्या कन्या—श्रीमंत ताराराजे यांचाहि विवाह याच सुमारास करण्याचें निश्चित झालें. त्यांची वर योजना सांवतवाडीचे राजे बहादूर रघुनाथराव बाबासाहेब सरदेसाई यांच्याशीं झाली. तारीख २१ माहे डिसेंबर सन १८७९ रोजीं हें लग्न नजरबागेंत झाल्यानंतर १७ दिवसांनीं सयाजीराव महाराजांचें लग्न झालें. डिसेंबर महिन्याच्या सुरवातीपासूनच मुली पाहण्याचें काम चालूं होतें. त्याकरतां दिवाण साहेब स्वतः एकदां पुण्यास गेले होते व त्यावेळीं “आपाततः” बऱ्याच थोर कुलांतील उपवर मुलीहि आल्या होत्या त्या त्यांनीं पाहिल्या. परंतु बहुतेक नापसंत झाल्या. अखेरीस तंजावर राजघराण्याशीं संबंध असलेल्या मोहिते कुळांतील प्रिन्सेस लक्ष्मीबाई यांना वधू नेमस्त करण्यांत आलें.

ता. ६ जानेवारी १८८० या दिवशीं सयाजीराव यांचा तजांवरच्या राजकन्येशीं नजरबागेंत मोठ्या थाटानें विवाह झाला आणि त्यांचें नांव चिमणाबाई असें ठेवण्यांत आलें. वयानें त्या सयाजीरावापेक्षां १॥ वर्षानें लहान होत्या. सर टी. माधवरावांनीं मोठ्या चटकदार भाषेंत या लग्नाचें वर्णन दिलें आहे. त्याचा थोडक्यांत सारांश असा कीं, ‘लग्न मंडपांत कुलदेवतांच्या पूजाअर्चा होत होत्या. वधु व वर होमापुढें हात जोडून लग्नविधींत गुंतले होते. लग्नाची घटका भरल्याबरोबर वधूस बुरखा घालून शृंगारून आणण्यांत आलें. दिव्यांचा चकचकाट, हंड्याझुंबरांची आरास, निरनिराळ्या अलंकारभूषणांनीं सजलेल्या स्त्रिया, फुलांचा अत्तरांचा घमघमाट, मिलिटरीचें बँडवादन अशा समारंभांत उपाध्ये, जोशी वगैरेनीं मंगलाष्टकें म्हणून वधूवरांच्या मस्तकावर

मंत्राक्षता टाकल्या.' लग्नसमारंभास पोलिटिकल एजंटसाहेब, इतर युरोपियन अधिकारी, सरदार, मानकरी इतर मांडलीक संस्थानिक, तंजावरचे राजे, कोल्हापूरच्या राणीसाहेब वगैरे मंडळी हजर होती. 'धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि' असें म्हणून सयाजीरावांनीं आपल्या भावी गृहीणीचा स्वीकार केला.

अगडांतल्या साठमाऱ्या, तमाशे, खेळ, मिलिटरीच्या कवायती, बँडवादन, आतशबाज्या, नाचरंग, मेजवान्या, मिरवणुकी यांमुळें शहरवासी लोकांना व इतर पाहुण्यांना हा सबंध महिना अतिशय आनंदाचा व मौजेचा गेला.

**लक्ष्मीविलासः**—ता. १० जानेवारी १८८० रोजीं लक्ष्मीविलास राजवाड्याच्या पायाची कोनशीला बसविण्याचा समारंभ एजंट साहेब मि. मेलविल यांचे हस्तें करण्यांत आला. यावेळीं सर रिचर्ड टेंपल मुंबईचे गव्हर्नर व हिंदुस्थानचे कमांडर-इन-चीफ जनरल बार हेहि बडोद्यास आले होते. एजंट साहेब व सर रिचर्ड टेंपल यांनीं श्रीमंत सौ. महाराणी चिमणाबाईसाहेबांचे व सयाजीराव महाराजांचे आयुरारोग्य चिंतिलें. त्यादिवशीं मोतीबागेंत युरोपियन पाहुण्यांना बडा खाना देण्यांत आला. त्या प्रसंगींहि मि० मेलविल व महाराज यांची यथोचित भाषणें झालीं. नंतर हा समारंभ आटोपला.

लक्ष्मीविलास राजवाड्याचें काम इ. स. १८९० सालीं पूर्ण झालें. परंतु दुर्दैवानें महाराणी चिमणाबाईसाहेब त्यावेळीं हयात नव्हत्या. या वाड्याकडे अजमासें ५० लक्ष रुपयांवर खर्च झालेला आहे व त्यांत राजकुटुंबाला लागणाऱ्या सर्व आधुनिक सुखसोयी आहेत. राजवाड्याच्या आसमंतांतला भाग रम्य लताकुंजांनीं व बागबगीचांनीं सजलेला आहे. वाड्याची बांधणी इंडो-सॅरसेनिक धर्तीवर आहे. अशाप्रकारचा राजवाडा हिंदुस्थानांतल्या राजवाड्यांमध्यें उत्तम आहे एवढेंच नव्हे तर पॅरिस वगैरे ठिकाणाहून उत्तम तज्ज्ञ, नामांकित शिल्पशास्त्रज्ञ आणून त्याचें बांधकाम करण्यांत आलें असल्यानें तो युरोपांतील कोणत्याहि देशाच्या राजवाड्याच्या तोडीचा येईल. रविवर्म्यासारखे देशी चित्रकार व विदेशी चित्रकार यांची अमोलिक व दुर्मिळ चित्रें तेथें काढलेलीं आहेत.

# ५. राज्यसूत्रें हातीं आलीं

**न खलु वयस्तेजसो हेतुः ॥ ***

सयाजीराव महाराज व प्रिन्सेस ताराबाई यांचीं लग्नें झाल्यावर महाराजांना आतां राज्याधिकार मिळावा असें सर्वांच्या मनानें घेतलें. सर टी. माधवराव व महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं एजंटसाहेबांच्या कानावर ही गोष्ट घातली. त्यांची संमति मिळून प्रकरण हिंदुस्थानसरकारकडे गेलें. हिंदुस्थान सरकारनें विलायतेहून मंजुरी आणवून ता. २८ डिसेंबर १८८१ रोजीं सयाजीराव महाराजांना राज्याधिकार देण्याचें ठरविलें. व्हाइसरॉय लॉर्ड रिपन यांना बडोद्यास येतां न आल्यामुळें मुंबईचे गव्हर्नर सर जेम्स फर्ग्युसन यांचे हस्तें महाराजांना अधिकाराचीं वस्त्रें देण्याचा समारंभ बडोद्यास मोठ्या थाटाचा दरबार भरवून करण्यांत आला. दरबारप्रसंगीं भाषण करतांना महाराजांनीं असें जाहीर केलें कीं, आजमितीपासून बडोदें **राज्याचा अधिकार आम्हीं आपल्या हातांत घेत आहोंत. आमची प्रजा संतुष्ट रहावी आणि उत्तरोत्तर तिच्या सुखाची वाढ होत जावी अशी आमची अंतःकरणापासून इच्छा आहे.** आमचा हा हेतु सिद्धीस नेण्याचे कामीं आमचे सर्व अधिकारी, मानकरी, दरकदार व अखिल प्रजा अत्यंत राजनिष्ठेनें आमच्याशीं वर्ततील व सहकार्य करतील असा आम्हास भरंवसा वाटतों. हें आरंभिलेलें कार्य सुफल होवो ( ता. २८-१२-१८८१ ).

महाराज वयाच्या तेराव्या वर्षीं गादीचे मालक झाले व १९ व्या वर्षीं त्यांनीं राज्यकारभार हातीं घेतला. लागलीच एक जाहीरनामा प्रसिद्ध करून प्रजेला त्यांनीं सुराज्याचें आश्वासन दिलें. याबाबतींत महाराजांचें सादृश्य अकबराशीं जुळतें. अकबर बादशाहाहि वयाचे तेराव्या वर्षीं राज्यांत गोंधळ, अव्यवस्था असतांना गादीचे मालक झाले व वयाच्या १९ व्या वर्षीं त्यांनीं स्वतंत्रपणें राज्यकारभार हातांत घेतला. अकबराचे शिक्षक बहिरामखान यांच्याप्रमाणेंच महाराजांना सर टी. माधवरावांनीं शिक्षण दिलें; आणि अकबराप्रमाणेंच महाराजांनीं प्रजेची सुस्थिति राहील अशी काळजी घेतली आणि आवश्यक अशा सामाजिक, धार्मिक, राजकीय सुधारणा घडवून आणल्या आहेत.

ता. २९ आक्टोबर १८८२ रोजीं दिवाण सर टी. माधवराव यांनीं आपले

---

* तेजस्वी जे वृत्ति ऐशी तयांची । तेथें कांहीं चाड नाहीं वयाची ॥

जागेचा राजीनामा दिला. राज्यकारभार हातीं आल्यावर महाराज एकदां बरोबर ऑफीसच्या कामाचे वेळीं दिवाणांचे कचेरींत गेले. त्यावेळीं दिवाण तेथें नव्हते. महाराज तेथून लवकरच निघून गेले. नंतर दिवाणांना ही हकीकत समजली. महाराजांना मुखत्यारी मिळेपर्यंत सर टी. माधवराव त्यांना वेळेची किंमत पढवीत होते. परंतु उतार वयाच्या कारणानें राज्यकारभाराचीं कामें वेळच्या वेळीं न उठलीं तर उलट आपल्यालाच वेळेची किंमत आपल्या शिष्याकडून पढवून घेण्याचा अनावस्था प्रसंग येईल असा दूरवर विचार करून ते लवकरच दिवाणगिरी सोडून आपल्या देशीं चालते झाले. महाराज लिहितात, ' वास्तविक सर टी. माधवरावांना राज्य स्वतंत्रतेनें चालविण्याचा अभ्यास झालेला, ते कमी दर्जाची ताबेदारी कशी पत्करणार ? ' त्यांच्या मागून काजी शहाबुद्दीन यांची महाराजांनीं दिवाणपदाचे जागीं नेमणूक केली.

सर टी. माधवरावांची बडोदें संस्थानांतील कामगिरी बहुमोल व भरीव आहे. प्रगतिपर धोरणाचा पाया त्यांनीं घातलेला आहे. त्यांनीं राज्याच्या उत्पन्नाची सुव्यवस्था लावून सरकारी खजिन्यांत १॥ कोटींची बचत केली. पूर्वीची अनियमित सारापद्धति बदलून चोहोंकडे रयतवारी पद्धति अंमलांत आणली. शेतसारा कमी केला; कांहीं जकाती उतरविल्या; नवीन खातीं उत्पन्न करून त्यामार्फत नवीन व्यवस्था अंमलांत आणिली; अनाठायीं चाललेल्या दानधर्माच्या खर्चास काट दिली; आरोग्यखातें काढून त्यावर चीफ मेडिकल ऑफिसरची नेमणूक केली; तरमबंदी ( Settlement ) खातें, सार्वजनिक बांधकामखातें ( P. W. D. ), शिक्षणखातें हीं खातीं नवीन उत्पन्न करून त्यावर नवीन अधिकाऱ्यांची नेमणूक केली; सार्वजनिक बागा, सार्वजनिक वाचनालयें, संस्थानी वाचनालयें, काढण्यास प्रोत्साहन दिलें. त्याचप्रमाणें उत्तम रस्ते, छोट्या छोट्या रेल्वे लाइन्स सुरू करण्यासंबंधी त्यांनीं खटपट केली. इ. स. १८७७ सालीं भरलेल्या दरबारांत सर. टी. माधवरावांना इंग्रज सरकारनें ' राजा ' हा किताब देऊन त्यांचा गौरव केला तो किती यथायोग्य होता हें दिसून येईल.

महाराजांना अधिकारप्राप्ती झाल्यानंतर आपल्या कार्यांत आपल्या धर्मपत्नीनें भागीदार व्हावें यासाठीं तिला जरूर तें शिक्षण देण्याचें ठरविलें. आणि त्याबरहुकूम श्री. सौ. महाराणी साहेबांना इंग्रजी शिकविण्यासाठीं



श्री. सयाजीराव महाराज
व
श्री. सौ. महाराणी चिमणाबाईसाहेब.

श्रीमती **नन्दबाई** नामक विदुषीची मासिक २०० रु. वेतनावर अध्यापिका म्हणून नेमणूक करण्यांत आली व महाराणी साहेबांचा शिक्षणक्रम सुरूं झाला. यानंतर अत्यंत आनंदाची गोष्ट म्हणजे ता ३ ऑगस्ट १८८३ रोजीं महाराणी साहेबांना पुत्ररत्न झालें ही होय. त्यांचें नांव फत्तेसिंहराव असें ठेवण्यांत आलें. युवराज जन्माचा हा अपूर्व योग तीन पिढ्यांत घडून आला नसल्यानें हा पुत्रोत्सव समारंभ विशेषच झाला. यानंतर पुढल्या वर्षी त्यांना एक कन्या-रत्न झालें. पुढें लवकरच ता. ७ मे १८८५ सालीं महाराणी चिमणाबाई साहेब यांना क्षयाचा विकार होऊन त्यांतच त्यांचा अंत झाला. 'त्या अत्यंत प्रेमळ, पतिनिष्ठ व सुस्वभावी होत्या' असे महाराजांनीं त्यांच्या संबंधी उद्गार काढले आहेत. महाराणी साहेबांच्या स्मरणार्थ 'चिमणाबाई क्लॉक टावर' नांवाचा एक मनोरा व 'चिमणाबाई न्यायमंदीर' नांवाची न्यायकचेरी बांधण्यांत आली. यानंतर ता. २८ डिसेंबर १८८५ रोजीं देवासच्या घराण्यांतील श्रीमंत बाजीराव घाटगे यांची कन्या गजराबाई यांच्याशीं महाराजांचा विवाह झाला. ह्याच हल्लींच्या सुशिक्षित व सुविद्य महाराणी चिमणाबाईसाहेब होत. इ. स. १८९३-९४ सालीं यांना महाराणी व्हिक्टोरिया यांनीं 'क्रौन ऑफ इंडिया' हा किताब व एक रत्नखचित पदक बक्षीस दिलें आहे. महाराजांची इतर कौटुंबिक हकीकत पुढें निराळी दिली आहे.

---

## ६. स्वभूमीचें संपूर्ण निरीक्षण

**'राजा प्रकृतिरंजनात्.'**

कोणतीहि सुधारणा करूं पाहणारांस तिची खरी तळमळ, सांगोपांग माहिती, व्यापक अवलोकन व सूक्ष्म निरीक्षण पाहिजे. राज्यकारभारांत सुधारणा करणारांस ह्या गोष्टी अत्यंत आवश्यक होत. याच हेतूनें राज्यसूत्रें हातीं घेतल्यानंतर आपल्या प्रजेची स्थिति कशा प्रकारची आहे, तिच्या अडचणी, तक्रारी कोणत्या स्वरूपाच्या आहेत, राज्यांत कोणत्या रीतीच्या सुधारणा अवश्यमेव आहेत हें समजण्याकरतां श्री. सयाजीराव महाराजांनीं दरसाल राज्यांतील एका भागांत स्वतः जाऊन तेथील स्थितीचें प्रत्यक्ष अवलोकन करण्याचा क्रम चालू केला. नोव्हेंबर १८८२ कडी प्रांत, १८८३-४ नवसारी, १८८४-५ बडोदें प्रांत, १८८६-७ अमरेळी व काठेवाड वगैरे प्रांतांत जाऊन महाराजांनीं तेथील परिस्थितीचें बारकाईनें निरीक्षण केलें.

यानंतरच्या काळांतहि महाराजांनीं आपल्या राज्यांत अनेकवार दौरे काढले असून हा क्रम अद्याप चालू आहे. या दौऱ्यामुळें महाराजांना आपल्या राज्यांतील सर्व गांवांची व तेथें राहणाऱ्या आपल्या प्रजाजनांची बिनचूक माहिती मिळाली असून तिच्या जोरावर त्यांना आपल्या अधिकाऱ्यांसहि फाजित करतां येतें. या दौऱ्याचे वेळीं सर्व लोकांना आपली गाऱ्हाणीं महाराजांच्या कानीं घालण्याची संधि देण्यांत येते, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

महाराजांचा पहिल्या फिरतीचा प्रवास बहुतेक बैलगाड्यांतून झालेला आहे. त्या फिरतीचे वेळीं प्रत्येक गांवांत जाऊन गांवचे प्रमुख लोक, सरकारी अमलदार यांना बोलावून त्यांच्या अडचणी, तक्रारी, आवश्यक व जरूर त्या सुधारणासंबंधी त्यांची मतें समजून घेणें ह्या गोष्टी महाराजांनीं जातीनें केल्या. आपला राजा आपुलकीच्या, ममतेच्या भावनेनें आपल्या सुखदुःखांची पित्याप्रमाणें चौकशी करीत असलेला पाहून कोणत्या राजनिष्ठ नागरिकाचें अंतःकरण कृतज्ञतेनें उचंबळून येणार नाहीं? महाराजांस आतुरतेनें पाहावयास लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटत असत व ठिकठिकाणीं त्यांचें थाटाचें स्वागत व आदरसत्कार केला जाई. पहिल्या फिरतीचे वेळीं महाराजांच्या बरोबर बराच लवाजमा होता. परंतु प्रजेस इतक्या लोकांचा इतमाम ठेवणें कठीण जातें व अनाठायी खर्च होतो हें ओळखून महाराजांनीं पुढें खास नोकर कमी केले. हल्लीं तर पांचपंचविसापेक्षांहि कमी लोक त्यांचे बरोबर असतात. फिरतीच्या वेळीं ज्या गांवास महाराज जाण्याचें ठरतें तेथें हे लोक अगोदर जाऊन तंबू वगैरे ठोकून इतर सर्व कडेकोट तयारी करतात. मग महाराजांची स्वारी त्या ठिकाणीं जाते. नंतर शाळा, कचेऱ्या, सरकारी इमारती, पोलिस व इतर अधिकारी, गांवांतील पाटिल तलाटी, लोकपक्षीय पुढारी, प्रमुख संस्थांचे चालक वगैरे मंडळीच्या गांठी-भेटी होऊन संभाषण, तपासणी, मुलाखती आटोपल्यानंतर महाराज दुसऱ्या गांवीं जातात. इनामदार, पुढारी वगैरे लोकांना महाराजहि पोषाख वगैरे देऊन त्यांचा गौरव करतात. कांहीं प्रसंगीं जातीनें व कांहीं प्रसंगीं तपासणी अधिकाऱ्याकडून प्रजेच्या अर्ज्या घेऊन त्यांचा निकाल महाराज स्वतः करतात. विशेष महत्त्वाची बाब असल्यास ती आपल्या स्मृतिपत्रकांत महाराज नमूद करून ठेवितात व त्याबद्दल हुजूर हुकूम लवकरच निघतो.

अशा पाहणीच्या योगानें नवीन सुधारणांच्यापुढें येणाऱ्या अडचणींचें

यथार्थ ज्ञान, प्रजेच्या स्थितीची कल्पना वगैरे गोष्टींचें चित्र महाराजांच्या विवेचक शक्तीवर किंवा बुद्धिपटलावर कोरलें गेलें. यामुळेंच महाराजांना नवीन नवीन सुधारणांचा उपक्रम करणें सुकर झालें. त्याचप्रमाणें या पाहणी-मुळें स्थानिक अधिकाऱ्यांवर वचक बसून अव्यवस्था, लांचलुचपत, वसुलाचा गोंधळ, पैशाची अफरातफर वगैरे प्रकारांना आळा बसला. प्रत्येकास आपलें गाऱ्हाणें महाराजांना विदित करण्याची मुभा आपल्याला मिळते व खरा न्याय मिळतो ही प्रजेची भावना दृढ झाली.

वास्तविक पाहतां स्वतः विशेष मेहनत न करतां सर टी. माधवरावासारख्या कुशल, राज्यकार्यधुरंधर मंत्र्यावर राज्यकारभार टाकून महाराजांस खुशाल स्वस्थ आराम घेत बसतां आलें, असतें. परंतु त्यांनीं तसें न करतां आरंभापासूनच सर्व विषयांत मन घालून स्वतः उद्योग करून राज्यकारभारावर आपली छाप पूर्णपणें बसविली. दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणें केव्हांहि वाईटच. तसेंच पुस्तकी विद्येबरोबर अनुभवाचें शिक्षण अत्यंत आवश्यक किंबहुना फार महत्वाचें आहे ही गोष्ट महाराजांस पुरेपूर पटली आहे.

## ७. राज्यव्यवस्थेंतील मन्वंतर

सयाजीराव महाराजांना राज्याधिकार मिळाल्यापासून आतांपर्यंतच्या त्यांच्या सर्व कृत्यांचें सार कोणतें असें कोणी विचारल्यास त्यास 'सुधारणा'– सर्वांगीण सुधारणा या समर्पक शब्दांत उत्तर मिळेल. राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक, कौटुंबिक बाबतींत सुधारणा–नवीन नवीन सुधारणा हेंच त्यांचें ध्येय असल्याचें आढळून येईल. हीच गोष्ट महाराजांनीं एका व्याख्यानाचें प्रसंगीं बोलून दाखविली होती. ते म्हणतात, 'कित्येकांना माझें काम व प्रयत्न असमंजसपणाचे वाटत असतील, परंतु त्या सर्वांच्या मुळाशीं माझा एकच उद्देश आहे आणि तो म्हणजे माझ्या प्रजाजनाचें हित करणें हा होय. **प्रजेचें कल्याण करणें हेंच माझें कर्तव्य आणि हाच माझा मोक्ष.**' लोकांनीं शिक्षण संपादन करून सुधारणेच्या मार्गास लागावें आणि उन्नतीचें शिखर गांठण्याचा प्रयत्न करावा ही महाराजांची मनीषा. आरंभापासून त्यांनीं राज्यव्यवहारासंबंधाचें शिक्षण आस्थेनें घेतलेलें. परंतु सुयंत्रित राज्यकारभार चालविण्यास त्यावेळीं त्यांना सल्लागार मंडळाची जरूरी भासत होती. यास्तव इ. स. १८८३ सालीं न्याय, जमाबंदी, अंमल-

बजावणी व खानगी अशा चार खात्यांचे मुख्याधिकारी, व वरिष्ठ कोर्टाचा न्यायाधीश आणि दिवाण यांचे एक 'कन्सल्टेटिव्ह कौन्सिल किंवा सल्लागार मंडळ' महाराजांनीं आपल्यास वेळोवेळीं सल्लामसलत देण्यासाठीं नेमलें. इ. स. १९०४ सालीं मुंबईच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या धर्तीवर संस्थानांतील प्रत्येक जिल्ह्यांतून निवडून दिलेल्या सभासदांचें एक कायदे-मंडळ बनवावें अशा प्रकारची एक योजना आंखली आणि १९०७ सालीं या सभेची घटना तयार झाली. आरंभीं ह्या कौन्सिलांत फक्त १७ सभासद होते, परंतु १९१२ सालीं लोकनियुक्त सभासदांची संख्या वाढविण्यांत आली. त्याचप्रमाणें सरदार व व्यापारीवर्गाचें मिळून दोन प्रतिनिधि घेण्यांत आले. १९१३ सालीं अस्पृश्य वर्गाच्या एका प्रतिनिधीची सरकारतर्फे नेमणूक करण्यांत आली. सांप्रत लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांतील (धारासभा) सभासदांची संख्या २७ असून त्यांचें वर्गीकरण खालीं दिल्याप्रमाणें आहे.*

| | |
|---|---|
| ६ सभासद— | दिवाण आणि पांच इतर सरकारी अधिकारी (अधिकारतः) [ न्याय, जमाबंदी खात्याचें प्रमुख, न्यायमंत्री, वरिष्ठ कोर्टाचा सरकारी वकील व सरसुभे मिळून ५. ] |
| ११ " | सरकारनें नेमिलेले सभासदः—यांत ७ अधिकारी व ४ निमसरकारी ( तीन राजघराण्यापैकीं, व्यापारी व अस्पृश्य वर्गाचें प्रतिनिधी असतात. ) |
| १० " | लोकनियुक्त सभासद ( बडोदा ३, कडी ३, नवसारी २, अमरेळी २. ) |
| २७ | |

सभासदांस सरकारला प्रश्न विचारून लोकांच्या अडचणी सरकारपुढें मांडण्याचा हक्क आहे. तसेंच लोकोपयोगी ठराव आणून त्यासंबंधानें कोणत्या सुधारणा जनतेच्या हिताच्या दृष्टीनें आवश्यक आहेत, हें शिफारसीच्या द्वारें सरकारास कळविण्याचा हक्क आहे.

सध्यां बहुतेक सत्ता महाराजांच्या मंत्रीमंडळास ( कार्यकारी कौन्सिलास ) असून राज्याचीं सूत्रें दिवाणाकडून हालविलीं जातात व तो महाराजांना जबाबदार असतो. अंमलबजावणी खात्याची सर्व रचना इंग्रजीपद्धतीवर केलेली आहे.

---

* Baroda Administration Report 1930-31.

बडोदा नरेशांनीं दुसरी महत्त्वाची सुधारणा अंमलांत आणली ती म्हणजे न्याय व अंमलबजावणी खात्याची विभागणी ही होय. महाराजांनीं ही सुधारणा फार हहुहळू व सावधगिरीनें अमलांत आणली. सर टी. माधवरावांनीं तालुक्याच्या वहिवाटदारांचा दिवाणी खटले चालविण्याचा अधिकार काढून तो मुन्सफास दिला. परंतु त्या वेळीं मुलकी अंमलदाराकडे फौजदारी खटले चालविण्याचा अधिकार तसाच कायम होता. महाराजांच्या लक्षांत ही गोष्ट पहाणीच्या वेळीं चटकन येऊन त्यासंबंधानें त्यांनीं असें ठरविलें कीं, प्रथम फौजदारी खटल्यापैकीं तीन चतुर्थांश खटले स्वतंत्र न्यायाधीशांनीं म्हणजे मुन्सफांनीं चालवावेत आणि बाकीचे एक चतुर्थांश वहिवाटदाराकडे सोपावेत. हा क्रम १९०३ सालापर्यंत होता. परंतु १९०४–५ सालीं ह्या कामाची पूर्ण विभागणी करण्यांत येऊन वहिवाटदारांना न्याय देण्याच्या कामांतून पूर्णपणें वगळण्यांत आलें.* मात्र अशा लोकांचा फौजदारी खटल्यासंबंधीचा अनुभव न्यायखात्यास मिळावा म्हणून त्यांतील कांहीं हुषार लोक न्याय खात्याकडे बदलून घेतले. सन १९०९ सालीं लॉर्ड मिंटो-साहेबांनीं महाराजांची या सुधारणेबद्दल स्तुति केली आहे. ब्रिटिश मुलखांत अमलांत नसलेल्या ज्या सुधारणा महाराजांनीं केल्या त्यापैकीं ही एक प्रमुख होय.

इ. स. १८८२ सालीं जुन्या कायदेकानूंचें स्पष्टीकरण करून त्यांची नवीन धर्तीवर रचना करण्यासाठीं महाराजांनीं एक लॉ कमिटी नेमिली. परंतु तिचें काम समाधानकारक न झाल्यामुळें सन १८९२ सालीं जे. आर. नेलर व जे. एस्. गाडगीळ या कायदेपंडीतांच्या मदतीनें नवीन पद्धतीवर दिवाणी व फौजदारी कायदे रचण्यांत आले. याच सुमारास इंग्लंडांतील प्रिव्ही कौन्सिलप्रमाणें एक न्यायसभा स्थापण्यांत येऊन तिजकडे महाराजाकडे येणाऱ्या सर्व अर्जांचा निकाल देण्याचें काम सोंपविण्यांत आलें. मि. नेलर यांना लीगल रिमेंम्ब्रन्सर म्हणून कायम करण्यांत आलें. बडोदा न्यायसभेनें दिलेल्या निकालांचा आधार ब्रिटिश हिंदुस्थानांतहि घेतला जातो इतकें सांगितल्यानें त्या कोर्टाची कार्यक्षमता कोणाच्याहि लक्षांत येईल.

महाराजांची तिसरी सुधारणा म्हणजे लोकांना स्थानिक स्वराज्य देणें ही

* गॅझेटीयर २–२६५.

होय. महाराजांनीं ग्रामसंस्थांचा पूर्वापार इतिहास लक्षांत घेऊन गांवकामगिऱ्या तशाच चालू ठेवण्याविषयीं हुकूम दिला. गांवकामगारांत शाळा मास्तरचाहि समावेश करण्यांत आला. सन १९०२ सालीं महाराजांनीं ग्रामपंचायतीसंबंधीं नवीन नियम केले. एक हजार लोकसंख्येच्या गांवीं निम्मे लोकांनीं निवडून दिलेले सभासद असावेत व निम्मे तालुक्याच्या मुख्याधिकाऱ्यानें नेमावेत असें ठरलें. पंचायतींतील सभासदांची संख्या ५ हून कमी व ९ हून जास्त नसावी; गांवचा पाटील हा त्या सभेचा अध्यक्ष व शाळामास्तर सभासद म्हणून घ्यावेत असें ठरलें. अशा प्रकारें निवडणुकीचें तत्त्व पंचायतींत सुरू करून गांवच्या अंतर्व्यवस्थेचे सर्व हक्क पंचायतीस दिले. गांवांतील विहीरी, तलाव, शाळा, धर्मशाळा, देवस्थानें, सरकारी मिळकती, व शेतें यांवर पंचायतीची देखरेख असावी असें ठरविण्यांत आलें. तसेंच दुष्काळ प्रसंगीं लोकांस मदत करणें, औषधोपचार करणें वगैरे बाबीहि पंचायतीकडे सोपविण्यांत आल्या. त्याचप्रमाणें पंचायतींना किरकोळ स्वरूपाच्या दिवाणी व फौजदारी खटल्यांचा निकाल देण्याचा अधिकार दिला. पंचायतीच्या सभा दर महिन्यास भरवून बऱ्याच गांवांच्या गटानें आपला एक प्रतिनिधी तालुका पंचायतींत पाठवावा असा नियम करण्यांत आला. अशा प्रकारची रचना तालुका पंचायतीची करण्यांत आली. तालुका पंचायतीचा अध्यक्ष नायबसुभा असून तीस आपला प्रतिनिधि प्रांत पंचायतींत पाठविण्याचा अधिकार असे. सुभा किंवा कलेक्टर हा प्रांत पंचायतीचा अध्यक्ष नेमला जाई. या पंचायतींनीं दुष्काळाच्या वेळीं उत्कृष्ट काम केलेलें आहे. त्या प्रकारची उपयुक्त मदत खुद्द सरकारासहि देतां आली नसती. १९०६ सालीं मोठ्या शहरांतील म्युनिसिपालिट्यांना स्थानिक स्वराज्याचे हक्क देण्यांत आले. ब्रिटिश मुलुखांत ग्रामपंचायतीची सुधारणा अजून अमलांत नाहीं, ती महाराजांनीं अत्यंत पद्धतशीर व यशस्वी रीतीनें आपल्या राज्यांत सुरू केली याबद्दल प्रत्येक जण त्यांना धन्यवादच देत राहील. महाराजांनीं इलियटसाहेबांना एका पत्रांत असें लिहिलें आहे कीं, ‘ निदान शंभर गांवांत पंचायत निवडणुकीची पद्धति अमलांत आणावी. कारण खेडेंगांवाची सुधारणा हा माझ्या सर्व सुधारणांचा मूळ पाया होय. ’ ब्रिटिश हिंदुस्थानांत सध्यां ‘ ग्रामोद्धार ’, ‘ ग्रामोद्धार ’ म्हणून जी चळवळ चालू आहे तिची कल्पना महाराजांस १९०० सालींच येऊन त्यांनीं या बाबतींत पुष्कळ पुढें पाऊल टाकलेलें

आपणास दिसून येईल व या बाबतींत जुन्या संस्था मोडून नव्या स्थापन करण्याऐवजीं जुन्याच संस्थांस सुधारून नवें स्वरूप देणें हें अधिक फायदेशीर आहे हेंहि दाखविलें आहे.

बडोदें संस्थानांत आजमितीस लोकोपयोगी सार्वजनिक गोष्टी पुष्कळ करण्यांत आल्या आहेत. राज्यांतील गरीब लोकांकरतां लहानमोठे दवाखाने असून मोफत औषध देण्याची सोय करण्यांत आली आहे. असे दवाखाने संस्थानांत एकंदर ९३ असून 'लेडी डफरीन हॉस्पिटल किंवा स्टेट जनरल हॉस्पिटल' हें मुख्य सरकारी हॉस्पिटल आहे. यामध्यें तज्ज्ञ डॉक्टरांच्या देखरेखीखालीं निरनिराळ्या रोग्यांकरतां वेगवेगळाले वार्डस् ठेविले असून रोग्यांसाठीं एक लहानशी लायब्ररीहि आहे.

सन १८९१ सालीं आरोग्यखातें (सॅनिटेशन डिपार्टमेंट) काढण्यांत आलें आणि त्याकडे ग्रामपंचायतींच्या कचेऱ्या, देवी टोचणें, जन्ममृत्यूसंबंधी नोंद, मॅजिक लँटर्नच्या साहाय्यानें व्याख्यानें देणें, सिनेमा, प्रदर्शन यांच्या द्वारें शिशुसंगोपनाचें व आरोग्यसंवर्धनाचें प्रचारकार्य या बाबी सोंपविण्यांत आल्या.

लोकांच्या जीविताचें, मालमत्तेचें सरंक्षण करणें हें राजाचें प्रमुख कर्तव्य समजण्यांत येतें, त्यास अनुसरून पोलिस खात्याची घटना बनविलेली आहे. सन १८७८ सालीं पोलिस लोकांची पलटण तयार करण्यांत आली व १८८१ सालच्या पोलिस ॲक्टान्वयें मिलिटरी खात्यापासून हें खातें वेगळें करण्यांत आलें. पगारी पोलीस व गांवपोलिस असे दोन भेद पोलिसांत असून एक पोलिस खात्याच्या अधिकाराखालीं असून दुसरे रेवेन्यू खात्याकडे दिलेले आहेत.

हुजूर हुकुमांची अंमलबजावणी व राज्यकारभाराची पद्धति लोकास समजावी या हेतूनें ब्रिटिश सरकारच्या 'गव्हर्नमेंट गॅझेट' प्रमाणें 'आज्ञापत्रिका' सुरू करण्यांत आली. तिच्यामुळें लोकांस राज्यकारभार कशाप्रकारें चालतो, हें समजण्याचें एक सुलभ साधन झालें.

बडोद्यासारख्या राजधानीस पाणी पुरवठा आवश्यक जाणून तेथून १३ मैलांवर सूर्यानदीला बंधारा बांधून एक तलाव बांधण्याची योजना ता. ८ जानेवारी १८८५ सालीं आंखली. हा तलाव 'सयाजी सरोवर' या नांवानें

प्रसिद्ध असून तत्प्रीत्यर्थ ३४ लक्ष रुपये खर्च झालेला आहे. अनेक युरोपियन तज्ज्ञांनीं केलेल्या योजना गैरसोयीच्या ठरून अखेर बडोदें येथीलच जगन्नाथ सदाशिव नांवाच्या एंजिनियरनीं केलेल्या या योजनेचें बांधणीचें काम चांगलें झालें आहे. या सरोवरापासून बडोदेंशहर व कँप यांना पाण्याचा मुबलक पुरवठा होतो व सरकारलाहि ७० हजार रुपये उत्पन्न मिळतें. या तलावाला पुरवणी म्हणून प्रतापपुरा नांवाचा एक नवीन तलाव १९३० सालीं महाराजांनीं बांधला आहे. याशिवाय राज्यांतील प्रमुख स्थळीं व खेड्यांपाड्यांतून महाराजांनी असेच तलाव बांधून व विहिरी खणून आपल्या रयतेस पाण्याची सोय करून दिली आहे.

लोकांच्या देवघेवींचे व्यवहार सुरळीत चालावे यासाठीं १८८९ त स्टँप ॲक्ट करण्यांत आला. परंतु त्यावेळीं त्याविरुद्ध एकच गिल्ला झाला. तेव्हां महाराजांनीं त्याची उपयुक्तता लोकपक्षीय पुढाऱ्यास बोलावून आणून पटवून दिली. हें महाराजांच्या समयज्ञतेचें उदाहरण म्हणून दाखवितां येईल.

सरकारोपयोगी व लोकोपयोगी इमारती लक्षावधि रुपये खर्च करून बांधण्यांत आल्या आहेत. अशा प्रकारच्या नवीन धर्तीवर तज्ज्ञ एंजिनीयरांकडून बांधविलेल्या इमारती दुसऱ्या कोणत्याहि संस्थानांत पहावयास मिळणार नाहींत. त्याचप्रमाणें वाहतुकीच्या सोयीसाठीं उत्तम रस्ते व सडका तयार करण्यांत आल्या असून पुष्कळ ठिकाणीं पूलहि बांधलेले आहेत. यामुळें दळणवळण बरेंच सुकर होऊन प्रजेच्या आणि सरकारी नोकरांच्या सुखांत भर पडली आहे.

---

## ८. महाराज आणि बादशाही सत्ता

ब्रिटिशांनीं हिंदुस्थानांत क्रमाक्रमानें व हळुहळू आपल्या सत्तेची स्थिरस्थावर केली, हें हिंदुस्थानचा इतिहास वाचणारास सहज अवगत होण्यासारखें आहे. त्या क्रमांत जसजशी सोय किंवा व्यवस्था त्यावेळच्या कंपनीच्या अधिकाऱ्यांस व मुत्सद्यांस योग्य दिसली त्याप्रकारचे तहनामे किंवा निर्बंध संस्थानांवर घालण्यांत आले. नेपाळसारखीं राज्यें अगदीं स्वतंत्र आहेत. ग्वाल्हेर संस्थानाशीं युद्धप्रसंग होऊन मांडलिक स्वरूपाचे तहनामे झाले आहेत. कित्येक रजपूत संस्थानांनीं आपण होऊन ब्रिटिश सत्तेचा अवलंब

केला आहे. अशा प्रकारांनीं निरनिराळ्या संस्थानांचे ब्रिटिश सरकारशीं वेगवेगळ्या स्वरूपाचे संबंध आहेत. प्रत्येकाचे तह वेगळे आहेत. बडोद्याच्या गायकवाडांशीं ब्रिटिशांचा दोस्तीचा संबंध जडलेला आहे. पेशव्यांशीं इंग्लिशांचें युद्ध सुरू असतां फत्तेसिंग गायकवाडानें सन १७७९ सालीं मोठ्या धोरणानें वागून ब्रिटिश जनरल गाडर्ड यांशीं बचावाच्या व चढाईच्या स्वरूपाचा दोस्तीचा तह केला. म्हणून गायकवाड हे ब्रिटिशांचे दोस्त होत. परंतु तहांचा मतलब कसाहि असला तरी प्रत्यक्ष राजनीतीच्या व्यवहारांत मनुष्यस्वभाव व परिस्थिति या संबंधानें बरेच फेरबदल व स्थित्यंतरें होतात. आजकाल सर्व संस्थानांची स्थिति सर्वत्र एकसारखीच दिसून येईल. अंतर्गत कारभारांत पूर्ण मुखत्यारी, परंतु परराष्ट्रीय व्यवहार मात्र ब्रिटिश सत्तेच्या मार्फत चालावयाचा. परचक्राचें व परस्पर कलहांचें निवारण व निराकरण ब्रिटिश सरकारकडून व्हावयाचें. सकृद्दर्शनीं असें वाटतें कीं, संस्थानिक म्हणजे अत्यंत भाग्यवान् व सत्ताधीश. प्रजा काडीची तक्रार न करतां निमूटपणें सारा देते व यंत्राप्रमाणें राजाचे सेवक तो बिनबोभाट वसूल करतात. अर्थात् त्याची शक्तीहि कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् या स्वरूपाची असणार. परंतु हा निवळ आभास आहे. वस्तुस्थिति अगदीं निराळी असते. संस्थानिकांचा गळा रेसिडेन्सीच्या तांतीनें बांधलेला असतो. रेसिडेन्सी डोळयांत तेल घालून संस्थानिकाचें कोठें चुकेल व 'चंचुप्रवेशे मुसलप्रवेशः' या नात्यानें त्यांच्या संस्थानांत ढवळाढवळ करून संस्थानिकांच्या हक्कांची पायमल्ली कशी करतां येईल व त्यांच्या कारभारावर ठपका आणण्यास कसें व केव्हां मिळेल याची वाट पाहात असते. एखादाच रेसिडेंट सुस्वभावी, सरळ व सौजन्यानें वागणारा आणि संस्थानी कारभाराकडे सलोख्याच्या वृत्तीनें पाहणारा. तात्पर्य, संस्थानिकांची स्थिति म्हणजे तोंड दाबून बुक्क्यांचा मार अशा प्रकारची. लोकमत, अधिकारी किंवा ब्रिटिश सरकार यांपैकीं कोणीच त्यांचा वाली नाहीं. त्यांच्या अडचणी लोकचर्चेंत येऊं न शकल्या कारणानें लोकांना त्यांच्या स्थितीची कल्पनाहि करतां येत नाहीं किंवा त्यांच्याबद्दल सहानुभूतीहि उत्पन्न होऊं शकत नाहीं. संस्थानिक जर खासगी संकटांत सांपडला किंवा सार्वभौम सरकारशीं त्याची तेढ पडली तर प्रजेपैकीं किंवा नोकररूपीं भाडोत्री यांच्यापैकीं कोणीहि त्याच्या साहाय्यास येऊं शकत नाहीं. उलट अशा संकटसमयीं दुर्बलतेनें किंवा अज्ञानानें किंवा मूर्खपणानें

त्याच्याविरुद्ध कोणी गेलें नाहीं म्हणजे मिळविली. सारांश, संस्थानिकांचें संस्थानिकत्व सार्वभौम सरकारच्या कृपादृष्टीवर अवलंबून राहातें व त्याकरितां रेसिडेंटरूपी देवास वरचेवर आळवावें लागतें.

सन १८९५ सालीं सयाजीराव जेव्हां युरोपाहून परत आले त्यावेळीं बडोदें संस्थानांत अत्यंत चमत्कारिक व कठिण परिस्थिति निर्माण झाली होती. महाराजांचा स्वतंत्र बाणा, स्वाभिमान, उद्योगप्रियता, सर्वसंग्रहात्मक बुद्धि, निर्भीडपणा, परदेशांतील नूतन सुधारणा आत्मसात् करण्याची विलक्षण हातोटी, बहुश्रुतपणा इत्यादि गोष्टींमुळें डोईजडपणाची धास्ती ब्रिटिश रेसिडेंटास वाटणें स्वाभाविक होतें. त्यांतल्या त्यांत महाराजांचे पूर्वीचे शिक्षक व यावेळीं सेटलमेंट कमिशनर म्हणून असलेले इलियटसाहेब महाराजांच्या स्वाभिमानाचें व हुषारीचें नेहमीं कौतुक करीत. ह्या गोष्टी पुष्कळांस सहन होत नसत. रा. वासुदेव सदाशिव बापट या नांवाचे गृहस्थ इलियट साहेबांचे असिस्टंट होते. यांच्यावर साहेबांची बहाल मर्जी होती. महाराजांनीं सेटलमेंट खात्यांत सुधारणा करण्याचें ठरविल्यावर त्या खात्याच्या चौकशीला इनाम कमिशनचें स्वरूप आलें. इनामावर आणेवारीचा आकार बसणें, सनद नसल्यामुळें इनाम जप्त होणें वगैरे गोष्टी घडून आल्या. त्यामुळें इनामदारवर्ग असंतुष्ट झाला व या सर्वाला कारण बापट अशी साहाजिक सार्वत्रिक समजूत झाली. महाराजांस खासगी सल्लामसलतींत—मग रेसिडेंट विरुद्ध कां असेना—इलियट साहेबांचा उपयोग होई. या सर्व गोष्टीमुळें महाराज, इलियट व बापट यांच्याविरुद्ध असंतुष्ट व लांचखाऊ लोकांची जूट झाली. आपल्याकडे वर्तमानपत्रांतून आलेल्या तक्रारींची चौकशी करण्यास रेसिडेंटनें दरबारास सुचविलें. वास्तविक पाहतां रेसिडेंटास दरबारांतल्या अंतर्व्यवस्थेंत हात घालण्याचा कांहींच हक्क नव्हता. परंतु इंग्रजांच्या सोईप्रमाणें ब्रिटिश सरकारची देखरेख याचा अर्थ हवा तितका विस्तृत व संकुचित होऊं शकतो! इलियटसाहेबांच्या मागून नेमलेले सेटलमेंट कमिशनर मि. मेकॉनकी यांनीं बापटांवर तरवार धरली. रेसिडेंट व दिवाण मणीभाई जसभाई यांची त्यांना मदत होतीच. मणीभाईंना महाराज व रेसिडेंट या दोघांचीहि भीति. महाराज युरोपांत असल्यामुळें रेसिडेंटाविरुद्ध जाण्याची दिवाण मणिभाईची छाती होईना. यामुळें बापटांच्या खटल्याला निष्कारण मोठें स्वरूप आलें. मेकॉनकी साहेबांना दरबार कौन्सिलकडून स्पेशल मॅजिस्ट्रेटचे अधिकार देण्यांत आले.

ता. १३ आगस्ट १८९४ सालीं बापट कमिशन नेमलें गेलें. फिर्यादीपक्षातर्फे बॅरिस्टर ब्रॅन्सन व फेरोजशहा मेथा काम चालवीत होते आणि बापटातर्फे दाजी आबाजी खरे व महादेव चिमणाजी आपटे काम चालवीत असून बापटांचे स्नेही बाळ गंगाधर टिळक त्यांना मदत करीत होते. कमिशननें आपल्याकडे न्याय कोर्टाचा अधिकार आहे अशा समजुतीनें वर्तन करून बापटांना ६ महिने साधी कैद व १० हजार रुपये दंड अशी शिक्षा देण्याची शिफारस केली. वस्तुतः ती नुसती चौकशी होती. महाराज १९ जानेवारी १८९५ सालीं विलायतेहून परत आल्यावर त्यांनीं बापट प्रकरण हातीं घेऊन दोघां कायदेपंडितांकडे सर्व कागदपत्र सोंपविले आणि त्याशिवाय दिवाण (S. K. Iyengar) व एक पारशी जज्ज यांचा अभिप्राय घेऊन बापटांना निर्दोषी ठरविलें. मात्र त्यांना नोकरीवर रुजूं करून घेतलें नाहीं. महाराजांच्या मतें अथपासून इतिपर्यंत बापट प्रकरण अत्यंत त्रासदायक होतें. त्यांना तर या प्रकरणाची आरंभापासून कांहींच माहिती कळविण्यांत आली नाहीं. या सर्व प्रकाराबद्दल रेसिडेंटचा महाराजावर फार मोठा घुस्सा झाला. रेसिडेंटचें म्हणणें कीं, महाराजांनीं परदेशास जातांना कौन्सिलला सर्वाधिकार देऊन जावें, व दिवाणांनीं महत्त्वाच्या बाबतींत रेसिडेंटचा सल्ला घ्यावा. रेसिडेंटास भेटून महाराजांनीं स्वच्छ सांगितलें कीं, रेसिडेंटास संस्थानच्या अंतर्गत व्यवस्थेंत हात घालण्याचा बिलकूल अधिकार नाहीं. परंतु रेसिडेंटनें आपला दुराग्रह सोडला नाहीं, इतकेंच नव्हे तर संस्थानांतील बऱ्या वाईट गोष्टींची माहिती आपणांस कळविली पाहिजे असेंहि महाराजांस सांगण्याचें धाष्ट्‌र्य केलें. अखिल हिंदुस्थानांत शांतता व सुव्यवस्था नांदावी याबद्दल ब्रिटिश सरकार जबाबदार आहे, त्याअर्थी त्यांना सर्व हकिकती कळविल्याच पाहिजेत हा रेसिडेंटचा युक्तिवाद. परंतु महाराजांनीं निक्षून सांगितलें कीं, संस्थानांत शांतता आहे किंवा नाहीं ह्यावर देखरेख ठेवणें एवढेंच रेसिडेंटचें काम, अंतस्थ कारभारांत मन घालण्याचें त्यांस कारण काय? महाराजांनीं राज्यकारभारासंबंधीं कोणत्याहि प्रकारची माहिती रेसिडेंटास पुरविण्याचें स्पष्टपणें नाकारलें (?). यावर रेसिडेन्सीचें व हिंदुस्थान सरकारच्या अधिराज्याचें जूं झुगारून देण्याचा हा महाराजांचा प्रयत्न आहे असेंहि रेसिडेंटनें भासविण्यास कमी केलें नाहीं. या वेळीं दोन्हीं बाजू हट्टास पेटल्या होत्या. महाराजांची प्रकृति कामाच्या दगदगीनें बिघडली होती.

निलगिरी, महाबळेश्वर वगैरे ठिकाणीं जाऊनहि त्यांना मनःस्वास्थ्य वाटेना. अखेर दिवाणावर राज्यकारभार सोंपवून महाराज विलायतेस गेले. इकडे रेसिडेंटनें हिंदुस्थान सरकारचे सल्ल्यानें महाराजांना आपले अधिकार कौन्सिलला देण्यास भाग पाडिलें व दिवाणांनीं बहुतेक बाबतींत रेसिडेंटचा सल्ला घ्यावा असें ठरविण्यांत आलें. या प्रकाराबद्दल महाराजांनीं तीव्र नापसंति आपल्या युरोपियन स्नेह्यांस दर्शविली आहे. मार्च १८९५ सालीं इलियट साहेबांना पाठविलेल्या एका पत्रांत महाराज लिहितात, 'एका रेसिडेंटच्या उपद्व्यापामुळें माझ्या इभ्रतीस धक्का पोंचून मानखंडना झाली आहे आणि नमुनेदार राज्यपद्धति अमलांत आणणें मुष्कील नसलें तरी दुष्कर होऊन बसलें आहे. या प्रकारामुळें माझें मन अत्यंत व्यग्र व उदास झालें आहे!'*

इ. स. १८९३ सालीं लॉर्ड लॅन्सडाऊन यांना महाराजांनीं एक पत्र पाठवून केलेल्या तक्रारीचें लॉर्ड साहेबांनीं जें उत्तर दिलें आहे त्यांत महाराजांच्या इभ्रतीस धक्का न बसेल अशाबद्दल खबरदारी घेण्यांत येईल असें महाराजांना आश्वासन दिलें आणि महाराजांची प्रकृति बिघडलेली आहे या सबबीवर महाराजांनीं प्रकरण मिटतें घ्यावें असेंहि सुचविलें. त्याप्रमाणें नाइलाजास्तव महाराजांनीं व्हाइसरायांना पत्र लिहून दिवाण, २ नायब दिवाण, सैन्य व जमीनमहसूलखात्याचे अधिकारी यांच्या कौन्सिलास आपले हक्क देण्याबद्दल संमति दर्शविली. कौन्सिलला व दिवाणाला जादा अधिकार देण्यासंबंधानें महाराज नाखूष केव्हांच नव्हते. परंतु बडोद्याच्या राज्यकारभाराचीं सूत्रें सिमल्याहून हाललीं जावींत ही गोष्ट त्यांना पटत नव्हती.

या प्रकारानंतर वरिष्ट सरकारशीं वाद माजण्याला दुसरें एक कारण झालें. १८९५ पासून १९०० पर्यंत महाराज कांहीं दिवस संस्थानांत, कांहीं महिने निलगिरी, काश्मीर, उटकमंड वगैरे थंड हवेच्या ठिकाणीं राहूं लागले. इ. स. १८९९ सालीं त्यांनीं नवीन व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांची भेट घेतली. कर्झन साहेब 'मोठे हुषार व व्यवहारदक्ष इसम आहेत' असे महाराजांनीं नंतर त्यांच्यासंबंधीं उद्गार काढले. परंतु या काटेकोर व्यवहारपटुत्वाचा प्रत्यय कर्झनसाहेबांनीं महाराजांना लवकरच आणून दिला. सन १९०० सालीं महाराणी चिमणाबाईसाहेब यांच्या ऑपरेशनसाठीं महाराजांना

* राइस, प्रथम खंड, पृ. १६४.

युरोपास जाणें भाग पडलें. ऑपरेशनमुळें महाराजांना महाराणी व्हिक्टोरिया यांनीं राजवाड्यांत दिलेल्या गार्डन पार्टीससुद्धां हजर राहतां आलें नाहीं. त्याच सालीं व्हाइसराय लॉर्ड कर्झन हे बडोद्याहून ग्वाल्हेरीस गेले. बडोद्यास महाराज नसल्यामुळें त्यांनीं स्वागत समारंभ करून घेण्याचें नाकारलें व त्याच सुमारास संस्थानिकांच्या वागणुकीसंबंधीं 'कर्झन सर्क्युलर' बाहेर पडलें. त्या सर्क्युलरचा आशय असा होता कीं, नेटिव्ह संस्थानिक हा ब्रिटिश साम्राज्याचा एक घटकावयव आहे आणि या दृष्टीनें मी त्यांना माझे सहकारी व भागीदार समजतों. त्यानें बेजबाबदारपणें वागून भागणार नाहीं. युरोपियन हॉटेल, रेसकोर्स, किंवा पोलोग्राऊंड वर त्यांचें आगमन लोकांच्या हिताच्या दृष्टीनें ठीक नाहीं. त्यांचें खरें कर्तव्य म्हणजे त्यांनीं प्रजेच्या हिताकडे लक्ष देणें हें होय, शिवाय सर्क्युलरमध्यें मुख्य खरी खोंच अशी होती कीं, संस्थानिकांनीं व्हाईसरॉयांच्या परवानगीशिवाय हिंदुस्थान सोडून जाऊं नये आणि अशा प्रकारची परवानगी देणें सर्वस्वीं व्हाईसरॉय साहेबांच्या मर्जीवर अवलंबून राहील. पुनः वादाचा प्रश्न उभा राहिला. महाराजांचा स्वभाव तर इतका दृढनिश्चयी आणि बाणेदार कीं, स्वतःच्या अधिकारावर अतिक्रमण त्यांस बिलकूल खपणें शक्य नव्हतें महाराज मोठ्या उद्वेगानें म्हणतात, 'आम्हांला संस्थानिक म्हणण्यांत येतें, परंतु पगारी नोकरापेक्षांहि तुच्छतेनें वागविण्यांत येतें !' याच सुमारास दादाभाई नौरोजी व सुप्रसिद्ध समाजसुधारक बी. एम्. मलबारी यांनीं महाराजांना खासगी पत्र लिहून ब्रिटिश सत्तेशीं विरोध करून हात दाखवून अवलक्षण करून घेऊं नये म्हणून सुचविलें. परंतु राणीसाहेब अजारी असल्यामुळें महाराजांना परत येतां येणें शक्य नव्हतें. महाराज ता. ८ आगस्ट १९०० रोजीं दिवाण आयंगार यांना लिहितात, 'या सर्क्युलरमध्यें आमची शरीरप्रकृति व हितसंबंध यांची किंमत कस्पटासमान लेखिली आहे. आम्हांला या गोष्टी अगोदर कळत्या तर आम्हीं आमच्या राणीसाहेबांना आजारी पडूं नका म्हणून सांगितलें असतें.' त्यावेळचे प्रिन्स ऑफ वेल्स एडवर्ड यांचेंहि असेंच मत होतें कीं, 'सर्क्युलरची भाषा जरा सभ्य व सौजन्याची असती तर बरें दिसलें असतें, आणि त्यापेक्षां मित्रत्वाच्या सूचनेनें पुष्कळ कार्य झालें असतें.' महाराजांना १९०१ साल उजाडेपर्यंत हिंदुस्थानांत परत येतां आलें नाहीं. महाराजांनीं परत आल्यावर दिवाणामार्फत 'सर्क्युलर'बद्दल आपली उघड नापसंति व्हाइसरायास व्यक्त केली,

परंतु यामुळें कर्झन साहेबांच्या तळव्याची आग मस्तकास गेली. व्हाइसराय झाल्यावर हिंदी लोकांवर सत्ता मिरविण्याची त्यांनीं कांहीं बाकी ठेवली नव्हती. हे बादशहांचे प्रतिनिधि, तेव्हां प्रतिनिधिपणाचा हक्क गाजवतांना उद्दामपणाच्या मनोधैर्याचा कळस व नानाप्रकारच्या प्रयत्नांनीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष अपमान करण्यांत त्यांनीं कोणताहि मोठा मनुष्य शिल्लक ठेवला नव्हता. सन १९०३ सालीं असाच मजेदार प्रसंग घडून आला. त्यांत कर्झन साहेबांच्या कुटिल राजनीतीची व अरेरावीची मजल कोठपर्यंत गेली आहे हें सर्वांस कळून चुकलें. या सालीं सातवे एडवर्ड यांच्या राज्यारोहणानिमित्त दिल्लीस दरबार भरविण्याचें ठरलें. बडे लाट कर्झनसाहेब यांनीं सदर प्रसंगीं सर्व संस्थानिकांनीं हजर राहावें म्हणून फर्माविलें आणि प्रत्येक संस्थानिकांकडून दरबारासंबंधीं सूचना मागविल्या. हा दरबार म्हणजे ब्रिटिश सार्वभौम सत्तेचें एक बडें प्रदर्शनच. त्यांतून कर्झन साहेबासारखे कट्टे साम्राज्यवादी गृहस्थ व्हाईसरॉय. मग काय विचारतां? 'संस्थानिकांनीं अफगाणिस्तानचे अमीर किंवा इराणचे शहा यांच्याप्रमाणें नुसते खुर्चीवर बसून न राहतां दरबारप्रसंगीं व हत्तीच्या मिरवणुकीचे वेळीं मनःपूर्वक आपल्या राज्यनिष्ठतेचें प्रदर्शन करून समारंभांत भाग घ्यावा,' अशा अर्थाचे कर्झनशाही हुकूम सुटले. महाराजांनीं ही गोष्ट आपल्यास साफ नापसंत असल्याचें रेसिडेंटास कळविलें. तरी पण सार्वभौम बादशहाविषयीं आपला यत्किंचितहि अनादर दाखविण्याची मात्र आपली इच्छा नाहीं असें महाराजांनीं बोलून दाखविलें. मिरवणुकींत भाग न घेतल्यानें संस्थानिक अराजनिष्ठ ठरतो, तर मग संस्थानिकांशीं याबाबतींत विचारविनिमय करण्याची तसदी लाटसाहेबांनीं निष्कारण कां बरें घेतली? 'संस्थानिकांनीं मिरवणुकींत भाग घेतलाच पाहिजे. बुद्धिपुरःसर त्यांनीं तसें न केल्यास त्यांचा अपमान केला जाईल' अशा प्रकारची सक्ती सार्वभौमसत्तेनें केल्यास महाराज समारंभांत भाग घेतील, परंतु ही गोष्ट त्यांना अंतःकरणापासून पसंत आहे म्हणून नव्हे, अशाप्रकारचे महारांजानीं आपले विचार अगोदर कळविले. दुसरा वादाचा मुद्दा असा कीं, महाराजांच्या खास नोकराचे पोषाख निळ्या रंगाचे होते. निळा रंग सार्वभौमसत्तेचा निदर्शक. साम्राज्यमदाची धुंदी चढलेल्या कर्झनसाहेबांस ही गोष्ट कशी खपणार? त्यांनीं लगोलग हुकूम काढून अशा प्रकारचे बरोबरीच्या नात्याचे सम्राट प्रतिनिधीस उपमर्दकारक वाटणारे दरबारी पोषाख संस्थानिकांच्या नोकरांस वापरण्यास मनाई केली.

ता. १ जानेवारी १९०४ रोजीं दरबार भरविण्यांत आला. महाराज त्याचे आदले दिवशीं, दिवाणसाहेब, राजघराण्यांतील इतर मंडळी यांच्या समवेत दिल्लीस पोंचले. समारंभास बादशाहाचे बंधु ड्यूक ऑफ कॅनॉट व त्यांच्या पत्नी उपस्थित होत्या. समारंभाचे वेळीं बादशहाच्या बंधूस खालची खुर्ची देऊन कर्झनसाहेबांनीं वरची घेतली. व्हाइसरायांचें भाषण झाल्यानंतर बादशहांचें भाषण वाचून दाखविण्यांत आलें. यानंतर प्रत्येक संस्थानिकानें बादशहाचे प्रतिनिधि व बंधु यांना प्रणाम करून आपली राजनिष्ठा व्यक्त करावयाची होती. निजामसाहेब शिरस्त्याप्रमाणें कुर्निसात करून परत आपले जागेवर येऊन बसले. यानंतर महाराजांची पाळी होती. महाराजांनीं शांतपणानें व्हाइसराय यांना उद्देशून 'राज्यारोहण व नूतन वर्षाबद्दल माझा अभिनंदनपर संदेश बादशहांना कळविण्याची तसदी व्हाइसरायसाहेबांनीं घ्यावी' असे सूचक उद्गार काढून ते आपले जागेवर येऊन बसले. महाराजांचा बाणेदारपणा व स्वाभिमान वरील गोष्टींत प्रतीत होत नाहीं काय ? अखेर शेवटीं कर्झनसाहेबांनीं आपल्या हृद्यांत दुमदुमणारा साम्राज्यवादाचा नगाराच नुसता वाजविला. १९०५ सालींहि प्रिंस ऑफ वेल्स ( हल्लींचे बादशहा ) हिंदुस्थानांत आले त्यावेळींहि अशीच गोष्ट घडली. महाराज त्यावेळीं बडोद्यांत नव्हते. व्हाइसराय साहेबांनीं याबद्दल महाराजास संस्थान सोडून कोठेंहि बाहेर जाण्याची कायमची बंदी करण्याचें ठरविलें. परंतु खुद्द बादशहांनीं त्यावेळीं कर्झन साहेबांचे अंतस्थ कान पिळून तसें करण्यास मनाई केली असें म्हणतात.

एकंदरीनें कर्झनशाहीची झळ महाराजांसहि लागली, परंतु महाराजहि तोडीस तोड होते.

यानंतर महाराजांनीं काश्मीरची सफर केली. १९०५ सालीं वंगभंगाची चळवळ सुरू झाल्यावर अरविंद घोष यांनीं बडोद्यांतील आपल्या नोकरीचा राजीनामा दिला. यावेळीं स्वदेशी चळवळीची लाट चोहोंकडे उसळली होती. त्याचें पर्यवसान बंगालमध्यें अत्याचार होण्यांत झालें. ऑगस्ट १९०९ सालीं व्हाइसराय लॉर्ड मिंटो यांच्याकडून महाराजास कळविण्यांत आलें कीं, 'देशांत अशांतता व अराजकता माजली असल्याकारणानें तिचीं पाळेंमुळें खणून टाकण्यास संस्थानांनीं मदत करावी.' परंतु बडोद्यांत राजद्रोह होता कोठें ? प्रजेचे राजे महाराज आणि ते तर प्रजेचे अत्यंत आव-

डते. मात्र ब्रिटिश मुलखांत राजद्रोहाचें बीज रुजून त्याचा वृक्ष फोंफावण्यास सुरुवात झाली होती.

नोव्हेंबर महिन्यांत व्हाइसराय लॉर्ड मिंटो यांनीं बडोद्यास भेट दिली. महाराजांनीं लक्ष्मीविलास राजवाड्यांत त्यांचें थाटाचें स्वागत केलें. भोजन-प्रसंगीं महाराजांनीं गायकवाड सरकारचें धोरण नेहमीं सार्वभौम सत्तेशीं राजनिष्ठ राहील अशी ग्वाही दिली. आपल्या भाषणांत महाराजांनीं राजनिष्ठा ही नेहमीं राजा व प्रजा यांच्या परस्पर प्रेमावर अवलंबून राहील; प्रजेला राज-सत्तेची अंशभाक् करणें हें राजाचें कर्तव्य होय असें सांगितलें. व्हाइसरा-यांनींहि आभारप्रदर्शनार्थ उत्तर देतांना महाराजांनीं आपल्या राज्यांत केलेल्या सुधारणांबद्दल त्यांचीं स्तुतिस्तोत्रें गाइलीं व यानंतर समारंभ खलास होऊन व्हाइसराय परत गेले. सन १९१० सालीं टाइम्सनें असें प्रसिद्ध केलें कीं, ' एकट्या गायकवाड सरकारखेरीज करून इतर सर्व संस्थानांनीं आपापल्या राज्यांतून राजद्रोहाचें समूळ उच्चाटण करण्यास संमति दिली आहे. ' बंगा-ल्यांतील ' अमृतबझार पत्रिका ' नांवाच्या जहाल वृत्तपत्रानें एक लेख लिहून महाराजांनीं वरिष्ठ सरकारला पाठविलेल्या उत्तराबद्दल त्यांची पाठ थोपटली. या गोष्टींचा विपरीत अर्थ करण्यांत येऊन महाराज अराज-कतेला उत्तेजन देतात अशाप्रकारचा वरिष्ठ सरकारचा ग्रह झाला. वंगभंगाच्या चळवळींत प्रसिद्धीस आलेले अरविंद घोष व कृष्णवर्मा ह्यांची महाराजापाशीं पूर्वीं नोकरी झाली, यामुळें महाराजावरचा संशय दृढ झाला. १९२६ सालीं महाराजांनीं त्यावेळची आठवण सांगतांना असें प्रतिपादन केलें कीं, ' त्यावेळीं मीं संस्थानांत केलेल्या सुधारणामुळें लोक मजला अतिशय चाहात असत. याचा विपरीत अर्थ अँग्लो इंडियन वृत्तपत्रें व ऑफिसर्स यांनीं केला. ' संस्थानिकानें प्रजेचें आवडतें होऊं नये ही ब्रिटिश राज्यांतील तेव्हांची न्यायनीति खरोखर औरच म्हणावयाची ! कांहीं दिवसांनीं महाराज युरोपच्या प्रवासास निघून गेले. २२ जून १९११ रोजीं विलायतेस झालेल्या राज्यारोहण प्रसंगीं महाराज व महाराणीसाहेब जातीनें हजर होत्या. दिल्लीस दरबार भरवून हिंदुस्थानचें बादशाहीपद जॉर्ज बादशहा व महा-राणी मेरी यांनीं धारण करावें असें यानंतर व्हाइसरायांनीं ठरविलें. त्याकरितां सयाजीराव महाराज नोव्हेंबर महिन्यांत बडोद्यास आले. डिसेंबर ५ रोजीं ादशहांची स्वारी दिल्लीस आली. मोठा दरबार भरून राजेसाहेबांचें भाषण

झाल्यावर व्हाइसराय व एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर यांनीं शिरस्त्याप्रमाणें कुर्निसात करून ते आपापल्या जागांवर जाऊन बसले. नंतर हैद्राबादचे निजाम, गायकवाड, म्हैसूरचे राजेसाहेब, काश्मीरचे राजेसाहेब वगैरेंचा क्रम ठरविला होता.

या समारंभाच्या पूर्वी झालेल्या तालमीस महाराज प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें स्वतः हजर राहूं शकले नाहींत. त्यांनीं श्री. संपतरावांस पाठविलें होतें व त्या दिवशीं त्यांच्या मनाची कांहीं खाजगी गोष्टीमुळें चलबिचल झाली होती. त्यादिवशीं ते बादशहांनीं नजर केलेलें स्वस्तिक व पट्टा घालण्याचे विसरले. दरबारास जातेवेळीं गाडींत रेसिडेंट साहेबांनींहि त्यांना या गोष्टीची आठवण करून दिली नाहीं. दरबारांत निजामसाहेबांनीं कुर्निसात केल्यानंतर, महाराजांनीं पुढें होऊन प्रणाम केला; परंतु गोंधळून जाऊन ते लगेच पाठ फिरवून परत फिरले.

आपल्या हातून एखादी चूक झाली आहे किंवा काय हें ता. १२ पर्यंत महाराजांस माहीत नव्हतें. दरबारानंतर महाराज गव्हर्मेंट हौसमध्यें गेले. परंतु तेथें लॉर्ड सिडेनहॅम नाहींत, असें त्यांना सांगण्यांत आलें. दुसरे दिवशीं नामदार गोखले यांनीं महाराजांना त्यांच्यासंबंधीं दरबारांत उठलेल्या काहुराची बातमी दिली आणि महाराजापासून माफी लिहून घेण्याचाहि सरकारचा विचार असल्याचें त्यांनीं कळविलें. त्यानंतर महाराजांनीं व्हाइसराय लॉर्ड हार्डिंज यांना पत्र लिहून झालेल्या प्रकाराबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली ती:—‘ प्रिय लॉर्ड हार्डिंज, मी ज्या पद्धतीनें सार्वभौम बादशहा व महाराणी यांना प्रणाम केला त्यावर सर्वांचें बरेंच प्रतिकूल मत झालें असें मीं ऐकिलें. सार्वभौमांचा कोणत्याहि प्रकारें भरदरबारांत अपमान न होईल असें वर्तन करण्याची शक्यतोंवर मी खबरदारी घेतली होती व सार्वभौमांनीं अगर इतर कोणीहि माझ्या राजनिष्ठतेबद्दल साशंक होईल असें कांहीं न घडावें असेंच मजला वाटत होतें. ब्रिटिश सरकारशीं मी व माझें संस्थान अत्यंत ऋणी व राजनिष्ठ राहिलें आहे. उच्चासनापासून परत फिरतांना मजकडून दरबारी शिष्टाचाराचा भंग झाला असें सांगण्यांत येतें. खरोखरी त्यावेळीं मी त्या भव्य दरबारांत गोंधळून गेल्यामुळें मी काय करीत आहे याचें मला भान देखील राहिलें नाहीं. माझे अगोदर एकट्या निजाम सरकारची स्वारीच कुर्निसात करून गेली होती व त्यावेळेस त्यांच्या बारीक सारीक गोष्टींकडे मला लक्ष देतां आलें नाहीं. त्यानंतर लाग-

लीच माझी पाळी असल्यामुळें मी प्रणाम करून बाहेरची वाट पाहण्यासाठीं गोंधळून इकडे तिकडे पाहूं लागलों व मी योग्य वाटेनें मार्गस्थ झालों अशी माझी कल्पना होती. माझ्या या चुकीबद्दल मी अत्यंत दिलगीर आहें. '

महाराजाविरुद्ध यावेळीं टीकेची बरीच मोठी झोड उठली. निरभ्र आकाशांत ढग येऊन एकदम वीज कडकडावी त्याप्रमाणें दरबारप्रकरणानें मोठीच खळबळ उडवून दिली. लंडन टाइम्सनें महाराजांचा कृष्णवर्मा, घोष इत्यादि क्रांतिकारकांशीं संबंध जोडला व त्यांच्या कृत्यास महाराजांची फूस आहे, सबब सरकारनें महाराजांची बिलकूल गय न करतां त्यांना आठवण राहाण्याजोगें शासन करावें असें सुचविलें. पॅरिसच्या ' ताँ ' पत्रानें ब्रिटिश राज्याविरुद्ध हिंदुस्थानांत किती असंतोष व अप्रीति आहे हें गायकवाडांच्या दरबारांतील वागणुकीवरून स्पष्ट होण्यासारखें आहे अशी टीका केली.

इंग्लंडांतील मजूरपक्षाचे पुढारी कीरहार्डी यांनीं ' पायोनियर ' पत्रांत लेख लिहून महाराजांच्या कोणापुढेंहि मान न वांकविण्याच्या स्वाभिमानाची स्तुति केली, परंतु ' दी वर्ल्ड ' पत्रांत महाराजांविरुद्ध आग पाखडण्यांत आली.

ता. ३१ डिसेंबर रोजीं महाराजांनीं लंडन टाइम्सला पत्र लिहून क्रांतिकारकांशीं आपला संबंध असल्याबद्दल त्या पत्रांत आलेली टीका अवास्तव, विपर्यस्त, खोडसाळ व भ्रममूलक आहे, हें सोदाहरण दर्शविलें.

यानंतर सात आठ महिन्यांनीं व्हाइसरायांचे बंधु व्हायकौंट हार्डिंज यांनीं एका व्याख्यानाचे प्रसंगीं दरबार प्रकरणाबद्दल उल्लेख केला. त्यांत सयाजीराव महाराजासारखा अनुभवी, सुशिक्षित, व जगभर प्रवास केलेल्या माणसाकडून अशा प्रकारची गोष्ट बुद्धिपुरःसर होणें शक्य नाहीं; त्यावेळीं ते गोंधळून गेले असले पाहिजेत हीच गोष्ट जास्त संभवनीय आहे, असे उद्गार काढले. त्यावर ' पॉलमाल गॅझेट ' मध्यें एक कडक टीका आली होती. महाराजांनीं २६ जून १९१२ रोजीं मि. एम्. एच. स्पिलमन यांना पाठविलेल्या पत्रांत ते लिहितात, ' रेसिडेंटसाहेबांनीं मला एकदांच प्रणाम करण्यास सांगितलें होतें. महाराज्ञींनांहि प्रणाम करण्याइतकें स्त्रीदाक्षिण्य माझ्यांत नव्हतें असें नाहीं. रेसिडेंटनें एकच प्रणाम करण्यास सांगितलें तेव्हां मला जरा चमत्कारिकच वाटलें, पण या बाबतींत प्रश्न करणें हें गैरसोयीचें होतें.'

यानंतर ही भडकलेली आग आपोआप थंड झाली व विरोधाचें आभाळ

निवळलें. परंतु संस्थानांत अराजकतेची बीजें पेरलीं गेलीं आहेत हा ब्रिटिश सरकारचा वहीम अजून शिल्लक होताच.

अमरेळी प्रांताचे सुभे बॅ. के. ग. देशपांडे हे गृहस्थ ब्रिटिशांविरुद्ध प्रचारकार्य करतात, म्हणून त्यांना संस्थानी नोकरींतून काढून टाकण्यांत यावें अशी मागणी हिंदुस्थान सरकारनें केली. परंतु देशपांड्याच्या विरुद्ध तशाप्रकारचा पुरावा मात्र ब्रिटिशसरकारास देतां आला नाहीं. महाराजांनीं देशपांडे यांना नुकसानीबद्दल १० हजार रुपये देऊन नोकरींतून रजा दिली. दुसरें उदाहरण म्हणजे बडोदा कॉलेजचे प्रोफेसर डी. एल्. पुरोहित. हे निरनिराळ्या समाजांचा अभ्यास करण्यास्तव हिंदुस्थानांत हिंडत असतां पांडिचेरीस जाऊन त्यांनीं बाबू अरविंद घोष यांची गांठ घेतली. अरविंद घोष हे पूर्वी बडोद्यास नोकरींत होतेच. परंतु हे सरकारच्या मतानें बडे क्रांतिकारक. अर्थात् पुरोहितांचा हा भयंकर गुन्हा ठरविण्यांत आला व त्यांनाहि बडोद्याच्या नोकरींतून कमी करण्यांत यावें अशी मागणी करण्यांत आली. परंतु पुरोहितांनीं पुढील प्रसंग जाणून १९१२ सालीं आपल्या जागेचा राजिनामा दिला व महाराजांनीं तो स्वीकारला.

या सर्व छळवादाच्या मुळाशीं दरबारप्रकरण आहे असें त्यावेळीं सर्वांच्या मनानें घेतलें. वस्तुतः स्वातंत्र्याच्या ध्येयाचा जनतेंत प्रसार करणें हा इंग्रजी न्यायशास्त्रान्वयें बिलकूल गुन्हा होत नाहीं. परंतु स्वदेशाभिमान म्हणजे अराजकता असा कांहीं विपरीत अर्थ त्यावेळच्या राजकारणांत गणला गेला व महाराजांसारख्या स्वाभिमानी व स्वदेशाभिमानी संस्थानिकाविरुद्ध निष्कारण गिल्ला करण्यांत आला, हें आजमितीस कोणासहि सहज कळून येण्यासारखें आहे. महायुद्धांत बडोदें सरकार राजनिष्ठ कीं अराजनिष्ठ याची प्रचीति सार्वभौम सरकारास आलीच आणि महाराजांच्या हेतूविषयीं अकारण गैरसमज पसरविला याबद्दल सार्वभौम सरकारास त्यावेळीं काय वाटलें असेल तें असो. महायुद्धांत ब्रिटिश सरकारास मदती दाखल महाराजांनीं ५० लाख रुपये दिले व १ कोटी रुपयांचे वार बॉंडस् खरेदी केले. युद्धांत ब्रिटिश सरकारला मदत केल्याबद्दल १९१७ सालीं महाराजांना जी. सी. आय्. ई. ही पदवी बादशाहाकडून देण्यांत आली.

महायुद्धानंतर व्हाइसराय लॉर्ड चेम्सफर्ड यांचे भेटीकरितां महाराज सिमल्यास गेले. यावेळीं विचारविनिमय करतां यावा म्हणून सर्व संस्थानिकांचें

एक ‘ नरेंद्रमंडळ ’ काढण्यांत आलें. आणि व्हाइसराय साहेबांना त्याचे अध्यक्ष नेमण्यांत आलें. इ. स. १९२१ सालीं प्रिन्स ऑफ वेल्स जेव्हां बडोद्यास आले त्यावेळीं त्यांचें थाटाचें स्वागत करून सर्व जडजवाहीर, प्रेक्षणीय वस्तु महाराजांनीं दाखविल्या. युवराज साहेबांचा मुक्काम बडोद्यांत फार थोडा असल्याकारणानें समारंभ लवकरच उरकण्यांत आला.

यानंतर २१ जानेवारी १९२६ रोजीं व्हाइसराय लॉर्ड रीडींग व लेडी रीडींग यांनीं बडोद्यास भेट दिली. स्वागत समारंभ झाल्यानंतर महाराजांनीं त्यांना एक थाटाची मेजवानी दिली. त्याप्रसंगीं खालसा मुलखांतील स्वराज्याच्या चळवळीचा उल्लेख करून महाराज म्हणाले कीं, हिंदी संस्थानांचें हक्कसंरक्षण साम्राज्यसरकारनें अवश्य केलें पाहिजे. त्यांचे पूर्वापार चालत आलेले मानमरातब व अधिकार यांस नवीन राज्यघटनेंत धक्का बसतां कामा नये. आपल्या संस्थानासंबंधीं बोलतांना ते म्हणाले कीं, शंभर वर्षांपूर्वी ब्रिटिशांनीं गायकवाड सरकार व त्यांचे मांडलीक यांच्या परस्पर संबंधाच्या बाबी आपल्या हातांत घेतल्या होत्या. आजतागायत तीच व्यवस्था अमलांत आहे. सध्यांच्या लोकशाहीच्या नवीन मनूंत मांडलिक संस्थानांचा ताबा गायकवाड सरकारास परत देणें हें साम्राज्य सरकारच्या हिताचें आहे. कारण त्यामुळें साम्राज्य सरकारावरील एक जबाबदारी कमी होणार आहे. उत्तरादाखल व्हाइसरायांनीं असें आश्वासन दिलें कीं, हिंदुस्थानच्या नवीन राज्यघटनेंत संस्थानिकांचे हितसंबंध अबाधित राहतील. महाराजांच्या इतर मागण्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार केला जाईल असें त्यांनीं अभिवचन दिलें. त्यानंतर बडोदा कॉलेजचे सायन्स इन्स्टिट्यूशनच्या पायाचा दगड बसविण्याचा समारंभ उरकल्यानंतर व्हाइसरायांची स्वारी परत दिल्लीस गेली. लॉर्ड रीडींग यांच्यानंतर व्हाइसराय लार्ड आयर्विन व लॉर्ड विलिंग्डन यांनींहि बडोद्यास भेटी दिल्या.

संस्थानिकांच्या प्रश्नासंबंधानें साम्राज्य सरकारनें नेमलेल्या बटलर कमिटीपुढील साक्षींत बडोदें संस्थानची जी कैफियत होती त्यांत संस्थानिकांचा संबंध बादशहाशीं आहे व नवीन राज्यघटनेंत संस्थानिकांचे हक्कसंबंध व तहनामे योग्य रीतीनें पाळण्यांत यावेत वगैरे मुद्दे होते. यासंबंधीं सांगोपांग विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. आतां पर्यंतच्या हकीकतीवरून महाराजांचे राजकीय बाबतींत वरिष्ठ सरकारशीं संबंध कोणकोणत्या स्वरूपाचे होते, हें कळण्यासारखें आहे. संस्थानिकांचे मध्यवर्ती

सत्तेशीं संबंध कशा स्वरूपांत असावेत याबद्दल निश्चित योजना हिंदुस्थान सरकार जवळ नाहीं. तहनामे व करार यांचे अर्थ ब्रिटिश सरकार म्हणेल तसे व्हावयाचे. संस्थानिकांच्या सूचना बिलकूल विचारांत घेतल्या जात नाहींत. ही स्थिति राजकीय प्रश्नासंबंधानेंच आहे असें नाहीं. इतर प्रश्नासंबंधानेंहि हीच तऱ्हा आहे. १९०४ सालीं कर्झन साहेबांनीं इंपीरियल सर्व्हिस सिस्टिमसंबंधानें जो खलिता सर्व संस्थानिकांकडे पाठविला होता, त्यांत हिंदुस्थानचें परचक्रापासून संरक्षण करण्याची जबाबदारी ब्रिटिशांवर आहे व ती तें सरकार उत्तम रीतीनें पार पाडतें; यास्तव संस्थानिकांनीं ब्रिटिश सरकारला सैन्य व पैसा यांची मदत करणें अवश्य आहे असें म्हटलें होतें. महाराजांनीं प्रत्युत्तरांत असें प्रतिपादन केलें कीं, साम्राज्य संरक्षणाचा भार जर अंशतः संस्थानिकांनींहि उचलावयाचा असेल तर त्यांना साम्राज्य सरकारच्या कौन्सिलांत प्रतिनिधित्व देणें क्रमप्राप्तच होय. कर्झनसाहेबांच्या खलित्यास महाराजांनीं नकारार्थी उत्तर पाठविलें हें सांगणें नकोच. परंतु यानंतर हा प्रश्न पार मागें पडला.

आर्थिक बाबतींत वरिष्ठ सरकारशीं बडोदें संस्थानचा संबंध अफू, मीठ, जकाती या बाबींसंबंधानें आलेला आहे. अफूची निर्यात हिंदुस्थानसरकारनें कायद्यानें बंद केली व संस्थानांनाहि तसें करण्यास भाग पाडलें. त्यामुळें बडोदें संस्थानचें अफूचें उत्पन्न बुडालें. त्याप्रमाणें मिठावर हिंदुस्थान सरकारनें जकात वाढविली व खाजगी मीठ तयार करण्यास कायद्यानें मनाई केली. आणि गायकवाड सरकारासहि आपल्या राज्यांत मिठागरें बांधण्यास विरोध केला. दरबारनें याबद्दल निषेध प्रदर्शित केला. परंतु वरिष्ठ सरकारनें आपला हट्ट शेवटास नेला. इ. स. १९०६ सालीं महाराजांनीं एक मेमोरँडम व्हाइसरायाकडे पाठवून संस्थानांत मीठ तयार करून तें ब्रिटिश जकात देऊन पाठविण्यास हरकत नसावी म्हणून कळविलें. परंतु त्यास नकारार्थी उत्तर पाठविण्यांत आलें. सध्यां ओखाबंदरांतून मीठ तयार करून बंगालमध्यें पाठविण्याचा हक्क संस्थानास मिळाला आहे असें समजतें.

तिसरी गोष्ट जकातींची. सन १८९४ सालीं हिंदुस्थान सरकारनें सरसकट परदेशी मालावर जकाती बसविल्या व संस्थानांनीं आपल्या मुलखांत तशा प्रकारची व्यवस्था अमलांत आणावी, म्हणून त्यांना कळविण्यांत आलें. तसें न झाल्यास संस्थानी मुलखाभोंवतीं हिंदुस्थानसरकार जकातींचीं

नाकीं बसवील अशी भीति घालण्यांत आली. सन १९०३ सालीं काठेवाडी बंदरांतून येणाऱ्या मालावर जकात घेण्यासाठीं विरमगांव येथें आयात जकातीचे मोठमोठे तट उभारण्यांत आले. यामुळें व्यापारी लोकांस दुप्पट जकातीचा भूर्दंड भरावा लागला. संस्थानांनीं या बाबतींत वरिष्ठ सरकारकडे कागाळ्या केल्या व बडोदें संस्थानानें जोराची तक्रार केली, तेव्हां विरमगांवचें ठाणें उठविण्यांत आलें. परंतु १९२७ सालीं पोरबंदर, भावनगर, बेंडी, ओखा वगैरे बंदरांचा व्यापार वाढल्यामुळें पुनः विरमगांव नाकें बसविण्यांत आलें. महाराजांनीं पुनः याबाबतींत पुष्कळ उचल घेतली, कांहीं अटी सुचविल्या, परंतु हिंदुस्थान सरकारनें त्या सर्व नाकबूल केल्या. सध्यां हा प्रश्न तसाच अनिर्णित आहे.

सन १९३०–३३ सालीं लंडनला झालेल्या तिन्ही गोलमेज परिषदांचे श्री. महाराजसाहेब सभासद होते. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्यांना या परिषदांत जातीनें विशेष भाग घेतां आला नाहीं. सन १९२९ सालचा अर्धाअधिक भाग महाराजांनी जगांतील निरनिराळ्या राज्यघटनांचा खोल अभ्यास करण्यांत घालवून आपलीं स्वतंत्र टिपणें तयार केलीं. तीं खासगी उपयोगाकरितां त्यांनी छापविलीं आहेत. सन १९३० सालच्या नवेंबर महिन्यांत पहिल्या गोलमेज परिषदेस सुरुवात झाली. त्याप्रसंगीं सुरुवातीस केलेल्या आपल्या भाषणांत त्या प्रसंगाचें महत्व किती आहे हें सांगून हिंदी संस्थानिक व हिंदी लोक यांच्या सर्व न्याय्य आकांक्षा पूर्ण करून सन १८५८ सालच्या राणीसरकारच्या जाहीरनाम्यांतील " हिंदवासियांचें ऐश्वर्य म्हणजे आमचें बळ, त्यांचा संतोष हीच आमची सुरक्षितता, व त्यांची कृतज्ञता हेंच आमचें पारितोषक " हे शब्द सार्थ करावे असे अर्थपूर्ण उद्गार महाराजांनी काढले होते. नंतर हिंदी संस्थानिकांच्या खासगी चर्चेंत व परिषदेंत महाराजांनी संयुक्त राज्यघटनेचा ( Federation ) पुरस्कार करून इतर संस्थानिकांचीहि या राज्यघटनेंत सामील होण्यासाठीं मनें वळविलीं. दुसऱ्या परिषदेचे सुरुवातीसहि महाराजांनी फेडरेशनचा जोराचा पुरस्कार केला होता. संयुक्त विषय (Federal subjects ) सोडून इतर बाबतींत संस्थानिकास पूर्ण स्वातंत्र्य असावें असें महाराजांचें मत असून गेल्या डिसेंबरांत सध्यांचे व्हाइसराय लॉर्ड विलिंग्डन हे बडोद्यास आले असतांना त्यांनी आपल्या भाषणांत या गोष्टीवर विशेष भर दिला होता. महाराजांची ही विचारसरणी व्हाइसरायांना पटल्याचें त्यांच्या भाषणावरून दिसून आलें.

# ९. महाराजांचे प्रवास

**केल्यानें देशाटण पंडित मैत्री, सभेंत संचार ।**
**शास्त्रग्रंथ विलोकन, मनुजा चातूर्य येतसे फार ॥**

" युरोप, अमेरिका येथील लोकांची राहणी, त्यांची सामाजिक स्थिति, त्यांची उन्नति व आपली हीनता इत्यादि नानाप्रकारचे विचार माझ्या मनांत घोळत असत. देशपर्यटन करणें हें ज्ञानाचें मुख्य साधन आहे, या विचारांनेंच मीं जगभर प्रवास करण्याचें ठरविलें. " हें महाराजांच्या शब्दांतच सांगावयाचें म्हणजे त्यांच्या प्रवासाच्या आवडीचें एक कारण होय. ' कांहीं प्रसंगामुळें व विशेषतः माझ्या प्रकृतीमुळें, वेळोवेळीं हिंदुस्थानीय लोक प्रवास करतात त्याप्रमाणें मला मोठा प्रवासी बनावें लागलें, ' हें दुसरें कारण. पुढं पुढें तर महाराजांस गुडघी रोगाची व्यथा जडली व थारेपालट करणें आवश्यक झालें.

महाराजांच्याच शब्दांत दिलेल्या कारणावरून त्यांनी इतर कोणत्याहि संस्थानिकापेक्षां जास्त प्रवास कां करावा याचा उलगडा होण्यासारखा आहे. महाराजांच्या पहिल्या महाराणी चिमणाबाई साहेब यांच्या मृत्यूनंतर महाराजांची मनःस्थिति अस्वस्थ होती. कोणतीहि गोष्ट करण्यास त्यांस हुरूप किंवा उत्साह वाटेना, आणि दुसरा विवाह झाल्यानंतरहि प्रकृतींत फेरबदल होण्याचें फारसें चिन्ह दिसेना. डॉक्टरांनीं हवाफेर करण्याचा सल्ला दिल्यावरून महाराजांनीं इ.स.१८८२ च्या नोव्हेंबरांत सिलोनला जाण्याचें ठरविलें. दोन तीन आठवडे तेथें काढून ते परत महाबळेश्वरीं आले. परंतु थंड हवेच्या ठिकाणींहि त्यांना चैन पडेना. त्यांचें वजन बरेंच घटलें व झोंपहि चांगली लागेनाशी झाली. अखेरीस मुंबई सरकारचे त्यावेळेचे सर्जन सर विल्यम मूर यांच्या सल्ल्यावरून त्यांनीं युरोपास जाण्याचें ठरविलें. राज्याचीं सर्व सूत्रें दिवाण लक्ष्मण जगन्नाथ यांच्या हवालीं करून ता. ३१ मे १८८७ रोजीं महाराज, महाराणी चिमणाबाईसाहेब, एक खासगी डॉक्टर व नोकर चाकर इत्यादि ५० मंडळी यांच्यासमवेत युरोपच्या पहिल्या सफरीस निघाले. त्यावेळीं परदेशी प्रवास करणें म्हणजे अधर्माचरण अशी लोकांची समजूत होती. अशा माणसास जातींतून बहिष्कृत व्हावें लागे. युरोपचा प्रवास पुष्कळ लांबीचा, बऱ्याच मुदतीचा, त्रासदायक व शिवाय धर्मशास्त्राविरुद्ध असल्यानें महाराजांचे सर्व

आप्त, इष्टमित्र, नोकरचाकर, प्रजाजन वगैरे सर्व एकसमयावच्छेदेंकरून या सफरीच्या विरुद्ध होते. महाराजांच्या मातुश्री महाराणी जमनाबाईसाहेब ह्याहि प्रतिकूल होत्या. परंतु महाराजांनीं सर्व अडचणी व विरोध बाजूस सारून युरोपास जाण्याचें ठरविलें. अज्ञानानें निष्कारण कांहीं भ्रामक समजुती उराशीं बाळगून धर्मशास्त्राचें व्यर्थ स्तोम माजविणें महाराजांस बिलकूल पसंत नव्हतें. या बाबतींत महाराजांचा करारीपणा, मानसिक धैर्य, दृढनिश्चय हे गुण वाखाणण्याजोगे आहेत. सुधारणाप्रिय मनुष्यानें भ्रामक रूढींचे पाश तोडून अज्ञानांधकारांतून मार्ग आक्रमून स्वतः सुधारणेच्या प्रकाशांत आलें पाहिजे, तरच दुसऱ्यास सुधारतां येतें.

बोटीवर महाराजांना पुष्कळ बाबतींत स्वतंत्र व्यवस्था करावी लागली. पडदानशीन स्त्रियांकरितां ‘ खास व खासगी ’ खोल्या भाड्यानें घ्याव्या लागल्या; सोंवळ्या ओवळया संबंधानेंहि कांहीं विचित्र प्रकार नजरेस आले; कांहीं कांहीं ठिकाणीं खाणावळीच्या व्यवस्थापकांनीं जादा भाडें आकारलें; नोकरचाकरांच्या शिष्टाचाराविरुद्ध विशिष्ट वागणुकीबद्दल अपमान व अवहेलना करण्यांत आली; अशा एक ना दोन हजार अडचणी या प्रवासांत आल्या. अनुभवानें मनुष्य शहाणा होतो, हें त्रिकालाबाधित सत्य महाराजांस यावेळीं पूर्णपणें पटलें.

व्हेनीस येथें प्रथम कांहीं दिवस काढून नंतर महाराज ए-ला-बेन येथें गेले. सप्टेंबर महिन्यांत त्यांनीं आपले बंधु श्रीमंत संपतराव गायकवाड ऑक्सफोर्ड येथें शिकत होते यांच्याकडेच राहण्याचें ठरविलें. नोव्हेंबर महिन्याच्या शेवटीं त्यांनीं लंडन येथें राहण्यासाठीं व्हिक्टोरिया स्ट्रीटवर एक बंगला भाड्यानें घेतला. त्यावेळचे हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी व्हायकाउंट क्रॉस यांनीं महाराज व महाराणी यांना विंडसर राजवाड्यांत नेऊन महाराज्ञी व्हिक्टोरिया यांची भेट करविली. श्री सौ. महाराणी चिमणाबाईसाहेब त्यावेळीं एक बंद गाडींतून अगोदर तेथें गेल्या होत्या. मेजवानीनंतर महाराज कांहीं दिवस ब्रायटन येथें राहून फेब्रुवारी १८८८ मध्यें बडोद्यास परत आले.

महाराजांनीं निरनिराळ्या देशांत मिळून आतांपर्यंत एकंदर २१ पर्यटनें केलीं आहेत. त्यांची जंत्री खालीं दिली आहे:—

| | निघाल्याची तारीख | देश | परत आल्याची तारीख |
|---|---|---|---|
| (१) | मे १८८७ | इंग्लंड ... | ... फेब्रूवारी १८८८ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (२) | जून | १८८८ | स्वित्झर्लंद् ... ... | सप्टेंबर १८८८ |
| (३) | मे | १८९२ | इंग्लंड, नॉर्वे, व जर्मनी | जानेवारी १८९३ |
| (४) | मे | १८९३ | कार्ल्सबाद् ... ... | आक्टोबर १८९३ |
| (५) | नोव्हेंबर | १८९३ | इंग्लंड, स्कॉटलंड, फ्रान्स, ऑस्ट्रिया, जर्मनी, स्वित्झर्लंड इटली ( जिनीवा, फ्लॉरेन्स ) तुर्कस्तान (कान्स्टाँटिनोपल) | जानेवारी १८९५ |
| (६) | मे | १९०० | फ्रान्स | जानेवारी १९०१ |
| (७) | फेब्रुवारी | १९०१ | इंग्लंड ... ... | आगष्ट १९०२ |
| (८) | मे | १९०५ | इंग्लंड, फ्रान्स, स्वित्झर्लंड, अमेरिका | नोव्हेंबर १९०७ |
| (९) | मार्च | १९१० | चीन, जपान, सॅन्फ्रान्सिस्को, कानडा, लंडन | डिसेंबर १९१० |
| (१०) | एप्रिल | १९११ | इंग्लंड .... ... | नोव्हेंबर १९११ |
| (११) | मे | १९१३ | स्वित्झर्लंड ( सेंट मॉरीटझ् ) | नोव्हेंबर १९१३ |
| (१२) | एप्रिल | १९१४ | इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी | डिसेंबर १९१४ |
| | जून | १९१५ | सर्व हिंदुस्थान | |
| (१३) | सप्टेंबर | १९१९ | इंग्लंड ... ... | फेब्रुवारी १९२१ |
| (१४) | मार्च | १९२१ | युरोप .. ... | नोव्हेंबर १९२१ |
| (१५) | एप्रिल | १९२२ | युरोप ... ... | नोव्हेंबर १९२३ |
| (१६) | एप्रिल | १९२४ | इंग्लंड, फ्रान्स, स्वित्झर्लंड | नोव्हेंबर १९२५ |
| (१७) | मार्च | १९२६ | स्वित्झर्लंड ... ... | नोव्हेंबर १९२७ |
| (१८) | एप्रिल | १९२७ | फ्रान्स, स्वित्झर्लंड, स्वीडन, डेन्मार्क, जर्मनी | जानेवारी १९२८ |
| (१९) | एप्रिल | १९२९ | युरोप | डिसेंबर १९३० |
| (२०) | मार्च | १९३० | युरोप | फेब्रुवारी १९३१ |
| (२१) | मे | १९३१ | फ्रान्स, स्वित्झरलंड, इंग्लंड, जर्मनी, इटली, स्कॉटलंड. | डिसेंबर १९३२ |

निरनिराळ्या देशांत प्रवास केल्यानें महाराजांना त्या त्या देशांच्या संस्कृतींचा तौलनिक अभ्यास करण्यास पुष्कळ मदत झाली. इटलींतील रोमन लोकांची संस्कृती ही लढाऊ लोकांची संस्कृति होती. युद्धशास्त्र हा त्यांचा आवडीचा व्यवसाय व विषय, आणि समरांगण हाच त्यांचा रंगमहाल. रोम मधील जुन्या इमारती, देवालयें इत्यादि अवशेष आणि इटालियन लोकांचे आचारविचार, धार्मिक विधि हे सर्व याच गोष्टीची पूर्णपणें साक्ष देत आहेत असें महाराजांना दिसून आलें. फ्रान्स हा केवळ विलासी, सुखोपभोगांत दंग असलेल्या लोकांचा देश म्हणून विशेष प्रसिद्ध आहे, आणि सौंदर्यशास्त्रामध्यें जपानची विशेष आघाडी आहे याचें प्रत्यंतर त्या त्या देशांत प्रवास करतांना महाराजांस आढळून आलें. 'त्याच-प्रमाणें तर्कशुद्ध विचारसरणी व उद्यमशीलता ह्यांत जर्मनी विशेष प्रमुख, परंतु कलाकुसरीच्या बाबतींत अत्यंत मागासलेला आणि आस्ट्रियांत तर सारेच गानप्रिय लोक,' असें महाराजांचें मत झालें. राजकारणपटु, केवळ उपयुक्त-तेवर तेवढी दृष्टी देणारे, सर्वसंग्रह करून जगाला उपदेशामृताचे घुटके पाजणारे अशा इंग्रज लोकांच्या संस्कृतींची, त्यांच्या देशांतील अजस्र कारखाने, रम्य उद्यानें यांवरून महाराजांना पूर्णपणें कल्पना आली. इजिप्त देशांतील प्रवासांत शिल्पशास्त्रज्ञांनांत अचंबा वाटावयास लावणारे पिरामिड पाहून, त्या संस्कृतीच्या प्राचीनतेची व अव्वल प्रतीच्या बुद्धिमत्तेची साक्ष पटली.

'प्रवास हा तरुण जनांच्या शिक्षणाची परिपूर्ती होण्यास व प्रौढ जनांच्या अनुभवज्ञानाची परिपक्वता होण्यास फार आवश्यक आहे' असें म्हणतात. महाराजांच्या मताप्रमाणें 'परदेशगमन हें शिक्षण आहे व प्राचीन हिंदु ग्रंथकारांच्या मताप्रमाणें ज्ञानार्जनाचें एक साधन होय.' इतर देशांशीं दळणवळण ठेवण्याच्या उपयुक्ततेसंबंधानें—विशेषतः युरोपियन लोकांशीं दळण-वळण ठेवण्यासंबंधानें महाराज म्हणतात कीं, तें हिंदुस्थानच्या प्रगतीस फार महत्वाचें होय. कारण स्वदेशांतील संस्थांची युक्तायुक्तता ठरविण्यास अशा दळणवळणाचा फार उपयोग होतो. यास्तव महाराजांनीं दर वर्षी निरनिराळ्या देशांत कृषि, कला, शास्त्रें, उद्योगधंदे, व्यापार वगैरेंचें शिक्षण घेण्यासाठीं विद्यार्थी पाठविण्याचा उपक्रम सुरु केला आहे.

सुधारलेल्या राष्ट्रांत प्रवास करण्यापासून फायदे दर्शवितांना ते म्हणतात, 'त्या लोकांची सद्यःस्थिति, त्यांचे आचारविचार व निरनिराळ्या संस्था,

प्रत्यक्ष पाहण्यांत आल्यानें त्यांच्या उन्नतीची कारणें समजण्यास सुगम होतें व त्यामुळें आपली स्थिति सुधारण्यास कोणत्या उपायांची योजना केली पाहिजे हें कळतें. साधारण लोकांना जर प्रवासापासून वरप्रमाणें फायदा होतो तर ज्यांच्या हातीं ईश्वरानें लक्षावधि लोकांच्या बरेंवाईटाची सत्ता दिली आहे, त्यांना अशा प्रकारच्या प्रवासानें किती फायदा होईल हें सांगणें नको.' संस्थानिकांवर परदेशी प्रवास करण्यासंबंधीं हिंदुस्थानसरकारनें कांहीं निर्बंध घालण्याचें योजिलें आहे असें समजून ते म्हणतात कीं, "अशा लोकांच्या प्रवासास प्रतिबंध करण्याचा प्रयत्न करण्यांत येतो ही फार दिल-गिरीची गोष्ट आहे."

प्रवासापासून आणखी एक फायदा म्हटला म्हणजे निरनिराळ्या माणसांच्या होणाऱ्या ओळखी. 'उदंड ओळखी होतां, उदंड भाग्य येतसे.' परंतु महाराज तर भाग्यवान् होतेच, अर्थात् त्यांनीं ओळखी बरोबरहि इतर अनेक गोष्टींचें ज्ञान करून घेतलें व त्याचा फायदा आपल्या प्रजाजनांना सढळ हातानें करून दिला, हें त्यांनीं आपल्या राज्यांत अनेक सुधारणा केल्या त्यावरून उघड होत आहे.

इंग्लंडाच्या सहाव्या फेरींत ड्यूक ऑफ कॅनॉट, लॉर्ड हॅरिस, लॉर्ड व लेडी रे, लॉर्ड नार्थब्रूक, लेडी ट्वीडेल, लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन, सर जॉन वॅटसन, सर जॉन पुलेस्टन, सर एडवर्ड लॉसन, सर जेम्स ब्लीथ वगैरे मोठमोठ्या बड्या लोकांशीं महाराजांचा परिचय झाला. महाराज्ञी व्हिक्टोरिया यांचें महाराजांवर मुलाप्रमाणें प्रेम होतें. व्हिक्टोरिया मेमोरियल फंडाला महाराजांनीं एक लक्ष रुपये देणगीदाखल दिले, यावरून महाराजांची त्यांचेसंबंधीं निष्ठा व्यक्त होते.

१९०१ मध्यें पॅरिस येथें झालेलें जागतिक प्रदर्शन पाहण्यांत महाराजांनीं कित्येक महिने घालविले. त्याचप्रमाणें वेम्ब्ले प्रदर्शनासहि त्यांनीं १०।१२ वेळां भेटी देऊन त्याचें सूक्ष्म निरीक्षण केलें. यावेळीं पाहिलेल्या गोष्टींचा आपल्या संस्थानास व देशास फायदा कसा करून देतां येईल याकडे त्यांची सारखी दृष्टि असे, व सुधारणेच्या अनेक गोष्टी त्यांनीं यूरोपमधून तारेनेंहि सुच-विल्या आहेत.

प्रवासापासून आणखी एक महत्त्वाचा फायदा म्हटला म्हणजे आपल्या देशांतील व इतर देशांतील राजकीय परिस्थितीचें यथायोग्य आकलन होऊं शकतें हा होय.

सारांश, महाराजांनीं देशपर्यटनापासून मिळविलेलें ज्ञान व माहिती राज्यकारभार सुधारण्याकडे व नवीन कायदे करून प्रजोन्नति करण्याचे कामीं अनेक प्रकारें खर्च केलेली आहे.

प्रवासांत असतांनाहि आपल्या संस्थानच्या कारभाराकडे त्यांचें सारखें लक्ष असतें व येथील परिस्थिति ओळखून नवीन नवीन गोष्टी कोणत्या करतां येतील याकडे त्यांची एकसारखी दृष्टि लागलेली असून त्यासंबंधीं अनेक विचार त्यांच्या मनांत घोळत असतात.

## १०. शिक्षणविषयक प्रगति.

" Education is absolutely necessary for the realisation of my ambition and wishes and for the success of my policy."

" Education is the basis of all reforms and is the only way of solution from our present condition."*

आजकाल बडोदें संस्थानचा यशोदुंदुभी अखिल हिंदुस्थानांतच काय पण आशिया, अमेरिका खंडांतून वाजत आहे. याचें कारण बडोद्यांतील शिक्षणप्रसार होय. मोफत व सक्तीच्या सार्वत्रिक शिक्षणामुळें आणि मोफत वाचनालयांमुळें श्रीमंत सयाजीराव महाराजांचे व बडोदें संस्थानचें नांव हिंदुस्थानच्या शिक्षणाविषयक इतिहासांत अजरामर होऊन राहिलें आहे यांत शंका नाहीं. राजपुत्रांना उत्तमोत्तम शिक्षण मिळण्याची आवश्यकता प्रतिपादन करतांना महाराज लिहितात, " जबाबदारीची व महत्त्वाचीं कामें पार पाडतां यावित आणि राज्यकारभार उत्तम रीतीनें चालवितां यावा म्हणून राजपुत्रांस देशकालमानाप्रमाणें उच्च प्रकारचें शिक्षण मिळणें अगत्याचें आहे. युरोपांतील राजपुत्रांमध्यें अशा शिक्षणाची फार आवड असते." खरोखर पाहतां ज्या देशावर राज्य करावयाचें त्यांतील प्रजाजनांची उन्नति करण्यासाठीं भावी राजा या दृष्टीनें राजपुत्रानें जरुर तें शिक्षण घेणें अवश्य आहे. आणि महाराजांच्या मतें "कायद्याची साधारण मूलतत्त्वें, अर्थशास्त्र, राजनीतिशास्त्र व इतर राज्यकारभारविषयक बाबी यांचें शिक्षण राजपुत्रांना दिलें असतां फार चांगला उपयोग होईल. " बडोद्यास राजपुत्र व इतर सरदारांची मुलें यांच्या शिक्षणासाठीं ' प्रिन्सेस स्कूल ' ही शाळा यांच्याच शिक्षणाच्या वेळीं प्रथम स्थापन

* महाराजांचीं भाषणें, प्रथमखंड.

करण्यांत आली. तसेंच राष्ट्राच्या नागरिकांची मनें उन्नत व सुसंस्कृत करणें हीच राष्ट्राची उत्तमोत्तम सेवा, आणि महाराजांच्या मताप्रमाणें, सार्वत्रिक शिक्षणाची सोय करणें हें प्रत्येक सरकारचें आद्य कर्तव्य. विसाव्या शतकांतल्या लोकशाहीच्या युगामध्यें लोकांस आपल्या नवीन कर्तव्यास व जबाबदारीस तोंड देण्यास सार्वात्रिक शिक्षण मिळणें अत्यंत जरूरीचें व महत्त्वाचें आहे. महाराजांच्या शिक्षणविषयक ध्येयाची यावरून सहज कल्पना करतां येईल.

इ. स. १८७१ सालापर्यंत बडोदें संस्थानांत शिक्षणाचें स्वतंत्र खातें नव्हतें. त्यासालीं सरकारनें २ गुजराथी व २ मराठी अशा चार प्राथमिक शाळा बडोद्यांत सुरू केल्या. अशा शाळांची संख्या राज्यांत वाढतां वाढतां इ. स. १८७८ सालीं एकंदर १४५ झाली. श्रीमंत सयाजीराव यांना अधिकार प्राप्त झाले त्यावेळीं एकंदर १८० शाळा होत्या. पुढें महाराजांनीं १८९३ सालीं अमरेली प्रांतांत प्रयोगादाखल सक्तीच्या शिक्षणाची योजना अमलांत आणली व १९०६ सालीं सर्व राज्यांत शिक्षण सार्वात्रिक व सक्तीचें करण्यांत आलें.

**प्राथमिक शिक्षणः**—महाराजांनीं शिक्षणप्रसार सार्वत्रिक होण्यास काय काय अडचणी येतील यासंबंधींचा पूर्ण व सांगोपांग विचार करून तशा प्रकारची व्यवस्था अमलांत आणली. प्रथम प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करण्यांत आलें. शाळांतून ७ ते १२ वर्षांच्या मुलांस व ७ ते १० वर्षांच्या मुलीस शिकण्यास पाठविण्याचा पालकावर निर्बंध घालण्यांत आला व त्यांनीं तसें करण्याचें नाकारल्यास त्यांना थोडा फार दंड करण्यांत यावा असेंहि ठरविण्यांत आलें. खेडेगांवीं शेतीच्या कामांत शेतकऱ्यांना आपल्या मुलांच्या मदतीची वाण पडूं नये अशा सोइस्कर वेळा शाळांसाठीं ठरविल्या. अंत्यज वर्गाच्या मुलांमुलींसाठीं स्वतंत्र शाळांची योजना करून त्यांना पुष्कळ सवलती, ( मुलास मोफत पाट्या, पेन्सिली पुरविणें ) देण्यांत आल्या. १८८५ सालीं काढलेल्या सरकारी हुकुमांत खालील सहा गोष्टींकडे शाळाखात्यानें विशेष लक्ष पुरवावें असें म्हटलें होतें: ( १ ) नव्या वाचनपाठमाला तयार करणें, ( २ ) मुलांना शारीरिक शिक्षण देणें, ( ३ ) मुलींच्या शाळांना स्त्रीशिक्षक पुरविणें, ( ४ ) मध्यम व कनिष्ठ वर्गांत शिक्षणाचा प्रसार करणें, ( ५ ) शाळांतून पदार्थसंग्रहालयें स्थापणें व ( ६ ) देशी वाङ्मय वाढविणें. याशिवाय ५० ते ६० हजार रुपये शाळांच्या इमारतीसाठीं खर्च करण्यासहि मंजुरी मिळाली होती.

हल्लींच्या सरकारी रिपोर्टावरून* प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या मुलांची संख्या २,२१,६०२ असून अशा प्रकारच्या शिक्षण देणाऱ्या सरकारी संस्था २,५३९ आहेत असें दिसतें. खेडेगांवांतील शाळांवर एक शिक्षक असणें हा शिक्षण-पद्धतींत दोष आहे असें अनुभवांतीं सरकारास दिसून आल्यावरून कांहीं जवळजवळ असणाऱ्या शाळांचें एकीकरण करण्यांत येऊन कांहीं ठिकाणीं एकापेक्षां अधिक शिक्षक नेमण्यांत आले.

प्राथमिक शिक्षण देण्यासाठीं उत्तम व अनुभविक शिक्षक व शिक्षकिणी तयार करणारी २ वेगवेगळालीं ट्रेनिंग कॉलेजें काढण्यांत आलीं, व शिक्षकांना खेडेगांवीं उपयोगाचे असे शेती सुधारणा, आरोग्य, परस्पर सहकार्य वगैरे विषय अभ्यासासाठीं ठेवण्यांत आले आहेत.

किंडर गार्डन पद्धतीनें शिक्षण देणाऱ्या शाळा १९ असून त्यांत १,५२९ मुलें हल्लीं शिक्षण घेत आहेत. सन १९३०–३१ सालीं अंत्यजाकरितां २०१ स्वतंत्र शाळा होत्या व त्यांत एकंदर शिक्षण घेणाऱ्या मुलांची संख्या १८,३८८ होती. सन १९३१–३२ सालीं या स्वतंत्र शाळांपैकीं ११० शाळा इतर शाळांस जोडण्यांत आल्या. अंत्यजांकरतां स्वतंत्र शिष्यवृत्त्या ठेवल्या असून कांहीं मुलांची राहण्याची व जेवणाखाणाची सोय सरकार-कडून केली जाते. अशा प्रकारच्या सोयी बडोदें, पाटण, नवसरी व अमरेली या शहरीं मुद्दाम करण्यांत आल्या आहेत. अस्पृश्यांचे सध्यांचे पुढारी डॉ. भीमराव अंबेडकर यांचें शिक्षण महाराजांनींच केलें आहे.

मुसलमानांच्या शिक्षणासाठीं निरनिराळ्या ठिकाणीं सरकारी ८३ व खासगी १३ उर्दू शाळा आहेत व एकंदर १०,९०० मुलें शिकत आहेत.

महाराजांनीं ‘ कालिपरज ’ व ‘ वाघेर ’ या अत्यंत मागासलेल्या अडाणी, जंगली, डोंगराळ मुलुखांत राहणाऱ्या जातींनाहि शिक्षण देण्याची योजना अंमलांत आणली आहे. कांहींना वसतिगृहांत मोफत ठेवून घेऊन त्यांच्या शिक्षणाची सोय करण्यांत आली आहे; आपल्या मुलूखांत परत गेल्यावर त्यांनीं इतरांनाहि फावल्यावेळीं शिक्षण द्यावें हा सरकारचा हेतु आहे. अशा रीतीनें सक्तीचें शिक्षण करण्यांत लोकांना लेखन, वाचन, व जुजबी अंक-गणित इत्यादींची ओळख करून देऊन साक्षर बनविणें हा प्रमुख हेतु आहे.

---

*Administration Report 1930-31. page 237.

**दुय्यम शिक्षण**— संस्थानांत एकंदर १५ सरकारी हायस्कूल्स असून शिवाय सरकारी मदत असणारी ८ आहेत. त्यापैकीं बडोद्यांत ३ आहेत व बाकीची नवसारी, गणदेवी वगैरे ठिकाणीं आहेत. त्याचप्रमाणें दुय्यम शिक्षण संस्था एकंदर ३५ आहेत.

**उच्च शिक्षण**—खुद्द राजधानीचें शहर बडोदें येथें उच्च ( शास्त्रीय व वाङ्मयात्मक ) शिक्षण देणारे 'कॉलेज' असून त्यांत एकंदर ९११ विद्यार्थी व विद्यार्थिनी शिक्षण घेत आहेत. इ. स. १८८२ सालीं डिसेंबर महिन्यांत हें कॉलेज सुरूं होऊन मुंबई विश्वविद्यालयास जोडण्यांत आलें. आतांपर्यंत या कॉलेजमधून २,२०० पदवीधर बाहेर पडलेले आहेत. त्यापैकीं १०० च्यावर एम्. ए. व एम्. एस्सी झालेले आहेत. टेट, लिटलडेल, क्लार्क, मसाणी यांसारखे विद्वान व नाणावलेले गृहस्थ या कॉलेजचे प्रिन्सिपाल होऊन गेले. त्याचप्रमाणें सर मनुभाई मेहता, टी. के. गज्जर, अरविंद घोष, मिडलटन, आर्ते, विजेरी यांसारखे हिंदुस्थानांतच काय पण जागतिक प्रसिद्धि मिळविलेले गृहस्थ या कॉलेजमध्यें प्रोफेसर होते. सध्यांचे प्रिन्सिपाल मि. बरो हेहि सुस्वभावी, समतोल बुद्धीचे गृहस्थ आहेत. नुकतीच ता. २६ डिसेंबर १९३२ रोजीं या कॉलेजची सुवर्णज्युबिली झाली. त्यावेळीं महाराज, महाराणीसाहेब, इतर अधिकारी शहरांतील प्रमुख नागरिक व कॉलेजचे माजी विद्यार्थी उपस्थित होते. आपल्या भाषणांत प्रिन्सिपाल बरोबर यांनीं महाराजांच्या शिक्षणविषयक धोरणाचा गौरव करून सांगितलें कीं, " It is rare in history for a ruler to attend the 50th anniversary of an institution he has formed."

या कॉलेजचें गुजराथ युनिव्हर्सिटींत रूपांतर व्हावें अशी पुष्कळांची इच्छा आहे. ती सफळ होईल तो दिवस सुदीन म्हणावयाचा.

**शिष्यवृत्त्याः**—१९३०-३१ च्या सरकारी रिपोर्टांत २ शिष्यवृत्त्या सिडेनहॅम कॉलेजमध्यें शिक्षण घेण्यासाठीं, ' सेवाकदर ' शिष्यवृत्ती सरकारी नोकरांच्या मुलांकरतां, सेकंडरी एज्युकेशन कोडमध्यें दिलेल्या शिष्यवृत्त्या, मराठा मुलींसाठीं कांहीं शिष्यवृत्त्या मिळून रु. २३,६०७ रुपये खर्च करण्यांत आले असें नमूद करण्यांत आलें आहे. त्याचप्रमाणें मराठा जातीच्या विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठीं ४० 'सयाजीराव शिष्यवृत्त्या' म्हणून आणि मराठा एज्युकेशन फंडाच्या व्याजांतून कांहीं शिष्यवृत्त्या देण्यांत येतात.

तसेंच नेमणूकदार वर्गाच्या मुलांकरतांहि कांहीं शिष्यवृत्त्या राखून ठेवण्यांत आल्या आहेत. याशिवाय दरवर्षी विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणासाठीं, इंग्लंड, अमेरिका, जपान इत्यादि देशांत निरनिराळ्या विषयांचा अभ्यास करण्यासाठीं पाठविण्यांत येते. महाराजांनीं आजपर्यंत शेतकी, बागाईत, सूपशास्त्र, गायनशास्त्र, घड्याळकाम, विद्युत्‌शास्त्र, यंत्रशास्त्र, मुद्रणकला, शिक्षण, कायदा, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, तत्त्वज्ञान, वेदांत, पुस्तकालयें, शिल्प इ० शास्त्रांच्या अध्ययनासाठीं व त्या त्या विषयांत प्राविण्य मिळविण्यासाठीं अनेक विद्यार्थी परदेशी पाठविले आहेत. व असे लोक तेथून शिकून आल्यानंतर आपल्या ज्ञानाचा फायदा हिंदुस्थानास देत आहेत. बनारस हिंदु युनिव्हर्सिटी सारख्या संस्थेला महाराजांचा उदार आश्रय आहेच. नुकतीच महाराजांनीं त्या युनिव्हर्सिटीस दोन लक्ष रुपयांची देणगी दिली आहे. महाराज त्या विश्वविद्यालयाचे प्रो—चॅन्सेलरहि आहेत. औद्योगिक शिक्षणाचीहि सोय महाराजांनीं आपल्या संस्थानांत केली आहे.

**औद्योगिक शिक्षण:**—आधुनिक शिक्षणक्रमांत औद्योगिक व शास्त्रीय शिक्षणक्रमाचा अंतर्भाव होणें ही अत्यंत आवश्यक गोष्ट गणली जाते. औद्योगिक शिक्षण देणारी संस्था आपल्या संस्थानांत काढण्याचा महाराजांचा १८८६ सालापासून विचार चालू होता. सुप्रसिद्ध प्रो. टी. के. गज्जर हे त्यावेळीं बडोदा कॉलेजांत प्रोफेसर होते. यांच्या साहाय्यानें महाराजांनीं 'कलाभवन' ही संस्था १८९० सालीं स्थापन केली. प्रो. गज्जर यांच्याकडे सर्व शिक्षणक्रम ठरविण्याचें काम सोंपविण्यांत आलें. प्रथम चित्रकला, कपडे शुभ्र करणें व रंगविणें, कपड्यावर छपाईचें काम करणें, सुतारकाम एवढेच विषय शिकवीत असत. कांहीं महिन्यांनीं पूर्वीचें ट्रेनिंगस्कूल व शेतकीचा वर्ग हेहि त्यास जोडण्यांत आले. कलाभवनांतील सर्व शिक्षण देशी भाषेच्या द्वारें देण्यांत येतें. प्रथम उत्पादक व प्रिन्सिपाल टी. के. गज्जर ह्यांनीं ह्या संस्थेस बरेंच नांवारूपास आणिलें. त्यांच्यानंतरहि संस्था अतिशय कार्यक्षमतेनें व शिस्तीनें चालविण्यांत आली आहे. सध्याचें प्रिन्सिपाल सी. एच्. व्होरा बी. ए., ए. एम्. आय्. बी. ई. यांच्या देखरेखीखालीं ही संस्था अतिशय उत्तम रीतीनें प्रगति करीत आहे. यांच्याशिवाय परदेशांत शिक्षण घेतलेले पांच प्रोफेसर शिकविण्याचें काम करीत आहेत. हल्लीं मेक्यानिकल, इलेक्ट्रिकल व सिव्हिल एंजिनियरिंग; केमिकल टेक्नालॉजी ( डाईंग, ब्लीचींग

कॅलिको प्रिंटिंग, सोप टेक्नॉलॉजी ), टेक्सटाईल मॅन्युफॅक्चर, आर्किटेक्चर, कॉमर्स वगैरे विषय शिकविण्यांत येतात. हिंदुस्थानांतल्या निरनिराळ्या भागांतले विद्यार्थी या ठिकाणीं औद्योगिक शिक्षण घेण्यासाठीं येतात. सध्यां त्यांची संख्या ५३७ आहे. इ. स. १९३०–३१ सालीं कलाभुवन व त्यास जोडून असलेलीं वर्कशॉपस् यांवर १ लक्ष ३४ हजार रु. खर्च व त्यापासून उत्पन्न २८ हजार ६०० रुपये झालें आहे. या शाळेंतून कांहीं नाणावलेले रंगकलावेत्ते बाहेर पडले असून मोठमोठ्या गिरण्यांमध्यें काम करीत आहेत. कलाभुवनास जोडलेली प्रयोगशाळा व्यापारी तत्त्वावर चालविण्यांत येते. म्हणजे राज्यांतील निरनिराळ्या खात्यांना लागणारें लोखंडी व इतर धातूचें सामान, लाकडीसामान वगैरे येथून पुरविण्यांत येतें. याच संस्थेच्या अंगभूत अशा तीन शाळा अमरेळी, पाटण व पेटलाद या ठिकाणीं चालू आहेत. नवसरीस जे. एन्. टाटा हुन्नर शाळेस सरकारी ग्रँट देण्यांत येते. १९२१ सालीं बंगलोर इंस्टिटयूटचे प्रो. आल्फ्रेड हाये यांच्या रिपोर्टावरून कलाभवन बंद करण्याचा महाराजांचा विचार होता, परंतु पुष्कळ लोकांच्या अर्जविनंत्यावरून तो विचार त्यांनीं रहित केला, एवढेंच नव्हे तर उलट त्याची वाढ केली. ही गोष्ट मोठ्या आनंदाची आहे.

शास्त्री, पुराणिक, पुरोहित यांच्यासाठीं एक संस्कृत पाठशाळा काढण्यांत आली असून त्यांत क्षत्रियादि चातुर्वर्णीय हिंदु लोकांची संस्कृत शिक्षणाची सोय करण्यांत आली आहे. देशी भाषेच्या द्वारें शिक्षण देणारें एक व्हर्न्याक्युलर कॉलेज होतें, पण तें विद्यार्थ्यांच्या अभावीं बंद करावें लागलें. पाटण येथें एका आयुर्वेद पाठशाळेंत आयुर्वेदाचें शिक्षण देण्यांत येतें. त्याचप्रमाणें अनाथगृहें, गायनशाळा, मूकविद्यालय, रेफर्मेटरी वगैरे कित्येक लोकोपयोगी संस्था सरकारकडून चालविण्यांत येत आहेत. यावरून महाराजांना सर्व प्रकारच्या शिक्षणाची सोय आपल्या संस्थानांत असावी याबद्दल किती कळकळ व आस्था वाटते हें कोणासहि दिसून येईल.

**स्त्रीशिक्षण:**—राष्ट्रांतील स्त्री पुरुषांच्या साक्षरतेचें प्रमाण हें त्या राष्ट्राच्या प्रगतीचें गमक आहे. फार प्राचीनकाळ सोडला तरी एकोणिसाव्या शतकांतील हिंदी स्त्रिया म्हणजे धर्मभोळेपणा, अज्ञान, हटवादीपणा गुलामगिरी यांच्या मूर्तिमंत पुतळ्याच असें एखाद्यानें विधान केलें तर तें फारसें बेजबाबदार ठरेल असें वाटत नाहीं. खरोखरी पाहतां हिंदुस्थानांतील स्त्रियांचा आयुष्यक्रम

म्हणजे गृहकृत्यें व उत्तमोत्तम वस्त्रालंकारासंबंधाचें ज्ञान या व्यतिरिक्त सार्वजनिक कार्य म्हणून एखादी चीज असेल ही कल्पना ध्यानींमनींहि नसते. अशा प्रकारच्या विचारसरणीमुळें स्त्रीशिक्षणाचा प्रश्न अत्यंत घोटाळ्याचा होऊन बसला होता. अशा वेळीं महाराजांनीं स्त्रीशिक्षणाचा जोरानें पुरस्कार करून या प्रश्नास यथायोग्य चालना दिली. सामाजिक सुधारणेचें पाऊल पुढें पडण्यास स्त्री शिक्षणासारखें दुसरें प्रबल शस्त्र नाहीं अशी महाराजांची ठाम समजूत होती. " जर घरांत सुशिक्षित स्त्री असेल तर ती ज्ञानाचा व गृहसौख्याचा उज्ज्वल प्रकाश घरांत पाडण्यास समर्थ होईल; व आपल्या आजूबाजूच्या लोकांच्या निर्दय व आपमतलबी कपट युक्त्यांत अशिक्षित स्त्री जशी फसते तशी फसणार नाहीं."* एके वेळीं त्यांनीं असे उद्गार काढलेले आहेत कीं, " स्त्रियांना शिक्षणाचा लाभ न दिल्यानें आपण आपल्या राष्ट्राची अर्धी शक्ति गमावीत आहोंत. आपल्या मुलांना सुशिक्षित मातांचा लाभ देण्याचें नाकारीत आहोंत, आणि मातांच्या मानसिक शक्तीची वाढ खची करून भावी पिढ्यांचें भयंकर नुकसान करीत आहोंत. इतकेंच नव्हे तर यामुळें आपल्या घरांत दुही माजविण्यास मदत करीत असून जुनें तेवढें उराशीं बाळगून बसणारा असा एक अजीबात निराळा वर्ग तयार करीत आहोंत." अशाप्रकारचें जरी महाराजांचें मत असलें तरी पण विवाहितावस्था व गृहकृत्यें हीं स्त्रियांचीं प्रधान कर्तव्यें असल्यानें त्यांना हीं कर्तव्यें पार पाडण्यायोग्य शिक्षण मिळणें अगत्याचें आहे, ह्या गोष्टीस त्यांचा बिलकूल विरोध नव्हता. हें मत त्यांनीं एका व्याख्यानाचे प्रसंगीं उघड करून सांगितलें आहे. " स्त्रीशिक्षण म्हणजे त्यांनीं नुसत्या परीक्षा पास होणें नव्हे. बायकांना संसारविषयक शिक्षण मिळालें पाहिजे. त्यांना आपलीं मुलें कशीं वाढवावयाचीं, आपल्या पतीस वाईट गोष्टीपासून कसें परावृत्त करावयाचें हेंहि त्यांना शिकविलें पाहिजे. त्यांना रसायनशास्त्र वगैरे शास्त्रांचें शिक्षण देणेंहि अगत्याचें आहे." तसेंच संसार सुखाचा होण्यास स्त्री पुरुष उभयतां सुदृढ असणें आवश्यक आहेत. या दृष्टीनें त्यांना शारीरिक कसरतीची फार आवश्यकता आहे, असें महाराजांचें मत असून त्यांनीं फिमेल ट्रेनिंग कॉलेजच्या लेडी सुपरिंटेंडंट यांना तशी व्यवस्था अम

* महाराजांचीं भाषणें पृ. ३२

ळांत आणण्यास वेळोवेळीं सूचना केल्या आहेत. हल्लीं बडोद्यास शारिरीक शिक्षण घेण्यासाठीं स्त्रियांकरतां जिमखाना असून पुष्कळ स्त्रिया त्याचा फायदा घेतात. श्रीमंत राणीसाहेब याहि सुशिक्षित असून स्त्रीशिक्षणाच्या कट्टया पुरस्कर्त्या आहेत. अखिल भारतीय महिला परिषदेच्या त्या १९२८ सालीं अध्यक्षाहि होत्या. बडोद्यांत स्त्री शिक्षणासाठीं "श्रीमहाराणी चिमणा बाई स्त्री उद्योगालय" नांवाचें उद्योग मंदिर महाराणी साहेबांच्या नांवें स्थापन करण्यांत आलें आहे. त्यांत शिवणकाम, वीणकाम, पाकशास्त्र, रोग्याची शुश्रूषा वगैरे विषय शिकविण्यांत येतात. अनाथ विधवांना व गरीब स्त्रियांना येथें शिष्यवृत्त्या देण्यांत येतात. याशिवाय मुंबई इलाख्यांत उच्च शिक्षण घेण्यासाठीं विद्यार्थीनींना शिष्यवृत्त्या देण्याकरितां महाराणीसाहेबांनीं एक लक्ष रुपयाची देणगी दिली आहे.

**वाचनालयें:**—अशाप्रकारें राज्यांत सक्तीचें शिक्षण केल्यावर सुशिक्षितांची संख्या साहजिकच वाढणार व अशा लोकांची ज्ञानपिपासा शमविणें हें सरकारचें महत्त्वाचें कर्तव्य होय, हें ओळखूनच कीं काय, महाराजांनीं सार्वजनिक वाचनालयें आपल्या राज्यांत सुरू केलीं. १९०५ सालीं महाराजांनीं अमेरिकेच्या प्रवासांत गांवोगांवीं व शहरोशहरीं प्रचंड सार्वजनिक वाचनालयें व त्यामुळें होणारा शिक्षणप्रसार हें प्रत्यक्ष अवलोकिलें; त्यावेळीं आपल्या राज्यांतहि अशाप्रकारचा उपक्रम सुरू करावा असें तत्काळ ठरविलें. आणि लोकांनीं वाचनालयें काढल्यास त्यास सरकार योग्य मदत करील असें आश्वासन दिलें.

१९०६–७ सालीं कांहीं वाचनालयें उघडलीं, पण १९१०–११ पासून या शिक्षणशाखेला अगदीं वेगळेंच स्वरूप आलें. यावर्षी महाराजांनीं अमेरिकेहून डॉ. बॉर्डन नांवाच्या लायब्ररीच्या कामांत निष्णात अशा एक अमेरिकन विद्वानास येथें आणून त्याची डायरेक्टर ऑफ स्टेट लायब्ररीज या नवीन जागीं नेमणूक केली. वाचनालयाचें खातें स्वतंत्र करण्यांत येऊन त्यास नवीन सुधारलेलें स्वरूप देण्यांत आलें. तसेंच नियमांतहि फेरबदल करण्यांत आला. एखाद्या गांवीं लोकांनीं वाचनालयाकरितां जी रक्कम गोळा केली असेल त्याच्या दुप्पट रक्कम सरकारनें देण्याचें ठरविलें. यामुळें पुस्तकालयांची संख्या झपाट्यानें वाढूं लागली. बडोद्यांतील पूर्वीच्या लायब्ररीचें मध्यवर्ती लायब्ररींत रूपांतर करण्यांत येऊन नगरवाचनालयें, प्रांतवाचनालयें, ग्रामवाचनालयें यांच्या कारभारावरची देखरेख ठेवण्याचा डायरेक्टरास अधिकार

देण्यांत आला. खुद्द महाराजांनीं आपला २० हजार पुस्तकांचा दुर्मिळ संग्रह मध्यवर्ती संस्थेस दिला. सध्यां वाचनालयांत निरनिराळ्या विषयांवरची लाखावर पुस्तकें असून त्यांतली ८३ हजार पुस्तकें लहान थोर वाचकांना वाचावयासाठीं मोफत देण्यांत येतात. संदर्भखात्यांतलीं कांहीं पुस्तकें तेथेंच बसून वाचावीं लागतात.

मध्यवर्ती लायब्ररीसाठीं पूर्वीच्या सरकार वाड्यास जोडूनच नवीन इमारत बांधण्यांत आली आहे. वृत्तपत्रीयशाखा, स्त्रीवाचकशाखा, संदर्भ-शाखा वगैरे भाग येथें आहेत. लायब्ररीचे संचालक मि. एन्. एम्. दत्त यांनीं बडोदा लायब्ररी हँडबूक नांवाचे पुस्तकांत लायब्ऱ्यांची सर्व माहिती दिली आहे. संस्कृत लायब्ररी डॉ. विनयतोष भट्टाचार्य यांच्या नेतृत्वाखालीं उत्तमप्रकारें चालविण्यांत येत आहे. सध्यां या लायब्ररीचें रूपांतर प्राच्यविद्या संस्थेंत करण्यांत आलें आहे.

शिक्षण खात्यावर कमिशनर ऑफ एज्युकेशन किंवा विद्याधिकारी असून त्याच्या हातांत वाचनालयें, प्राच्यविद्यामंदिर, पदार्थसंग्रहालयें, कलाभवन, गायनकला, स्काउट संस्था, कॉलेजें व शाळा इत्यादि संस्थांचा कारभार दिलेला असतो. हल्लीं रा. भास्कर काशिनाथ भाटे एम्. ए. (केंब्रिज) हे विद्याधिकारी असून डॉ. भा. चिं. लेले पी. एच. डी. हे त्यांचे मदतनीस आहेत.

**विद्याप्रसार:**—देशी भाषेंत वाङ्मय तयार करण्याच्या बाबतींत बडोदें संस्थाननें किती प्रशंसनीय बहुमोल कामगिरी केली आहे हें महाराजांनीं तत्प्रीत्यर्थ लक्षावधि रुपये खर्च करून अनेक उपयुक्त ग्रंथांची भाषांतरें निरनिराळ्या सुशिक्षितांकडून करवून साहित्याच्या अभिवृद्धींत भर घातली यावरून दिसून येईल. खानगी खातें व विद्याखातें या दोन खात्यांकडून अनेक प्रकारच्या ग्रंथांस योग्य पारितोषिकें किंवा इतर प्रकारांनीं उत्तेजन देऊन ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्यांत येतात. अशा रीतीनें महाराजांच्या आज्ञेनें इ. स. १८८६ पासून आतांपर्यंत "राष्ट्रकथा माला, महाराष्ट्र ग्रंथमाला, विविधविषयक ग्रंथमाला, क्रीडामाला, श्रीसयाजी साहित्य माला, श्रीसयाजी ज्ञानमंजूषा, प्राचीन काव्यमाला, बालसंगीत माला, वगैरे ग्रंथमालेंत ३०० वर ग्रंथ गुजराथी, मराठी, हिंदी, संस्कृत, इंग्लिश इत्यादि भाषांत छापून प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. ग्रंथकारांनीं एखादा नवीन ग्रंथ आश्रयार्थ पाठविल्यास त्याच्या कांहीं प्रती विकत घेण्यांत येतात.

**भाषाभिवृध्यर्थ प्रयत्न**—देशी भाषांना परकीय भाषांचें जें ग्रहण लागलें आहे तें सुटण्यासाठीं महाराजांनीं विशेष प्रयत्न केले आहेत. 'श्रीसयाजीशासन शब्दकल्पतरु' नें परकीय भाषेंतील पारिभाषिक शब्दांचे देशी भाषेवरील आलेलें दडपण कमी होऊन आपले सर्व व्यवहार आपल्या भाषेंत करणें सुकर झालें आहे. या पारिभाषिक कोशासंबधीं महाराजांस एवढी उत्कंठा आहे कीं, कांहीं शब्द त्यांनीं स्वतः पॅरिसमधून सुचविले आहेत. कायद्यांतील पारिभाषिक शब्दांचा हा कोश तयार करण्यासाठीं महाराजांनीं एक मंडळ नेमिलें होतें, व हिंदुस्थानची एक राष्ट्रीय भाषा असावी या ध्येयास अनुसरून या कोशाचें स्वरूप अष्टभाषात्मक असून त्यांतल्यात्यांत सर्व भरतखंडांत सुलभतेनें रूढ होण्यासारखे शब्द अखेरीस सुचविले आहेत. महाराजांनीं पुण्याच्या शब्दकोश मंडळास उदार आश्रय देऊन मराठी भाषेचा बृहत्कोश काढण्यास त्या प्रयत्नाच्या बाल्यावस्थेंतच प्रोत्साहन दिलें आहे, व त्याचें दृश्य स्वरूप पहिल्या भागाच्या रूपानें नुकतेंच प्रकट झालें आहे. महाराजांच्या या प्रचंड साहित्यविषयक कामगिरीबद्दल कोणा-चेंहि अंतःकरण कृतज्ञतेनें भरून येईल. तसेंच त्यांनीं सयाजीपदक व वर्षासन देऊन कांटावाला, चिंतामणराव वैद्य, विठ्ठल रामजी शिंदे वगैरेंचा गौरव केला आहे व कवि चंद्रशेखर यांची राजकवि म्हणून नेमणूक करून त्यांस मासिक बिदागी दिली आहे.

सारांश, महाराजांचा जीवनहेतु आपल्या प्रजेस सर्वांगीण शिक्षण देणें व उच्च साहित्योपार्जन करणें हा होय. खऱ्या शिक्षणाचा हेतु अवलोकन-शक्तीचा विकास करणें, उत्तम शील बनविणें, व मानसिक उन्नति करणें हा समजण्यांत येतो. 'विद्या म्हणजे नुसतें लिहितां वाचतां येणें नव्हे, तर जिच्यामुळें कार्यकारणांचा योग्य संबंध कळतो, इतरांच्या सामाजिक, धार्मिक, औद्योगिक स्थितीची व आपली दुरवस्था कळून तिचीं कारणें शोधून काढतां येतात आणि सर्व विषयांचा न्यायानें व सम-तेनें विचार करतां येतो ती विद्या.' ती मात्र विशिष्ट वर्गालाच न मिळतां सार्वत्रिक असली पाहिजे याविषयीं महाराजांचा कटाक्ष असतो. टेनिसनच्या मतानें ज्ञान ही एक शक्ति आहे खरी, पण तें शहाणपणापेक्षां कमी दर्जाचें आहे; म्हणून शहाणपणाची वाढ करणें हें खऱ्या शिक्षणाचें ध्येय असलें पाहिजे. अशा प्रकारचें खरें शिक्षण देण्याचा महाराजांचा

प्रचंड उद्योग पाहिला म्हणजे कोणालाहि आश्चर्य वाटेल. जें ब्रिटिश सरकार आम्ही हिंदीप्रजेस शिक्षण दिलें म्हणून सर्व जगभर टिमकी वाजवतें त्याच्यापेक्षां शेंकडोंपटींनीं जास्त महाराजांची साहित्यविषयक कामगिरी आहे व त्यांनीं स्वकृतींनीं आपलें नांव हिंदुस्थानच्या इतिहासांत अजरामर करून ठेविलें आहे यांत तिळमात्र शंका नाहीं. गायकवाड घराण्यांत त्यांच्याइतका विचक्षण, व्यापक बुद्धीचा व बहुश्रुत साहित्यप्रेमी राजा झाला नाहीं व पुढेंहि होणार नाहीं. आज समशेरबहाद्दरीचा काळ असता, तर महाराजांनीं त्यांतहि नांव मिळविलें असतें इतका पराक्रम, अलोट बुद्धिमत्ता, अतुल स्वार्थत्याग त्यांचे अंगीं वसत आहे. 'वीरपुरुष हा सर्वच ठिकाणीं वीर असतो' ही शेक्सपीयरची उक्ति महाराजांस लागू पडते. असा आधुनिक विद्वानांचा, कविजनांचा, लेखक व कादंबरीकारांचा पोशिंदा आहे हें जाणून, 'आधुनिक भोजराज' श्रीमन्महाराज सयाजीराव यांच्या आजवरच्या कामगिरीवरचा कळस म्हणूनच कीं काय, त्यांच्या वयाच्या ७० व्या वर्षी अखिल महाराष्ट्र जनतेनें त्यांना साहित्य परिषदेचें अध्यक्षस्थान दिलें होतें. महाराजांनीं एकमेका साह्य करूं । अवघें धरूं सुपंथ या भरतवाक्यानें परिषदेचा यथार्थ समारोप करून 'संहतिः कार्य साधिका' हा धडा सर्वत्रांस गिरवावयास सांगितला आहे.

---

## ११. शेतकी व औद्योगिक सुधारणा.

**शेतकीः**—बडोदें राज्यांत शेंकडा ६४ लोक शेतीवर उदरनिर्वाह करणारे आहेत. इ. स. १८९९ सालीं संस्थानांत मोठा दुष्काळ पडला त्यावेळीं दुष्काळी कामें सुरू करून सरकारनें पुष्कळ लोकांचे जीव वाचविले. महाराजांनीं त्याच वेळीं एक कमिशन नेमून संस्थानांतील शेतकऱ्यांच्या स्थितीबद्दल चौकशी करण्याचें ठरविलें. शेतकऱ्यांचा कर्जबाजारीपणा, त्यांची सांपत्तिक हलाखी व त्यामुळें शेतकीकडे होणारें दुर्लक्ष वगैरे गोष्टींसंबंधानें कमिशननें एक लांबलचक रिपोर्ट लिहिला. इ. स. १९०९ सालापर्यंत स्वतंत्र असें शेतकी खातें बडोदें संस्थानांत नव्हतें. रेव्हेन्यू खात्याकडे शेतकीविषयक कारभार सोंपविला होता. त्यासालीं स्वतंत्र खातें निर्माण करण्यांत येऊन सन १९१२ सालीं दि. ब. व्ही. एम्. समर्थ ह्यांना अमात्य नेमण्यांत आलें.

शेतकऱ्यांना हलक्या दरानें कर्जाऊ रकमा देऊन सावकारांच्या तावडींतून सोडविणें, त्यांना बींबीयाणें पुरविणें, व शेतकींत कशा सुधारणा कराव्या हें प्रयोग, प्रदर्शनें, भाषणें इत्यादि रूपानें शेतकऱ्यांना समजावून देणें वगैरे उद्योग त्याखात्यानें हातीं घेतले. उत्तम नमुनेदार शेतें कशीं करावी यासाठीं सरकारनें जगुदन, नवसारी व बडोदें या ठिकाणीं नमुनेदार शेती करून एका तालुक्यांत जें धान्य होत नाहीं त्याची दुसऱ्या तालुक्यांत कशाप्रकारें निपज करतां येईल, हें सप्रयोग दाखविण्याची व्यवस्था केली. १९३०-३१ सालीं अशा सरकारी शेतांवर रु. ५,५८७ खर्च करण्यांत आले. शिवाय सुधारलेली औतें, वाफेनें चालणारा नांगर, धान्यविध्वंसक जंतूचा नाश यासंबंधानें शेतकऱ्यांना माहिती पुरविण्यांत आली. हा उपक्रम १९०९-१० सालींच करण्यांत आला. त्यावेळीं नवसारी वगैरे प्रांतांत मोठी प्रदर्शनें भरविण्यांत येत असत. ह्याशिवाय शेतकऱ्यांच्या मुलांसाठीं शेतकी शिक्षणाचे वर्ग उघडण्यांत आले आणि शेतीचे तुकडे पाडण्यास कायद्यानें बंदी करण्यांत आली. शेतकऱ्यांचा कर्जबाजारीपणा नाहींसा करण्यासाठीं शेतकी पतपेढ्या, शेतकी मंडळें, परस्पर सहाय्यक संस्था स्थापन करण्यांत आल्या. १९०५ सालीं काश्मिरांतील रेशिमाच्या पैदासीच्या पद्धतीचें शिक्षण घेण्यासाठीं रावजीभाई पटेल यांना पाठविलें होतें. तसेंच बंगालच्या शेतकीखात्याचे असिस्टंट डायरेक्टर व सिल्क एक्सपर्ट मि. एन्. जी. मुकर्जी यांना बडोद्यांत कांहीं महिन्यापुरतें बोलावून नवसारी व बडोदें येथें रेशिमाची पैदास उत्तम रीतीनें कशी करतां येईल याबद्दल महाराजांनीं विचारविनिमय केला. सध्यां शेतकीखातें फिरते तपासनीस नेमून शेती सुधारणेसंबंधीं प्रयोग, व्याख्यानद्वारा प्रचारकार्य उत्तम तऱ्हेनें करीत आहे. त्याचप्रमाणें बींबीयाणें, जनावरांची व कोंबड्यांची उत्तम पैदास, डेअरी वगैरे संबंधाची माहिती व हस्तपत्रकें यांचा शेतकऱ्यांमध्यें प्रसार करण्यांत येतो. शेतीच्या जनावरांसाठीं निरनिराळ्या ठिकाणीं एकंदर २१ पशुरोग चिकित्सालयें स्थापिली असून डॉक्टरलोकहि ठिकठिकाणीं दौरा काढून मदत करतात. विहीरी खोदण्याचे कामासहि सरकारकडून उत्तेजन देण्यांत येतें.

**उद्योगधंदे व व्यापार**—या बाबतींत मात्र बडोद्याची स्थिति म्हणण्यासारखी पुढारलेली नाहीं. याचें कारण म्हणजे अहमदाबादेसारखें भरभराटीचें व्यापारी शहर बडोद्याच्या अगदीं नजीक असल्यामुळें व्यापाराचा ओघ साहजिक तेथें

वळतो. तरीसुद्धां महाराजांच्या प्रगतिपर धोरणामुळें उद्योगधंद्याच्या बाबतींत बडोदें संस्थान महत्त्वाचें गणलें जातें. महाराजांनीं व्यापारास उत्तेजन देण्यासाठीं बऱ्याच कारखान्यांना सरकारी मदत दिली. आयात निर्गत मालावर जकात कमी केली, पाणी पुरवठा वगैरे इतर सवलती दिल्या, आणि नवीन धंद्याच्या उपक्रमासंबंधानें तद्विषयक तज्ज्ञ इसमांना बोलावून वस्तुस्थितींत काय सुधारणा करतां येतील यासंबंधानें चर्चा करून रिपोर्ट मागविले. मोत्यें शोधून काढण्यासाठीं डॉ. हॉर्नेल, सीमेंटसाठीं अँडर्सन, खनिजपदार्थासाठीं ब्रसफूट, शंभुशिव ऐयर, उद्योगधंद्यासाठीं व्हीटनॅक, अमेरिकेंत शिक्षण घेतलेले रा.दातार व मि.नानावटी वगैरे इसमांस नोकरींत घेऊन त्यांचेकरवीं उद्योगधंद्याची स्थिति सुधारण्याचे प्रयत्न केले. येथील रंगविण्याच्या कारखान्यांचा हिंदुस्थानांत दुसरा नंबर लागतो. त्याशिवाय राज्यांत कापडाच्या गिरण्या असून मंगलोरी कौलें, रासायनिक द्रव्यें, चामडें, साखर वगैरे अनेक जिन्नस तयार करण्याचे कारखाने आहेत. बिलीमोरा हें बंदर व रेल्वे स्टेशन असल्यानें विटा, साबू, तेलें यांचे तेथें मोठमोठे कारखाने आहेत. आसपास जंगल बरेंच असल्यानें जहाजें बांधण्याचा धंदा चालतो. पण तो खूप वाढविला पाहिजे. कारखान्यांना भांडवल पुरविण्यासाठीं सरकारी बँक १९०८ सालीं स्थापण्यांत आली असून तिचें भांडवल ६० लाखांचें होतें. ह्या बँकेच्या शाखा मुंबई, अहमदाबाद, सुरत वगैरे ठिकाणीं असून संस्थानांत १०।१५ ठिकाणीं उपशाखाहि आहेत. पूर्वीचें गायकवाडी नाणें व ब्रिटिश रुपया यांच्या हुंडणावळींत बाजारांत तफावत पडल्यामुळें महाराजांनीं गायकवाडी रौप्यनाणें बंद केलें.

महाराजांनीं १९०६ सालीं अखिल भारतीय औद्योगिक परिषदेच्या अध्यक्षपदावरून भाषण करतांना स्वदेशीचा जोरानें पुरस्कार केला आहे. ‘Swadeshi is our last chance.’ हिंदुस्थाननें पाश्चात्य लोकांना तत्त्वज्ञानामृत पाजून त्याच्या मोबदला शास्त्रीयज्ञान पैदा केलें पाहिजे असें सांगून, राजकारणाचें धोरण आर्थिक पद्धतीवर उभारणें किती जरूर आहे, हें पूर्वींच्या रोम, ग्रीस इत्यादि राष्ट्रांच्या इतिहासांवरून स्पष्ट केलें होतें. ‘अनाठायीं होणाऱ्या पैशाचा विनियोग जर उद्योगधंदे उभारण्याकडे होईल तर राष्ट्राचें बलसंवर्धन होईल.’ तेव्हां त्यादृष्टीनें धनिकांनीं प्रयत्न करावेत अशी कळकळीची विनंति करून महाराजांनीं आपलें भाषण संपविलें होतें.

यावरून महाराजांचें औद्योगिक बाबतींतील धोरण स्पष्ट होईल. याचकरतां रेल्वे बांधणीच्या प्रचंड कामास महाराजांनीं सुरुवात केली.

**रेल्वे**—श्रीमंत गणपतराव महाराजांनीं बी. बी. सी. आय्. रेल्वे कंपनीस १८५६ सालीं संस्थानांत रेल्वे लाईन बांधण्यास परवानगी दिली व त्या भागावरचे दिवाणी व फौजदारी हक्क ब्रिटिशांस दिले. त्याप्रमाणें १८६० सालीं पहिली आगगाडी बडोद्याहून गेली. खंडेराव महाराजांनीं कर्जणपासून डभई पर्यंत पहिली संस्थानी रेल्वे ५० हजार रुपये खर्च करून १८६९ सालीं बांधविली व तीवरील दळणवळण १८७३ सालीं सुरूं झालें. सर टी. माधवराव दिवाणपदावर आल्यानंतर त्यांनीं संखेडा–डभई–चांदोद फाटा १८७९ सालीं सुरू केला व त्यास गोयागेट–विश्वामित्री हा दोन मैल लांबीचा भाग जोडला. श्रीमंत सयाजीराव महाराज ज्यावेळीं राज्यारूढ झाले त्यावेळीं राज्यांत एकंदर रेल्वे लाईन ५९ मैल लांबीची होती. त्यानंतर ब्रिटिश सरकारकडून कडी प्रांतांत रेल्वे गायकवाड सरकारनें सुरू करावी अशी सूचना आल्यावरून १८८७ सालीं मेहसाणा व वडनगर हा फाटा सुरूं करण्यांत आला. १८९१ सालीं मेहसाणा ब्रिटिश हद्दींतील विरमगांव स्टेशनास रेल्वेनें जोडण्यांत आलें. अशा प्रकारें महाराजांचे हातीं राज्यसूत्रें येऊन दहा वर्षें पुरीं होतात न होतात तोंच कडी प्रांतांत ९० मैल लांबीची रेल्वे सुरू झाली. मेहसाणा हें मोठें जंक्शन बनलें.

यानंतर महाराजांनीं सर्व राज्यांत रेल्वे सुरूं करण्याचा प्रश्न हातीं घेतला. आपल्या राज्यांत दौरा काढण्यासाठीं रेल्वेची सोय असल्यास बरें या हेतूनें एकंदर ६४४ मैलांची रेल्वे बांधण्यांत आली. अमरेळी व ओखामंडळ प्रांतांत १९२१ सालीं मीटरगेजची लाईन बी. बी. सी. आय्. रेल्वेकडून बांधविण्यांत आली. रेल्वेमुळें दुष्काळग्रस्तांस दुष्काळाच्या दिवसांत मदत पोंचविण्याच्या कामीं व एकंदर व्यापार व उद्योगधंद्याच्या कामीं केवढा उपयोग होतो ह्याचा महाराजांनीं लिहिलेल्या ‘ फॅमिन नोट्स ’ मध्यें स्पष्ट उल्लेख केलेला आहे. सध्यां बोडेली–छोटा उदेपूर रेल्वे, आनंद-पेटलाद रेल्वे, मेहसाणारेल्वे, खिजडिया–धारी रेल्वे व ओखा रेल्वे इतके फाटे सुरू असून एकंदर भांडवल ५ कोटीपर्यंत घातलें आहे व वार्षिक उत्पन्न रु. ५२ लक्ष असून खर्च रु. ४० लक्ष पर्यंत आहे. गोयागेट स्टेशनवर मोठें

वर्कशॉप बांधण्यांत आलें आहे. रेल्वे नोकरांना प्रॉव्हिडंट फंड, परस्पर सहाय्यक संस्था, पेन्शन फंड वगैरे सर्व सवलती देण्यांत येत आहेत. महाराजांइतकीं रेल्वेबांधणी आपल्या देशांत दुसऱ्या कोणत्याहि संस्थाननें केली नाहीं. महाराजांस जरी यांत पुष्कळ आर्थिक नुकसान सोसावें लागलें तरी Not failure but low aim is crime' हें त्यांचें ध्येय आहे.

---

## १२. सामाजिक सुधारणा

कोणत्याहि सुधारणेचें लक्षण म्हणजे दरेक व्यक्तीचा उत्कर्ष व समाजाच्या अवास्तव बंधनांतून तिची सुटका हें होय. देशाची प्रगति होण्यास ज्या अनेक साधनांची जरुरी आहे त्यांत सामाजिक सुधारणा अत्यंत आवश्यक होत. स्वतःचें घर सुधारल्याखेरीज देशाची स्थिति सुधारण्याच्या प्रश्नास हात घालणें म्हणजे 'आधीं कळस मग पाया रे' अशी स्थिति होणार! पायावांचून रचलेली इमारत जशी टिकूं शकत नाहीं तद्वतच समाज सुधारणेच्या अगोदर देशोद्धारांच्या बाबतींची चर्चा करणें फुकट होय.

आधीं राजकारण का समाजसुधारणा हा वाद बराच जुना असून त्यावर पुष्कळ भवति न भवति झालेली आहे, व या प्रश्नांत शिरण्याचें आपणास कारण नाहीं. कोणतीहि सुधारणा लेखणीच्या फटकाऱ्यासरशी किंवा दंडुकेशाहीच्या जोरावर होऊं शकत नाहीं; त्यांतूनहि धार्मिक अंधश्रद्धा, सामाजिक बंधनें, हटवादीपणा, जातीजातींतील परस्पर द्वेष, कोते विचार यांचा पगडा समाजावर बसला असेल तर विचारण्याची सोय नाहीं, आणि या सर्वांच्या जोडीला निरक्षरता व अज्ञान असलें म्हणजे साराच कारभार आटोपला. तशांत एखाद्यानें प्रचलित रुढीविरुद्ध सुधारणा करूं म्हटलें तर उपहास, मानहानि, तिरस्कार यांशिवाय अन्य कांहीं त्याच्या वांट्यास यावयाचें नाहीं.

परंतु अशा या बिकट परिस्थितीसहि न जुमानतां सुधारणावादी गृहस्थ 'बुद्धिबलाच्या प्रभावानें सर्व लोकांस आपलेसे करून स्वतःचे विचार समाजांत प्रसृत करील तर त्यास खात्रीनें यश मिळेल.' अशाची थोरवी काय वर्णावी ? हळूहळू लोकहि त्याचा कित्ता गिरवूं लागतील, व लागतातहि.

श्री. सयाजीराव महाराजांनाहि अशाच प्रकारचा जनापवाद सोसावा लागला आहे. युरोपच्या पहिल्या सफरीचे वेळीं त्यांच्या सहकाऱ्यांचीं व नोकराचाकरांचीं मतें या प्रवासास अत्यंत प्रतिकूल होती. अशा लोकांच्या विरोधाचा पारा उतरावयास व त्यांना सर्वस्वी अनुकूल करून घेण्यास, भीड, बढती, बक्षिसें, मानसन्मान इ. गोष्टींचा महाराजांनीं मोठ्या चातुर्यानें उपयोग करून आपलें प्रवासकार्य शेवटास नेलें. कालांतरानें परदेश गमनाबद्दलचा लोकांचा विरोध व तन्निमित्त जातिबहिष्कृत करण्यासंबंधीं समाजाचा दुराग्रह व जुलूम या गोष्टी हळुहळू नाहींशा होऊं लागल्या. विद्याभ्यासाकरितां विद्यार्थ्यांना परदेशीं पाठविण्याचा महाराजांनीं जणूं काय पायंडाच घातला. अशा रीतीनें एका काळीं परदेशगमन गैरसोयीचेंच नव्हे तर धोक्याचें वाटत होतें व समाजबंधन, रूढी यांच्या नांवाखालीं लोक 'साप, साप,' म्हणून ओरडत तीं केवळ दोरीच आहे. असें महाराजांनीं आपल्या उदाहरणानें सर्वांस दाखवून दिलें.

वस्तुतः समाजाचा पाया म्हणजे कुटुंबव्यवस्था. हिंदी लोकांत बालविवाहाच्या अनिष्ट पद्धतीमुळें कुटुंबव्यवस्थेची निकृष्टावस्था झालेली आहे. 'बालकांच्या शरीरांची व मानसिक शक्तीची वाढ होण्यापूर्वीं जीं लग्नें होतात त्यापासून भावी प्रजा अशक्त निपजून राष्ट्राचें भयंकर नुकसान होतें. बालविवाहामुळें सांसारिक जीवन सुखाचें होत नाहीं.' याचे दुष्परिणाम टाळण्यासाठीं महाराजांनीं 'बालविवाह प्रतिबंधक' कायदा पास केला. या कायद्यान्वयें विवाहप्रसंगीं वधुवरांचीं निदान वयें १४ व १८ असलींच पाहिजेत असें ठरविण्यांत आलें. हा कायदा मोडणारांस थोडीशी दंडाची शिक्षा ठेवण्यांत आली. परंतु महाराजांनीं याची अम्मलबजावणी फारशी कडक रीतीनें केली नाहीं, इतकेंच नव्हे तर कांहीं जातींना प्रथम प्रथम सवलतीहि देण्यांत आल्या. दुसरी सुधारणा म्हणजे विधवांचे विवाह कायदेशीर समजण्यांत आले.

सुधारणा एकदम अमलांत आणण्यांत किंवा फार घाई केल्यास कार्याचा नाश होतो; म्हणून कायदे करूनहि त्यांचा चातुर्यानेंच अम्मल करण्यांत राज्यकर्त्यांची खरी कर्तबगारी दिसून येते. ही गोष्ट सयाजीरावांच्या कारकीर्दीवरून उत्तम समजण्यासारखी आहे.

सर्व हिंदुस्थानभर प्रसिद्धीस आलेल्या 'बसुबिला' च्यापूर्वीं सहासात वर्षें बडोदें कौन्सिलांत सर्वतोपरी खल होऊन 'सिव्हिल मॅरेज ॲक्ट' ( ऐहिक

लग्ननिबंध) पास करण्यांत आला. या कायद्यान्वयें असगोत्रत्वाची व सवर्णत्वाचीं बंधनें काढून टाकण्यांत आलीं. विजातीय विवाह करणारास पूर्वी स्वधर्मास सोडचिठ्ठी द्यावी लागे. महाराजांनीं जातिबंधनें व रूढ आचार कोणी पाळूं नयेत अशाप्रकारचे व्यक्तिस्वातंत्र्यास विघातक नियम मात्र कधींच करण्याचें मनांत आणलें नाहीं, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. कोणतीहि सुधारणा म्हणजे समाजोन्नतिकारक नियमांची उभारणी व अयोग्य, समाजघातक नियमांची संहारणी; हातीं सत्ता आहे म्हणून न जुमानतां आपलें म्हणणें जुलूम जबरदस्तीनें दुसऱ्यावर लादणें योग्य नाहीं असें महाराजांचें मत. सारांश परिस्थितीप्रमाणें सर्व धोरण आंखलें पाहिजे ही त्यांची समाज नियमननीति होय. ‘ जुनें तें सोनें ’ म्हणून व्यर्थ उराशीं बाळगून बसण्यांत अर्थ नाहीं. महाराज म्हणतात कीं ‘ लहान मुलास दुरुस्त करणें असेल तर त्याचे योग्यतेनुरूप इलाज योजिले पाहिजेत. वयोवृद्ध व समंजस मनुष्य दुरुस्त करणें असेल तर त्याचे समजुतीनुरूप निराळे इलाज घेतले पाहिजेत. हेंच धोरण योग्य फेरफारानें समाजासहि लावावयाचें आहे.’ नंतर एके ठिकाणीं ते म्हणतात कीं, सुधारणेंत अनीतीचा कोणताहि भाग असूं नये एवढ्याबद्दल कार्यकर्त्यानें खबरदारी घेतली म्हणजे झालें. याप्रमाणें ‘ राजाची अनुमति व लोकांची सहिष्णुता ( Tolerance ) असली म्हणजे कोणतीहि सुधारणा यशस्वी होण्यास विलंब लागत नाहीं. ’ अशारीतीचें त्यांचें धोरण आहे. अनेक देशांतील रीतीरिवाज व इतिहासपरंपरा वगैरेंचें सूक्ष्म निरीक्षण करून जें अमूल्य ज्ञान त्यांनीं संपादिलें त्याचाच हा परिणाम होय. अशा रीतीनें स्वसंपादित ज्ञानाच्या व अधिकाराच्या जोरावर त्यांच्या मुखांतून जे उपदेशपर शब्द निघत ते केवळ पोकळ नसून त्याप्रमाणें ते स्वतः लोकांस धडा घालून देत असत. उदा० त्यांची प्रियकन्या श्री. इंदिराराजा यांच्या कुचबिहारच्या राजपुत्राबरोबरील लग्नास केवळ विजातीय विवाहास उत्तेजन म्हणून त्यांनीं संमति दिली.

दुसरें उदाहरण म्हणजे महाराजांनीं स्त्रियांची पडदापद्धति नाहींशी केली, व याचा उपक्रम खुद्द महाराणीसाहेबांपासून झालेला आहे. न्यायमंदिरांत झालेल्या बक्षीससमारंभाचेवेळीं महाराणीसाहेब गोषा न वापरतां प्रथम सभेंत आल्या. ‘ आधीं केलें, मग सांगितलें ’ किंवा ‘ जैसा

बोले तैसा चाले, त्याची वंदावी पाउलें ' या सदुक्तीप्रमाणें त्यांचा उपदेश सक्रिय होत असे हें यावरून उघड होत आहे.

महाराजांची सहावी सुधारणा ' अस्पृश्यतेचें उच्चाटण ' ही होय. हिंदुधर्म व हिंदुसमाज यांतील तत्त्वांचें व प्रचलित चालीरींतींचें निःपक्षपातानें जो कोणी निरीक्षण करील त्याला या समाजांतील व धर्मातील एका गर्हणीय प्रकाराविषयीं संताप व तिटकारा आल्यावांचून रहाणार नाहीं. आणि तो लाजिरवाणा प्रकार म्हणजे ज्यांना आपण ' हीन ' किंवा ' अतिशूद्र ' म्हणून समजतों त्यांच्याशीं आपले वर्तन हा होय. 'अस्पृश्यता' हा हिंदुधर्माचा व हिंदी-राष्ट्राच्या जिवंतपणाचा प्रश्न आहे. अस्पृश्यता हा हिंदुधर्मावर कलंक आहे. राज्यकर्त्यांकडे न्याय, समता व समान हक्कांची मागणी करण्यांत येते, परंतु एका बहुसंख्यांक वर्गाशीं वागतांना या गोष्टी अजिबात विसरल्या जातात हें आश्चर्य नव्हे काय ? महाराज म्हणतात ' वरचे लोक खालच्या लोकांस वाईट रीतीनें वागवितांना पाहून मला फार दुःख होतें. कुलशील माणसाच्या वर्तनावरूनच ठरतें, त्याशीं जन्माचा कांहीं संबंध नाहीं.' नंतर अस्पृश्यता काढून टाकण्यासंबंधीं ते म्हणतात, ' आपली भरभराट होण्यास व आपलें वैभव वाढण्यास हा जातीजातींचा आकुंचितपणा नाहींसा होऊन आपलें ऐक्य झालें पाहिजे. ' जातिभेद देवकृत नाहींत, मनुष्यकृत आहेत असें त्यांनीं मत दिलें आहे. मागासलेल्या जातींना शिक्षण देण्यासंबंधीं ते म्हणतात, ' या कामीं हिंदु लोकांची अनुकूलता मिळेना, म्हणून मला मुसलमान व ख्रिस्ती शिक्षकांची मदत घ्यावी लागली. याबद्दल त्यांचे आभार मानणें गैरशिस्त होणार नाहीं. ' महाराजांनीं अंत्यजांच्या उन्नतीसाठीं, शिक्षणाच्या काय काय सवलती दिल्या आहेत याचें विवेचन मागें आलेंच आहे.

सन १९०४ सालीं भरलेल्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेचे अध्यक्ष म्हणून महाराजांची निवडणूक करण्यांत आली होती व महाराजांनीं आपल्या भाषणांत वरील तत्त्वें सांगितलीं आहेत. यावरून महाराजांचे सामाजिक बाबतींत किती प्रगतिपर विचार होते यांची कल्पना येईल. नुकतेच कन्याविक्रयासंबंधानें, नवराबायकोच्या घटस्फोटासंबंधानें व स्त्रियांच्या हक्कासंबंधानें बडोदा असेंब्लीमध्यें कायदे पसार झालेले आहेत. हेंहि तेथील सामाजिक प्रगतीचें द्योतक आहे.

---

## १३ महाराजांचीं धार्मिक मतें.

संस्थानिकांना अंतर्गत स्वातंत्र्य असल्यामुळें त्यांना ब्रिटिश सरकारापेक्षां धार्मिक व सामाजिक सुधारणा एकदम कायद्यानें करणें शक्य असतें. खरें पाहिलें तर ब्रिटिश सरकार हे विदेशीय असल्यानें हिंदी लोकांच्या धार्मिक बाबतींत सहसा हात घालूं इच्छित नाहीं. ब्रिटिश सरकाराप्रमाणेंच महाराजांनीं आपल्या प्रजेस धार्मिक स्वातंत्र्य दिलें आहे. स्वतः हिंदु तेव्हां हिंदु-धर्मीयांनाच काय तें उत्तेजन द्यावयाचें व परधर्मीयांचा छळ करावयाचा अथवा त्यांच्या धार्मिक स्वातंत्र्यावर व तदनुषंगिक न्याय्य हक्कांवर गदा आणावयाची असलें संकुचित ध्येय त्यांनीं डोळयांपुढें ठेविलें नाहीं. त्यांनीं प्रत्येक धर्मांतील धर्मपुस्तकांचीं मराठींत भाषांतरें करविलीं आहेत. इ. स. १८८५ सालीं जैनधर्माच्या इतिहासाचें वाङ्मय मराठींत आणण्यांत आलें. १९०४ सालीं धर्माचा तुलनात्मक अभ्यास करून त्यावर ग्रंथ लिहिण्यासाठीं ५०० रु. मंजूर केले. सन १९११ सालीं खिश्चन, जैन, झोरास्ट्रियन, इस्लाम, बौद्ध, हिंदु वगैरे धर्मांतील तत्त्वें शिकविणारा एक क्लास काढावयाचें त्यांनीं ठरविलें होतें. या बाबतींत त्यांचें अकबराशीं फार जुळतें. अकबरबादशाहासहि अशा प्रकारच्या निरनिराळ्या धर्माच्या तौलनिक अभ्यासाची फार आवड होती व प्रत्येक धर्मांतील उत्तमोत्तम तत्त्वें घेऊन त्यानें ‘ दिने–इलाही ’ नांवाचा नवीन धर्म स्थापन केला होता हें इतिहासप्रसिद्ध आहे. महाराज जरी तितक्या पायरीपर्यंत गेले नसले तरी सर्व धर्मीयांबद्दल त्यांना आदर आहे हें निर्विवाद आहे. मात्र त्यांना व्यर्थ शब्दावडंबर करून धार्मिक स्तोम माजविणें बिलकूल पटत नाहीं. तसेंच रूढीच्या पांघरुणाखालीं जीं कित्येक थोतांडें किंवा फसवाफसवीचे प्रकार करण्यांत येतात अगर समाजाकडून त्याजकडे कानाडोळा करण्यांत येतो, तो त्यांना नको आहे. धर्माच्या बाबतींत कोणी मध्यस्थ नको. कुलाचार पाळूं नयेत असें त्यांचें मत नाहीं, पण अमूक माणसानांच किंवा जातीलाच वेदोक्ताचा अधिकार आहे, इतरांना नाहीं, हें मत त्यांच्या बुद्धीस पटत नाहीं. सर्वच ईश्वराचीं लेकरें, तेव्हां ईश्वराची प्रार्थना करण्याला सर्वांना सारखाच अधिकार पोंचतो. ब्राह्मणांस तेवढा वेदोक्ताचा अधिकार, परंतु क्षत्रियास मात्र पुराणोक्त पद्धति, ही विषमता त्यांना दु:सह वाटते. महाराजांस हिंदु-

धर्माचा पूर्ण अभिमान, परंतु देशकालानुरूप त्यांत फरक होणें इष्ट आहे असें त्यांचें मत आहे.

महाराजांनीं आपल्या कुटुंबांतील सर्व मंडळींचे संस्कार वेदोक्त पद्धतीनें केलेले आहेत. त्याचप्रमाणें भोजनादिप्रसंगीं सोंवळें–ओवळें, पंक्तिप्रपंच इत्यादि गोष्टींना अजिबात फाटा दिला जातो. महाराजांचें भोजन तर युरोपियन पद्धतीचेंच असतें, परंतु सार्वजनिक कार्यक्रमांतहि या समजुतींना थारा देण्यांत येत नाहीं.

लहानपणीं साधू अगर संन्यासी होणें हीहि गोष्ट महाराजांना मान्य नाहीं. महाराज लिहितात, 'विचार प्रौढ व प्रगल्भ झाल्यावर साधु किंवा संन्यासी होणें ही गोष्ट वेगळी; परंतु विरक्ति म्हणजे काय याची पुरी कल्पनाहि नसते अशा अल्पवयांत साधु होण्यानें ऐदी लोकांची संख्या वाढून समाजाचें अनहित होतें.' अशा लोकांस दान केल्यानें भिक्षेकऱ्यांना एकप्रकारें उत्तेजन मिळून ते निरुद्योगी बनतात व त्यांना नानाप्रकारचीं व्यसनें जडतात, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. महाराजांनीं राजवाड्यांतील अशाप्रकारचा दानधर्म सक्तीनें बंद करविला. कारण ते म्हणतात, 'अविचारी दानामुळें अतिशय अनर्थ होतो. धंदेवाईक भिकारी वाढतात व लोक कंगाल होतात.'

हल्लींच्या शिक्षणांत धर्मशिक्षणाचा प्रवेश होणें फार अगत्याचें आहे. धर्मशिक्षणाची रचना नीतिमत्तेच्या पायावर करून शिक्षणामुळें मनुष्याचें विचारक्षेत्र थोर व विशाल होईल अशी तजवीज होणें अगत्याचें आहे, असें सांगून धार्मिक शिक्षणानें आपलपोटेपणास थारा मिळणार नाहीं असें महाराजांनीं मत प्रतिपादन केलें आहे. या मतास अनुसरून महाराजांनीं नियमहि केले आहेत. ( १ ) पुजारी नियम–या नियमान्वयें देवालयांतील पुजाऱ्यांना संस्कृत शिकवून त्यांची परीक्षा घेण्यांत येते. देवळाचे पुजारीहि सुशिक्षित असले पाहिजेत असें महाराजांचें मत आहे. ( २ ) पुरोहित नियम—सन १९१४ सालीं हिंदु पुरोहितांच्या लायकीविषयीं एक कायदा करण्यांत आला. या कायद्यान्वयें वाटेल त्या जातीच्या इसमास इतर धंद्याप्रमाणें पुरोहिताचा धंदा करण्याची सवड ठेवण्यांत आली. मात्र पौरोहित्य करूं इच्छिणाऱ्यानें पुरोहितांची परीक्षा पास होऊन प्रशस्तिपत्र मिळविलें पाहिजे. या नियमाचा मुख्य कटाक्ष पुरोहित

वर्गाला आवश्यक शिक्षण देण्याकडे व ज्यांना ब्राह्मणेतर पुरोहित हवा असेल त्यांना तशी सवलत कायद्यानें मिळवून देण्याकडे विशेष आहे. अर्थात या नियमांनीं पुरोहितांच्या वंशपरंपरागत हक्काचें स्तोम कमी केलें असून पुरोहितानें गुणकर्माप्रमाणें आपलें समाजांतील स्थान मिळवावें, हें स्पष्ट करण्यांत आलें आहे. ( ३ ) गोप्रदानें–प्रायश्चित्तें, दक्षिणा यावर जो अनाठायीं खर्च होतो तो बंद करून त्या पैशाचा विनियोग संस्कृत वाङ्मयास उत्तेजन देण्याकडे करण्यांत आला आहे.

अशा प्रकारचीं महाराजांचीं धार्मिक मतें असून तीं समाजास एकंदर हितकारक आहेत असेंच कोणीहि म्हणेल.

---

## १४. जगीं सर्व सूखी असा कोण आहे ?

जे राजे प्रजेचें कल्याण तेंच आपलें कल्याण असें समजतात, प्रजेच्या हितासाठीं अहर्निश झटत असतात, त्यांच्या वाट्यास कौटुंबिक सुख फार थोडें येतें असें म्हणतात. रामराज्य स्थापणारे प्रभु रामचंद्र यांना तरी कौटुंबिक सुख कितीसें मिळालें ? प्रथम चौदा वर्षें वनवास भोगला, रावणासारख्या बलाढ्य शत्रूशीं टक्कर दिली व अखेर राज्य मिळालें तरी लोकरंजनार्थ सीतेचा त्याग करावा लागला. तात्पर्य राजाला कौटुंबिक सुख फार थोडें मिळूं शकतें. तीच गोष्ट सयाजीरावांची. त्यांचें कौटुंबिक जीवन थोडेंसें विस्तृत सांगणें इष्ट आहे.

श्रीमंत सयाजीरावांना दोघे बंधु. ज्येष्ठ आनंदराव व धाकटे संपतराव. कनिष्ठ बंधु श्रीमंत संपतराव गायकवाड ह्यांनीं बॅरिस्टरीची परीक्षा दिली आहे. त्यानंतर महाराजांनीं खासगी कारभारी, सरसुभे, एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे सभासद वगैरे महत्त्वाच्या जागांवर त्यांची नेमणूक केली. श्रीमंत संपतराव यांनीं सर्व लोकांशीं मिळून मिसळून वागून बरीच लोकप्रियता संपादन केली आहे. महाराजांचे वडील बंधु श्रीमंत आनंदराव यांची बहुतेक सर्व नोकरी फौज खात्यांत झालेली होती. ते सध्यां हयात नाहींत.

श्रीमंत सयाजीराव महाराजांच्या द्वितीय पत्नि श्री. सौ. महाराणी चिमणाबाईसाहेब यांनीं मराठी, गुजराती, हिंदी इंग्लीश व फ्रेंच भाषांचें शिक्षण घेतलें असून स्त्रीशिक्षणाच्या त्या मोठ्या पुरस्कर्त्या आहेत. “ भारतीय महिलांची स्थिति ” या नांवाचा त्यांनीं इंग्लीश भाषेंत एक सुंदर ग्रंथ

लिहिला असून त्यांत पाश्चात्य व पौर्वात्य पद्धतींचा मेळ बसेल असें शिक्षण स्त्रियांना दिलें पाहिजे, स्त्रीभावनांचा परिपोष करणारे विषय स्त्रियांना शिकविले पाहिजेत, युरोपियन स्त्रियांप्रमाणें हिंदी स्त्रियांनी सार्वजनिक कामांत भाग घेतला पाहिजे, असे सुंदर विचार प्रदर्शित केले आहेत. श्री. सौ. महाराणीसाहेबांना एकंदर चार अपत्यें झालीं. प्रिन्स जयसिंहराव, प्रिन्स शिवाजीराव, श्रीमंत राजकुमारी इंदिरा राजे व प्रिन्स धैर्यशीलराव.

महाराजांच्या प्रथम पत्नि श्री. सौ. महाराणी (पहिल्या) चिमणाबाईसाहेब यांचे पुत्र श्री. युवराज फत्तेसिंहराव यांनीं आपला प्राथमिक अभ्यास बडोद्यास 'प्रिन्सेस स्कूल" मध्यें संपविल्यानंतर ते मुंबई विद्यापीठाची प्रवेशपरीक्षा (मॅट्रिक) उत्तीर्ण झाले. त्यानंतर त्यांना पुढील शिक्षणासाठीं इंग्लंडास पाठविण्यांत आलें. त्यांचे बरोबरच त्यांचे धाकटे सापत्नबंधु प्रिन्स जयसिंहराव व प्रिन्स शिवाजीराव यांना शिक्षणासाठीं धाडण्यांत आलें. इंग्लंडला गेल्यावर श्री. युवराज फत्तेसिंहरावांनी बॅलियल कॉलेजांत प्रवेश मिळविला, पण आपला अभ्यासक्रम पुरा करण्यापूर्वींच ते सन १९०२ सालीं हिंदुस्थानास परत आले. महाराजांना याबद्दल अत्यंत वाईट वाटलें. आपल्या पुत्रांनीं सुशिक्षण घेऊन त्याचा फायदा इतरेजनांना द्यावा अशी कोणत्या पित्याची इच्छा नसणार ? त्यांतून महाराजांची तर होतीच होती. पण दुर्दैव आडवें आल्यावर ते काय करणार ?

सन १९०८ सालीं युवराज फत्तेसिंहराव मज्जातंतूच्या विकारानें अकालीं कालवश झालें. त्यामुळें महाराजास अतिशय वाईट वाटलें. महाराजांवर आलेली ही द्वितीय कौटुंबिक आपत्ति होय. श्री. युवराज फत्तेसिंहरावांना मृत्यूसमयीं दोन कन्या व एक चिरंजीव अशी तीन अपत्यें होतीं. या मुलींपैकीं श्री. राजपौत्री इंदुमतीदेवींचें श्री. छत्रपति राजाराम महाराज यांचेबरोबर लग्न झालें आहे. श्री. राजपौत्री लक्ष्मीदेवींना सावंतवाडीचे हल्लींचे राजेसाहेब यांस दिलें असून त्यांना तीन अपत्यें झालीं आहेत. श्री. युवराज फत्तेसिंहराव यांचे चिरंजीव श्री. युवराज प्रतापसिंह यांनीं पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतील इंटरमीजिएट पर्यंतचा अभ्यास पुरा करून राज्यकारभाराचा अनुभव मिळण्यासाठीं मुलकीखात्यांतील वहिवाटदार, नायसुभे, सुभे व सरसुभे अशा विविध हुद्यांचें काम केलें व सध्यां ते कर्मसचिव या हुद्याचें जबाबदारीचें काम करीत आहेत. राज्यांतील मंत्रीमंडळाचेहि ते सभासद आहेत.

प्रिन्स जयसिंहराव, शिवाजीराव व धैर्यशीलराव यांच्या शिक्षणाच्या बाबतींतहि ईश्वरी नेमानेम प्रतिकुळ ठरला. जयसिंहराव हे प्रथम हॅरो येथील ग्रामर स्कुलमध्यें शिकत होते. सन १९१० सालीं त्यांना अमेरिकेंतील हारवर्ड विद्यापीठांत शिक्षणार्थ पाठविण्यांत आलें. पण लवकरच प्रकृति नादुरुस्त झाल्यानें त्यांना आपला अभ्यास अर्धवट सोडून हिंदुस्थानास परत यावें लागलें. हिंदुस्थानास आल्यावर त्यांचें लग्न झालें व राज्यांत विविध हुद्यांचीं कामें करण्यास त्यांनीं सुरुवात केली.

महाराजांचे तिसरे पुत्र प्रिन्स शिवाजीराव हे निकोप प्रकृतीचे, सुदृढ बांध्याचे व उमद्या स्वभावाचे होते. हिंदुस्थानांत आपला प्राथमिक शिक्षणक्रम संपवून ते पुढील अभ्यासासाठीं ऑक्सफर्डला गेले. थोड्याच दिवसांत त्यांनीं क्रिकेट खेळण्यांत तेथें बराच वरचा नंबर पटकाविला व सर्वांकडून वाहवा मिळविली. पुढें ते हिंदुस्थानास परत आल्यावर त्यांचा विवाह करण्यांत आला व महाराजांनीं त्यांना राज्यकारभारांत घातलें. सन १९१९ सालीं त्यांना न्यूमोनियाचा ताप आला व त्यांतच त्यांचा दुर्दैवेंकरून अंत झाला. त्यांच्या पाठीमागें त्यांच्या पत्नि श्री. राजस्नुषा कमलादेवी, व तीन मुलें—प्रिन्स उदयसिंह, खंडेराव व प्रिन्सेस निर्मलराजे—आहेत. मुलांपैकीं प्रिन्स उदयसिंह सध्यां बडोद्यांतील कॉलेजांत शिकत असून दुसरी दोघें अनुक्रमें बडोदें व पुणें येथील शाळांतून शिक्षण घेत आहेत.

श्री. राजकन्या इंदिराराजे यांचे शिक्षण खाजगी रीतीनें होऊन नंतर त्यांनीं बडोदा कॉलेजमध्यें शिक्षण घेण्याचें ठरविलें; याबद्दल बरीच टीका झाली. महाराजांच्या मनांत ग्वाल्हेरचे महाराज माधवराव शिंदे यांच्याशीं इंदिराराजे यांचा विवाह करावा असें होतें; परंतु इंदिराराजे यांनीं कुचबिहारचे महाराज जितेंद्रनारायण यांच्याबरोबर विवाह करण्याचें निश्चित केलें. हा विवाह-समारंभ इंग्लंडमध्यें ब्राह्मोपद्धतीनें झाला. पुढें कांहीं वर्षांनीं महाराज जितेंद्रनारायण मृत्यू पावले.

सन १९१९ सालीं प्रिन्स जयसिंगराव यांची प्रकृति बिघडली. तेव्हां हवापालट व औषधोपचारासाठीं त्यांना युरोपांत पाठविण्यांत आलें. परंतु त्याचा कांहीं एक उपयोग न होतां ता. २७ ऑगस्ट १९२३ रोजीं बर्लिनहून हॉलंडास येत असतां त्यांना वाटेंत आगगाडींत मृत्यूनें गांठलें. या वेळीं महाराज सेंट मॉरिट्झ येथें होते, परंतु रूटरनें बडोद्याच्या गायकवाडांस देवाज्ञा झाली अशी मोघम तार



राजकुटुंब ( सन १९२६ )

पाठविली. 'गायकवाड' म्हणजे सयाजीराव अशी चोहोंकडे प्रसिद्धी असल्यामुळें इंग्लंडांत व हिंदुस्थानांत निरनिराळ्या वृत्तपत्रांनीं महाराजांचे मृत्युलेख प्रसिद्ध केले. 'आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां' या उक्तीप्रमाणें महाराजांस जिवंतपणींच आपल्याविषयीं लोक काय बोलतात हें वाचावयास सांपडलें. लंडन टाइम्सनें महाराजांनीं महायुद्धांत इंग्रज सरकारास केलेल्या मदतीचा गौरवपूर्वक उल्लेख करून 'महाराजांची वृत्ति अतिशय चंचल व भांडखोर होती, आणि सार्वभौम सत्तेशीं त्यांचे वरचेवर खटके उडत असत' अशी टीका केली. मॉर्निंग पोस्टनें 'महाराज प्रजाहितदक्ष होते' असें म्हटलें. डेलि हेरल्ड पत्रानें बडोदें संस्थान पंजाबमध्यें असल्याचें सांगून हिंदुस्थानाविषयीं आपलें गाढ अज्ञान प्रगट केलें; तर बडोदें हिंदुस्थानांत मोठे सुधारलेले व भरभराटीस आलेलें संस्थान आहे असें सांगून महायुद्धांत महाराज राजनिष्ठ राहिल्याबद्दल डेली टेलिग्राफ पत्रानें त्यांना धन्यवाद दिले. मुंबईच्या टाइम्सनें 'राजकीय वातावरणांत महाराज ही एक डोईजड व्यक्ति होती' अशा अर्थाची निंदागर्भित स्तुति केली. तें कसेंहि असलें तरी बहुतेकांनी महाराजांच्या कार्याची स्तुतीच केली. हिंदुस्थानांतील—विशेषत: मुंबई इलाख्यांतील प्रजेला महाराज सुखरूप आहेत हें वृत्त ऐकून किती आनंद वाटला असेल हें सांगणें नलगे.

महाराजांचे सर्वांत धाकटे चिरंजीव श्रीमंत धैर्यशीलराव यांचें शिक्षण इंग्लंडांतील एका पब्लीक स्कुलमध्यें झालें आहे. आपलें शिक्षणक्रम पुरें झाल्यावर त्यांनीं लष्करी शिक्षण घेतलें. तें संपवून ते बडोद्यास आल्यावर त्यांचें लग्न झालें. सध्यां त्यांना पांच अपत्यें असून त्यांपैकीं चार युरोपांत विद्यार्जन करीत आहेत. राज्यांतील निरनिराळ्या खात्यांतील कामकाजाची त्यांनीं माहिती घेतली असून सध्यां ते बडोद्यासच राहतात. सन १९२७ सालीं बडोद्यास मोठा जलप्रलय झाला, त्यावेळीं त्यांनीं जलप्रलय निवारणाचें काम चांगल्या रीतीनें करून सर्वांकडून वाहवा मिळविली.

या सर्व हकीकतीवरून असें दिसून येईल कीं, महाराजांच्या देखत त्यांच्या मातुश्री महाराणी जमनाबाईसाहेब, भगिनी श्रीमंत ताराराजे, प्रथम पत्नी महाराणी चिमणाबाईसाहेब, तीन वयांत आलेले मुलगे, एक सून, एक जांवई श्री. महाराज जितेंद्रनारायण, बंधु आनंदराव, ही सर्व मृत्यु पावली. अर्थात् त्यांना कौटुंबिक सुखाचा लवलेशहि नाहीं असेंच कोणी म्हणेल व स्वत: महाराजहि असेंच मत प्रगट करतात: "I have no domestic life."

# १५. दोन महोत्सव

सन १९०७ च्या मार्च महिन्यांत श्री. महाराजसाहेबांचा रौप्य महोत्सव त्यांच्या प्रजेनें मोठ्या थाटानें साजरा केला. महाराजांनीं आपल्या पंचवीस वर्षांच्या कारकीर्दींत केलेल्या लोकोपयोगी सुधारणांमुळें ते आपल्या प्रजेचे तेव्हां किती आवडे झाले होते हें निदर्शनास आलें. याप्रसंगीं बडोदा कॉलेजांतील समारंभ आटोपून राजवाड्यांत परत जातेवेळीं त्यांच्या गाडीचे घोडे सोडून विद्यार्थ्यांनीं त्यांची गाडी स्वतः ओढत नेली. या आनंदोत्सवाप्रीत्यर्थ महाराजांनी पांच लक्ष रुपयांची साराबाकी मांडून वाळली, बडोदें येथें ज्युबिलीबाग उघडून बडोदा सुधराईस मार्केटसाठीं एक भव्य इमारत बक्षिस दिली, अंत्यज विद्यार्थ्यांसाठीं पाटण व अमरेली येथें दोन वसतिगृहें उघडलीं, राज्यांत चार मोठे दवाखाने काढले, व खेडोपाडीं विहिरी खणण्यासाठीं पांचलक्षांची जादा रकम मंजुर केली.

महाराजांच्या राज्यारोहण समारंभास सन १९२५ सालीं ५० वर्षे पुरी झालीं. तन्निमित्त त्यांच्या प्रजाजनांनीं बडोद्यास व राज्यांतील खेड्यापाड्यांतून थाटाचा सुवर्ण महोत्सव करण्याचें ठरविलें. त्याच्यासाठीं एक एक समिती नेमण्यांत आली व तिनें या महोत्सवाची अल्पावधींत जंगी तयारी केली. महाराजांचा मुक्काम तेव्हां युरोपांत असल्यामुळें ते परत आल्यानंतर हा समारंभ करण्याचें ठरविण्यांत आलें.

ता. २० नवेंबर १९२५ रोजीं महाराजांची स्वारी स्वदेशीं परत आली व ता. ११ जानेवारी १९२६ पासून सुवर्ण महोत्सवास सुरुवात झाली. या दिवशीं सकाळीं ९—३० च्या सुमारास वारशा परेड ग्राउंडवर मोठा दरबार भरविण्यांत आला. लक्ष्मीविलास राजवाड्यापासून घोडदळ, पायदळ, सोन्याचांदीच्या तोफांसह जंगी तोफखाना या भव्य लवाजम्यासह महाराजांची स्वारी हत्तीवर सोन्याच्या अंबारींत बसून परेड ग्राउंडवर येऊन दाखल झाली. मिरवणुकीच्या अग्रभागीं घोड्यावरचा इंग्रजी पद्धतीचा स्फूर्तिदायक बँड वाजत होता. ठिकठिकाणचे रस्ते स्त्रीपुरुष प्रेक्षकांनीं अगदीं फुलून गेले होते. मैदानावर मुख्य दरवाजाशीं महाराजांची स्वारी अंबारींतून उतरल्यानंतर, दिवाणसाहेब व इतर अधिकारी यांच्याशीं हस्तांदोलन करून ते खास उच्चासनावर जाऊन बसले. त्यांच्या शेजारीं श्री. सौ. मा. महाराणीसाहेब व बाजूला

श्री. कुचबिहारच्या राणीसाहेब, श्री. प्रतापसिंह व राजघराण्यांतील इतर मंडळीं यांच्याकरितां सोनेरी, रुपेरी खुर्च्या ठेवण्यांत आल्या होत्या.

त्यावेळीं जमलेल्या सर्व लोकांनीं दरबारी पोशाख केलेला होता. मिलिटरीचे अधिकारी आपल्या मिलिटरी युनिफॉर्ममध्यें इकडून तिकडे वावरतांना दिसत होते. महाराजांची स्वारी मंडपांत आल्यावर सर्वांनीं त्यांना उत्थापन देऊन अभिवादन केलें. महाराजांची स्वारी उच्चासनावर विराजमान झाली व त्यांच्या दोन्हीं बाजूंस हातांत नंग्या समशेरी घेऊन त्यांचे शरीरसंरक्षक उभे राहिले. त्यावेळचा एकंदर देखावा मोठा भव्य व गंभीर दिसत होता.

दिवाणसाहेबांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत प्रजेच्या वतीनें महाराजांचें आयुरारोग्य चिंतिल्यानंतर निरनिराळया संस्थांतर्फे मानपत्रें अर्पण करण्याच्या कामास सुरवात झाली. ( १ ) मिल ओनर्स असोसिएशन, ( २ ) पुण्याची शिक्षण प्रसारक मंडळी, ( ३ ) अखिल भारतीय हिंदु महासभा, ( ४ ) सुरत म्युनिसिपॅलिटी, ( ५ ) मराठा समाज, ( ६ ) सुनी अंजुमान, बडोदें, ( ७ ) बडोदें अंत्यज संस्था, ( ८ ) नवसारी जिल्ह्यांतील नागरिक, ( ९ ) बडोद्यांतील मुसलमान, ( १० ) पारशी, ( ११ ) रोमन कॅथॉलिक इ. समाजांतर्फे महाराजांना मानपत्रें देण्यांत आलीं. हीं मानपत्रें मराठी, गुजराथी, हिंदुस्थानी, फारसी, अरबी, इंग्रजी या भाषांतून होतीं. मानपत्रांस उत्तर देतांना महाराजांनीं इंग्रजींत विचारपरिलुप्त भाषण करून सांगितलें कीं, बडोदा संस्थानांत सर्व जातींचे व सर्व धर्मांचे लोक एकोप्यानें व मित्रत्वाच्या नात्यानें राहात आहेत ही फारच आनंदाची गोष्ट आहे. सर्वांनीं एकराष्ट्रीयत्वाची भावना ठेवून कोणत्याहि सार्वजनिक प्रश्नाचा विचार करणें फायद्याचें आहे. यामुळें मतभेदास व जातिभेदास फारशी जागा राहाणार नाहीं. स्वतःच्या धोरणासंबंधानें महाराजांनीं असा खुलासा केला कीं, सर्व साधकबाधक प्रमाणांचा पूर्णपणें विचार करून कोणतेंहि धोरण सरकारतर्फे निश्चितपणें अमलांत येतें. जे राजकीय हक्क प्रजेस देण्यांत आले आहेत त्यांचा तिनें योग्यप्रकारें व शहाणपणानें उपयोग करून घेतला पाहिजे. गतकालासंबंधानें ते म्हणाले कीं, ‘ जुनें तें सोनें ’ न मानतां जुन्यांतील चांगला अंश ग्रहण करून नवीन सुधारणा घडवून आणली पाहिजे. तरच हिंदवी संस्कृतीचें आपण रक्षण केल्यासारखें होईल.

महाराजांच्या भाषणानंतर तोफांची सलामी, व बँडवर बडोदें संस्थानचें राष्ट्रगीत म्हणण्यांत येऊन कार्यक्रम आटोपला.

दुपारीं लक्ष्मीविलास राजवाड्यांत दुसरा दरबार भरविण्यांत आला, व तदनंतर महाराजांनी न्यायमंदिरांत शाळेंतील मुलांच्या मेळ्यास उद्देशून छोटेसें उपदेशपर भाषण केलें. रात्रौ शहरांत विजेची झगझगीत, नेत्रांस दिपविणारी, परंतु प्रेक्षणीय अशी रोषणाई केली होती. बडोद्यांतील सार्वजनिक इमारती, न्यायमंदिर, सयाजीविहार क्लब, शाळा इ. ठिकाणची रंगीबेरंगी नयनमनोहर रोषणाई अपूर्व दिसत होती. सुरसागर तलावाभोंवतीं दारुकाम उडविण्यांत आलें. लाल, हिरव्या, जांभळ्या तारकांची जणूं काय वृष्टीच अशा तऱ्हेचें तें कुशलतेचें दारुकाम, तलावाभोंवतीं पाजळलेली लांबलचक दीपपंक्ती, तिचें जलाशयांत पडलेलें सुंदर प्रतिबिंब, यामुळें पाहाणारास हिऱ्यांच्या दोनचारसरी हारांचा भास होत होता !

ता. १२ रोजीं सार्वजनिक बागेंत नाच, गाणें इ. कार्यक्रम करण्यांत आला. ता. १३ रोजीं सकाळीं ८-३० वाजतां मकरपुरा रस्त्यावरील मैदानावर लष्करी शिपायांची महाराजांसमोर कवाईत झाली. त्याचप्रमाणें महाराजांनीं बालचमूंच्या सैन्याचीहि पाहणी केली. दुपारीं गोरगरीबांना अन्नदान करण्यांत आलें, व संध्याकाळीं युरोपियन स्त्रीपुरुष व शहरांतील प्रमुख लोकांना महाराजांनीं थाटाची मेजवानी दिली. त्यानंतर भिल्ल लोकांचा नाच करण्यांत आला व रात्रौ १२ वाजतां सर्व कार्यक्रम संपला.

ता. १४ रोजीं सकाळीं जादा सरकारी गॅझेट काढण्यांत येऊन सुवर्ण महोत्सवानिमित्त प्रजाजनांना खालीलप्रमाणें सवलती दिल्याचें जाहीर करण्यांत आलें:—( १ ) ३ लक्ष रु. जमीन महसुलाची रयतेस सूट. ( २ ) कापसावरील कराची तहकुबी. ( ३ ) मोठमोठ्या शहरीं टेलिफोनची सोय. ( ४ ) कैद्यांची मुक्तता.

ता. १५ रोजीं विश्वामित्री नदीच्या काठीं केदारेश्वर देवालयानजीक महाराजांनीं ‘ कीर्तीमंदिरा ’ च्या पायाचा दगड बसविला. रोमच्या ‘ पँथिऑन ’ किंवा इंग्लंडांतील ‘ वेस्ट मिन्स्टर ॲबे ’ प्रमाणें या इमारतींत गायकवाड घराण्यांतील सर्व राजांचे व नामांकित मुत्सद्यांचे पुतळे किंवा तैलचित्रें ठेवण्यांत येतील असें महाराजांनीं समारंभप्रसंगीं सांगितलें. संध्याकाळीं ‘ सयाजी

विहार क्लब ' नें महाराजांना एक जंगी मेजवानी दिली व त्याचबरोबर हा समारंभ समाप्त झाला.

षष्ठ्यब्दि हा हिंदुधर्मांत एक धार्मिक विधि मानला असून इतर संस्कारा-प्रमाणें व्यक्तीच्या ६१ व्या वाढदिवशीं होमहवन, अन्नसंतर्पण वगैरे धर्माचार पाळावे असें शास्त्रांत सांगितलें आहे. युरोपमध्यें व्यक्ति व संस्था यांचेहि महोत्सव करण्यांत येतात. अशा समारंभांत व्यक्तीचा आनंद तर असतोच पण इतर इष्टमित्रांच्या सहानुभूतीनें तो द्विगुणित होतो. असो. सध्यां महारा-जांना ७० वें वर्ष चालू आहे. आणखी दोन वर्षांनी त्यांचा रत्नमहोत्सवहि अशाच किंबहुना द्विगुणित उत्साहानें साजरा करण्यांत येईल.

---

## १६. युवराजांचा विवाह व नंतर

यानंतरचा बडोद्यांतला मोठा उत्सव म्हणजे युवराज प्रतापसिंहराजे यांचा विवाह होय. कोल्हापूरचे सरदार मानसिंगराव घोरपडे यांची कन्या श्री. कु. शांतादेवी यांना श्री.महाराजसाहेब व श्री. राजपौत्र प्रतापसिंह यांच्या अनुमतीनें वधू नेमस्त करण्यांत आलें हा विवाहसमारंभ ४ जानेवारी १९२९ रोजीं मोठ्या थाटानें करण्यांत आला. त्यावेळीं गुजराथेंतील व काठेवाडांतील मोठमोठे राजेरजवाडे, मांडलिक संस्थानिक, रेसिडेंट वगैरे हजर होते. युवराज प्रतापसिंह यांचें शिक्षण डेक्कन कॉलेजमध्यें झालें असून ते क्रिकेट खेळण्यांत निपुण आहेत. त्यांचा स्वभाव मनमिळाऊ असून सर्वांशीं ते मोठ्या प्रेमानें वागतात. मागें सांगितल्या-प्रमाणें आपलें राज्यकारभाराचें शिक्षण संपवून हल्लीं ते कर्मसचिव या नात्यानें दिवाण अधिकाराची कामें पाहातात. सन १९३० सालीं प्रतापपुरा तलावाच्या उद्घाटणप्रसंगीं महाराजांनी जाहीर रीतीनें प्रथमच त्यांना युवराज या नांवानें संबोधिलें.

युवराजांच्या पत्नी श्रीमंत सौ. शांतादेवी या २ एप्रिल १९३० रोजीं प्रसूत होऊन त्यांना पुत्ररत्न झालें. हें आनंददायक वृत्त ऐकून महाराजांना संतोष वाटला. अशा प्रकारें महाराजांनीं पंतवड पाहिलें व हिंदुधर्माच्या समजुतीप्रमाणें त्यांना काशीयात्रा घडली ! हें भाग्य कांहीं लहानसहान नाहीं.

सन १९३१ सालीं महाराजांनीं आपल्या पतवंडास फत्तेसिंह असें नांव ठेवलें. यानंतर कांहीं दिवसांनीं श्री. सौ. युवराज्ञींना एक कन्यारत्न झालें.

---

## १७. उपसंहार

**व्यक्तिविषयक**—महाराजांचे फोटो, रंगित चित्रें किंवा साधीं छापील चित्रें हीं सर्व हिंदुस्थानभर इतकीं पसरलेलीं आहेत कीं, हें 'सयाजीराव महाराज' असें एकादें लहान मूलहि सांगू शकेल. 'मी राजा होण्याकरितां आलों आहें,' हें महाराजांनीं दत्तकाची निवड होण्याप्रसंगीं दिलेलें उत्तर महदाख्यायिकेच्या मालिकेंत अढळ स्थान मिळवून बसलें आहे, आणि लहान मुलांना ही गोष्ट नेहमीं सांगण्यांत येते. तात्पर्य, महाराजांचें नांव आज आबालवृद्धांच्या तोंडीं आहे. महाराजांना ओळखण्याची खूण म्हणजे मुख्यतः साधा पोषाख, त्यांची गायकवाडी पगडी, पांढरा पायघोळ अंगरखा, व सरदारी थाटाची विजार. त्यांच्या एकाकाळच्या आंकडेबाज पिळदार मिशा, रुंद व भव्य कपाळपट्टी, हृदयभेदक, खोंचक अशी सूक्ष्म दृष्टी, विचारमग्न व मूर्तिमंत मुत्सद्दीपणाची मुद्रा, किंचित् ठेंगणी व पुष्ट शरीरयष्टि, राजपदास शोभेशी उभें राहण्याची लकब, अगर बसण्याची ढब, रोमरोमीं विलसणारें व खेळणारें राजतेज, व हातांत राजदंड (सोन्याची मूठ बसविलेली काठी) घेतलेली ती श्री.सयाजीराव महाराजांची मूर्ति पाहिली कीं, आपण एका साध्या पण नीतिमान् नृपशिरोमणीच्या सान्निध्यांत राहण्याचा अलभ्य लाभ घेत आहोंत याबद्दल स्वतःला धन्यता वाटूं लागते. दुसऱ्यांच्या ज्ञानाबद्दल आदर, अनेक विषयांबद्दलची रसिकता, स्वतःची तीव्र ज्ञानलालसा, विचारांची सचोटी, बारीक चिकित्सेची आवड, दांडगी स्मरणशक्ति, नवें जोडावें पण जुनें सोडूं नये हा बाणा, उज्ज्वल देशभक्ति, असामान्य कर्तव्यनिष्ठा, प्रबोधशक्ति व स्वार्थत्यागबुद्धि, 'अनुभवें आलें अंगा, तेंचि देतसे या जगा' अशी वृत्ति, यांमुळें त्यांच्याशीं सहवास घडणाऱ्या इसमावर त्यांची विलक्षण छाप बसते. कायदा व शिस्त हीं प्रत्येक गोष्टींत असलीच पाहिजेत हा आग्रह. जेथें व्यवस्था नाहीं तेथें प्रगति नाहीं व पराक्रम नाहीं, हें ठाम मत. किंबहुना यावरून महाराजांस शिस्त, व्यावहारिक ज्ञान, सारासार विचार व नियम यांचें बाळकडूं पाजलें होतें कीं काय असें वाटूं लागतें. बोलण्यांत शब्द मोजके, रेखीव आणि तोलीव असे असावयाचे. त्यांत सावधानता दिसावयाची. तरी पण प्रत्येक वाक्यागणिक उद्दिष्टाचें पाऊल पुढें पडत असावयाचें; व दुसऱ्यास त्याचा थांगपत्ताहि लागावयाचा नाहीं! 'राजकारण बहुत करावें, परंतु कळोंच नेद्यावें' ही खूणगांठ सदैव मनांत

ठेवून प्रत्येकाशीं बोलावयाचें. ऐकणाराला शब्द खोंचदार व मार्मिक वाटून त्यानें महाराजांच्या समयज्ञतेचें, मुद्देसूदपणाचें व आत्मविश्वासाचें कौतुकच करावें. जें स्वतःस पटलें नाहीं, तें कोणासहि सांगावयाचें नाहीं. याचेंच नांव जबाबदारीची जाणीव. निरनिराळ्या सार्वजनिक प्रसंगीं भाषण करतांना कांहीं तरी नवीन मार्ग व विचार सुचविल्याखेरीज खुर्ची सोडावयाची नाहीं. दुसऱ्याची चूक दाखवितांनाहि भाषासरणी मधुर, मुद्देसूद व चित्ताकर्षक वापरावयाची. हेतु हा कीं, ज्याची चूक झाली असेल त्याचें पूर्ण समाधान व्हावें. परंतु कोणाचा बुद्धिपुरस्सर अपमान किंवा अपशब्द यांचा गंधहि नाहीं. विषय मांडणींत नेहमीं नाविन्य, कळकळ, विचारपरिप्लुतता, चटकदारपणा, मोहकता ह्यांचा मालमसाला भरपूर सांपडावयाचा. आपल्यास पसंत आहेत त्या गोष्टी सर्वसंमत व सर्वसंमानित रूढीविरुद्ध असल्या तरी तसें प्रांजलपणें, निर्भीडपणें, व स्पष्ट बोलून तदनुसार आचरण करावयास लागावयाचें. अगदीं भोजनासारख्या साध्या बाबीपासून तों थेट धार्मिक, सामाजिक, आर्थिक व राजकीय बाबीपर्यंत, विरोधाच्या, प्रच्छन्न वैरभावाच्या वावटळीवर वावटळी उठल्या तरी शांत, स्थितप्रज्ञ राहून विरोधकास आपल्या बुद्धिबलाच्या प्रभावावर आत्मसात् करावयाचें. तडजोड ही नेहमींची वृत्ति खरी, परंतु कोणी स्वत्वावर किंवा पिढीजाद हक्कावर घाला घालूं पाहील, अथवा विनाकारण डवचूं लागेल तर अशा प्रतिपक्षाशीं कोटिक्रमानें, युक्तिवादानें, पुराव्यानें, विशिष्ट पद्धतीच्या उपहासानें, प्रसंगविशेषीं सत्तेचा, अधिकाराचा उपयोग करून प्रतिपक्षास नामोहरम करावयाचें. त्यांत सहसा माघार घ्यावयाची नाहीं. आपल्या हक्काबद्दल रेसिडेंटशीं झालेल्या तंट्यांत महाराज किती जागरूक होते हें मागें दाखविलेंच आहे. 'कोणीहि मोठेपणाच्या पायरीस पोंचावयास लागला कीं, त्याजविरुद्ध आकांडतांडव सुरूं झालेंच म्हणून समजावें. मग नानातऱ्हेचे आरोप त्याजवर व्हावयाचे,' असें एका कवीचें श्रेष्ठपदवीबद्दल मत आहे. महाराजांना जात्याच युद्धप्रसंग नकोत, पण पेशा पडला राजाचा, सोडून काय भागणार ? टाळावयाचें असलें तरी तोंड देणें भाग पडतें.

महाराजांचीं व्याख्यानें म्हणजे अनेक दलांचें कमल. अनेक विषयांवरील महाराजांचे वेळोवेळीं प्रकट झालेले विचार या कमलाच्या प्रत्येक पाकळी गणिक सांठविलेले आहेत. एकएक पाकळी जरी घेतली तरी सुंदर व पूर्ण सुगंधयुक्त. मग सबंध कमळाचें रूप व गंध काय वर्णावा !

महाराजांच्या व्याख्यानांचें सार ( १ ) विद्येची महती फार थोर आहे, ( २ ) उद्योगाचें श्रेष्ठत्व सर्वमान्य असावें, ( ३ ) उच्चनीच भावनांचा त्याग करावा, ( ४ ) प्रत्येकानें सुखदुःखाविषयीं उदासीन होऊन कर्तव्यदक्ष असावें, ( ५ ) स्वार्थनिरपेक्षपणें कोणतेंहि कार्य करावें, या पांच तत्त्वांत समाविष्टें आहे. त्यांचें विशाल वाचन, सर्वसंग्राहकता, बुद्धीची अनुभवजन्य परिपक्वता, निरनिराळ्या संस्कृतींचा तौलनिक अभ्यास व जबर व्यासंग वगैरे गोष्टींचें प्रतिबिंबच अशीं हीं व्याख्यानें व भाषणें आहेत.

महाराजांचे उद्योग बहुशाखी, व अनंत व्यापाचें चक्र नेहमीं चालूंच. युरोपमध्यें असले काय किंवा हिंदुस्थानांत असले काय, राज्यकारभारासंबंधीं महत्वाचे कागदपत्र मागवून स्वतः महत्त्वाच्या प्रश्नांचा निकाल करावयाचा. कांहीं कांहीं प्रश्नांचें बाबतींतील निकालांमध्यें त्यांचा कठोरपणा दिसतो असा कांहींचा आक्षेप आहे. इनामदारांचीं उत्पन्नें त्यांच्या सनदा असूनहि कमीं केलीं, हें उदाहरण म्हणून देण्यांत येतें. परंतु महाराजांना कोणीहि स्वस्थ बसून चैनींत खावें प्यावें, ही गोष्ट सर्वांत नापसंत आहे, हें हे टीकाकार विसरतात. श्रम करावे व खावें ह्याबद्दल तर महाराजांचा विशेष कटाक्ष. इनामदार वर्गांतले लोक आळशी, निरुद्योगी, व विलासी. त्यांना महाराजांची प्रगतिपर नाविन्यपूर्ण राजवट पसंत पडली नाहीं. त्यांनीं एकवटून गिल्ला केला. परंतु महाराजांनीं अशा लोकांनीं सरकारी कामें केलीं तरच त्यांचें उत्पन्न चालविण्यांत येईल असा कायदा करून टाकला. या कृत्याबद्दल त्यांना दोष देणारे देवोत, परंतु केवळ पूर्वजांच्या नांवावर, थोर घराण्यांतील म्हणून एकाद्यानें वाटेल तशी चैन करावी किंवा काय, व समाजानें किंवा मुख्य सत्तेनें तशी गोष्ट वंशपरंपरा चालूं द्यावी किंवा काय, हा राजनीतिशास्त्रांतला एक तत्त्वाचा प्रश्न आहे. विषारी प्रतिकूल टीका सहन करूनहि महाराजांनीं तो प्रश्न मोठ्या धाडसानें व दृढनिश्चयानें सोडविला, यावरून त्यांची तत्त्वनिष्ठा प्रतीत होत नाहीं काय ?

इतर राज्यकारभाराचीं कामें घड्याळाच्या कांट्यांप्रमाणें ठराविक वेळीं व अत्यंत नियमितपणें चालावींत यावर त्यांची विशेष नजर. स्वतः महाराजांना कामाचा उरक विलक्षण. पांचपांच सहासहा अंमलदार निरनिराळ्या कामासाठीं बोलावून त्यांच्या प्रश्नांचा निकाल करावयाचा, पण त्यांत गोंधळ शपथेला नाहीं. राज्यकारभारासंबंधीं अनेक बाबतींचे विचार नेहमीं त्यांच्या

डोक्यांत घोळत असतात. त्यांनीं प्रथम जेव्हां राज्यसूत्रें हातांत घेतलीं तेव्हां तर या विचारांनीं त्यांना सारी रात्र झोंप येत नसे. ही गोष्ट जेव्हां त्यांनीं स्वकीयांजवळ सांगितली तेव्हां त्यांनीं महाराजांस विश्रांतीची अवश्यकता पटवून देण्याऐवजीं त्यांच्या निद्राभावाचीच उलट तारीफ करून राजानें जागरूकच असलें पाहिजे असें त्यांस सांगितलें ! यामुळें त्यांच्या प्रकृतीवर मात्र अनिष्ट परिणाम झाला. महाराजांचें सुधारणा हें ब्रीदवाक्य, आणि सर्व प्रकारच्या दोषांवर, न्यूनतेवर शिक्षण हा त्यांचा जबरदस्त तोडगा. कोठें कांहीं नवीन पाहिलें कीं, त्याचा उपक्रम आपल्या राज्यांत सुरू करावयाचा हा फार हव्यास. सुधारणांचें रहस्य लोकांस कळावें म्हणून शिक्षण सार्वजनिक, सक्तीचें व मोफत केलेलें. प्रजेच्या हिताविषयीं नेहमीं तळमळ व त्याप्रीत्यर्थ दौरा काढून त्यांचीं सुखदुःखें समजावून घ्यावयाचीं. सन १९२७ सालीं झालेल्या बडोद्यांतील जलप्रलयामध्यें हजारों लोक घरें पडल्यामुळें निराश्रित व निराधार झाले असतां त्यांनीं खासगींतून लाख रुपयांची देणगी देऊन व दिवाणाकडून फंड वगैरे उभारून आपद्ग्रस्तांना मदत करण्याची सोय करण्यांत तत्परता दर्शविली. या व इतर कित्येक प्रकारांवरून त्यांचें प्रजावात्सल्य व कळकळ हीं स्पष्टपणें दृग्गोचर होत आहेत.

विद्वान, साहित्यभक्त यांचा अयाचित सत्कार करून उच्च साहित्योपार्जन करणें हें नेहमींच डोळ्यांपुढें ध्येय. या ध्येयास अनुसरून त्यांनीं सर रविंद्रनाथ टागोर, जगदीशचंद्र बोस, सर राधाकृष्णन्, कांटावाला, चिंतामणराव वैद्य, गंगनाथ झा, जयस्वाल, राधाकमल मुकर्जीसारख्या थोर विद्वानांचा सत्कार केला, व त्यांची व्याख्यानें करवून आपल्या प्रजाजनास त्यांच्या ज्ञानाचा लाभ करून दिला. हजारों पुस्तककर्त्यांनाहि आजपर्यंत त्यांनीं उत्तेजन दिलें आहे.

प्रजेला राजकीय हक्क देण्यासंबंधानेंहि उदासीनता नाहीं; पण दिलेल्या हक्काचा कितपत सदुपयोग होतो हें पाहण्याकडे जास्त भर. कोणत्याहि गोष्टींत घाई उपयोगी नाहीं, साधकबाधक विचार व पूर्ण खल झाल्याशिवाय पुढें पाऊल टाकावयाचें नाहीं, ही कार्यपद्धति.

कोणी म्हणतात ते फार लवकर विकारवश होतात. सर्वव्यापी उद्योगामुळें मनासारखें झालें नाहीं म्हणजे निराशेची भावना तोंडावरून प्रतिबिंबित व्हावी हें साहजिक. परंतु एखादी वाईट बातमी कानीं आली, कौटुंबिक आघात झाला तरी चेहऱ्यावर यत्किंचितहि खेदाची छटा नाहीं.

शांतपणानें सर्व दुःख गिळावयाचें. तसेंच वर्तमानपत्रांतून अवास्तव टीका आल्याचें कोणी सांगितल्यास 'बिचाऱ्याला काय कल्पना' अशा तऱ्हेचे उद्गार काढून स्वस्थ बसायचें. एकाद्या कामाला एक मनुष्य लायक आहे असें समजलें तरी त्याला दुसरेंच काम देऊन त्याचा बहुश्रुतपणा, ग्रहणशक्ति यांचा अजमास करावयाचा. हीच गोष्ट सुधारणांची. एक सुधारणा बरी आहेना, ठीक; परंतु दुसरी चांगली पाहिजेच ही वृत्ति. विषयाची किंवा कामाची सांगोपांग माहिती असणाराच त्यांच्याजवळ टिकेल, 'येरा गबाळाचें काम नोहे.' मोठमोठ्या अंमलदारांचीहि बऱ्याच वेळां त्यांच्यापुढें तिरपिट उडते असें म्हणतात.

प्लेटोच्या मतानें आदर्श राज्यपद्धति ( ideal government ) स्थापन करण्यास गुणसंपन्न व समर्थ माणसाच्या हातांत राज्यसूत्रें असलीं पाहिजेत. राज्यकारभार चालविण्यास समर्थ म्हणजे तत्त्ववेत्ता, बाकीचे असून नसून सारखेच व निरुपयोगी. तो म्हणतो कीं, 'खरा तत्त्ववेत्ता ज्ञानार्थी असतो; त्यास सर्व प्रकारचें ज्ञान संपादन करण्याची उत्कट इच्छा असते; त्याचें सामान्य लोकांप्रमाणें इंद्रियगम्य बाह्य वस्तूंच्या ज्ञानानें समाधान होत नाहीं; त्याचें तत्त्वाकडे लक्ष असतें. सत्य-असत्य, न्याय्य-अन्याय्य, बरेंवाईट, इत्यादिकांचें रहस्य ओळखून घेण्याकडे त्याची प्रवृत्ति असते; साधुत्वाचें मर्म ( idea of the good ) जाणण्याची त्यास मनस्वीं इच्छा असते. तो प्रशांत, उदारमनस्क, थोर मनाचा असून त्याची स्मरणशक्ति दांडगी असते. अशा माणसाचे हातांत राजसत्ता दिल्यास तो एकटाच उत्तम व कार्यक्षम राज्यपद्धति स्थापन करूं शकेल.' श्रीमंत सयाजीराव महाराजांच्या अंगीं प्लेटोच्या 'तत्त्ववेत्त्या' चे सर्व गुण तंतोतंत उतरले आहेत किंवा नाहींत, हें आजतागायतच्या त्यांच्या कारकीर्दीचें सिंहावलोकनावरून दिसून येईल. राज्यसूत्रें हातांत दिल्यावर प्लेटोच्या तत्त्ववेत्त्याप्रमाणें आश्चर्यकारक व मतिगुंग होण्यासारखी कार्यक्षमता राज्यशकट हांकतांना त्यांनीं प्रकट केली, हें कोणीहि कबूल करील. राज्यकर्त्यानें मंत्री, सेनाध्यक्ष, अमात्य, वगैरे अधिकारी नेमतांना व निवडतांना भिन्नभिन्न परिस्थितींत भिन्नभिन्न प्रकारांनीं त्यांना कसोटीस लावून, कडक परीक्षेंत ज्यांचे देशाभिमान, निश्चय, धैर्य, स्वामिभक्ति इत्यादि सद्गुण अचल राहतील अशांनांच निरनिराळ्या अधिकारांच्या जागांवर नेमावें असें कौटिल्याचें मत आहे. सयाजीरावांचा काल तर विद्वान्, अनुभवी, मुत्सद्दी, राजकार्यधुरंधर, अत्यंत

नाणावलेल्या व पुढारी म्हणून गाजलेल्या लोकांच्या सहवासांत गेलेला. त्यांच्या राज्यांतील मुख्य मुख्य अधिकाऱ्यांचीं नुसतीं नांवें पाहिलीं तरी त्यावरून महाराजांच्या चतुर राजनीतीची साक्ष पटण्याजोगी आहे. सर टी. माधवराव, श्रीनिवास राघव आयंगार, रमेशचंद्र दत्त, बिहारीलाल गुप्त, मि. सेडन, व्ही. पी. माधवराव इत्यादि हिंदुस्थानांतील नामांकित व राजधुरीण अशा पुरुषांच्या कर्तबगारीचा ठसा बडोद्याच्या कारभारावर उमटलेला आहे. सर टी. माधवराव व मि. इलियट हे तर आरंभीं महाराजांचे अध्यापक होते. मि. इलियट तर कैक वर्षे महाराजांचे विश्वासू सल्लागार होते. सर टी. माधवरावांनीं बडोद्याच्या राजवटींत त्यावेळचीं प्रसिद्ध, विद्वान्, नामांकित माणसें मुद्दाम बाहेरून आणविलीं. काजी शहाबुद्दीन, विनायक जनार्दन कीर्तने, डॉ. भालचंद्र कृष्ण भाटवडेकर, जनार्दन सखाराम गाडगीळ, पेस्तनजी जहांगीर वगैरे मंडळी त्यावेळीं बडोद्याच्या नोकरींत चमकत होती. महाराजांना राज्यकारभार मिळाल्यावर त्यांनीं हळुहळू स्वतःचीं माणसें तयार करण्याचा क्रम सुरू केला. वासुदेव महादेव समर्थ, यशवंत वासुदेव आठल्ये, जयसिंगराव आंगरे, केरशास्पजी रस्तुमजी, अंबालाल साकरलाल, वासुदेव गोपाळ भांडारकर, विनायक महादेव पंडित, गुणाजीराव राजबा निंबाळकर, मनुभाई नंदशंकर मेहता वगैरे मंडळींनीं महाराजांच्या हाताखालीं काम करून फार मोठा नांवलौकिक संपादन केला. अशा प्रकारची योग्य मंडळी राज्यकारभारांत आणणें यांतच राज्यकर्त्याचें खरें कौशल्य आहे, व सध्यांहि अनेक होतकरू मंडळींस विलायतेस पाठवून शिक्षण व संधि देऊन त्यांनीं जबाबदारीच्या जागीं काम करण्यास तयार केलें आहे. हा उपक्रम अखंड चालू आहे. वरील लहान थोर मंडळींशीं नानाप्रकारच्या प्रश्नांचे खल करून राज्यकारभार करण्यांत महाराजांचा पुष्कळसा काळ गेल्यामुळें आणि त्यांतच स्वतःच्या वाचनाची, दीर्घ व्यासंगाची, व जगभर प्रवास करून मिळविलेल्या ज्ञानाची भर पडल्यामुळें महाराजांची योग्यता इतकी वाढली आहे कीं, त्यांच्याइतका अष्टपैलु, सर्वसंग्रही मुत्सद्दी, साहित्यदेवतेचा मुकुटमणि हिंदुस्थानांत तर अगदींच विरळा; फार काय मोठमोठे युरोपियन मुत्सद्दीहि त्यांच्या पासंगाला देखील पुरणार नाहींत. निसर्गतःच भिन्न असलेल्या श्री आणि सरस्वति या दोहोंचा अनुपमेय संगम त्यांचे ठिकाणीं झाला असल्यानें त्यांची सर्वत्र पूजा होत असल्यास नवल काय ?

महाराजांची दिनचर्या देणें अगत्याचें आहे.ती साधारणतः खालीलप्रमाणें:—

| | | |
|---|---|---|
| सकाळीं | ६ | निजून उठणें. |
| ,, | ७ | पर्यंत प्रातर्विधि, स्नान, पूजा, गोप्रदान, नंतर ब्रेडस, केळीं व कॉफी पान. |
| ,, | ७–८॥ | घोड्यावर अगर गाडींतून फिरणें. कांहीं कामांची पाहणी. |
| ,, | ८॥-१०॥ | वर्तमानपत्रें वाचणें, विशिष्ट ऑफिसरांच्या भेटी. |
| ,, | ११–१२ | टपाल, जेवण, विश्रांति. |
| ,, | १–४ | राज्यकारभाराचें काम.* |
| ,, | ४–५ | चहा व मासिकें चाळणें. |
| ,, | ५–७ | टेनिस, मोटरींतून फिरणें. |
| ,, | ७॥–८ | भोजन. |
| ,, | ८–९ | बिलियर्ड, ब्रिज. |
| ,, | ९–११ | उपयुक्त विषयावरील वाचन. |
| ,, | ११ | च्या पुढें झोंप. |

'सदेवपणाचें लक्षण, रिकामा जाऊं नेदी क्षण' या तत्त्वानुसार राहणी, उच्च व तात्विक विचारसरणी, पाश्चात्य व पौर्वात्य ग्रंथांचें परिशीलन व राज्यकारभार हाच महाराजांचा नित्यक्रम होय.

तत्त्वज्ञान व नीतिशास्त्र हे महाराजांचे दोन आवडीचे विषय आहेत. यांवरील नवे नवे ग्रंथ ते नेहमीं वाचीत असतात. इतिहास हा त्यांचा आरंभापासूनचा अत्यंत प्रिय विषय व गिबन हा आवडता ग्रंथकार. 'रोमचा उत्कर्ष व नाश' या ग्रंथाची महाराजांनीं स्वतः टिपणें काढून त्यांचें भाषांतरहि राजारामशास्त्री भागवत यांच्याकडून करविलें आहे. तुकाराम हा त्यांचा आवडता कवि असून त्यांनीं त्याच्या गाथ्याचें अनेकवार पारायण केलें आहे. काव्यनाटकाचा महाराजांना दृढ परिचय असून त्यांनीं अनेक ग्रंथांचें मार्मिक परिशीलन केलें आहे. 'पाश्चात्य देशांतील तुलनात्मक ( Comparative ) व गुणदोषविवेचकबुद्धि ( Critical faculty ) स्वीकारून' भाषेचें व निरनिराळ्या विषयांचें अध्ययन कर-

* हल्लीं श्री. महाराजसाहेब सकाळीं १० ते १ पर्यंत राज्यकारभाराचें काम पाहातात व भोजनोत्तर विश्रांति घेतात.

ण्यानें महाराजांच्या आचारांविचारांमध्यें पाश्चात्य व पौर्वात्य संस्कृतींचा गोड व सुंदर मिलाफ झालेला कोणासहि आढळून येईल.

**ध्येयवाद**—महाराजांच्या कोणत्याहि सुधारणेकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां त्यामध्यें कोणतें ना कोणतें तरी ध्येय असल्याचें आढळून येईल. मग तें सामाजिक, धार्मिक, राजकीय किंवा कोणत्याहि स्वरूपाचें असो. महाराजांनीं आपल्या मनश्चक्षूपुढें संकुचित ध्येय केव्हांहि ठेविलें नाहीं. स्वतः पुरतें किंवा आपल्या संस्थानापुरतेंच पाहाण्याचा त्यांचा दृष्टिकोन नसून अखिल हिंदुस्थानचें किंबहुना आपल्या सर्व देशबांधवांचें कल्याण जेणेंकरून होईल त्यासाठीं अहर्निश झटत असावयाचें, हेंच महाराजांचें सर्वव्यापी उदात्त अंतिम ध्येय आहे. एकाच व्यक्तीनें, एकाच जातीनें, एकाच राष्ट्रानें हें कार्य करावयाचें नसून, सर्वांनीं प्रयत्न केल्यास सर्वांचीच उन्नति होणें सुसाध्य आहे. स्वातंत्र्याचा व सत्तेचा उपयोग मानवी जातीच्या कल्याणार्थ केला पाहिजे. उन्नतीची मदार नशीब किंवा दैवयोग यावर नसून ती खास पुरुषार्थावर आहे. ‘पुष्कळांचें पुष्कळ हित’ करणें एकाद्या राजास—व्यक्तीस शक्य असलें ( आणि महाराजांनीं आपल्या उदाहरणानें हें सिद्ध केलें आहे ) तरी ‘सर्वभूतहितरतत्त्व’ हेंच सर्वांचें अंतिम ध्येय असलें पाहिजे, ही महाराजांची तात्त्विक शिकवण आहे. महाराजांचीं निरनिराळ्या प्रसंगींचीं भाषणें म्हणजे भिन्नभिन्न संस्कृतींचा तुलनात्मक अभ्यास करून व त्यांतील तत्त्वज्ञानाचें मंथन करून काढलेलें नवनीतच होय. महाराजांचीं इंग्रजी, मराठी गुजराथी या भाषांत विविध विषयांवर झालेलीं भाषणें प्रसिद्ध झालेलीं आहेत. याखेरीज त्यांनीं वेळोवेळीं काढलेले हुकूम ( हुजूर आर्डर्स ) हे अनेक विषयांतील त्यांची सूक्ष्म दृष्टि, मार्मिकता, व विवेचक बुद्धि यांची चांगली साक्ष पटवितात, व ते जर प्रसिद्ध होतील तर जनतेस फारच उद्बोधक होतील. तसेंच त्यांनीं आपल्या मित्रांस, विशेषतः मोठमोठ्या इंग्रज अधिकाऱ्यांस लिहिलेलीं पत्रेंहि अत्यंत महत्त्वाचीं असून त्यांची तीक्ष्ण बुद्धि, अनेक विषयांचा खोल अभ्यास, व विचक्षणता यांची द्योतक आहेत. हींहि पुढें मागें प्रसिद्ध झाल्यास वाचकांस एक अत्यंत महत्त्वाचें वाङ्मय पहावयास मिळेल अशी खात्री आहे.

उच्च—नीच, स्पृश्य—अस्पृश्य, गरीबश्रीमंत, काळागोरा असा कोणताहि भेद महाराजाजवळ नाहीं. आपल्या देशबांधवांच्या उन्नतीसाठीं तळमळणारा महाराजांचा आत्मा जनता जनार्दनाशीं जणों एकरूपच होऊन अखिल मानव-

जातीच्या आध्यात्मिक व आधिभौतिक उन्नतीसाठीं आपलें अंतस्तेज प्रकट करीत असलेला सर्वांस दिसत आहे. आपापसांतील द्वेषभाव नष्ट व्हावा, सर्वांच्या हृदयांत ज्ञानाची ज्योत प्रज्वलित व्हावी, वसुधातलावर एका कुटुंबाप्रमाणें एकोपा नांदावा, व्यक्तिस्वातंत्र्यास वाव मिळून ‘ एकमेकां साह्य करूं, अवघे तरूं ’ अशी वृत्ति निर्माण व्हावी, थोडक्यांत म्हणजे ideal of human unity or humanism हेंच ध्येय महाराजांच्या मनांवर पूर्णपणें ठसलें असून ते जनतेसहि याच मार्गाची ओळख करून देत आहेत. ते म्हणतात, ‘ आपली नीति व अंतःकरण चांगलें ठेवा. बाह्य वर्तनावर तसेंच डामडौलावर विश्वास ठेवूं नका. यांतच खरा ज्ञानाचा उपयोग आहे. सर्वांनीं आपल्या देशबांधवांच्या कल्याणाकरितां प्रयत्न करावेत. ते सर्व आपलेच बंधू आहेत, असें मानावें व सर्वांवर दया करावी. मनुष्यमात्र एक आहे अशाप्रकारची भावना सगळ्यांची व्हावी. हें अंतिम साध्य होय. ’ महाराजांची शिकवण बुद्धीस पटणारी व विचारशक्तीस किती चालना देणारी आहे याची वरील उतारा उत्तम रीतीनें साक्ष पटवितो.

महाराजांना हिंदवी संस्कृतीबद्दल अतिशय अभिमान असून कोणतीहि गोष्ट तीस नाशक न होतां पोषकच व्हावी अशी त्यांची उत्कट इच्छा आहे. हिंदुस्थानचा उदय औद्योगिक व आर्थिक भरभराटीवर अवलंबून असल्याकारणानें शास्त्रीय ( Scientific ) ज्ञानाच्या प्रसाराची अत्यंत अवश्यकता त्यांनीं प्रतिपादन केली आहे. हिंदुस्थानचा उद्धार होणार तो औद्योगिक व शास्त्रीय उन्नतीनेंच होणार.

सारांश, ईश्वराचें ज्ञान जगभर पसरावें व त्याचें प्रत्यक्ष दर्शन आपल्या देशबांधवांनीं आधीं स्वतः करून घ्यावें, हें जनतेस पटवून देण्यासाठींच महाराजांचा अवतार होय. हें काम त्यांनीं कितपत पार पाडलें आहे हें पाहण्याचें काम वाचकांवर सोंपवून व महाराजांस चिरायुरारोग्य चिंतून येथें तूर्त थांबणें बरें.

**तेनार्थवान् लोभपराङ्मुखेन ।**
**तेन घ्नता विघ्नभयं क्रियावान् ॥**
**तेनासलोकः पितृमान् विनेत्रा ।**
**तेनेव शोकापनुदेन पुत्री * ॥ १ ॥**

* रघुवंश १३–२३.

# संदर्भ ग्रंथ


1 Ruler of Baroda — Philip Seargent.

2 Life of Sayajirao III Vols. 2. — Stanley Rice.

3 Speeches and Addresses of H. H. The Maharaja Gaekwar of Baroda Vol. 2 — Prof. Widgery.

४ सयाजी चरितामृत — श्रीरामशर्मा.

५ श्रीमंत सयाजीराव महाराज यांचें चरित्र. — का. ना. गोत्री.

६ श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांचीं भाषणें ( मराठी व गुजराती )

7 Administration Report 1930-31

8 Gazeteer of Baroda. Vols. 2

# श्रीमंत सौभाग्यवती मा. महाराणी चिमणाबाई गायकवाड

( लेखक:—प्रो. सदाशिव विनायक देशपांडे एम्. ए., बडोदें )

बालविवाहप्रतिबंधक कायदा, हिंदु विधवांच्या वारसाहक्काचा कायदा, विषमवयोविवाहप्रतिबंधक कायदा इत्यादि अनेक सुधारणांमुळें बडोदें संस्थानचें नांव आज सर्वतोमुखीं झालें आहे. त्याचें श्रेय संस्थानच्या लोकांना, संस्थानच्या कायदेमंडळाला, श्रीमंत सरकार महाराज साहेबांना जितकें आहे तितकेंच तें श्रीमंत सौ. महाराणीसाहेबांनाहि आहे. स्त्रियांचें सामाजिक जीवन सुधरावें, त्या सुसंस्कृत व्हाव्यात, त्यांना उत्तम शिक्षण मिळावें, त्यांची कुटुंबांत व समाजांत प्रतिष्ठा वाढावी, आणि त्यायोगें हिंदुसमाजाचें चित्र रमणीय व्हावें ही त्यांची अंत:करणाची उत्कट इच्छा. आपल्या प्रजेबद्दल स्वप्रजेइतकेंच त्यांना प्रेम आहे, व त्यामुळेंच प्रजेच्या कोणच्याहि सुधारणेच्या त्या नेहमींच प्रेरक असतात.

श्रीमंत सौ. मा. महाराणीसाहेब ह्या श्रीमंत महाराजांचें द्वितीय कुटुंब. श्रीमंतांचें प्रथम कुटुंब विवाहानंतर लवकरच अल्पवयांत निवर्तले व श्रीमंतांचा हल्लींच्या राणीसाहेबांशीं विवाह झाला ( ता. २८-१२-१८८५ ). राणी-साहेबांचें माहेरचें नांव गजराबाई. त्यांच्या वडिलांचें नांव बाजीराव अमृतराव ( मामासाहेब ) घाटगे सर्जेराव व आईचें नांव काशीबाई. मामासाहेब हे घोडनदी तालुक्यांतील सुखवस्तु इनामदार. त्यांचें घराणें शिवाजीमहाराजांचे वेळेपासून मराठे मंडळींत प्रमुख होतें. बाजीराव मामासाहेब यांच्या बहिणीचें लग्न देवास धाकटीपातीचे राजे बापूसाहेब महाराज पवार यांजबरोबर झालें. त्या निमित्तानें बाजीराव दक्षिणेंतून देवासला आले. बाजीरावांचें कुटुंब काशीबाई या वाटार-नजीक नांदळज येथील पवार घराण्यांतील होत्या. त्या हुशार, कर्तृत्ववान् व संसार-दक्ष होत्या. बाजीरावांचा व यांचा संसार पुष्कळ वर्षे सुखाचा झाला. त्यांना एकंदर तेरा अपत्यें झालीं. चार पांच मुलगे व बाकीच्या मुली. मुलगे बहुतेक अल्पायुषी वारले. मुली मात्र चांगल्या ठिकाणीं पडून लौकिकवान झाल्या. हीं सर्वच मुलें देखणीं, गोरी व तरतरीत असून बोलण्याचालण्यांत रुआ-बदार आहेत.

विवाहानंतर श्रीमंत सौ. मा. महाराणीसाहेबांच्या नवीन व जबाबदारीच्या आयुष्यास सुरवात झाली. नव्या आयुष्याला साजेल, व राजाच्या राणीला शोभेल असा अभ्यासक्रम व चरित्रक्रम त्यांनीं सुरू केला. विशेषत: इंग्रेजी शिकण्याकडे त्यांनीं अवधान दिलें. तसेंच आजूबाजूच्या चालत्या व्यवहारा-

वरून व श्रीमंत महाराजसरकार यांचेबरोबर अनेक ठिकाणीं प्रवास करून चौकस बुद्धीनें व सूक्ष्म दृष्टीनें त्यांनीं अनेक प्रकारचें ज्ञान मिळविणेंस सुरवात केली व त्याचा प्रत्यक्ष उपयोग त्या आचरणांत करूं लागल्या. ह्याच काळांत त्यांना अपत्येंहि झालीं. त्यांच्या संगोपनाचीहि जबाबदारी त्यांचेवर पडली. शिवाय श्रीमंत महाराजाकडेहि त्यांना पाहणें असेंच. इतकें सर्व त्या आस्थेनें व प्रेमानें करीत. सर्व गोष्टींवर स्वतः देखरेख ठेवीत. महाराजांची स्वतः निगा राखीत. मुलांच्या संवर्धनाकडे स्वतः पाहत. स्वाभाविकच त्याचा गोड परिणाम झाला. श्री. सौ. मा. महाराणींना एकंदर तीन मुलें व एक मुलगी अशीं चार अपत्यें झालीं. मुलगी श्री. इंदिराराजा म्हणजे कुचबिहारच्या महाराणीसाहेब. मुलांपैकीं फक्त श्रीमंत धैर्यशीलराव हेच एकटे हयात आहेत.

श्रीमंत सौ. महाराणीसाहेब यांचा वर्ण गोरा, चेहरा रुंद व वाटोळा, कपाळपट्टी, विस्तृत व रुआबदार, नाक बांधेसूद अशी असल्यामुळें त्यांचा चेहरा सुंदर व हुकमत गाजविणारा दिसतो. त्या मराठी, गुजराती, हिंदी व इंग्रेजी सफाईनें बोलतात. अलीकडे त्या फ्रेंच भाषाहि शिकल्या आहेत. त्यांच्या बोलण्यांत तेज आहे व ऐकणारांवर त्याची चटकन छाप पडते.

शिक्षणाच्या व विशेषतः स्त्रीशिक्षणाच्या त्या फार प्रेमी आहेत. हिंदी समाजाची सद्यःस्थिति सुधारण्यास शिक्षणप्रसार हा एक रामबाण उपाय आहे असें त्यांचें मत असून शिक्षणप्रसारार्थ झटणाऱ्या अनेक संस्थांस त्यांनीं आजवर सढळ हातानें मदत केली आहे. लोकोपयोगी कोठलेंहि कार्य असो, त्यास श्री. सौ. मा. महाराणीसाहेबांची सक्रिय सहानुभूति मिळाली नाहीं असा आजवर तरी प्रकार घडलेला नाहीं. आज कित्येक वर्षांपासून आपल्या हातखर्चांतून त्या दरमहा दोनशें रुपये शिष्यवृत्त्यांसाठीं खर्च करीत असून कॉलेजांत शिकणाऱ्या विद्यार्थीनींना शिष्यवृत्त्या देणासाठीं त्यांनीं एक लक्ष रुपयांचा एक स्वतंत्र निधि स्थापिला आहे. त्यांच्या नांवाशीं संलग्न असलेल्या अशा बडोद्यांत अनेक संस्था आहेत. त्यापैकीं चार संस्था प्रमुख होत. ( १ ) महाराणी चिमणाबाई महिला पाठशाळा, ( २ ) महाराणी चिमणाबाई हायस्कूल, ( ३ ) महाराणी चिमणाबाई स्त्री–उद्योगालय व ( ४ ) महाराणी चिमणाबाई मॅटर्निटी व चाइल्ड वेल्फेअर लीग. पहिली संस्था पुण्याच्या अखिल भारतीय महिला विद्यापीठास जोडलेलें स्त्रियांचें कॉलेज असून त्याची इतरत्र माहिती दिली आहे. दुसरें मुलांचें हायस्कुल आहे. श्री. महाराणी चिमणाबाई स्त्रीउद्योगालयांत स्त्रियांना शिवणकाम, भरतकाम व दुसरीं कलाकुसरीचीं आणि स्त्रियांना झेंपतील अशीं कामें शिकविण्यांत येतात. या उद्योगा-

लयांत शिकून तयार झालेल्या कित्येक स्त्रिया आज स्वतःच्या चरितार्थ स्वतंत्र रीतीनें चालवीत आहेत. चवथ्या संस्थेची उपयुक्तता तिच्या नांवावरूनच पटण्यासारखी आहे. या सर्व संस्था दिवसेंदिवस भरभराटत आहेत ही आनंदाची गोष्ट होय.

स्त्रियांचें स्वतंत्र कॉलेज काढणेंची श्री. सौ. मा. महाराणींना प्रथमपासूनच हौस होती. स्त्रियांचा अभ्यासक्रम पुरुषी वळणावर न जातां, किंवा तो पुरुषांच्या बरोबरच केवळ न ठेवतां स्त्रियांना उपयुक्त व भूषणावह असावा, त्यांची स्वतंत्ररीत्या शारीरिक व मानसिक वाढ करण्यास सुलभ व सोयीचा असावा, ही त्यांची नेहमींची इच्छा. सन १९२७ सालीं पुणें येथें भरलेल्या अखिल भारतीय महिला परिषदेच्या अध्यक्ष या नात्यानें केलेल्या आपल्या अनेक विचारपरिप्लुत अशा भाषणांत त्या म्हणतात, "स्त्रीजातीच्या मोहकत्वास कारण होणाऱ्या उत्कृष्ट मनोवृत्ति, देहविकास व बुद्धिविकास यांचा उत्कर्ष व्हावा म्हणूनहि स्त्रियांचें शिक्षण निरनिराळेंच झालें पाहिजे. शिक्षणानें स्त्रियांच्या विशिष्ट गुणधर्मांचा विकासहि केला पाहिजे व त्याबरोबरच सामान्य संस्कृति ग्रहण करण्याची पात्रताहि त्यांच्या अंगीं आणली पाहिजे. यासाठीं मुली व स्त्रिया यांच्यासाठीं खास निराळया शाळा व कॉलेजें पाहिजेत हें उघड आहे. मुलींना आरोग्यशास्त्र, प्रपंचशास्त्र, बालसंगोपन, सौंदर्याभिज्ञानशास्त्र, गायनवादन व चित्रकला यांचें शिक्षण दिलें पाहिजे." अशा पद्धतीचें शिक्षण स्वतंत्र रीतीनें देण्याचा अवसर भारवर्षीय महिला विद्यापीठांतच आहे, हें जाणून तत्पूर्वींच इ. स. १९२३ मध्यें त्या विद्यापीठाशीं संलग्न असें एक स्त्रियांचें कॉलेज काढण्यास श्री. सौ. मा. महाराणींनीं येथील कांहीं प्रतिष्ठित लोकांना प्रोत्साहन दिलें व त्याप्रमाणें त्यांनीं कॉलेज काढून आज दहा वर्षे झालीं. सदर संस्थेंत दिवसानुदिवस अधिकाधिक विद्यार्थिनी शिक्षण घेत आहेत.

शिक्षणाइतकीच सामाजिक सुधारणांची श्री. सौ. मा. महाराणींना आवड आहे व त्याचाच परिणाम म्हणजे आरंभीं निर्देशिलेले बालविवाहप्रतिबंधक, विषमवयोविवाहप्रतिबंधक इ. कायदे. सार्वजनिक कार्यक्रमांत भाग घेणेंची श्रीमंत सौ. महाराणींची नेहमीं तयारी असते. कोणत्याहि समारंभाला त्या मोठ्या अगत्यानें येतात. सारांश, त्यांचे ठिकाणीं राज्ञीचें तेज आहे, तसेंच कुलीन प्रेमळपणाहि आहे.

श्रीमंत महाराजावर त्यांचें अकृत्रिम प्रेम आहे, व श्रीमंतांचीहि त्यांचेवर निरतिशय निष्ठा आहे. अशा या अन्योन्य प्रेमळ राजदंपतीस ईश्वर आयुरारोग्य देवो.

# श्रीसयाजीगौरवग्रंथ

## भाग दुसरा

## महाराजांचा गुणगौरव.

### श्री. महाराजसाहेबांची विद्याभिरुचि.

( लेखकः—श्रीयुत **चिंतामण विनायक वैद्य**, एम्. ए., एल्एल्. बी.
कुलगुरु, टिळक विद्यापीठ, पुणें, व अध्यक्ष, भारत इतिहास
संशोधक मंडळ, पुणें. )

श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या अनेक सद्गुणांमध्यें त्यांची विद्याभिरुचि हा सद्गुण त्यांच्या यशोमंदिराच्या कळसाप्रमाणें शोभतो. तो सुवर्णमय तेजस्वी असून दुरूनहि दिसतो. सयाजीराव स्वतः विद्यासंपन्न आहेत, इतकेंच नव्हे तर आपली सर्व प्रजा विद्यासंपन्न व्हावी अशी त्यांची कळकळीची इच्छा आहे. सर्व महाराष्ट्रांतील व गुजराथेंतील जनतेस विद्यासंपन्न करणेंसाठीं त्यांनीं अनेक महत्वाच्या विषयांवर मराठींत व गुजराथींत ग्रंथ प्रसिद्ध करण्याची व्यवस्था केली आहे. ह्याप्रमाणें ते स्वतः विद्यासंपन्न असून विद्याव्यासंगी आहेत व या उत्तरवयांतहि ते अविश्रांत विद्यार्जन करितात. विद्वान लोकांचीहि ओळख करून घेऊन त्यांस द्रव्यसाहाय्य करतात; ग्रंथसंपादनास प्रोत्साहन देतात; आणि अनेक रीतींनें प्रजेस साक्षर करण्याची खटपट करितात. अशा त्यांच्या उज्वल चरित्राकडे पाहिलें म्हणजे मध्ययुगीन कालांतील धारच्या परमारवंशी **मुंज** व **भोज**, त्याचप्रमाणें कनोजच्या प्रतिहारवंशी **भोज** व **महेंद्रपाल**, अशा विद्वान व विद्याप्रेमी कीर्तिमान् राजांची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. भोजाच्या दरबारांत अनेक विद्वानांची संभावना होत असे. त्या दरबाराची आठवण बडोदें येथें केवळ विद्वानांच्या

संभावनेसाठीं भरलेल्या दरबारांत झाल्याशिवाय रहात नाहीं. " विद्वानेव हि जानाति विद्वज्जनपरिश्रमम् । न हि...वंध्या विजानीते गुर्वीं प्रसववेदनाम् " या उक्तीप्रमाणें श्रीमंत सयाजीराव महाराज स्वत: विद्वान आहेत व विद्यार्जनाचा परिश्रम करणारे आहेत, म्हणूनच त्यांस विद्वानांची चहा आहे.

श्रीमंत सयाजीराव स्वत: विद्वान असून शिवाय आयुष्यभर विद्यार्जनाचा व्यासंग करणारे आहेत. हा त्यांचा सद्गुण केवळ ईश्वरदत्त आहे, हें सांगितलें पाहिजे. ज्या कुळांत त्यांचा जन्म झाला त्या कुळांत विद्येची परंपरा नव्हती हें प्रसिद्धच आहे. तसेंच लहान वयांत बडोद्याच्या गादीवर आल्यावर एकंदर परिस्थिति विशेष अनुकूल होती असेंहि म्हणतां येत नाहीं. राजकुलांमध्यें शिक्षण देणारे उत्तम गुरुजी अनेक ठिकाणीं मिळतात आणि राजपुत्रांस विद्यासंपन्न करण्याचा प्रयत्न सर्वच ठिकाणीं होतो; परंतु राजेलोकांत सयाजी महाराजांच्या विद्वत्तेप्रमाणें व विद्याप्रियतेप्रमाणें विद्वत्ता किंवा विद्याप्रियता सांपडणें फारच कठीण आहे. श्रीमंत सयाजीराव महाराजांस लहानपणीं चांगले गुरु लाभले ही गोष्ट निर्विवाद आहे. राजकारणांत सर टी. माधवरावासारखे व इंग्रजी विद्याशिक्षणांत इलियटसारखे त्यांस नामांकित शिक्षक मिळाले हें खरें, पण गुरु कितीहि चांगला असला तरी शिष्याचे निसर्गदत्त बुद्धिवैभव हेंच त्याच्या विद्वत्तेचें साधन असतें. " वितरति गुरु: प्राज्ञे विद्याम् " इत्यादि श्लोकांत सांगितल्याप्रमाणें विद्यार्थ्याची नैसर्गिक बुद्धिसंपत्ति हीच मुख्य आहे. व आरशांत जसें तेजाचें प्रतिबिंब पडतें, त्याचप्रमाणें बुद्धिवान् विद्यार्थ्यांतच गुरूची विद्या प्रतिबिंबित होऊन उज्वल दिसतें. पण याहीपेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे, कॉलेजांतील शिक्षण संपल्यावर बहुतेक विद्यार्थी अधिगत विद्या विसरतात, मग विद्येच्या वाढीची गोष्टच नको. शिक्षणकाल संपल्यानंतर आजन्म विद्याव्यासंग चालविणें हें केवळ ईश्वरदत्त स्वभावावर अवलंबून आहे. विद्याभिरुचि खरी कळकळीची, नैसर्गिक असल्याशिवाय विद्याव्यांसग रहात नाहीं, हें आपण सर्व प्रकारच्या लोकांत पहातों. आणि त्यांतच राज्याधिकार आणि राज्यलक्ष्मी प्राप्त झाल्यावर विद्याव्यासंग चालविणें हें अत्यंत दुरापास्त आहे. असें उदाहरण हल्लींच्या काळांत केवळ श्रीमंत सयाजीराव महाराजांचेंच आहे, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

राज्यलक्ष्मी व विद्याव्यासंग ह्यांचा अनेक ठिकाणीं विरोध दिसतो. ह्यावरून लक्ष्मी आणि सरस्वती यांचें भांडण आहे अशी कवींनीं

कल्पना केलेली आहे. पण सूक्ष्म विचार केला असतां असें भांडण असण्याचें कारण नाहीं. लक्ष्मी विष्णूची पत्नी, आणि सरस्वती गणपतीची पत्नी, तेव्हां त्यांनीं कां भांडावें तें समजत नाहीं. शिवाय त्या दोघींचें क्षेत्रहि एक नाहीं. तसेंच गणपती हा विष्णूचाच अवतार असून लक्ष्मी आणि सरस्वती एकच मानावयास हरकत नाहीं. प्रत्यक्ष व्यवहाराचा विचार केला तरी लक्ष्मीच्या मदतीशिवाय सरस्वतीची भरभराट होत नाहीं. त्याचप्रमाणें सरस्वतीच्या मदतीशिवाय लक्ष्मीचेंहि ऐश्वर्य वाढणार नाहीं. ज्ञानाच्या साहाय्यानें पाश्चात्यदेश भरभराटीस आले आहेत, हें आपण प्रत्यक्ष पहातों. तेव्हां लक्ष्मी आणि सरस्वती यांचा विरोध नसून त्यांचें एकमेकांस अत्यंत साहाय्य आहे, असेंच सिद्ध होतें.

लक्ष्मी आणि सरस्वती यांचा खरोखर विरोध नाहीं ही गोष्ट व्यवहाराच्या दृष्टीशिवाय इतिहासावरूनहि सिद्ध करतां येईल. अलौकिक बुद्धिमत्तेचे व विद्याव्यासंगाचे पुरुष गरिबांतहि उत्पन्न होतात व श्रीमंतांतहि उत्पन्न होतात. असे पुरुष ज्यास "जीनियस" अशी इंग्रजींत संज्ञा देतां येईल, केवळ ईश्वराच्या इच्छेनें सर्व परिस्थितींत व लोकांत उत्पन्न होतात. राजघराण्यांत व गरिब घराण्यांतहि उत्पन्न होतात. पण त्यांचे प्रमाण सर्वत्र सारखें दिसणार नाहीं, आणि गरीब स्थितींत अधिक उत्पन्न होतात असेंहि म्हणतां येणार नाहीं. गरीब स्थितींत जसे अनेक प्रतिभावान ग्रंथकर्ते उत्पन्न झाले आहेत तसें राजघराण्यांतहि उत्पन्न झालेले आहेत. मध्ययुगीन भारताच्या इतिहासांत कित्येक प्रसिद्ध राजे विद्वान व ग्रंथकर्ते झाले आहेत. उदाहरणार्थ कल्याणचे चालुक्य घराण्यांत **विक्रमादित्य** व त्याचा पुत्र **सोमेश्वर** हे विद्वान असून सोमेश्वराचा मानसोल्हास ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें ठाण्याचे शिलाहार राजांचेपैकीं **अपरादित्य** यानें लिहिलेला अपराक नांवाचा हिंदुधर्मावरील ग्रंथ काश्मीरांतहि हल्लीं चालतो. तेव्हां मध्ययुगीन कालांत राजवंशांतहि कित्येक विद्वान राजे झाल्याची साक्ष इतिहास देतो. अर्थात लक्ष्मीचे व सरस्वतीचें वैर आहे ही कल्पना निर्मूल होय. हिंदुस्थानच्या पडत्या काळांत लक्ष्मीचा आणि सरस्वतीचा विरोध दिसला तरी हल्लींच्या प्रगतिपर कालांत हा विरोध नाहींसा होऊन जे कित्येक विद्वान राजे आपल्यास दिसत आहेत त्यांत श्रीमंत सयाजीराव महाराज ईश्वरदत्त बुद्धिमत्तेनें व विद्याव्यासंगाच्या चिकाटीनें अग्रणी आहेत ह्यांत संशय नाहीं.

अशा दृष्टीनें विचार करतां श्रीसयाजीमहाराजांच्या नैसर्गिक बुद्धिमत्तेस आणि विद्याव्यासंगाच्या इच्छेस राज्यलक्ष्मीची जोड मिळाली हें सुदैव होय. ह्या लक्ष्मीच्या साहाय्यानें त्यांच्यांतील अलौकिक सद्गुणास उत्तम वाव मिळाला. तसा न मिळता तर हे सद्गुण अज्ञातवासांत राहून कदाचित् कोमेजून गेले असते. महाराष्ट्राच्या व बडोदें राज्याच्या सद्भाग्यानें श्रीमंत सयाजीरावमहाराज हे राज्यारूढ होऊन त्यांनीं लक्ष्मीच्या साहाय्यानें आपली विद्वत्ता वाढविली व विद्याव्यासंग चालू ठेवला, इतकेंच नव्हे तर महाराष्ट्राच्या व गुजराथच्या लोकांत ज्ञानाचा प्रसार होणेंसाठीं आपल्या राज्यलक्ष्मीचा मनःपूर्वक हौसेनें चांगला उपयोग केला. याबद्दल महाराष्ट्र व बडोदें राज्य श्रीसयाजीराव महाराजांची प्रेमानें व कृतज्ञतेनें नेहमीं आठवण ठेवील.

महाराजांची विद्याभिरुचि व ज्ञानप्रसारलालसा तृप्त होण्यास त्यांनीं या दोन्हीं बाबतींत आजपर्यंत काय काय केलें याचें वर्णन या लेखांत करावयाचें आहे. हें काम थोडक्यांत त्यांनीं नुकत्याच झालेल्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष पदावरून जें मननीय विद्वत्तापूर्ण भाषण केलें त्यांत सांगितलें असून त्यांतील उतारे येथें प्रथम देण्यासारखे आहेत.

" बाल्यावस्थेपासून आम्हीं शक्य तितक्या प्रकारांनीं पुस्तकांना व त्यांच्या कर्त्यांना उत्तेजन देऊन मराठी व गुजराती वाङ्मयांची जी अल्प सेवा केली आहे तिच्या योगानें हा मान आम्हांस मिळत आहे. ( २ ) ज्या वाक्यांत सत्य, सौंदर्य आणि हित यांचें अधिष्ठान आहे, त्यांचाच संग्रह समाज आपल्या स्मृतींत करीत असतो. ( ३ ) भावनात्मक, सौंदर्यप्रधान अशा ललितवाङ्मयास आपण साहित्य हा शब्द लावतों, परंतु वाङ्मयाच्या अललित व ललित या दोन्ही शाखांचें आम्हांस सारखेंच अगत्य वाटतें. ( ४ ) मराठी, गुजराती व हिंदी वाङ्मयांच्या सर्व प्रकारच्या वाढीकडे गेलीं पन्नास वर्षे आम्हीं हितैषी निरीक्षक या नात्यानें पहातच नव्हे तर शक्य ती मदतहि करित आलों आहों. ( ५ ) आम्हीं आपल्यापुढें वाङ्मयाचे अभ्यासक व हितचिंतक म्हणून आलों आहों. ( ६ ) सक्तीचें प्राथमिक शिक्षण, व दिलेलें शिक्षण विसरून जाऊं नये म्हणून ग्रामपुस्तकालयांची स्थापना हे प्रथम यत्न झाले. ( ७ ) राष्ट्रकथामाला, ज्ञानमजूंषा, महाराष्ट्रग्रंथमाला वगैरे पुस्तकमाला काढण्यांत सुमारें अडीच लक्ष रुपये खर्च झाला, व १९१२ सालीं दोन लाखांचा निधि वेगळा

ठेवून त्याच्या व्याजांत ग्रंथप्रकाशनाची व्यवस्था झाली. ( ८ ) प्राचीन जनसमाजाचें खरें चित्र प्राकृत ग्रंथांच्या अभ्यासानेंच अधिक स्पष्ट करून येण्यासारखें असल्यानें जुन्या उपयुक्त प्राकृत पुस्तकांचीं कांहीं भाषांतरें आम्हीं करविलीं आहेत. ( ९ ) वाङ्मय समाजाचें चित्र असतें. ( १० ) कायमचें देशकल्याण प्रजेंतील बहुसंख्यांक वर्गाच्या प्रगतीवर अवलंबून आहे. चांगलें वाङ्मय समाजाची प्रवृत्ति बदलूं शकतें. ( ११ ) इटली देशाच्या स्वातंत्र्याची प्रभात माझिनीच्या चौघड्यानें गाजली, व महाराष्ट्रांतल्या वेड्यावांकड्या रूढींच्या विनाशकालाची सूचना केशवसुतानें आपल्या तुतारीनें दिली. ( १२ ) वाङ्मयलेखकांनीं लोकाराधनेकडे लक्ष न देतां राष्ट्रांत जोम, उत्साह उत्पन्न करून आत्मोन्नतीची प्रेरणा करणारेच लेख होतां होईल तितके लिहावे. ( १३ ) भाषा व लिपी एक असणें राष्ट्रीय ऐक्यास पोषक आहे, असें आमचें मत असल्यानें आमच्या राज्यांतील प्राथमिक शाळांतून हिंदीचा अभ्यास गेल्या वीस वर्षांपासून आम्हीं आवश्यक केला आहे. ( १४ ) महाराष्ट्र विद्यापीठ हें केवळ परीक्षा घेणारी कचेरी न होतां, सद्विचार व सद्‌भावनांच्या संस्कारासह कार्यक्षम व देशाभिमानी तरुण तयार करणारी जिवंत संस्था असावी."

वरील वक्तृत्वपूर्ण आणि अत्यंत खोल विचारग्रथित केलेले उतारे श्री. सयाजीराव महाराज यांची सुविद्यता आणि प्रजेस सुविद्य करण्याची कळकळ उत्तम रीतीनें व्यक्त करतात, ही गोष्ट वाचकांच्या ध्यानांत आल्याशिवाय रहाणार नाहीं.

श्रीमंत सयाजीराव गायकवाड हे १८७५ सालीं दत्तक घेतले गेले. त्यावेळेपासून त्यांच्या शिक्षणास सुरवात झाली. ज्याप्रमाणें सयाजी महाराज हे सुदैवानें उत्तम बुद्धीवान आहेत, त्याचप्रमाणें सुदैवानें त्यांस उत्तम शिक्षक लाभले. बरोबरच्या समवयस्क मंडळीसह त्यांचा क्लास सुरु झाला त्यावेळेस इलियट साहेबासारखे अध्यापक सामान्यशिक्षण व इंग्रजी शिक्षण देऊं लागले. मध्यम शिक्षणाचे विषय अशा क्लासांत त्यांना शिकविले गेले. यानंतर कांहीं वर्षांनीं सर टी. माधवराव दिवाण यांनीं त्यास राज्यव्यवस्थेच्या व राज्य चालविण्याच्या अनेक बाबींत लहान लहान व्याख्यानें दिलीं. हीं व्याख्यानें लेखी असून त्यांचा संग्रहहि केला गेला आहे. याप्रमाणें निरनिराळ्या विषयांची माहिती झाल्यानंतर सयाजी महाराजास १८८१ सालीं राज्याधिकार मिळाला. तरी-

पण महाराजांचें स्वतःचें शिक्षण त्यांच्या विद्याप्रियतेमुळें चालूच राहिलें. तें अद्याप पर्यंत चालू आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें अनेक कॉलेजांतून बाहेर पडलेल्या सुशिक्षितांचा विद्याव्यासंग मुळींच रहात नाहीं. संसारांतील कामें किंवा सरकारी नौकरीची, किंवा धंद्याची कामें करून राहिलेला वेळ असे लोक गप्पागोष्टी किंवा बिझीक, ब्रिज वगैरे पत्त्यांच्या खेळांत घालवितात, हें प्रसिद्धच आहे. त्याचप्रमाणें कित्येकांचा वेळ ऐषआरामांत, नाटकें-तमाशांत जातो. या दृष्टीनें विचार करतां राज्याचीं अनेक कामें, निरनिराळे प्रसंग, ऐषआरामाचीं निरनिराळी साधनें इत्यादि अडथळे नेहमीं सज्ज असतां श्रीमंत सयाजी महाराजांनीं आपला फुरसतीचा वेळ विद्याव्यासंगांत घालविला. किंबहुना रात्रीचाहि वेळ ते वाचनांत अद्याप घालवितात. सर्व प्रकारचे व्यवहार व उद्योग करूनहि श्रीमंत सयाजी महाराज विद्वान कसें झालें याचें उत्तर लोकमान्य टिळकांच्या उदाहरणाप्रमाणें "रात्रौ भुंक्ते" या न्यायानें रात्रीं वाचनानें ते विद्वान झाले, असेंच द्यावें लागतें. अलीकडे अलीकडे त्यांस वाचण्याची शक्ति राहिली नसल्यानें त्यांनीं रीडर्स म्हणजे पाठक ठेवले आहेत, परंतु ज्या ठिकाणीं विषय गहन असेल त्या ठिकाणीं रीडर्सकडून ऐकवून न घेतां ते स्वतः तेवढा भाग वाचतात. यामुळें एका कानांतून दुसऱ्या कानावर गेलें अशी स्थिति होत नाहीं. जें वाचलें जातें किंवा जें ऐकलें जातें तें त्यांच्या पोटांत उतरतें व पचनीं पडून त्यांचा त्यावर विचार चालू होतो.

श्रीमंत सयाजीमहाराजांची विचारशक्ति व ग्रहणशक्ति दोन्ही दांडगी असल्यानें त्यांस कोणत्याहि विषयाचा अभ्यास करण्यास अडचण पडत नाहीं. त्याचप्रमाणें जें वाचलें जातें तें नीट समजून घेण्याचा ते नेहमीं प्रयत्न करितात. एखादा अपरिचित कठीण शब्द मध्यें आल्यास ते त्यावरून तसेंच पुढें जात नाहींत, तर तो शब्द कोशांत काढून त्याचा अर्थ समजून घेतात. किंबहुना मराठींत सुटसुटीत योग्य प्रतिशब्द देण्याची खटपटहि करितात. यामुळेंच त्यांस पुढें सांगितल्याप्रमाणें निरनिराळ्या विषयांतील योग्य पारिभाषिक मराठी शब्द ठरविण्याची आवश्यकता वाटून त्यांनीं प्रयत्न केला आहे.

श्रीमंत सयाजीराव महाराजांचा आवडीचा विषय इतिहास आहे. त्यांनीं प्रथम गिबनचा इतिहास वाचून काढला, इतकेंच नव्हें तर ह्या इतिहासोत्तमाच्या संक्षेपरूपानें नोट्स काढून फ्रॉम सीझर टू सुलतान या नांवाचें एक पुस्तकहि

तयार केलें. हें नांव किती व्यापक व योग्य आहे ह्याची कल्पना गिबनचा इतिहासाचा विषय अवलपासून अखेरपर्यंत आपल्या डोळ्यासमोर आणला म्हणजे होईल. हा इतिहास 'Decline and Fall of the Roman Empire' अशा नांवाचा असून त्यांत रोमन साम्राज्याच्या उत्कर्षबिंदूपासून म्हणजे मार्कस् ऑरिलियस ह्या बादशहा ( सीझर ) पासून तो थेट कॉन्स्टॅन्टीनोपल येथें स्थापन झालेल्या पूर्व रोमन साम्राज्याचा अंत, कॉन्स्टॅन्टीनोपल शहर घेऊन तेथें तुर्की सुलतानांनीं आपली गादी १४५४ त स्थापन केली तेथपर्यंतचा युरोप व एशिया यांतील मुख्य मुख्य राष्ट्रांचा इतिहास आहे. " फ्रॉम सीझर टू सुलतान " या इंग्रजी पुस्तकाचें भाषांतर रा. भागवतांनीं केलेले आहे. श्रीमंत सयाजीराव महाराज हे एक ग्रंथलेखक असून मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होण्यास ते कसें योग्य होते हें वरील माहीतीवरून वाचकांच्या लक्षांत येईल. वरील संमेलनाच्या प्रसंगीं केलेल्या आपल्या अध्यक्षीय भाषणांत श्रीमंत महाराजांनीं पाश्चात्य भाषेंतील उत्तम इतिहासकारांचीं नांवें सांगितलीं. त्यांत गिबनचें नांव प्रथम त्यांनीं दिलें आहे. निरनिराळ्या इतिहासावरून राष्ट्राचा उदय, उत्कर्ष, आणि उच्छेद कसा होतो ह्याविषयीं त्यांचे विचार खोल व परिणत झाले असून ते त्यांच्या भिन्न भिन्न भाषणांतून प्रदर्शित होतात. महाराजांचा दुसरा आवडता विषय म्हणजे फिलॉसफी आणि एथिक्स, अर्थात् तत्वज्ञान व नीतिशास्त्र हा आहे. पाश्चात्य देशांत ह्या विषयावरचे लेखक नामांकित असून त्यांचे ग्रंथ मननीय आणि शीलवर्धन करणारे आहेत. ह्या ग्रंथांचाहि अभ्यास त्यांनीं चांगला केलेला आहे व अनेक पुस्तकांवर त्यांनीं नोट्स अर्थात् आपल्या टिप्पणी टांचून ठेवल्या आहेत. मराठी व संस्कृत भाषेंत तत्त्वज्ञान व नीतिशास्त्र ह्यांजवर निराळे ग्रंथ नाहींत. धर्माचाच हा एक भाग आहे असा प्राचीनकाळापासून समज असल्यानें धर्मविरहित या गोष्टींचा विचार आपल्या इकडे केलेला नाहीं. त्यामुळें इकडील प्राचीन विद्येंत निष्णात असलेल्या लोकांची छाप श्री. सयाजीमहाराजांवर पडत नाहीं. " बाबा वाक्यं प्रमाणं " अशीच समजूत असलेले व अशाच रीतीनें प्रत्येक विषयाचें समर्थन करणारे इकडचे संस्कृत विद्वान असतात. त्या रीतीचें पुढील विद्वान होऊं नयेत असाच इषारा त्यांनीं आपल्या वरील अध्यक्षीय भाषणांत दिला आहे. बुद्धिवान मनुष्यास ही पद्धति नेहमींच नापसंत असते त्याप्रमाणेंच ती महाराजांस नापसंत

आहे हें योग्यच आहे. तत्त्वज्ञानांत काय किंवा नीतिशास्त्रांत काय मनुष्याच्या बुद्धीस पटेल असेंच समर्थन करून सिद्धांत मांडले पाहिजेत, हें सांगावयास नकोच.

या रीतीनें विचार करतांना धर्माचाहि विचार मनुष्याच्या नजरेपुढें येतो. तेव्हां निरनिराळ्या धर्माचाहि अभ्यास श्रीमंत सयाजीराव महाराज यांनीं केला आहे हें सांगावयास नको.

Comparative study of religions (निरनिराळ्या धर्मांचा तुलनात्मक अभ्यास ) या विषयांची लोकांना माहिती देण्यासाठीं सयाजीराव महाराजांनीं प्रो. विजेरी या तज्ज्ञ गृहस्थाची मदत घेतली व त्यासंबंधाचें एक पुस्तकहि बनविलें.

याप्रमाणें इतिहास, तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र व धर्म या केवळ विचारांवर अधिष्ठित असलेल्या विषयांची माहिती श्रीमंत सयाजीराव महाराजांनीं करून घेतली व त्यामधील त्यांचा दर्जा फार मोठा आहे हें नमूद केल्यावर त्यांनीं भौक्तिकशास्त्राकडेहि आपलें लक्ष पुरविलें आहे असें सांगितल्यास आश्चर्य वाटेल. बहुधा जो विद्वान मनुष्य बुद्धिशास्त्रांत म्हणजे बुद्धिगम्य शास्त्रांत अभ्यास करून रममाण होतो तो प्रत्यक्ष प्रमाणांवर ( experiments ) बसलेल्या भौतिक शास्त्राकडे वळत नाहा. त्यांत त्याची बुद्धी चालत नाहीं. ते विषय त्यांस आवडत नाहींत. The man of letters is never a man of science. " अक्षरांचा विद्वान वस्तूचा विद्वान् होत नाहीं " असें म्हटलें असतां चालेल. पण सयाजीमहाराजांची विलक्षण बुद्धिमत्ता इतकी व्यापक आहे कीं, ती भौतिकशास्त्राकडेहि वळली आहे. त्यांस भौतिक शास्त्राची माहिती करून घेण्याची नेहमीं इच्छा असते. दीक्षितांचें भारतीय ज्योतिषशास्त्र हें त्यांनीं पूर्वींच पाहिलें असून त्या पुस्तकांस त्यांनीं चांगलीच मदत केली आहे. निरनिराळ्या भौतिक शास्त्रांचे विषय त्यांनीं आपल्या नजरेखालीं घातले आहेत. अगदीं अलीकडे वनस्पति शास्त्राची माहिती करून घेण्यासाठीं त्यांनीं मि. टिस्डाल या तज्ज्ञाची मदत घेतली. प्रो० गज्जर यांस योग्य आश्रय देऊन त्यांच्या भौतिक शास्त्रज्ञानाचा उपयोग प्रजेस व्हावा ह्यासाठीं मोठी संस्था काढून टेक्नीकल एज्यूकेशन (कलाशिक्षण) देण्याचा मोठा उपक्रम महाराजांनीं केला आहे. हें कलाभुवन बडोदा शहराचें

एक महनीय भूषण असून त्याचा फायदा बडोदें राज्यासच नव्हे तर एकंदर हिंदुस्थानांतील लोकांस कसा होत आहे ह्याचें विस्तृत वर्णन अन्य लेखांत याव-याचें आहे. ह्याप्रमाणें श्रीमंत सयाजीराव महाराजांना भौतिक शास्त्रें व त्यांचा कलांकडे उपयोग ह्याविषयीं चांगली अभिरुचि असून त्यांनीं कलाशिक्षणास फारच मोठें उत्तेजन दिलें आहे. ह्यामुळें त्यांस कलकत्ता येथें भरलेल्या " Industrial Conference " च्या अध्यक्षपदाचा जो मान मिळाला तो यथायोग्य होता. शास्त्रांचा अभ्यास व कलांचा अभ्यास वाढावा म्हणून त्यांनीं " ज्ञानमंजूषा " या नांवाची एक निराळी ग्रंथमाला काढिली होती.

अशा ग्रंथास एक मोठी अडचण म्हणजे सुटसुटीत आणि योग्य असे पारिभाषिक शब्द सर्वत्र एकच उपयोगांत येणें ही होय. ही अडचण दूर करण्यासाठीं असे पारिभाषिक शब्द तयार करण्याचीहि व्यवस्था श्रीमंत सयाजी महाराजांनीं केली व एक शब्दकोश तयार करविला. योग्य शब्द प्रत्येक शास्त्रांत व निरनिराळ्या भारतीय भाषांत तयार होण्याची आवश्यकता श्रीमंत सयाजीमहाराजास इतकी वाटते कीं, त्यांनीं व्यवहारांत व कायद्यांत उपयोगांत येणारे पारिभाषिक शब्द संस्कृत, मराठी, गुजराथी, हिंदी व ऊर्दू या भाषांत बनविण्यासाठीं निरनिराळ्या भाषांतील तज्ज्ञांची एक कमिटी नेमली व मोठा खर्च करून ह्या कमिटीनें तयार केलेला एक व्यवहारकोश नुकताच प्रसिद्ध केला आहे. हें अतिशय परिश्रमाचें व खर्चाचें काम अद्याप पूर्ण व्हावयाचें आहे.

श्रीमंत सयाजी महाराजांच्या अभ्यासविषयांमध्यें Political अर्थात राज-कीय विषयहि येतात. राष्ट्रांच्या संबंधाचे विचार त्यांनीं खोल केले असून राष्ट्रघटना, कायदे बनविणें, न्यायदानपद्धति, प्रजेचे व राजाचे अधिकार व कर्तव्यें इत्यादि विषयासंबंधाची पुस्तकें त्यांनीं वाचली आहेत. निरनिराळ्या देशांतल्या Constitution ( राज्यघटना ) संबंधी त्यांची माहिती चांगली असून त्यासंबंधानें विचारहि प्रगल्भ व उदारपणानें ते करतात. प्रथम " Round Table Conference " च्या प्रसंगीं हिंदुस्थानांतील देशी संस्था-नातर्फे ते प्रतिनिधी म्हणून हजर होते व एकंदर संस्थानिकांत राजकीय ज्ञानासंबंधी त्यास अग्रभागी होण्याचा मान मिळाला होता. ह्याप्रसंगीं त्यांनीं आपल्या ज्ञानाचा पुष्कळ फायदा Round Table Conference ला

दिला. हिंदुस्थानच्या प्रजेस जर अधिक हक्क मिळत असतील तर संस्थानांचे अधिपति आपले अधिकार संकुचित करण्यासहि तयार आहेत असें त्यांनीं उदार उद्गार काढले हें वाचकांस स्मरतच असेल.

श्रीमंत सयाजीराव महाराज यांस ग्रामिण शिक्षणाची अवश्यकता किती वाटते हें त्यांनीं एका महत्वाच्या भाषणप्रसंगीं एका उदार वाक्यांत व्यक्त करून दाखविलें:—"No ultimate solution of our problem will be reached until schools have been provided in every village, and education is taken to the very threshold of the people." (आपल्या समोर असलेल्या राष्ट्रोद्धाराच्या प्रश्नाचा अंतिम निर्गम तोंपर्यंत होणार नाहीं, जोंपर्यंत प्रत्येक खेड्यांत शाळा स्थापिली गेली नाहीं आणि लोकांच्या घरांच्या उंबरठ्यापावेतों शिक्षण नेलें जाणार नाहीं.) निरनिराळ्या राष्ट्रांच्या इतिहासाचें खोल अध्ययन महाराजानीं केलें आहे, आणि हल्लींच्या पाश्चात्य देशांच्या परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षणहि त्यांनीं केलें आहे. त्यावरून काढलेला वरील सिद्धांत किती खरा आहे हें विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. जोंपर्यंत प्रत्येक खेड्यांतील प्रत्येक घरंदाज मनुष्य, तरुण व वृद्ध, शिक्षण पावला नाहीं, त्याला लिहितां वाचतां येऊन जगांत काय चाललें आहे, हें तो वाचूं शकणार नाहीं तोंपर्यंत राष्ट्राच्या उद्धारास व प्रगतीस त्याची मदत मिळणें शक्य नाहीं. प्राचीन काळांत भारतीय आर्यांस सर्वांच्या शिक्षणाची आवश्यकता किती भासत होती हें त्यांनीं द्विजांच्या उपनयनसंस्कारांत व्यक्त केलें. प्रत्येक आर्यानें गुरूजवळ जाऊन शिक्षण घेतलेंच पाहिजे असा त्यांनीं धार्मिक नियमच केला. असो. हल्लींच्या काळांत अमेरिकेंतील संयुक्त राष्ट्र सर्व जगतांत अधिक संपन्न व सुव्यवस्थित आहे, याचें कारण हेंच आहे कीं, खेडेगांवांतील प्रत्येक शेतकरी सुशिक्षित आणि वाचणारा आहे. याचा विचार करून श्रीमंत सयाजीमहाराजांनीं ग्रामिण शिक्षणाचा प्रयत्न केला, व आपल्या राज्य-व्यवस्थेचें प्रगति हें चिरस्थायी लक्षण केलें. त्यांनीं एका अन्यप्रसंगीं आपलें अस मत नमूद केलें आहे कीं, 'I think that ultimately if any country is to progress and the administration is to leave a permanent mark of its beneficial work it can only be so by raising the general level of intelligence of the masses.'

( मला वाटतें कीं, जर कोणत्याहि राष्ट्राची प्रगति होणें असेल आणि तेथील राज्यव्यवस्था जे कांहीं प्रगतीसाठीं प्रयत्न करतें त्याचा ठसा कायमचा रहावयाचा असेल तर देशांतील लक्षावधी सामान्य जनतेच्या बुद्धिमत्तेचें मान अधिक वाढविलें पाहिजे.)

अमेरिकेंतील फिरत्या वाचनालयांच्या पद्धतीवरून बडोदें राज्यांत त्यांनीं ग्रामीण फिरतीं वाचनालयें चालू केलीं. त्यांतहि शेतकऱ्यांस उपयोगी पडतील व धंद्याच्या दृष्टीनें त्यांची प्रगति होईल अशीं पुस्तकें इतर सामान्य विषयांवरील पुस्तकांबरोबर ठेविलीं जातात. पण दुर्दैवानें मराठी किंवा गुजराथी भाषेंत सुबोध व सोप्या रीतीनें लिहिलेलीं धंदेशिक्षणाचीं पुस्तकें फार थोडीं आहेत. याची जाणीव महराजांना तीव्र असल्यानें त्यांनीं कोल्हापूर येथील आपल्या अध्यक्षीय भाषणांत लेखकांस याबद्दल महत्त्वाच्या सूचना केल्या आहेत. सर्वच ग्रंथ गंभीर जड भाषेंत न लिहितां खेडेगांवांतील लोकांकरितां, सरळ सोप्या भाषेंत ग्रंथ लिहिण्याकडे भावी लेखकांनीं लक्ष दिलें पाहिजे. सर्वच विषयांवर अशी पुस्तकें पाहिजेत, पण विशेषत: शेतकी, व्यापार इत्यादि विषयांवर तर जरूरच पाहिजेत. याकरितां साहित्य संमेलनांनीं विशेष लक्ष पुरविलें पाहिजे. महाराजांच्या ह्या प्रयत्नानें व सूचनेनें ग्रामीण फिरत्या वाचनालयांत अशी धंदेशिक्षण देणारीं पुस्तकें जास्त ठेवतां येतील आणि प्रजेस सुशिक्षित करण्याचा महाराजांचा प्रयत्न ज्यास्त सफल होईल अशी आशा करण्यास हरकत नाहीं.

येथपर्यंत सांगितलेल्या हकिकतीवरून श्रीमंत सयाजीरावमहाराज यांची विद्याभिरुचि किती उज्ज्वल, प्रखर व सर्वगामी आहे हें कळण्याजोगें आहे. जगांतील वस्तुमात्राचें ज्ञान आपणाला शक्यतर असावें अशी महाराजांची वृत्ति दिसते. त्यांनीं स्थापन केलेल्या शाळा, कॉलेज, कलाभुवन, सेंट्रल लायब्ररी सारख्या संस्था, त्यांनीं उत्तेजन देऊन प्रसिद्ध करविलेले अनक विषयांवरील ग्रंथ, आणि ठिकठिकाणच्या विद्वान व कार्यकर्त्या पुरुषांच्या सन्मानार्थ श्रीसयाजी पदक, राजरत्न पदक वगैरे सारखीं त्यांनीं ठेवलेलीं पदकें, हीं सर्व श्रीमंत महाराजसाहेबांच्या विद्याभिरुचीचीं जीवंत स्मारकेंच होत.

याप्रमाणें श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांची ज्ञानलालसा अत्यंत तीव्र असून त्यांनीं ह्या वयांतहि सरस्वतीची सेवा चालविली आहे.

ज्या सरस्वतीची उपासना ब्रह्मा, विष्णु, आणि शंकरहि करतात—कारण जगताच्या (द्रव्याच्या) उत्पादनास, संरक्षणास आणि दुष्टलोकांच्या संहारास ज्ञानाचीच मदत लागते—त्या सरस्वतीची उपासना करणें प्रत्येक हितेच्छु मनुष्याचें विशेषत: राज्यावर अधिष्ठित झालेल्याचें कर्तव्य आहे. कारण त्यांस प्रजेस द्रव्योत्पादनानें समृद्ध करावयाचें असतें, तिचें रक्षण करावयाचें असतें, आणि दुष्टांचें दण्डन करावयाचें असतें. आपल्या राज्याच्या जोपासनेच्या कर्तव्यास या सरस्वतीच्या सेवेनें महाराज किती योग्य झाले आहेत याचें ज्यास्त वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं. सतत वाचन ठेवून व त्याचें मनन करून विचाराची चालना ते नेहमीं करीत असतात. त्याचबरोबर प्रजेंत ज्ञानाची वाढ कशी होईल याचीहि ते काळजी करीत असतात व त्याचें फळ म्हणजे आज बडोदेंराज्यांत सर्व प्रकारच्या शिक्षणाची—बौद्धिक, शास्त्रीय, कलात्मक वगैरे शिक्षणाची जी अद्वितीय प्रगति झाली आहे ती होय. याबाबतींत बडोदें इतर संस्थानांच्या, किंबहुना सर्व ब्रिटिश प्रांताच्याहि पुढें आहे. सामान्य पांढरपेशांच्या शिक्षणाचीच काळजी महाराज वाहात नसून अशिक्षित खेडवळ प्रजेच्या शिक्षणाची काळजी घेत आहेत आणि प्राथमिक सक्तीचें शिक्षण व फिरतीं वाचनालयें यांच्या द्वारें त्यांच्यांत ज्ञानाचा प्रसार करीत आहेत. सरस्वतीस जाड्यापहा म्हटलें आहे. कारण ज्ञानप्रसारानेंच वेडगळ समजुती व अज्ञानमूलक कल्पना व चाली नष्ट होतात, हें ध्यानांत आणून महाराजांनीं (शिक्षण) खेड्यांतील लोकांच्या "उंबरठ्यापर्यंत" पोंचविलें आहे. साहजिक बडोदें राज्यांतील सर्वच प्रजा महाराजांस दुवा देत आहे. याबरोबरच सर्व भारतवर्षांतील विद्वानांना व अविद्वानांना ते विसरले नाहींत. बडोदें राज्यांत पूर्वीपासून विद्वानांस दक्षिणा देण्याचा प्रघात आहेच. त्याची वाढ करून अखिल भरतखंडांतील विद्वानांचा महाराज आशीर्वाद घेत आहेत. श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड अशा प्रजेच्या व विद्वानांच्या आशीर्वादानें चिरायु होवो असें मी या गौरवग्रंथाच्या सुप्रसंगानें आनंदानें आशीर्वचन देतों.

# बडोदें राज्यांतील प्राथमिक शिक्षण

( **लेखकः**—श्रीयुत **भालचंद्र चिंतामण लेले**, एम्. ए., पी. एच्. डी. )

बडोदें संस्थानांत नवीन पद्धतीनें शिक्षण आणि त्याबद्दलची योजना १८७१ सालीं अस्तित्वांत आली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण यावर्षीं सरकारी खर्चानें लोकांस शिक्षण देण्याचें तत्व अमलांत आलें. यापूर्वी जुन्या पद्धतीच्या पाठशाळांतून शिक्षण देण्यांत येत असे. परंतु १८७१ सालीं एक सरकारी हायस्कूल व चार प्राथमिक शाळा उघडण्यांत आल्या. या शाळांतून शिक्षण घेणाऱ्या मुलांची संख्या ६६६ असून एकंदर खर्च १३,००० रुपये गायकवाडी ( अथवा ८४,१६० कलदार ) इतका होत असे. १८७५ सालीं शाळाखातें स्वतंत्र करण्यांत आलें व पुढील वर्षी एक शाळा-तपासनीस अथवा इन्स्पेक्टरची जागाहि नवीन काढण्यांत आली. १८८० सालीं शाळांची संख्या १८० असून विद्यार्थ्यांची संख्या १७,४६५ होती. १८८१ सालीं हल्लींचे श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांनीं संपूर्ण अधिकारासह राज्यकारभाराची सूत्रें आपल्या हातांत घेतलीं. यावेळेस त्यांचें वय फक्त १८ वर्षांचें होतें. परंतु यावेळेपासूनच आपल्या प्रजेस सार्वत्रिक शिक्षण देण्याचें उच्च ध्येय त्यांनीं निश्चित केलें होतें व या ध्येयानुसार शिक्षणाची प्रगति पुढील वर्षांत सपाट्यानें होत गेली. सन १८८९–९० मध्यें शाळांची संख्या ४४४ असून त्यापैकीं ३५ शाळा खास मुलींकरितां होत्या. या शाळांत ४०,६१९ मुलगे व ३,१४५ मुली शिक्षण घेत होतीं व शाळाखात्याचा एकंदर खर्च ४,३१,६१३ रुपये होता.

१८९१ सालीं महाराजांच्या हुकुमावरून ग्राम्य शाळा उघडण्यांत आल्या. या शाळा ग्रामव्यवस्थेंतील एक मुख्य अंग समजल्या जात असत व मेहेताजी अथवा या शाळेंतील शिक्षक हा खेडेगांवांतील सरकारी नोकरांपैकीं एक कायमचा घटक मानला जात असे. खेडेगांवांतील लोकांत शिक्षणाची आवड उत्पन्न करणें व अत्यंत गरीब अशा लोकांमध्यें देखील शिक्षणाचा प्रसार करणें हीं शिक्षकाचीं कर्तव्यें समजलीं जात असत. शाळेंत शिकणाऱ्या मुलांच्या संख्येच्या प्रमाणांत शिक्षकास दरमहा रु. ३ पासून रु. ५ पर्यंत पगार मुलकीखात्याकडून मिळत असे. त्याचप्रमाण मुलांच्या पालकांकडून फी किंवा अन्य रीतीनें मोबदला स्वीकारण्याची त्याला मुभा असे. याशिवाय परीक्षेंत पास होणाऱ्या संख्येनुसार शिक्षणखात्याकडून मदत दिली जात असे.

जुन्या पद्धतीच्या खाजगी शाळा पुष्कळ खेडेगांवांतून असून चालू होत्या. शिक्षणपद्धति व अभ्यासक्रम सर्व शाळांतून सारखीं असणें इष्ट होत व म्हणून खाजगी शाळा शिक्षणखात्याच्या देखरेखीखालीं येणें अवश्य होतें. याकरितां खाजगी शाळांतील शिक्षकांस नवीन ग्राम्य शाळांतील शिक्षकांच्या जागा देण्यांत आल्या. अशा तऱ्हेनें बहुतेक जुन्या खाजगी शाळांचें नवीन ग्राम्य शाळेंत रूपांतर झालें. एक वर्षांत शाळांची संख्या २२८ पर्यंत वाढली व त्यांवरील देखरेख नीट रहावी या हेतूनें या शाळा १८९२ सालीं देशी शाळाखात्याच्या ताब्यांत देण्यांत आल्या. या धोरणानुसार शाळा व शिक्षक यांची संख्या वाढत गेली. ज्याठिकाणीं निदान १६ मुलें जमणें शक्य असेल त्या ठिकाणीं शाळा काढण्याची महाराजांनी इच्छा दर्शविली. व १८९२ च्या अखेरीस शाळांची संख्या ५७२, व १८९३ सालीं ६४१ वर जाऊन मुलांची संख्या वीस हजार पर्यंत वाढली.

याच सुमारास शिक्षकांच्या पगारांत थोडीशी सुधारणा करण्यांत आली. पंचवीस विद्यार्थी हाताखालीं असलेल्या शिक्षकास रु. ६ दरमहा पगार देण्यांत येऊं लागला व यापेक्षां जास्त मुलांची संख्या असल्यास रु. ७ दिले जात असत. शाळेच्या सर्वसाधारण स्थितीप्रमाणें शाळेस रु. १२ ते २० पर्यंत वार्षिक मदत दिली जात असे. मुलांच्याकडून फी घेण्यास शिक्षकास मोकळीक असे. पन्नासच्या वर मुलांची संख्या गेल्यास एक उपशिक्षक दिला जात असे.

ता. १६ मार्च १८९३ रोजीं प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करण्याबद्दलचा कायदा महाराजांच्या हुकुमानें अमलांत आला. हा कायदा प्रथम अमरेली प्रांतांत फक्त अमरेली शहर व अमरेली तालुक्यांतील ९ गांवांसच लागू करण्यांत आला व त्याकरितां रु. ३१,७९० रुपये जास्त मंजूर करण्यांत आले. कायद्याचा अंमल कसा होतो हें पाहून नंतर अमरेली तालुक्याच्या राहिलेल्या गांवांसहि हा कायदा लागू झाला. सर्व हिंदुस्थानांत शिक्षणाबद्दल इतका महत्वाचा प्रश्न हातीं घेण्यांत बडोदें संस्थानाचा पहिला नंबर होता व हा प्रयत्न कितपत यशस्वी होतो हें पाहण्याकरितां सर्व हिंदुस्थानचे डोळे बडोद्याकडे लागले होते. कायद्याचा अंमल कसा होतो, लोकांची सहकारिता किती मिळते वगैरे गोष्टींकडे श्रीमंत महाराजसाहेबांचेंहि लक्ष सारखें लागलें होते. शिक्षणासंबंधीं एके ठिकाणीं महाराजांनीं

खालील विचार प्रदर्शित केले आहेत. "कोणत्याहि राज्यपद्धतीचा चांगलेपणा अगर यशस्वीपणा राज्यकारभारातील निरनिराळ्या बारीक-सारीक गोष्टींवर अवलंबून नसतो, परंतु त्या राज्यपद्धतीमुळें लोकांची सर्व दृष्टीनें प्रगति होण्याला अवसर मिळतो किंवा नाहीं व अशा प्रगतीस अवसर मिळाल्यानंतर प्रगतीनुसार मिळविलेल्या ज्ञानाचा उपयोग करण्यासाठीं पूर्ण संधि लोकांस मिळते किंवा नाहीं या गोष्टींवर तो यशस्वीपणा अवलंबून असतो. यामुळें सार्वत्रिक शिक्षणाची व्यवस्था करणें हें कोणत्याहि राज्यपद्धती-मध्यें पहिलें कर्तव्य समजलें जाणें स्वाभाविक आहे. जुन्या काळीं ज्यावेळेस लोकांनीं फक्त शेती करणें व कायदे पाळणें इतकीच गोष्ट करावयाची असे त्यावेळेस शिक्षणाची विशेष जरूर वाटत नसे. परंतु आधुनिक काळीं सामान्य लोकमताला अधिकाधिक जबाबदारी पडत आहे. यामुळें स्वतःचीं कर्तव्यें व जबाबदारी पार पाडण्याकरितां लोकमत तर्कनिष्ठ व समतोल होणें अवश्य आहे व याकरितां शिक्षणाशिवाय दुसरा उपाय नाहीं. अज्ञानावर अधिष्ठित असलेलें लोकमत कधींहि स्थिर असणें शक्य नाहीं. भावनेचा अथवा विकाराचा थोडासा वास लागल्याबरोबर तें हेलकावे खाऊं लागून एखादें वेळेस समाजाच्या अधःपातास कारण होईल. राष्ट्राची सर्वांगीण प्रगति होण्यास समाज योग्य रीतीनें नियंत्रित असला पाहिजे, व ही गोष्ट समाजां-तील प्रत्येक घटकास शिक्षणाचा लाभ मिळाल्याशिवाय शक्य नाहीं. शिक्ष-णाची सोय लोकांस करून देणें व त्यावर देखरेख ठेवणें हीं राज्यव्यवस्था ज्यांच्या हातीं आहे त्यांचीं मुख्य कर्तव्यें होत. कारण त्याशिवाय शिक्षण-पद्धतीस एकसूत्रीपणा व सुसंघटितपणा यावयाचा नाहीं.

"हल्लींच्या यांत्रिक युगांत व चढाओढीच्या काळांत तर शिक्षणाचें महत्व अधिकच वाढतें. जें राष्ट्र आपल्या सर्व नागरिकांना कोणचाहि भेद अथवा निर्बंध न ठेवतां शिक्षणाचा फायदा मिळविण्याची संधि देतें तें राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रांना मागें टाकून खात्रीनें पुढें जाणार. प्रत्येक व्यक्तीला ज्ञानाच्या उच्च कोटीला पोहोचणें शक्य होणार नाहीं, परंतु सर्व-साधारण ज्ञानाची मर्यादा जितकी अधिक तितकें तें राष्ट्र अधिक समर्थ ठरेल. यामुळें उच्च किंवा नीच अशा जातीचा अगर वर्णाचा भेद न ठेवतां सर्वांसच ज्ञान मिळविण्याची संधि दिली पाहिजे."

अमरेली तालुक्यांत फक्त कांहीं ठिकाणीं प्राथमिक शिक्षणाचा कायदा प्रथम लागू करण्यांत आला, परंतु कांहीं दिवसांनीं सर्व तालुक्यास तो लागू केला गेला. त्याचप्रमाणें राज्यांतील दुसऱ्या प्रांतांतहि कांहीं ठिकाणीं या कायद्याचा अंमल करण्यांत आला व अशा रीतीनें हळुहळू सुरुवात होऊन योग्य अनुभवानें १९०७ च्या मे महिन्यामध्यें मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा कायदा सर्व राज्यास लागू करण्यांत आला. तेव्हांपासून आतांपर्यंतची प्रगति पाहतां मोफत व सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा प्रयोग यशस्वी झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. अर्थातच सर्व हिंदुस्थानमध्यें बडोदें संस्थानांत हा उपक्रम प्रथमच झाल्यामुळें या प्रयोगांत प्रथम किती प्रकारच्या अडचणी येतात याचा अनुभवहि चांगला आला, व या अनुभवाचा फायदा इतर संस्थानांस व प्रांतांस फारच उपयोगी होईल. अजूनहि कित्येक अडचणी नाहींशा झालेल्या नाहींत. परंतु नेहमीं एक अडचण दूर झाल्यावर दुसरी यावयाचीच व यांतच प्रगतीचें बीज आहे.

प्राथमिक अथवा खरें पाहिलें असतां इतर कोणत्याहि प्रकारच्या शिक्षणाच्या बाबतींत सर्वांत अत्यंत महत्वाचा प्रश्न म्हणजे शिक्षकांचा. शाळा कितीहि उघडल्या व मुलांवर सक्ती करून शाळेंत जाणाऱ्या मुलांची संख्या कितीहि वाढली तरी या शाळांमध्यें शिक्षण देणारे शिक्षक उत्साही, निरलस, प्रामाणिक व विशेषतः शिक्षणशास्त्रांत तरबेज झालेले नसले तर शिक्षणसंबंधीं बराचसा खर्च फुकट गेल्यासारखाच होईल. यामुळें शिक्षणाच्या वाढीबरोबरच शिक्षकांस शिक्षण देणाऱ्या खास संस्था असाव्या लागतात. बडोद्यांत १८७२ सालीं अशा प्रकारचा शिक्षणवर्ग प्रथम उघडण्यांत आला. परंतु या वर्गाला शिक्षणानुभवशाळा जोडण्यांत आली नव्हती. १८७६ सालीं हा वर्ग बंद करण्यांत आला. परंतु मुलींच्या शाळेंत स्त्रीशिक्षकांचा प्रश्न सोडविण्याकरितां १८८२ सालीं हल्लींची स्त्रीशिक्षणपद्धति पाठशाळा, Training College for Women स्थापन करण्यांत आली. त्याचप्रमाणें १८८५ सालीं पुरुषशिक्षणपद्धतिपाठशाळा अस्तित्वांत आली. १८९१ सालीं या पाठशाळेंत ७४ शिक्षक शिक्षण घेत होते. आठ वर्षेंपर्यंत बरेचसे शिक्षक तयार झाल्यानंतर ही पाठशाळा बंद करण्यांत आली. १९०५ सालीं हे शिक्षणवर्ग पुन्हा उघडण्यांत आले. व प्राथमिक शिक्षण सक्तीचें झाल्यानंतर या संस्थेंत अधिकाधिक शिक्षक दाखल करण्याची जरूरी भासूं लागली.

१९०८ सालीं दोन वर्षांचा शिक्षणक्रम वाढवून तीन वर्षांचा करण्यांत आला व १९१०–११ सालीं या संस्थेंत ३५७ शिक्षक शिक्षण घेत होते. १९३०–३१ सालीं एकंदर ६,२३९ प्राथमिक शाळांतील शिक्षकांपैकीं ४,२२७ शिक्षकांनी या दोन शिक्षणपद्धतिपाठशाळांत शिक्षण घेतलेलें होतें. १९३०–३१ सालीं प्राथमिक शाळांतील मुलांची संख्या पाहिल्यास शिक्षणाचा प्रसार किती होत आहे हें दिसून येईल. यासालीं ही संख्या २,२९,७६४ असून त्यांपैकीं १,४०,१२० मुलगे व ८९,२४४ मुली होत्या. परंतु शिक्षणाची प्रगति नुसत्या संख्येवरच अवलंबून नसून शाळेंत दाखल झालेल्या मुलांपैकीं साक्षर (literate) किती होतात यावर अवलंबून असते. साक्षरता येण्यास प्राथमिक शाळेंतील निदान चार वर्षांचा अभ्यासक्रम पुरा झाला पाहिजे. या दृष्टीनें पाहिल्यास चवथ्या इयत्तेपर्यंत जाणाऱ्या मुलांचें प्रमाण कसें वाढत आहे, हें खालीं दिलेल्या चार वर्षांच्या आंकड्यांच्या कोष्टकावरून दिसून येईल.

| अनुक्रम नंबर. | साल | बालवर्ग | इयत्ता १ | इयत्ता २ | इयत्ता ३ | इयत्ता ४ | ४ इयत्तेंतील मुलांचें बाळ वर्गांतील मुलांच्या संख्येशीं शेंकडा प्रमाण. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | १९३०–३१ | ७२८४० | ५०६४९ | ३८२०४ | ३००१४ | २१४८० | २९·४ |
| २ | १९२९–३० | ६९८३४ | ४६९२३ | ३६४५२ | २५९०५ | १९१०४ | २८·० |
| ३ | १९२८–२९ | ६९३८१ | ४६९५५ | ३१७९३ | २३६८९ | १७५७८ | २५·३ |
| ४ | १९२७–२८ | ७७८५९ | ४२७३४ | २९१६९ | २२२९९ | १७१०३ | २३·१ |

त्याचप्रमाणें बडोदें राज्यांत साक्षरतेची वाढ काय प्रमाणांत होत आहे ह पाहिल्यास शिक्षणाची प्रगति स्पष्ट दिसून येईल. १९२१च्या खानेसुमारीप्रमाणें ५ वर्षांवरील वयाच्या लोकसंख्येंत साक्षरतेचें प्रमाण दर हजारी १४३ इतकें होतें.

१९३१ सालच्या खानेसुमारीप्रमाणें तेंच प्रमाण दर हजारी २०९ इतकें वाढलें आहे.

सक्तीच्या शिक्षणाच्या कायद्याप्रमाणें सात वर्षे वयाच्या मुलांस शाळेंत दाखल करणें व वयाच्या चौदा वर्षांपर्यंत अथवा चवथी इयत्ता पास होई-पर्यंत शाळेंत ठेवणें या गोष्टीं अवघड नाहींत. परंतु शिक्षण मिळवूनहि लिहि-ण्यावाचण्याचें ज्ञान कायम राखणें ही गोष्ट फार महत्वाची आहे. शेतीच्या व त्याचप्रकारच्या धंद्यांत पडल्यावर विशेषतः खेडेगांवांत शिकलेलें ज्ञान कायम राखण्याचीं साधनें फारच थोडीं असतात. त्याचप्रमाणें मुलींच्या बाबतींतहि लग्न झाल्यानंतर नियमित लिहिणें वाचणें जवळजवळ होतच नाहीं. यामुळें शाळेंतून बाहेर पडल्यानंतर चार पांच वर्षांतच शिकलेलें सर्व विसरून गेल्याचीं अनेक उदाहरणें घडतात. अशा लोकांच्या शिक्षणाकरितां झालेला खर्च बहुतेक व्यर्थच गेल्यासारखा होतो. याकरितां अत्यंत दूरदृष्टीनें श्रीमंत महाराजसाहेबांनीं प्रथमपासून खेडेगांवांत पुस्तकालयें व वाचनालयें उघड-ण्याचा उपक्रम केला. सक्तीच्या शिक्षणाच्या योजनेंत वाचनालयांना अत्यंत महत्वाचें स्थान आहे. लोकांत वाचनाची अभिरुचि उत्पन्न केल्यावर वाच-नाची साधनेंहि त्यांस उपलब्ध करून दिलीं पाहिजेत. १९३०–३१ सालीं राज्याच्या एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ६३·४९ लोकांस वाचनालयाचा लाभ मिळाला आहे. त्याचप्रमाणें ज्या ज्या ठिकाणीं शाळा त्या त्या ठिकाणीं वाचनालय असावें असा श्रीमंत सरकारचा नुकताच हुकुम झालेला आहे व त्याप्रमाणें येत्या सहा सात वर्षांत दरवषा १०० नवीन पुस्तकालयें उघडून सर्व ठिकाणीं हा लाभ लोकांस देण्याची योजनाहि सरकारकडून मंजूर झाली आहे.

---

# THE MAHARAJA SAHEB AND HIGHER EDUCATION.

( *By Prof. J. M. Mehta M. A., Ph. D.* )

Of no ruler of an Indian State can it be more truly said that he subordinated his own interests to the welfare and prosperity of his State than of H. H. the Maharaja Saheb of Baroda. Ever since his accession to power he has been the soul of the administration. There has been a succession of great ministers who have advised His Highness on important problems of policy, but almost all important measures in the State have been largely initiated by His Highness and finally shaped by him. The whole administration bears the impress of his personality. Like Frederick the Great it can be said of him that he is the first servant of the State.

Very early in his reign he realised the importance of education as a remedy to lift his people from the morass of ignorance and superstition in which they were sunk. The people of the State were custom-ridden and full of superstitious beliefs. His Highness believed that mass education alone can wake them up from lethargy and the sleep of ignorance. In one of his speeches he therefore said, "I have no hesitation in saying that we cannot do better than educate all our subjects. This is absolutely necessary for the realisation of my ambitions and wishes for the future of my people." Again in his speech at the Aligarh College in 1901, he said, "Education is the basis of all reforms and is the only way of salvation from our present condition." It was his firm belief in the value of education which prompted him to introduce free and compulsory education in his State long before it was introduced in British India. It was not only primary education that engrossed His

Highness' interest. He had grasped quite clearly as early as 1879 the role and significance of higher education.

On the 8th of January 1879 when laying the foundation stone of the Baroda College His Highness remarked, " Education is all important to India. It is the lever–the only lever–by which this vast country can be extricated from that stationary condition in which it has remained through incalculable ages. It is therefore the duty of every one earnestly to promote education. The education of the masses is certainly very important, but my profound conviction is that the higher education though necessarily of a smaller number is still more important in the present condition and circumstances of India. I feel convinced that one Indian to whom higher education has been imparted at the expense of Rs. 1,000 contributes infinitely more to the general progress of the community than 333 Indians only slightly or superficially educated at the expense of Rs. 3 per head. I put it purposely in the dry arithmetical form. The truth is, a certain force is required to break the iron chains of intellectual bondage, and merely elementary education fails to generate the required force.

" I have availed myself of the opportunity to give expression to my conviction in this respect all the more readily, because there seems to be latterly a disposition in certain parts of India to advocate breadth of education at the expense of its elevation. This is neither the time nor the place to enter into any argument or controversy on the subjcet. I have simply expressed my personal conviction, and will only assure you that it is the result of careful observation and reflection and of some native insight into the conditions of the problem. While then we exert ourselves commensurately with our resources to give lateral expansion to education, we recognise even more fully the

superior importance of a vertical development of the same. Hence it is that we are this day to lay the foundation of a building which will, indeed, at first accomodate our High School, but which has been really designed to answer the more extensive requirements of a College which is fairly in prospect under the able and zealous direction of our Principal Mr. Tait."

His Highness must have also probably realised that the success of his administration would to a large extent depend upon intelligent and loyal co-operation of his officers. His administration therefore must have a steady supply of really capable and trained men which the College in course of time would be able to provide. Higher education must be imparted to his subjects to fit them to take a larger and lager share in the administration of the State. This idea was given expression to by the Dewan Sir T. Madhavrao at the close of the proceedings of the ceremony of laying the foundation stone of the College in 1879. The Dewan Sir T. Madhavrao said that they hoped that long before a single hair of his head assumed a silver hue, His Highness would enjoy the proud satisfaction of seeing himself surrounded by numbers of his countrymen of high intellectual training, of unsurpassed probity and principle, and of abundant practical ability to assist him in the good government of his Kingdom, all gratefully owning themselves to be the graduates of the Baroda College. It was then a pious wish, but the prophecy has been amply fulfilled.

The College was affiliated in 1881 to the University of Bombay for in that year it received recognition from the University for the purpose of accepting students and preparing them for what was then called the previous examination. The College actually commenced work at the beginning of the year 1882 with a previous class of 30

students. Twenty-two of these students were sent up for the previous examination and 8 of them passed. This was quite a good beginning. It was as a matter of fact somewhat better than the average for the University as a whole. During the first year of its existence the College did not sit in this splendid building. It did not become ready for occupation till September 1883, and when the building was then occupied the students had to work with the noise of the workmen and the building operations dinning in their years.

In 1887 the College embarked on the teaching of science. The first B. Sc. class was opened on 1st January 1887. It was then thought that it would be much more desirable to make Baroda College more of a Science College than an Arts College. There was a sufficient number of Arts Colleges in the presidency and a Science College was more desirable. There was also the feeling that to try and increase the number of science graduates of the University was a step which might result in much good to the country. In 1890 the College however was recognised for full arts and science courses leading up to the B. A. and B. Sc. degrees. In 1890 the College was also recognised in the full course of Agriculture. Mr. Middleton ( now Sir Thomas Middleton ) was the first Professor of Agriculture. The starting of the agricultural class was a very desirable feature. In a country where 80 per cent of the population depend upon agriculture for its subsistence and where agriculture is by far the most important industry, Agricultural College is a prime necessity. It is much to be regretted that the people of Gujarat did not take very kindly to higher education in agriculture. The numbers coming for admission soon became so small that Government had to consider whether it was worth while to continue the class. Eventually it was

discontinued and a promising experiment came to an end. His Highness, however, deserves great credit for the vision and foresight which he showed in this pioneering effort.

For some time the College was also recognised for the 1st LL. B. examination, but in 1908 the law class was closed. To-day the College is training students for the full arts and science courses leading to the B. A. and B.Sc. degrees, and also for the post graduate work leading to M.A. and M.Sc. degrees.

It would not be out of place to review the growth of the College here. The College started with 30 students in 1882. In 1895 there were 164 students, in 1905 the number went upto 225, in 1915 to 605, in 1925 to 814 and in 1930-31 to 911. In 1905 there were no lady students in the College. In 1915 there were 8 lady students, in 1925 there were 13 lady students and in 1931 the number went up to 35.

The college staff naturally had to be augmented with increase in the number of boys. In 1905 the staff consisted of the Principal, the vice-principal and seven professors, two fellows, one Shastri, one lecturer in French, two laboratory assistants and one librarian. There were thus 16 members of the college staff. In 1915 there was the Principal, (the post of the vice-principal had been abolished), 14 professors, 2 lecturers, one Shastri and one Persian Munshi, two fellows, one demonstrator and a librarain. The total strength of the staff was 23. Besides there were four student demonstrators. In 1925 besides the Principal there were 17 professors, three lecturers, two demonstrators, two fellows and a librarian. In 1931 the permanent staff had gone upto 26. There were 11 men on temporary teaching staff, two fellows and one librarian.

This increase in the staff would naturally mean a considerable increase in the college expenditure. Owing however to a gradual increase in the college fees which were at one time very low and which even now are much lower compared to the Government and some of the private colleges in the Presidency, the net expenditure has not gone up very much. In 1931 the total cost of the College to the Government was Rs. 1,86,422 while the net cost only Rs. 84,514. The average cost per student was Rs. 86. In 1925 the total cost was Rs. 1,52,402, while the net cost was Rs. 51,311, and the average cost per student was Rs. 60-14 As.. In 1915 the total cost was Rs. 92,488 and net cost Rs. 65,366, and the average cost was Rs. 123-14 As.. In 1905 the total expenditure on the College was Rs. 58,575 while net expenditure was Rs. 46,816 and the average cost per student was Rs. 205.

I have quoted these figures in detail which may perhaps cause weariness to the readers, but I have a motive in doing so. It has been insistantly remarked that the college expenses are going up. If however one looks at the net expenditure and the average cost of educating the college students, the statistics will clearly show that the average cost of educating the pupil has considerably gone down. It was Rs. 205 in 1905 while in 1931 it was only Rs. 86.

It would be interesting at this stage to compare the cost of educating a student in the Bombay Government Arts Colleges with that in Baroda College. In 1931 the cost of educating a student in the Bombay Government Colleges went up from Rs. 342 to Rs. 502, and the cost to Government from Rs. 190 to Rs. 335 as compared with the preceding year. In the Royal Institute of Science, the average annual cost per student increased from Rs. 690 to

Rs 701, and the cost to Government from Rs. 247 to Rs. 266. These figures will give one the idea of the cheapness of Baroda education.

I have not referred yet to the rapid growth of science classes in the College. From the starting of the science class in 1887 upto 1907, 16 students from the College passed the Inter Science examination, and 19 had passed the B.Sc. examination. The total successes now are 586 for the Inter Science, and 408 for the B. Sc. In the year 1931 alone the Baroda College sent up 108 students for Inter Science of whom 55 passed, and in B. Sc. 57 of whom 45 passed.

This growing popularity of science induced His Highness' Government to construct a new Science Institute, and when it would be completed the College will be able to take up more boys for the science courses.

As far as the results of the Baroda College are concerned they are fairly satisfactory. As Principal Burrow remarked in his speech at the time of the Golden Jubilee of the College, " We are not usually at the top of the list in order of percentage of success. Neither are we at the bottom or any where near it. We are well up among the best colleges. "

In the year 1915 His Highness established a chair of comparative religion, and Professor Widgery was appointed to it. The department of comparative religion and the Seminar continued till 1922 when it was closed. His Highness has a very wide and tolerant religious outlook. He thought that the study of comparative religion may widen the religious outlook of his people, and may bring about a more scientific study of Hindu religion. In 1931 the chair of the comparative religion was again revived, and Prof. Buch was put in charge of that department.

In his religious outlook there is a close resemblance between his Highness and Akbar. His Highness has a speculative bent of mind. His training in philosophy and his fondness for that subject have accentuated the reflective mood in his temperament.

The solitary musings of Akbar in Fatehpur Sikri led him to the establishment of his "Din Illahi" faith. He invited religious discussions in his Ibadat Khana with a view to a better understanding of moral and ethical principles which every great religious system embodies. He also thought that the proper understanding by men of one faith of religious professions of those belonging to another faith would clear men's mind of bigotry, narrowness of religious outlook and introduce a spirit of toleration. Akbar hated cant and hypocracy of the Ulemas and their pretentions to monopoly of truth. "He had in fact reasoned himself out of belief in all dogmas and in all accepted creeds."

Like Akbar His Highness has no belief in the arrogance of the priesthood and its pretensions to be the sole custodian of divine truth. There is good in every religion and everyone must try and understand sympathetically the religious professions of a man of different faith. It is only the correct knowledge of different forms of religion that would destroy religious fanaticism and bigotry and nowhere is it more necessary than in India where religious fanaticism is as rampant even to-day as in Europe of the 16th and 17th century.

Besides a better understanding of other forms of religion His Highness wanted a more scientific study of Hindu religion. Superstitious beliefs had crept in the body of the Hindu religion. Outward forms and ceremonies had become more important while the real spirit and essence of Hindu religion was being forgotten. People confounded these out-

ward forms with religion itself, and the husk became more important than the kernel itself. Customs which are harmful to the Hindu Society like early marriages, untouchability, minute caste divisions are adhered to under the false sanction of religion.

It is against this tyrrany of customs and superstitions masquerading under the garb of religion that His Highness throughout his life has protested. He has been misunderstood, and people have thought that he is an atheist.

On the whole he is a profoundly religious man, but he refuses his religious beliefs to be circumscribed by any one form or system of religion.

" Obedience is not in prostration on the earth, practice sincerity, for righteousness is not borne upon the brow."

The College has been lucky in getting a succession of able principals assisted by capable members of the staff. Mr. Tait, Mr. Littledale, Mr. Clarke, Mr. Masani and Mr. Burrow have brought the College to its present efficient condition.

Before I take up the growth and development of the high schools in the State, I would like to say a few words about the much discussed idea of the Baroda University. The idea of a separate Baroda University had as early as 1909 engaged the attention of His Highness. Looking up at the old files of the College I found the following Memorandum written by Principal Clarke:

" Some time back His Highness the Maharaja Saheb was pleased to direct me to enquire into the possibility of the foundation of an University of Gujarat and Kathiawad to which the colleges of Baroda, Ahmedabad, Bhavnagar and Junagadh would be affiliated. I have accordingly made enquiries, and now have the honour to submit the following minute for His Highness' information. Mr. Robertson the

newly appointed Principal of the Gujarat College having talked over the matter with the gentlemen of Ahmedabad and with the Educational inspector N. D. writes that he regrets to find that there is but little prospect of success for such an university, either in the near or more remote future .................I have carefully thought over the matter and am myself forced to the conclusion that it would be unwise for the State to determine on much increased expenditure on higher education for many years to come.................. Considering the many calls on the State purse in this and in other directions, I fear that we must for the present relinquish the very attractive idea of having either an university of our own or one in combination with Ahmedabad and Kathiawad."

This "very attractive idea" however had captured the imagination of His Highness and again a little later Mr. Sheshadri, then Professor at the Benares University, was asked to submit a scheme for Baroda University. In 1925-26 a regular Commission was appointed under Mr. Widgery. The Commission published a report embodying a scheme for Baroda University but somehow the idea of starting an university was dropped.

At the time of the Golden Jubilee of the College on the 25th December 1932 His Highness remarked that he had not quite abandoned the idea of an university for Baroda but he thought that the time was not yet ripe for its immediate establishment.

His Highness is not sure whether multiplication of universities which merely impart the students an exclusively literary and theoretical knowledge is necessary. There is a plethora of graduates but what India wants today are men of practical training and abilities. India is a country with vast potential resources but in the race for

industrial leadership of the world she has still remained considerably behind the leading countries of Europe and Japan. It is entirely due to the absence of men with practical training and lack of technical and scientific education in India. His Highness has a great faith therefore in technical training and it is that which led him to the establishment of Kalabhavan in 1890 for which Baroda is famous through out India and which draws students from all parts of India to-day. It is this firm conviction in the value of scientific education that has prompted him to build the Institute of Science.

Before the accession of His Highness to the Gadi in 1875 there was only one High School in Baroda established in 1871. His Highness realised the necessity of providing more schools for the imparting of English education. For official purposes the knowledge of English was getting every day more and more necessary, and he therefore saw the urgency of high schools in the district towns. Till 1890 there were only two Government high schools one at Baroda and one at Pattan and two aided high schools in Navsari and Gandevi. In 1895 the number of high schools in the State remained at the same figure. In 1905 there was an addition of one Government high school at Amreli. In 1915 the number of Government high schools had gone up to 5, and the number of State aided schools had also increased to five, two of which were established in Baroda. In 1924, the number of Government high schools had gone up to 15, and there were five State aided high schools. In 1931 the number of Government high schools continued to be 15 while the number of State aided high schools increased to 9. There are to-day Government high schools in each of the districts of the Baroda State, and the number of Government high schools in

Baroda district is 7 while that in Mehsana is four and Navsari 2. There is one Government high school in Amreli and Dwarka. The Baroda High School was established in 1871, and Mr. Pope was one of its earliest European Principal. In 1876 Mr. Pope left and he was succeeded by Mr. Tait, and in 1879 Mr. Littledale was brought as a vice-principal.

The school for a long time sat in the college building. It was only in 1916 that the present building in which the high school is located was built. Till 1904 the English and Anglo-Vernacular education was under the charge of the Principal of the College who was also called the Director of Anglo-Vernacular Education. The total expenditure on Baroda High School in 1877 was Rs. 22,847, and in 1878 it was Rs. 25,000. The High School then included classes lower than the fourth standard also. The number of boys in the upper school was 56 in 1876, and 230 in 1886. The average cost of a high school student in 1886 was Rs. 86-0-0. In 1886 thirtythree students went up at the Matriculation examination and 25 of these were successful. In 1901 however the Baroda High School stood at the top and beat all other schools in the percentage of its successful candidates at the Matriculation examination of the year. " 82 candidates were sent up for the examination and of these no less than 53 passed. This, the best result ever achieved here, has placed Baroda at the head of the list of schools in the Bombay Presidency as regards the Matriculation examination."

In 1931 there were 1,048 students in Baroda High School. The High School sent up 195 students of whom 119 passed. The total expenses in 1931 came up to Rs. 88,248 and the net expenditure to Rs. 60,870, and the average cost of educating a student in the High School came to Rs. 59. The district high schools are steadily

जो खर्च करण्याचें मी धारिलें आहे त्याचा मोबदला मला दुसऱ्या कोणत्याहि कामांत मिळाला नाहीं तरी चालेल. परंतु या खर्चाचा मोबदला मला पूर्णपणें मिळण्यासाठीं प्रजेनें मदत केली पाहिजे. ती मदत अशी कीं, दरेक आईबापांनीं आपल्या मुलांना फरज पाडल्याप्रमाणें फक्त तिसऱ्या इयत्तेपर्यंतच न शिकवितां निदान पांचव्या इयत्तेपर्यंत त्यांचा अभ्यास करवावा. जर याप्रमाणें होईल तर माझ्या मेहनतीचें फळ मिळेल. नाहीं तर ती व्यर्थ जाण्याचा संभव आहे. तरी माझ्या हयातींत तसेंच पश्चात हें महान् कार्य सुधारून घेण्याचें प्रजेचेंच स्वाधीन आहे." तसेंच त्याचप्रसंगीं मुलींना उद्देशून श्रीमंत म्हणतात, "मुलींनीं देखील तितकाच अभ्यास करणें जरूर आहे. सांसारिक रीतिरिवाजामुळें वाटेल त्या अडचणी येत असल्या तरी त्या दूर करून दरेक मुलीकडून निदान पांचव्या इयत्तेपर्यंत अभ्यास पुरा करविण्याची तुम्ही जाहीर हिंमत दाखवावी."

सक्तीच्या शिक्षणाची वयोमर्यादा हिंदुमुलींच्या बाबतींत वर्षें १२ धरली, पारशी मुलींचे बाबतींत वर्षें १५ धरली. या पथ्यकर सक्तीचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं, जीं रूपांतरें स्वयंप्रेरणेनें शंभर वर्षांत होणें शक्य नाहीं तीं पांच पंचवीस वषात सहज दिसूं लागलीं. श्रीमंतांच्या इच्छेला गोड फळें आलीं, व त्यांचा मधुर आस्वाद घेण्याइतकी तत्परता व क्षमता शिक्षणेच्छु विद्यार्थिनींनींहि मोठ्या अगत्यानें दर्शविली. अशा रीतीनें साक्षरतेचा प्रसार करण्याचे श्रीमंतांचे प्रयत्न फलद्रूप होऊं लागले.

**इंग्रजीशाळा**—विद्यार्थिनींची संख्या वाढूं लागली तसतशी प्राथमिक शाळांचीहि संख्या वाढली. नंतर साहजिकच इंग्रजी शाळेची गरज भासूं लागली. इ. स. १९०७ सालीं पेटलाद, पाटण, विसनगर येथें इंग्रजी वर्ग उघडण्यांत आले. अनुभवी शिक्षकवर्ग या कामीं नेमला. तथापि सामान्यतः लोकांनीं जेवढी आस्था व कळकळ या कार्यांत दाखविणें इष्ट व जरूर होतें तेवढी प्रथम त्यांनीं दाखविली नाहीं. इंग्रजीविषयीं प्रेम अद्याप निर्माण झालें नव्हतें. पालकांना आपल्या मुलीं इंग्रजीशिक्षण घेण्यास पाठविणेंची उपयुक्तता लवकर पटेना. इंग्रजीशिकून नोकऱ्या तर मिळवावयाच्या नाहींत असे त्यांचे विचार. साहजिकच शिक्षणेच्छू मुलींची संख्या प्रारंभीं अगदींच अल्प होती. सन १९०८ सालीं पेटलादच्या शाळेंत २१ मुली होत्या, पट्टणला ४१ तर विसनगरला अवघ्या २३ होत्या.

सन १९०५ सालीं प्रथम बडोद्यांत फीमेल ट्रेनिंग कॉलेजमध्यें इंग्रजीचा

प्रारंभ झाला. मराठी शाळांतून बाहेर पडलेल्या कांहीं दक्षिणी व गुजराती विद्यार्थिनी त्या वर्गांत दाखल झाल्या. लवकरच त्यावर्गाचें एका हायस्कूलमध्यें रूपांतर झालें. सन १९१०-११ सालीं सदर शाळेला मुंबई विश्वविद्यालयानें आपली मान्यताहि दिली. त्या सालीं शाळेंत विद्यार्थिनींची संख्या १७१ होती, व त्यापैकीं एक विद्यापीठाच्या प्रवेशपरीक्षेला बसून उत्तीर्णहि झाली !

गेल्या वीस वर्षांत या परिस्थितींत केवढें स्थित्यंतर झालें आहे ! सन १९३०-३१ च्या शाळाखात्याच्या सरकारी रिपोर्टांत इंग्रजी शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थिनींची संख्या ७१७ दिली आहे. ज्या हायस्कूलांत शेंदोनशें विद्यार्थिनी असण्याची पंचाईत तेथें सन १९३०-३१ सालीं ५६७ विद्यार्थिनी होत्या व आज तर ती संख्या याहूनहि अधिक आहे. जी शाळा पुरेशा संख्येचे अभावीं फार मोठी वाटे तीच आज अत्यंत अपुरी पडत असून एवढे मोठमोठे व इतके वर्ग बसवावे कसे अशी अडचण पडूं लागली आहे. विश्वविद्यालयाच्या परीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थिनींची संख्या वाढत आहे. शिक्षण घेणारांची हौस येथेंच विराम न पावतां, उच्च शिक्षणाचा प्रांत न्याहाळावा, तेथील रमणीयता अनुभवावी असें तिला वाटत आहे. साहजिकच कॉलेजांत उच्च शिक्षण घेणारांची संख्या बोटांच्या संख्येची मर्यादा ओलांडून आतां गेली आहे.

**अभ्यासक्रम**—शाळेच्या अभ्यासक्रमांत इंग्रजी, गणित, भाषा, सायन्स इत्यादि मुलांच्या शाळांतील विषय तर येतातच; त्याशिवाय शिवणकाम, विणकाम, चित्रकला, गायन, स्वयंपाक इत्यादि गृहोपयोगी व स्त्रीजीवनोपयोगी विषयांचाहि अंतर्भाव होतो. अर्थात कांहीं विषय फक्त खालच्या वर्गांनाच घ्यावे लागतात. प्रवेशपरीक्षेला मुंबई विश्वविद्यालयानें मान्य केलेले विषय व मान्य केलेली अभ्यासपद्धति अवलंबावी लागते.

**उच्च शिक्षण**—मुंबई विश्वविद्यालयाच्या परीक्षेंतून उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थिनी पुढें कॉलेजचें उच्च शिक्षण घेऊं लागल्या. सन १९२४-२५ सालीं त्यांची संख्या १३ होती. ती वाढत वाढत सन १९३१-३२ सालीं ३३ झाली. या क्रमवार वाढीवरून निष्कर्ष असा निघतो कीं, शिक्षणेच्छु विद्यार्थिनींचा उत्साह अखंड असून त्यांची ज्ञानक्षुधा अद्याप अतृप्तच आहे.

**महाराणी चिमणाबाई महिला पाठशाळा**—ह्याच स्थलीं एका संस्थेचा विशेष उल्लेख केला पाहिजे, ती म्हणजे महिला पाठशाळा. मुंबई विद्यापीठाचा

अभ्यासक्रम मुलांच्या गरजा व मनोभूमिका लक्ष्यांत घेऊन आंखलेला आहे. स्त्रियांच्या गरजा, त्यांची मनोभूमिका, त्यांचा स्वाभाविक कल, ह्यांचा त्यांत विचार नाहीं. मुलींच्या स्वतंत्र शाळा झाल्या पण अभ्यासक्रम बहुतांशीं मुलांचाच राहिला. त्यांच्या अभ्यासांत एक प्रकारची अस्वाभाविकता होती ती दूर झाली नाहीं. शिवाय अभ्यासक्रमांत मातृभाषेला जें महत्व प्राप्त होणें जरूर आहे तें तिला त्या अभ्यासक्रमांत नव्हतें, व तिचा दर्जाहि अगदीं निकृष्ट होता. ही अस्वाभाविकता दूर व्हावी, स्त्रियांचा कल लक्ष्यांत घेऊन अभ्यासक्रम आंखलेला असावा, त्यांच्या शिक्षणांत ललित विषयांनाहि योग्य स्थान मिळावें, व विशेषतः मातृभाषेला प्रधानपद प्राप्त व्हावें म्हणून पुण्याला भारतवर्षीय महिला विद्यापीठ स्थापन झालें. ह्या शिक्षणक्रमाची उपयुक्तता पटून सदर विद्यापीठाचे प्रवेशपरीक्षेचे वर्ग मुलींच्या हायस्कूलांत सुरू झालें. त्यांतून विद्यार्थिनी उत्तीर्ण होऊं लागल्या. परंतु त्यांच्या उच्च शिक्षणाची सोय नव्हती. तेवढ्यासाठीं इतरत्र सांगितल्याप्रमाणें श्रीमंत सौभाग्यवती मा. महाराणीसाहेब यांच्या प्रोत्साहनानें व आर्थिक साहाय्यानें 'महाराणी चिमणाबाई महिला पाठशाला' या नांवाची भारतवर्षीय महिला विद्यापीठाचें उच्च शिक्षण देणारी एक संस्था गांवच्या राजमान्य व लोकमान्य मंडळींनीं स्थापन केली. संस्था खाजगी पण तिला श्रीमंताचा आश्रय व आशीर्वाद. सन १९२३ सालीं सुरवातीस या सस्थेंत फक्त ३ विद्यार्थिनी होत्या. परंतु ही संख्या वाढत जाऊन सन १९३०–३१ सालीं ती २५ वर गेली. आज संस्थेंत ३६ विद्यार्थिनी सांस्कृतिक उच्च शिक्षण घेत आहेत. ही वाढ संस्थेची उपयुक्तता व इष्टता पटविते. मुंबई विद्यापीठाचे अभ्यासाकडे विद्यार्थिनींचा जितका ओढा आहे तितकाच या भारतवर्षीय विद्यापीठाचे अभ्यासक्रमाकडे आहे. इतकेंच नव्हे तर मुंबई वियपीठाचे प्रवेशपरीक्षेंत उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थिनीहि उच्च शिक्षणाकरितां महिला पाठशालेंत दाखल होत आहेत. ही गोष्ट या शिक्षणक्रमाला व संस्थेला भूषणावह आहे. प्रजेच्या गरजेनुसार व तिच्या कल्याणासाठीं शिक्षणाची अशी विविध रीतीनें सोय करण्यांत श्रीमंतांच्या दृष्टीची व्यापकताच दिसते, व अशा संस्थेची जोपासना व वृद्धि करण्याचें औदार्य श्रीमंत प्रकट करीत आहेत, हें त्यांस भूषणावह आहे.

**महिला पाठशालेचा अभ्यासक्रम**—भारतीय विद्यापीठाचें वैशिष्टय हें कीं, त्यांत मातृभाषेला प्रधान पदवी असून गृहजीवनशास्त्र, मानसशास्त्र,

शिशुमानसशास्त्र, समाजशास्त्र इत्यादि घराला व समाजाला उपयोगी विषय आवश्यक आहेत. इंग्रजी भाषेचें अध्ययन तर आहेच; शिवाय चित्रकला, गायन, शिवणकाम इत्यादि ललितकला हे विषय वैकल्पिक आहेत. संस्कृतादि भाषांचा अभ्यासहि इच्छेनुसार करतां येतो.

**फीमेल ट्रेनिंग कॉलेज**—विद्यार्थिनींच्या प्राथमिक शिक्षणाची सोय झाली, पण तेवढ्यानें शिक्षण सुंदर व परिपूर्ण होऊं शकत नाहीं. तें देण्यासाठीं स्त्रीशिक्षकांचीहि जरुरी असते. विद्यार्थिनी स्त्रीशिक्षकांकडून जितक्या निःसंकोचपणें व सहज ज्ञान घेऊं शकतात तितकें त्यांना पुरुषशिक्षकांकडून घेणें जमत नाहीं. एतदर्थ स्त्रीशिक्षक तयार करणेंसाठीं फीमेल ट्रेनिंग कॉलेज स्थापन करण्यांत आलें. या संस्थेची अन्यत्र सविस्तर माहिती दिली असल्यानें येथें तिचा ओझरताच उल्लेख केला आहे.

**झनानावर्ग**—स्त्रियांचा असा एक वर्ग आहे कीं, जो पडदानशीन आहे. त्याला शिक्षणाची हौस आहे, पण उघड्यावर येऊन शिक्षण घेणेंची सोय नाहीं. अशा पडद्याआड असलेल्या स्त्रियांपावेतोंहि शिक्षणाचा प्रकाश जाऊन पोहोंचावा, त्यांना मानसिक व बौद्धिक आरोग्य प्राप्त व्हावें म्हणून ठिकठिकाणीं झनानावर्ग काढण्यांत आले. हे वर्ग दुपारीं तीन तास भरतात, व लिहिण्यावाचण्याशिवाय त्यांत गृहोपयोगी शिक्षण देण्यांत येतें. हिशेब ठेवणें, शिवणकाम, भरतकाम यांकडे विशेष लक्ष्य असतें. सन १८९५–९६ सालीं असे वर्ग ८ होते व त्यांत शिकणारांची संख्या २७८ होती. सन १९१०–११ सालीं २१० स्त्रिया झनानावर्गांत शिकत होत्या. सन १९२९–३० सालीं बडोद्याला ५५ स्त्रियांचा एक सरकारी, आणि कठोर व पेटलाद येथें ५२ व ४८ अशा संख्यांचे खाजगी दोन वर्ग होते. पडदानशीनत्वाचा अद्यापहि अवशेष आहे, हें लक्ष्यांत घेतां अशा वर्गांची अजूनहि उपयुक्तता वाटते.

**मागासलेल्या जातींच्या व अस्पृश्यांच्या शिक्षणाचा प्रयत्न**—शिक्षण संस्थांचा उगम व विकास सांगतांना श्रीमंतांनीं मागसलेल्या जातींच्या व विशेषतः अस्पृश्यांच्या शिक्षणाची आस्थेनें जी तजवीज केली तिचा विशेष उल्लेख करावासा वाटतो. त्यांनीं मागसलेल्या जातींच्या विद्यार्थिनींना शिष्यवृत्त्या देऊन शिक्षणोन्मुख केलें. अस्पृश्यांकरितां सोयीच्या शाळा घातल्या.

त्यांना विद्यादेवीचें मंदिर उघडून दिलें. तिचें सौंदर्य त्यांना दिसेल, त्यांना तें जवळ जाऊन पहावेसें वाटेल अशी सिद्धता केली. साहजिकच मागसलेल्या वर्णाच्या व अस्पृश्य म्हणून आजवर दूर लोटलेल्या जातींच्या मुलीहि मुलां-बरोबर त्यांच्या इतक्याच भराभर साक्षर होऊं लागल्या. त्यांचेवरचा अवि-द्येचा कलंक पुसून टाकणेंस सुरवात झाली. आज अस्पृश्यतेच्या मुळाशींच कुऱ्हाड घालून त्यांच्या जीवनावरचाच कलंक श्रीमंतांनीं धुवून टाकणेंचें आरंभिलें आहे. श्रीमंतांनीं त्यांना देवमंदिरेंहि उघडलीं व विद्यामंदिरेंहि स्पृश्यांच्या बरोबरीनें उघडीं केलीं.

**चिमणाबाई स्त्री उद्योगालय**—घरगुती स्त्रियांना रिकाम्या वेळांत कांहीं तरी उपयुक्त कला यावी, विशेषतः शिवणकाम, भरतकाम यावें म्हणून चिम-णाबाई स्त्री विद्यालयानें उपक्रम केला व तो अद्याप चालू असून त्याचा फायदा अनेक स्त्रिया घेत असतात.

**शारीरिक शिक्षण**—बौद्धिक शिक्षणा इतकीच स्त्रियांना शारीरिक शिक्ष-णाचीहि अवश्यकता आहे. सुंदर मनाला धड शरीराचा आश्रय असावा लागतो. स्त्रियांच्या शारीरिक शिक्षणक्रमाविषयीं श्रीमंत म्हणतात, "स्त्रियांस शारीरिक कसरतीची फार जरूर आहे. संसारांत स्त्री व पुरुष उभयतां सुदृढ असलीं तरच तो सुखावह होतो.......मुलींच्या मनाची व शरीराची शक्ति पाहून त्यांस जरूरीचें शारीरिक शिक्षण देण्याचा प्रयत्न करावा." श्रीमंतांच्या इच्छेनुसार शाळेच्या अभ्यासक्रमांत अनेकप्रकारचे देशीपरदेशी वैयक्तिक व सांघिक खेळ दाखल करण्यांत आले. साहजिकच खेळांची हौस वाढली. आज बडोद्याच्या हिंदविजय जिमखान्यातर्फे स्त्रियांचें क्रीडासंमेलन होतें, सरकार त्याचा पुरस्कार करतें, स्त्रिया त्यांत शेंकड्यांनीं भाग घेतात, व सहजच स्त्रियांच्या शारीरिक विकासाला मदत होते.

**महिला पुस्तकालयें**—प्रत्यक्ष शिक्षणाबरोबरच अप्रत्यक्ष शिक्षणाचाहि उल्लेख अवश्य आहे. श्रवणज्ञानाइतकेंच वाचनापासून होणारें ज्ञानहि महत्वाचें आहे. स्त्रियांचेसाठीं वाचनालयांत एक स्वतंत्र राखीव विभाग असून त्यांत स्त्रियांना योग्य अशा पुस्तकांचा विपुल सांठा आहे. आपापल्या अभिरुची-प्रमाणें स्त्रिया त्याचा उपयोग करतात. शिवाय घर बैठ्या स्त्रियांच्या अगदीं

द्वाराशीं हें ज्ञान जाऊन पोहोंचावें म्हणून फिरतीं वाचनालयेंहि ठिकठिकाणीं हिंडत असतात.

**श्रीमंत सौभाग्यवती महाराणी साहेब यांची इच्छा व प्रयत्न**—श्रीमंत सरकार महाराजसाहेबांप्रमाणेंच श्री. सौभाग्यवती मातुश्री महाराणीसाहेब याहि स्त्रीशिक्षणाच्या कैवारी आहेत. स्त्रियांत शिक्षणाचा प्रसार आस्थेनें व तात्काल-व्हावा म्हणून त्यांनीं एक स्वतंत्र कायमनिधि ठेविला असून त्यांतून शिक्षणेच्छु, होतकरू पण निर्धन अशा विद्यार्थिनीस महाराणी चिमणाबाई शिष्यवृत्त्या देण्यांत येतात.

**उपसंहार**—"प्रजेचें कल्याण हेंच माझें कर्तव्य आणि तोच माझा मोक्ष" ही श्रीमंत महाराजांची प्रतिज्ञा. प्रजेचें कल्याण शिक्षणाशिवाय व विशेषतः स्त्रीशिक्षणाशिवाय होणें नाहीं, हें त्यांना निःसंदिग्ध पटलें. त्याच्या अनुरोधानें एकनिष्ठेनें त्यांनीं प्रयत्न सुरू केले. महाराजांच्या प्रयत्नाला गोड फळें आलीं. स्त्रीशिक्षणाचा प्रसार व्हावा, साक्षरता वाढावी, इतकेंच नव्हे तर इंग्रजीशिक्षण देणाऱ्या संस्थांची संख्या वाढावी, स्त्रियांच्या स्वतंत्र संस्था काढण्याचा सुयोगहि यावा इत्यादि श्रीमंतांचीं सुखस्वप्नें आज प्रत्यक्ष व्यव-हारांत अवतीर्ण झालेलीं दिसत आहेत. साक्षरतेचें प्रमाण वाढत आहे; विद्या-र्थिनी शेकड्यांनीं इंग्रजी शिक्षण घेत आहेत; फीमेल ट्रेनिंग कॉलेज स्त्रीशिक्ष-कांची उणीव दूर करित आहे; बडोदा कॉलेज, महाराणी चिमणाबाई महिला पाठशाळा या संस्थांतून अनेकविध विषयांचा उच्च दर्जाचा अभ्यास प्रौढ विद्यार्थिनी करित आहेत वगैरे सुंदर देखावा पाहून आज श्रीमंत महाराजांना सानंद अभिमान वाटला तरी तो योग्यच ठरेल. काळाच्या उदरांत काय आहे कुणी सांगावें ? उद्यां कदाचित बडोदा विद्यापीठ स्थापन होईल आणि त्याच विद्यापीठाच्या ह्या वर्धिष्णु संस्था होतील. आज मात्र प्रत्येक जण स्त्रीशिक्षणाच्या ह्या महनीय कामगिरीबद्दल श्रीमंत महाराजांना दुवा देईल व श्रीमंतांना व राज्याला भूषण असणाऱ्या ह्या सर्व संस्थांचा अधिकाधिक उत्कर्ष होवो असेंच इच्छील. शुभं भवतु ।

# बडोद्यांतील महिला अध्यापनशाळा

( लेखिकाः—श्रीमंत सौ. इंदिराबाई आंबेगांवकर, बडोदें. )

श्रीमंत सरकार महाराजसाहेब यांची विद्याप्रियतेबद्दल सर्वत्र ख्याति असून आपल्या प्रजाजनांना सुविद्य करण्यासाठीं त्यांनीं तनु-मन धनें करून आजवर अविश्रांत परिश्रम केले आहेत. ' Through-out my reign, education has been the object of my constant care and attention ' असें त्यांनी एका व्याख्यानप्रसंगीं सांगितलें व तें किती खरें आहे हें कोणीहि सुशिक्षित मनुष्य सांगू शकेल.

शिक्षणप्रसाराच्या कामीं महाराजसाहेबांना किती विरोध सहन करावा लागला, हें कोणास नव्यानें सांगावयास पाहिजे असें नाहीं. विरोधाची ही कमान स्त्रीशिक्षणप्रसाराच्या बाबतींत विशेष आढळून आली. पण तिनें निरुत्साही न होतां, अनेक अडचणीस तोंड देऊन, अविश्रांत परिश्रम करून, अंतःकरणाच्या खऱ्या तळमळीनें त्यांनी या कार्यास हात घातला व तें यशस्वी रीतीनें पार पाडलें, हें त्यांना खरोखर भूषण होय. महाराजांच्या या प्रयत्नांस कशीं गोड फळें आलीं आहेत, हें मागील लेखावरून कळून येईल. या लेखांत महिला अध्यापनशाळा ( फीमेल ट्रेनिंग कॉलेज ) या महाराजांनींच स्थापिलेल्या संस्थेनें या कार्यास कितपत मदत केली हेंच पहावयाचें आहे.

शिक्षणाची राज्यांत जसजशी वाढ होऊं लागली तसतशी शिक्षकांची उणीव जास्त भासूं लागली. ही उणीव दूर करण्याकरितां महाराजांनीं बडोद्यांत दोन अध्यापनशाळा ( ट्रेनिंग कॉलेजें ) काढल्या. यांपैकीं महिला अध्यापनशाळा स्थापन होण्यापूर्वी ९ विद्यार्थिनींना शिक्षणशास्त्राचें शिक्षण देण्यांत आलें. परंतु स्त्रीशिक्षणप्रसाराच्या दृष्टीनें ही संख्या फारच अपुरी होती. स्त्रीशिक्षणाचा झपाट्यानें प्रसार होण्यास व तो कायम टिकून मोठ्या मुलींना आपली विद्यासंपादनाची भूक भागवितां यावी म्हणून ज्यास्त स्त्रीशिक्षक तयार करणें जरूर होतें. ते तयार करण्यासाठीं सन १८९३ मध्यें महिला अध्यापन शाळा सुरू करण्यांत आली. दोन वर्षांनंतर या शाळेसाठीं रु. ९२,०३० खर्च करून एक स्वतंत्र इमारत बांधण्यांत आली. प्रारंभीं आपलें शिक्षण संपल्यावर नाकरी मिळून आपल्या चरितार्थाचा प्रश्न सुटेल. या आशेनें या शाळेंत फक्त प्रौढ विधवा स्त्रियाच दाखल होत; पण अलीकडे सर्व जातीच्या व अनेक धंद्याच्या स्त्रिया ( सुवासिनी व कुमारिका ) या

संस्थेचा लाभ घेत आहेत. न्हावी, कुंभार, अंत्यज, या सारख्या मागासलेल्या जातींतील स्त्रियाहि या संस्थेंत शिक्षण घेत आहेत, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. महाराजांनीं चारपांच महिन्यापूर्वीच्या एका हुकुमांत म्हटल्याप्रमाणें या स्त्रिया शिकून तयार झाल्या म्हणजे आपआपल्या जातींत शिक्षणाचा प्रसार करण्यास मदतरूप होतील.

खालील कोष्टकावरून या शाळेची प्रगति कसकशी होत गेली, हें कळून येईल.

| साल | विद्यार्थिनींची संख्या |
|---|---|
| १८८२–८३ | ९ |
| १९००–०१ | २७ |
| १९१०–११ | ६९ |
| १९२९–३० | १७५ |
| १९३०–३१ | १७९ |
| १९३१–३२ | २३४ |

दूरच्या प्रांतांतून फीमेल ट्रेनिंग कॉलेजचा लाभ घेऊं इच्छिणाऱ्या विद्यार्थिनींसाठीं इ. स. १९०९ च्या सप्टेंबर महिन्यांत एक वसतिगृह स्थापन करण्यांत आलें. प्रथमतः कॉलेजची मुख्य अध्यापिका या वसतिगृहांतील मुलींवर देखरेख करीत असे; परंतु अलीकडे वसतिगृहासाठीं स्वतंत्र लेडी सुपरिंटेंडट नेमण्यांत येऊं लागली आहे.

फीमेल ट्रेनिंग कॉलेजचा अधिक विद्यार्थिनींनी लाभ घेऊन, तेथील शिक्षण संपूर्ण करून, शिक्षकिणी म्हणून बाहेर पडावें, व अशा रीतीनें, स्त्रीशिक्षणाला व पर्यायानें स्त्रियोन्नतीला मदत करावी, या हेतूनें, इ. स. १९०४-०५ सालीं दरमहा रु. २०० च्या शिष्यवृत्त्या महाराजांनीं मंजूर केल्या. हल्लीं शिष्यवृत्त्यांसाठीं दरमहा रु. २,०५० खर्च कण्यांत येत असतात.

वसतिगृहांतून जरी रहाण्याची व जेवणाची उत्तम सोय करण्यांत आली होती, तरी सुद्धां बाहेरगांवच्या मुलींची संख्या अपेक्षेप्रमाणें वाढेना. अमरेलीसारख्या लांबच्या प्रांतांतील मुली बडोद्यास येऊन राहूं इच्छीनात. याकरितां सरकारांतून इ. स. १९१४-१५ सालीं अमरेली प्रांतांत या कॉलेजाची एक शाखा उघडण्यांत आली. इ. स. १९२२-२३ सालीं ती शाखा मेहसाणा प्रांतांत नेण्यांत आली. हल्लीं ही शाखा बंद करण्यांत आली आहे.

खेड्यांतील लोकांची व विशेषतः शेतकरीवर्गाची प्रगति होण्यास शाळांचीच मदत होणार आहे हें लक्षांत घेऊन वेळोवेळीं शिक्षकवर्ग सुधारणें, वाढविणें, अभ्यासक्रम बदलणें, वेळापत्रकांत फेरबदल करणें इत्यादि सुधारणा करून विद्यार्थिनींची शारीरिक व मानसिक उन्नति करण्याचा व त्यांची कर्तृत्वशक्ति वाढविण्याचा नेहमीं प्रयत्न करण्यांत येत असतो. सन १९१७-१८ सालीं अध्यापनशाळेच्या अभ्यासक्रमांत स्लॉइड (Sloyed) चा समावेश करण्यांत आला. सन १९२०-२१ मध्यें किंडरगार्टन मेथड-बालशिक्षण पद्धति सुरू करण्यांत आली व शारीरिक शिक्षणहि याचसालीं सुरू करण्यांत आलें. इ. स. १९२१ मध्यें गर्ल गाईड व गृहजविनशास्त्र ( Domestic Science ) हे विषय सुरू करण्यांत आले. विद्यार्थिनींना संसाराची गोडी लागावी याकरितां त्यांना भरतकाम, चित्रकला, विणकाम, शिवणकाम, गायनवादन, व स्वयंपाक इ. भिन्नभिन्न रुचीस पटणारे विषय शिकविण्याची सोय करण्यांत आली. विद्यार्थिनींच्या अंगीं सार्वत्रिक ज्ञान यावें व त्यांना माहिती मिळावी यासाठीं त्यांना ऐतिहासिक स्थळें व क्षेत्रें दाखविण्याची सोय करण्यांत आली, व देशांतील इतर स्त्रियांच्या स्थितीबद्दल व उन्नतीबद्दल माहिती करून देण्याची व्यवस्था करण्यांत आली. सभा, प्रदर्शनें, खेळ, चढाओढी, इत्यादिकांत विद्यार्थिनी भाग घेऊं लागल्या. हल्लीं त्यांना खेड्यांची सुधारणा, आरोग्यरक्षण, रोगनिवारण यांसारखे विषय शिकविण्यांत येत असून विद्वान् वक्त्यांना निमंत्रण करून वरील सारख्या विषयांवर भाषणें करविण्यांत येत असतात.

शालागृहें हींच कर्तृत्वाचीं मुख्य केंद्रें व्हावीं यासाठीं वरीलप्रमाणें प्रयत्न मुख्यतः करण्यांत आले.

विद्यार्थिनींना शिक्षकिणींच्या कामाचा सराव व्हावा यासाठीं ट्रेनिंग कॉलेजाला एक गुजराथी व एक मराठी याप्रमाणें दोन प्रॅक्टिसिंग स्कूल्स जोडण्यांत आलीं. या ठिकाणीं शिक्षकिणींच्या देखरेखीखालीं, विद्यार्थिनींकडून काम करवून घेतलें जातें. शिवाय येथें गायन, वादन, चित्रकला, शिवण, भरतकाम व विणकाम यांसारखे उपयुक्त विषय शिकविण्यांत येतात. या ठिकाणची विद्यार्थिनींच्या संख्येची झपाट्यानें होत असलेली वाढ पाहिली म्हणजे या जोड-शाळांची लोकप्रियता व उपयुक्तता लक्षांत येते.

मुलींच्या शाळांवर सर्वच स्त्रीशिक्षक असणें अवश्य आहे, व हेंच धारण राखून सरकारकडून व खात्याकडून हरतऱ्हेची खटपट व अविश्रांत

श्रम करण्यांत येत आहेत. तरीसुद्धां राज्यांतील सर्व शाळांमधून स्त्रीशिक्षकिणी पुरविण्याचें काम संपूर्णत्वानें अजूनपर्यंत पुरें झालें नाहीं. स्त्रीशिक्षणाची वाढ दिवसेंदिवस अधिकाधिक व्हावयास हवी असेल तर त्याकरितां सर्व शाळांना स्त्रीशिक्षकिणी पुरविणें अत्यावश्यक आहे, व त्या तशा पुरविल्या जातील अशी आम्हांस सबळ आशा आहे.

राज्यांतील स्त्रीवर्गांत साक्षरतेची वाढ होण्यास ही शाळा कशी उपकारक झाली आहे हें इतरत्र दिलेल्या आंकड्यांवरून कळून येईल. पुरुषवर्गाप्रमाणेंच देशांतील स्त्रीवर्ग साक्षर व्हावा व त्यावरील कृत्रिम व सद्यःस्थितींत अनावश्यक असलेली सामाजिक बंधनें दूर व्हावींत असें श्री. महाराजसाहेबांचें मत असून आपल्या गेल्या ५८ वर्षांच्या कारकीर्दींत त्यांनीं स्त्रियांची स्थिति सुधरण्यासाठीं अनेक कायदे पास केले आहेत. या कामीं श्री. सौ. मा. महाराणीसाहेब यांची त्यांना पूर्ण मदत असून स्त्रियोन्नतीच्या प्रत्येक कार्यास त्यांची सहानुभूति असते.

अलेक्झांडर यानें हिंदुस्थानावर स्वारी केल्याचा काळ फार प्राचीन व ती स्वारी तात्पुरती म्हणून तो काळ लक्षांत घेतला नाहीं, तरी गेलीं हजार आठशें वर्षें तरी हा हिंदुस्थान स्वातंत्र्यविन्मुख झालेला आहे. स्मृतिपुराणादि ग्रंथांतून विदुषी स्त्रियांचीं कांहीं नांवें येतात; परंतु त्यानंतर स्त्रीशिक्षणालाच काय, पण बहुजनसमाजांतील पुरुषांनां सुद्धां शिक्षण मिळालें नसावें असें छत्रपति शिवाजीमहाराज निरक्षर होते ( ? ) यावरून सहज सिद्ध होतें. सारांश, आमचें स्वातंत्र्य गमविल्यावर ज्या अनेक आपत्ति हिंदुस्थानावर कोसळल्या, त्यांतील शिक्षणबंदी ही आपत्ती फारच भयंकर व सर्व नाशकारी अशी झालेली आहे. या दृष्टीनें विचार केला म्हणजे लक्षांत येतें कीं, श्रीमंत महाराज साहेबांनीं स्त्रीपुरुषांना समानशिक्षण देण्याचा उपक्रम आपल्या राज्यांत पन्नास वर्षांपूर्वी सुरू केला, हें खरोखरी त्यांचें महत्कृत्य होय. किंवा खरें सांगावयाचें म्हणजे निदान गेल्या हजार आठशें वर्षांत तरी श्रीमंत महाराजसाहेबांची बरोबरी करूं शकेल असा एकहि राजा हिंदुस्थानांत झाला नाहीं असेंच म्हणावें लागतें. शिवाजी महाराजांचें कर्तृत्व असामान्य असल्यानें त्यांची गणना रामकृष्णांप्रमाणें अतिमानुष कोटींतच करावयाची आहे, हें सतत लक्षांत ठेविलें पाहिजे. सारांश, श्रीमंत महाराजसाहेबांच्या अशा अनेक कर्तृत्वामुळें आम्हां प्रजाजनांना, आम्हीं रामराज्यच अनुभवित आहोंत असें वाटतें, व हें रामराज्य आम्हांस सतत लाभावें अशी आम्हीं परमेश्वराजवळ प्रार्थना करतों.



---

# મહારાજા ગાયકવાડ અને સ્ત્રી કેળવણી.

(લેખિકાઃ—શ્રી. સૌ. સરલા મહેતા.)

સને ૧૯૦૪ ની સંસારસુધારાપરિષદ્‌ના પ્રમુખપદેથી શ્રીમંત સયાજીરાવ મહારાજાએ ઉચ્ચારેલા નીચેના શબ્દો ગુજરાતના સામાજિક ઇતિહાસમાં માર્ગ-દર્શક તરીકે લેખાશે. શ્રીમંતની નજર આજ ને કાલ ઉપર નહિં પણ જમાના ઉપર રહે છે. તેમના હૈયામાં અજ્ઞાન ને દારિદ્ર્યમાં સબડતા હિન્દુ સમાજ માટે ઉંડી ઉંડી લાગણી છે અને તેના ઉદ્ધાર માટે શું પગલાં લેવાં તે નિરંતર વિચાર્યા કરે છે. તેમણે કહ્યું હતું કે “ આપણા દેશમાં સ્ત્રીઓને કેલવણી વિહીન રાખીને આપણે પ્રજાનું અડધું બળ ગુમાવીએ છીએ અને આપણાં બાળકોને સંસ્કારી માતાના અનેક ફાયદા મળી શકે તેનાથી વિમુખ રાખીએ છીએ. ભવિષ્યની માતાઓની બુદ્ધિની યોગ્ય ખીલવણી નહિ કરવાથી આપણી પ્રજાની ઉન્નતિમાં આડખીલીરૂપ બનીએ છીએ. ગૃહમાં પણ સ્ત્રી અને પુરુષની માનસિક શકિતમાં આસમાન-જમીનનો ફેર પડી જાય છે. સ્ત્રી રૂઢિપૂજક હોવાથી હરેક જુનાપુરાણા અવિચારી મતોને વળગી રહે છે અને તેથી સર્વે પ્રગતિની આડે આવે છે.”

શ્રીમંતે રાજ્યનું સુકાન હાથમાં લીધું ત્યારથી જ સંસારસુધારક તરીકે ઘણા પ્રખ્યાત થયા છે. એમની દીર્ઘ દૃષ્ટિ અને વિચારોની ઉદારતા માટે તેમને અનેકાનેક ધન્યવાદ ઘટે છે. અડધા સૈકા ઉપર આપણા સમાજમાં સ્ત્રીઓની સ્થિતિ દયાજનક હતી. રૂઢિ અને અજ્ઞાનનું રાજ્ય પ્રવર્તેલું હતું. સ્ત્રીઓને શિક્ષણ આપવાની વાત કોઇને ગળે ઉતરતી ન્હોતી. તે જમાનામાં પણ સ્ત્રીઓને કેળવણી આપવાનો શ્રીમંતે નિશ્ચય કર્યો હતો. જે કન્યાઓ ભવિષ્યમાં માતા થવાની તેજ અજ્ઞાન હોય તો પ્રજાના ભાવિમાં અજ્ઞાન શિવાય બીજું શું રહેવાનું ? પુરુષો ગમે તેટલા સુધા-રક થવાની ઇચ્છા ધરાવતા હોય પણ સ્ત્રીઓના સહકાર વિના શું કરી શકવાના હતા ! એ પ્રશ્નો શ્રીમંતને પ્હેલેથી જ ગુંચવતા હતા. આપણા સમાજમાં સ્ત્રીઓ અજ્ઞાન હોવાથી જ વ્હેમો અને રૂઢિઓ હાનિકારક હોવા છતાં નાબુદ નથી થઈ શકતાં. બાળમરણો, અનારોગ્ય, ગંદકી અને ગરીબાઇ એ સઘળાં એનાં જ ફળ છે. આવા વિચારોને લીધે શ્રીમંતે કન્યાકેળવણીને ખાસ મહત્ત્વ આપ્યું છે. રાજ્યના કન્યાકેળવણીના ઇતિહાસ ઉપર નજર નાખતાં જોઈ શકીશું કે તેની કેવી રીતે ધીમે ધીમે વૃદ્ધિ થઈ છે.

સને ૧૮૭૫ માં શ્રી. સયાજીરાવ ગાદી ઉપર આવ્યા ત્યાંસુધી શાળાઓની સંખ્યા નજીવી જેવી હતી. રાજ્ય તરફથી કેળવણીની સંસ્થા ઉપર કંઈ ખર્ચ થતો ન્હોતો. સને ૧૮૭૫ માં કન્યાકેળવણીનાં પ્રથમ મંડાણ બે શાળા—એક ગુજરાતી અને એક મરાઠી—એ રૂપે થયાં. આ કાર્યનો માર્ગ સહેલો ન્હોતો. પ્રજામત કન્યા-

કેળવણીની તરફેણમાં ન્હોતો થયો. બાળલગ્નની પ્રથા પણ હયાતીમાં હતી. કોઈ કોઈ સંસ્કારી ઘરોમાં ખાનગી રીતે કન્યાઓને શિક્ષણ અપાતું પણ શાળામાં તેમને મોકલનાર થોડા જ નીકળતા.

સને ૧૮૮૨ માં આખા રાજ્યમાં ૧૨ કન્યાશાળાઓ હતી. તેમાં ૧,૦૭૦ કન્યાઓ અભ્યાસ કરતી હતી.

કન્યાશાળા શરૂ થયા પછી અનુભવ ઉપરથી જણાયું કે આપણા રૂઢિઓથી દબાયેલાં અને લાજ મ્હલાજાના વિચારવાળાં કન્યાનાં માબાપ તેમને શાળામાં મોકલતાં ખંચકાય છે તેનું એક મોટું કારણ સ્ત્રીશિક્ષિકાઓનો અભાવ એ છે. પણ સ્ત્રીશિક્ષિકા લાવવી ક્યાંથી ? હિન્દુ સંસારમાં સ્ત્રીને ધંધો કરવાનો નથી હોતો. જેટલી સ્ત્રી જન્મે તે ઘર સંસાર માંડવા. " ડોસી કોઈ દિવસ કુંવારી ના હોય " એ કહેવત સાચી જ હોય છે. વિધવા હોય તેનાથી તો વળી ઘરના ખુણામાંથી બ્હાર પણ ના પડાય. આવી વસ્તુસ્થિતિમાં ૧૮૮૨ માં સ્ત્રીઓને માટે શ્રીમંત સરકારે ટ્રેનિંગ કૉલેજની સ્થાપના કરી. આ પગલું શ્રીમંતનું ધૈર્ય અને આશાવાદીપણું સ્પષ્ટ કરે છે. સ્ત્રીશિક્ષિકાઓ તૈયાર કરીને કન્યા કેળવણીનો માર્ગ સરલ બનાવવા ઉપરાન્ત હતાશ વિધવા અને સંસાર સુખથી વંચિત અનેક બ્હેનોને પોતાની શક્તિ અને સમયનો ઉપયોગ કરવાનું પવિત્ર સાધન હાથમાં આવ્યું.

સને ૧૮૮૫ માં શ્રીમંત મહારાજાએ સ્ત્રીકેળવણીના વિષય ઉપર એક નોંધ પ્રકટ કરી હતી. વડોદરા રાજ્ય સ્ત્રીઓ પ્રત્યેની ઉદાર નીતિને માટે મશહૂર છે તેના પાયારૂપે આ નોંધ ગણી શકાય. તેમણે લખ્યું હતું કે " શિક્ષણના વિષયમાં કન્યા કેળવણીને લીધે જે સારાં પરિણામ આવી શકે તે અત્યંત મહત્ત્વની વસ્તુ છે. બાલકનાં માનસની યોગ્ય ખીલવણીમાં જે અચૂક સંભાળભરી દેખરેખ અને સમાધાનીથી કામ લેવાની શક્તિ ખાસ જરૂરનાં છે તે શિક્ષિત અને ચાલાક માતા ઘણી કુશળતાથી કરી શકે છે. અને તે ગુણોની મદદથી અનેક ત્રૂટિઓ દૂર કરી શકે છે. દરેક પ્રજાનું સામાજિક જીવન ઘડનાર સ્ત્રી જ છે અને તેથી જ પુરૂષ અને સ્ત્રીની ચઢતી અને પડતી સાથે જ થાય છે. તેથી જ આપણા સામાજિક જીવનમાં સ્ત્રીના યોગ્ય સ્થાનને લાયક બનાવવા માટે હું કન્યાશાળાઓની સ્થાપના ઉપર ખાસ ધ્યાન આપું છું. " આવી રીતે કન્યાકેળવણીની પ્રગતિનો યુગ શરૂ થયો.

શ્રીમંત સરકારે ફરજીયાત અને મફત પ્રાથમિક કેળવણીની સ્થાપના કરી ત્યારે કન્યાઓને વિસારી ન્હોતી. ૧૮૯૨ માં અમરેલી પ્રાન્તમાં એક અખતરા રૂપે આ પ્રયોગ શરૂ થયો. તેમાં ૭ થી ૧૦ વર્ષની દરેક કન્યાને શાળામાં જવાનું ફરજીયાત ગણાયું. આ મહાન પ્રયોગ શ્રીમંતની દીર્ઘ દૃષ્ટિનો ઘણો જ પ્રત્યક્ષ પુરાવો છે. અનુભવથી તે સફળ અને આવશ્યક જણાયો અને તેથી ૧૯૦૬ માં ફરજીયાત

શિક્ષણનો કાયદો આખા રાજ્ય માટે થયો. શરૂઆતમાં આ કાયદાનો અમલ ઘણી સાવચેતીથી કરવામાં આવતો. પડદાના રિવાજવાળા વગેરે ચુસ્ત વિચારવાળાને માટે તેમાં જબરજસ્તી ન્હોતી. કન્યાઓને શાળામાં મોકલવાનો જેમને વિરોધ હોય તેઓ ખાનગી વ્યવસ્થા કરીને શિક્ષણ આપે તો ચલાવી લેવામાં આવતું. આવી રીતે વિરોધીઓનાં મન સાચવીને જે કુનેહથી કામ લેવામાં આવ્યું તે પ્રશંસાને પાત્ર છે. તેથી સુધારકો ધારે તેવી જલદીથી પ્રગતિ થઈ શકી નહિ, છતાં પણ ધીમે પ્રગતિ થતી હતી એ વાત નિઃશંક છે.

સને ૧૯૦૫ માં ૯૪ કન્યાશાળાઓ હતી ને કુલ અભ્યાસ કરતી કન્યાઓની સંખ્યા ૧૨,૭૩૧ હતી. શરૂઆતથી જ જે જે સ્થળોમાં કન્યાઓની સંખ્યા શાળા પુરતી ના હોય ત્યાં ૧૨ વર્ષની અંદરની કન્યાઓ છોકરાઓની શાળામાં દાખલ થતી. એકંદરે જોતાં શાળામાં ભણી શકે એ ઉમ્મરની ૧૦ ટકા કન્યાઓ અભ્યાસ કરતી હતી. મુખ્ય શહેરોમાં જ્યાં જોગવાઈ થઇ શકતી ત્યાં કન્યાશાળામાં ભરતકામ, ચિત્રકામ, રાંધણકલા, તથા સંગીત એ ઉપયોગી વિષયો દાખલ કર્યા હતા. ૧૪ વિદ્યાર્થીનીઓથી શરૂ થએલી ટ્રેનિંગ કૉલેજમાં સંખ્યા વધીને ૨૬ થઈ હતી. વળી મોટી ઉમ્મરની સ્ત્રીઓને માટે ઝનાનાવર્ગ શરૂ કરવામાં આવ્યો હતો. બાળપણમાં જેમને ભણવાનો યોગ ના મળ્યો હોય છતાં પણ ઉત્સાહથી શીખવા માગતાં હોય એવાં બ્હેનોને બપોરના ફુરસદના સમયે વાંચન, લેખન અને હિસાબ તથા શિવણ-ભરત એવા વિષયો શીખવવામાં આવતા. આવા ૬ વર્ગો રાજ્યમાં હતા. અને ૧૪૦ સ્ત્રીઓ તેનો લાભ લેતી હતી. "પાકી કોઠીએ કાના ચઢે નહિં" એ કલ્પનાને આવા વર્ગ ખોટી પાડે છે. કારણ કે ઘણી વાર પાકી બુદ્ધિવાળી અને અનુભવવાળી બ્હેનો ઘણા થોડા સમયમાં અક્ષરજ્ઞાન મેળવી લે છે એવું જણાયું છે.

વળી દસ વર્ષ કુદાવીને આપણે ૧૯૧૪–૧૫ ના હેવાલમાં જોઇશું તો જણાશે કે કન્યાઓની પ્રાથમિક શાળાઓની સંખ્યા ૩૯૪ વધીને થઈ હતી ને કન્યાઓની સંખ્યા ૯૪, ૪૦૨ સુધી પ્હોંચી હતી. બીજી અન્ય સંસ્થામાં ૮૭૧ કન્યાઓ અભ્યાસ કરતી હતી. ટ્રેનિંગ કૉલેજમાં ૧૩૭ વિદ્યાર્થીની હતી. અને કુલ સંખ્યા ૯૫, ૫૪૪ થઈ હતી. આ આશ્ચર્યકારક સંખ્યા જોઇને આપણી ખાત્રી થાય છે કે કન્યાકેળવણી માટેની ઝુંબેશે તીવ્ર સ્વરૂપ પકડયું છે. સંખ્યા એકદમ વધવાના થોડાંક કારણ પણ હતાં. ફરજીયાત અભ્યાસ કરવા માટેની કન્યાની ઉમ્મર ૧૧ ને બદલે વધારીને ૧૨ વર્ષની કરવામાં આવી હતી. અને ચોથાને બદલે ૫ માં ધોરણ સુધી અભ્યાસ કરવાનું નક્કી થયું હતું. મુખ્ય તો કારણ કાયદાને અંગે થતી નોંધણી કાળજીભરી થતી હતી એ જ હશે. ઝનાના વર્ગમાં આ વખતે ૧૬૭ સ્ત્રીઓ હતી.

આ પ્રમાણે પ્રગતિનો વેગ વધ્યા જ કર્યો હોત તો અત્યારે જે સ્થિતિ છે તેના કરતાં ઘણી વધારે સારી સ્થિતિ થઈ શકત. પણ છેલ્લા બતાવેલા આંકડા

લેવાયા તે પછી તરત ઈન્ફ્લુએન્ઝાનો ભયંકર ઉપદ્રવ ફાટી નીકળ્યો અને તેમાં ખુબ ખુવારી થઈ ગઈ. તેથી જ પછી સંખ્યા વધવાને બદલે એકદમ ઘટી ગઈ. આટલાથી પણ પુરૂં ના થયું અને ૧૯૧૮-૧૯ માં દુકાળ પડ્યો. તે સંકટના પરિણામે કેટલીક શાળાઓ કમી કરવી પડી એટલું જ નહિ પણ ફરજીયાત કેળવણીનો કાયદો થોડા વખત માટે મોકુફ રાખવો પડયો. આવી રીતે પ્રગતિમાં ભંગ પડયો. તે બધું જોતાં ૧૯૨૩-૨૪ના આંકડા ખરાબ ના કહેવાય. તે અરસામાં સ્થિતિ નીચે પ્રમાણે હતી. કન્યાશાળાની સંખ્યા ૩૬૮ હતી. તેમાં અભ્યાસ કરતી કન્યાઓની સંખ્યા ૬૩,૨૦૩ હતી. બીજી સંસ્થામાં ૧,૧૭૯ કન્યાઓની સંખ્યા હતી. કુલ તેમની સંખ્યા ૬૪,૭૪૮ હતી. સ્ત્રીઓની ટ્રેનિંગ કૉલેજમાં ૭૬ અને ઝનાનાવર્ગમાં ૮૦ સ્ત્રીઓ અભ્યાસ કરતી હતી.

છેવટે ૧૯૩૦-૩૧ ના છેલ્લા આંકડા મળી શકે છે તે જોતાં કન્યાશાળાની સંખ્યા ૩૧૧ છે. તેમાં અભ્યાસ કરતી સંખ્યા ૩૮,૯૮૬ છે. મિશ્રશાળામાં અભ્યાસ કરતી કન્યાઓની સંખ્યા વધીને ૫૧,૭૯૫ સુધી ગઇ છે અને કુલ ૯૦,૭૮૧ અભ્યાસ કરે છે. ટ્રેનિંગ કૉલેજમાં ૧૭૯ વિદ્યાર્થીનીઓ છે ને ઝનાના કલાસમાં ૬૫.

આ ઉપલા આંકડા જોતાં જણાય છે કે છેલ્લા પાંચ વર્ષમાં કન્યાશાળાની સંખ્યા ઘટી છે પણ તેથી ગભરાવા જેવું નથી. અભ્યાસ કરતી કન્યાઓની સંખ્યા વધી છે. આમ થવાનું કારણ એ છે કે જ્યાં એક શિક્ષકવાળી શાળા હોય ને તેમાં કન્યાઓની સંખ્યા થોડી હોય તેવીને કમી કરવામાં આવી છે. કેટલીકને બીજી સાથે જોડી દેવામાં આવી છે. આ ઉપરાન્ત અંત્યજ શાળાઓ જુદી હતી તે બંધ કરી દીધી છે. સારી વ્યવસ્થાને માટે આવા કેટલાક ફેરફારો થયા છે. તેથી શાળાની સંખ્યા ઓછી થઈ છે. એટલું તો સ્પષ્ટ છે કે કન્યાઓની સંખ્યાનો આંકડો વધતો જાય છે. કુલ પુરૂષોની વસ્તીમાંથી ૧૫ ટકા શાળામાં જઈ શકે એવી ઉમ્મરના છોકરાઓ છે એમ ગણતાં ૮૧ ટકા શાળામાં અભ્યાસ કરે છે. જ્યારે કન્યાઓ માટે ૧૨ ટકા સ્ત્રીઓની વસ્તીમાંથી શાળામાં ભણતી ઉમરની ગણતાં ૭૦.૩ કન્યાઓ અભ્યાસ કરે છે. આ આંકડા છેક ખરાબ ના કહેવાય અને આશા આપનારા છે. કેમકે જો આવી રીતે ચાલુ સુધારો કાયમ રહેશે તો બીજા થોડાંજ વર્ષોમાં આપણે બીજા દેશોની સરખાઇ કરી શકીશું. હજી પણ લોકમત કન્યાકેળવણી માટે કંઇક અંશે બેદરકાર તો છે જ. આટલું પરિણામ આવ્યું છે તે ફરજીયાત કાયદાને આભારી છે. હજી પણ કન્યાઓની નોંધણી જોઇએ તેટલી ચોક્કસ રીતે કરવામાં લોકોનો સહકાર નથી મળતો. શાળામાં નામ દાખલ કરાવ્યા છતાં ઘણી અનિયમિત હાજરી પુરાવે છે. મોટું કારણતો આ જ છે કે આપણે ત્યાં ભાવનાશાળી ઉત્સાહી સ્ત્રી શિક્ષિકાઓની મોટી ખોટ પડે છે. હજી તો આપણે કન્યાઓની સંખ્યા જોઇને સંતોષ માનીએ છીએ. પણ આવી સ્ત્રીશિક્ષિકાઓ

મળશે ત્યારેજ શિક્ષણની સંગીનતા ઉપર ધ્યાન ખેંચાશે. અને ત્યારે જ પ્રાથમિક ફરજીયાત કેળવણીની સફળતાની છાપ સમાજ ઉપર પડશે.

અત્યાર સુધી બધી વાત પ્રાથમિક ફરજીયાત કેળવણીની થઈ. માધ્યમિક સ્ત્રીકેળવણી ધીમે ધીમે વધતી જાય છે. ફીમેલ ટ્રેનીંગ કૉલેજને અંગે સને ૧૯૦૫ માં ઈંગ્લીશ વર્ગ ખોલવામાં આવ્યા ત્યારથી તેની શરૂઆત થઈ અને સંપૂર્ણ હાઇસ્કુલ થોડા સમય પછી બની. દસ વર્ષ પછી ૧૯૧૫ માં ૧૨૨ વિદ્યાર્થીનીઓ તેમાં અભ્યાસ કરતી હતી. ઉપલા વર્ગમાં તો સંખ્યા છેક ઓછી રહેતી. મેટ્રિકની પરીક્ષામાં કન્યાઓએ બેસવા માંડયું અને પરિણામ સારૂં આવતું. ૧૯૧૭ માં ટ્રેનીંગ કોલેજથી છુટી પાડીને મહારાણી ગર્લ્સ હાઇસ્કુલની નવી સંસ્થા ખાસ બંધાયેલા મકાનમાં સ્થપાઈ. ૧૯૨૩-૨૪ માં તેમાં કન્યાઓની સંખ્યા ર૭૯ સુધી પ્હોંચી હતી. આજે છેવટના ૧૯૩૨ ના આંકડા જોતાં ૭૨૪ જેવી આવકારદાયક સંખ્યા થઇ છે. શરૂઆતમાં જે મકાન બંધાયું હતું તે હવે તો ઘણું નાનું પડે છે. શાળાના ખુણે ખુણા કન્યાઓથી ભરાઈ જાય છે અને છતાં વર્ગો કયાં રાખવા તે સવાલ થઈ પડે છે. સંસ્થાનાં ઉપરી ઘણાં વર્ષથી મીસ નીડહામ છે. તેમની કાર્યદક્ષતા અને ઉત્સાહ તથા કન્યાઓની અંગત કાળજીને લીધે આખા રાજ્યમાં આ સંસ્થા ઘણી લોકપ્રિય બની છે. તેમના હાથ નીચે બાર ગ્રેજ્યુએટ અને સોળ અંડર ગ્રેજ્યુએટ શિક્ષકો છે. જેમાંથી ઘણાં સ્ત્રીશિક્ષકો પણ છે. આ શાળામાં મુંબાઇની યુનિવર્સિટીની મેટ્રિકની પરીક્ષા માટે અભ્યાસ કરાવવામાં આવે છે. તે ઉપરાન્ત કન્યાઓને ઉપયોગી અનેક વિષયો જેવા કે ચિત્રકામ, સંગીત, શિવણકામ, ભરત, ગૃહશાસ્ત્ર વિગેરે શીખવવામાં આવે છે. આ શાળાની બીજી એક વિશિષ્ટતા છે કે ૧૯૨૨ થી તેમાં પુનાવાળી શ્રી. નાથીબાઈ દામોદર ઠાકરસી હિન્દુ સ્ત્રીઓની યુનિવર્સિટીની શાલાન્ત પરીક્ષા માટે પણ શીખવવાની ગોઠવણ રાખવામાં આવે છે. આમાં ખાસ સ્ત્રીઓને યોગ્ય વિષયોમાંથી પસંદગી મળી શકે છે તેથી, અને મુખ્ય તો માતૃભાષામાં અભ્યાસ થઇ શકે છે તેથી સંખ્યાબંધ કન્યાઓ આ પરીક્ષા માટે અભ્યાસ કરે છે. અને તે દિવસે દિવસે માનીતો ક્રમ થતો જાય છે. છેલ્લા આંકડાઓ જોઈશું તો મુંબાઇ યુનિવર્સિટીની મેટ્રિકના છઠ્ઠા ને સાતમાં ધોરણમાં અનુક્રમે ૩૧ અને ૩૧ કન્યાઓની સંખ્યા છે જ્યારે વીમેન્સ યુનિવર્સિટીના તેજ ધોરણમાં ૨૦ અને ૨૮ સંખ્યા છે. આ કન્યાઓની સંસ્થા પાછળ શ્રીમંતની સરકારને છેલ્લા વર્ષમાં રૂ. ૪૪,૦૦૦ જેટલો ખર્ચ થયો હતો.

આખા રાજ્યમાં કન્યાઓ માટે જુદી માધ્યમિક કેળવણીની આ એકલી જ સંસ્થા હોવાને લીધે રાજ્યના બીજા ભાગમાંથી અને બ્હારથી પણ ઘણી વિદ્યાર્થીનીઓ અભ્યાસ કરવા અહિં આવે છે. તેમને આશ્રય આપવા માટે શ્રીમંત મહારાજાએ કૃપાવંત થઇને એક વિદ્યાર્થીનીગૃહ સ્થાપ્યું છે. શરૂઆતમાં બે ચાર

કન્યાઓ માટે કામચલાઉ સગવડ રહેવાની કરી આપી હતી. તેમાંથી આજે ૭૦-૭૫ ની સંખ્યાવાળી વિશાળ હોસ્ટેલ કાયમને માટે સ્થપાઈ ગઈ છે. અને તેમાં એક લેડી સુપ્રીન્ટેન્ડન્ટની સંભાળ ભરી દેખરેખ નીચે કન્યાઓ અભ્યાસને ખાતર રહે છે.

ઉચ્ચ કેળવણી માટે મેટ્રિક થયા પછી કેટલીક કન્યાઓ બરોડા કૉલેજમાં અભ્યાસ કરે છે. ૧૯૦૫ સુધી એક પણ કન્યા કૉલેજમાં ન્હોતી. ૧૯૧૫ માં સંખ્યા ૮ થઈ હતી. ૧૯૨૫ માં ૧૩ હતી અને ૧૯૩૧ માં ૩૫ હતી. આ પ્રમાણે ઉચ્ચ કેળવણી પણ વધતી જાય છે.

હવે છેવટે ઉચ્ચ કેળવણી માટે એક સંસ્થા વિષે ટુંકાણમાં કહેવાનું છે. અને તે શ્રી. મહારાણી ચિમણાબાઈ મહિલા પાઠશાળા. આ સંસ્થાની શરૂઆત શ્રીમંત મહારાણી સાહેબના ઉત્સાહને આભારી છે. તેમને સ્ત્રીકેળવણીનો વિષય ઘણો પ્રિય છે, તેથી ૧૯૨૩ માં આ સંસ્થાની સ્થાપના કરી તેની વ્યવસ્થા એક નાની સમિતિને તેમણે સોંપી. પ્રથમ તો વિદ્યાર્થીઓના અભ્યાસની જોગવાઈ બરોડા કૉલેજના અધ્યાપકો અને એક ખાસ નીમેલા અધ્યાપકની મદદથી કરવામાં આવી હતી. પ્રીન્સીપલ કલાર્કે દરેક રીતે સહાનુભૂતી દર્શાવી એક વર્ગ જુદો આપ્યો હતો. અભ્યાસક્રમ પુનાની વીમેન્સ યુનિવર્સિટીવાળો રાખવામાં આવ્યો હતો. અનેક કારણોને લીધે શ્રીમંત મહારાણી સાહેબે આર્થિક મદદ થોડા સમય પછી આપવી બંધ કરી. તેવા સંજોગોમાં શ્રીમંત સરકાર પાસેથી મદદ મેળવીને પાઠશાળા ચાલુ રાખી શકાઇ. કૉલેજમાં સ્થળ સંકોચને લીધે લાંબો વખત રહી ના શકાયું. તેથી સવારનો સમય પાઠશાળાનો રાખીને મહારાણી ગર્લ્સ હાઈસ્કુલમાં સ્થાન ફેર કર્યું. ૧૯૩૦ માં કન્યાકેળવણીમાં રસ લેતા શહેરીઓએ વડોદરા સ્ત્રીકેળવણી મંડળ સ્થાપ્યું અને પાઠશાળાનો વહિવટ હાથમાં લીધો છતાં પણ શ્રીમંતની વાર્ષિક રૂ. ૪૦૦૦ ની સંગીન મદદ તો કાયમ રાખવી પડી. આજે તેમાં બે નીમેલા અધ્યાપકો અને બીજા માનદ કામ કરનાર દસ ગૃહસ્થો કામ ચલાવે છે. પ્રીન્સીપાલનું કામ હાઇસ્કુલના બોજા ઉપરાન્ત મીસ નીડહામ અનન્ય ઉત્સાહ ને ખંતથી કરે છે એ ખાસ નોંધવા લાયક બીના છે. પાઠશાળા ત્રણ વિદ્યાર્થીનીઓથી શરૂ થએલી તેમાં આજે ૩૫ કન્યાઓની સંખ્યા છે. તે દિવસે દિવસે વધતી જાય છે.

આ પ્રમાણે વડોદરા રાજ્યમાં સ્ત્રીકેળવણીનો ઇતિહાસ શ્રીમંત મહારાજા સાહેબના ઉચ્ચ આદર્શો ને પ્રયત્નો કેટલે અંશે સફળ થયા છે તે બતાવી આપે છે.

# श्री. महाराज व मागसलेल्या वर्गाचें शिक्षण.

(लेखक–प्रिन्सिपॉल **सीताराम रामजी तावडे**, एम्.ए., ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, पुणें.)

" प्रजेचें कल्याण हेंच माझें कर्तव्य व तोच माझा मोक्ष "

—श्री. महाराजसाहेब यांचें भाषण, रौप्य महोत्सव, ५ मार्च १९०७.

" विद्या ही एकाच व्यक्तीला किंवा वर्गाला, फार तर काय एकाच समाजालाहि मिळून फायदा नाहीं. ती सार्वत्रिक असली पाहिजे, तरच आपलें पाऊल पुढें पडणार आहे हें लक्षांत ठेवा. सर्व राष्ट्राचा उत्कर्ष पाहिजे आहे, तो एका समाजानें साधणार नाहीं. लहानापासून थोरापर्यंत सर्वच विद्या शिकलेले होतील असें करण्यास तुम्हीं झटलें पाहिजे; तरच राष्ट्र पुढें जाईल. ..................जन्मानें कोणी मोठें नाहीं, हें तुमच्या मनांत वागलें पाहिजे. खेड्यांपाड्यांतूनसुद्धां हें विद्याप्रसाराचें काम अव्याहत व सुयंत्र चाललें पाहिजे. आपल्या देशांत महारापोरांपासून तो अगदीं वरच्या पायरीपर्यंतच्या सर्व लोकांना कार्यकारण भाव समजूं लागेल तर आपला ऊर्जितकाल जवळ आला आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. " श्री. महाराजांचें न्यू इंग्लिशस्कूल, पुणें येथें झालेलें भाषण, ११ जून १९०४.

श्री. सयाजीराव महाराजांना सत्तर वर्षें पुरीं होऊन ७१ वें वर्ष लागलें आहे, याबद्दल सर्वांना अतिशय आनंद होत आहे. श्री. महाराज हे एक लोकोत्तर राजपुरुष आहेत. त्यांच्या आयुष्यांत वाढ होणें हा त्यांच्या प्रजाजनांचा आनंदोत्सवच आहे. महाराजांसारखे पुरुष लोकांना जितके दिवस लाभतील तितके दिवस त्यांना हवे असतात. यासाठींच त्यांचे प्रजाजन असल्या वाढदिवसानिमित्त आनंदोत्सव साजरे करीत असतात.

या लेखाच्या आरंभीं उध्दृत केलेला भाग जवळ जवळ दोन तपांपूर्वी महाराजांनीं निरनिराळ्या प्रसंगीं केलेल्या भाषणांतून घेतलेला आहे. त्यावरून महाराजांची प्रजेच्या हिताची कळकळ व बहुजनसमाजाच्या कल्याणाविषयींची दक्षता सहज लक्षांत येण्यासारखी आहे. महाराज विद्याप्रिय आहेत हें नव्यानें सांगावयास नको. ते दांडगे विद्वान् असून त्यांचा विद्याव्यासंग अव्याहत चालू आहे. त्यांनीं मोठमोठी विद्वान् मंडळी पदरीं ठेऊन आपल्या प्रजेच्या हिताचीं व राज्याच्या व्यवस्थेचीं कामें करून घेतलेलीं आहेत. महाराज विद्वानांचे चहाते आहेत, व त्यांनीं आश्रय दिला नाहीं असा विद्वान्

महाराष्ट्रांत क्वचित् आढळेल. प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठीं महाराजांना देशाबाहेर रहावें लागत असून सुद्धां त्यांनीं आपला संबंध मराठी साहित्याशीं कसा अव्याहत ठेविला आहे, हें त्यांच्या गेल्या साहित्य संमेलनांतील अध्यक्षीय भाषणावरून सहज समजून येणार आहे. त्यावेळचें त्यांचें तें भाषण म्हणजे मराठी साहित्याचा इतिहास व वाढ या विषयावरचा एक संशोधनात्मक निबंधच आहे असें म्हटलें असतां चालेल.

विद्याप्रसाराच्या बाबतींत महाराजांनीं आपल्या राज्यांत पुष्कळ प्रयत्न केले आहेत. विद्येची वाढ व साक्षरता या बाबतींत बडोदें राज्याचा नंबर कोणत्याहि संस्थानापेक्षां व खालसांतील राज्यापेक्षां पुष्कळ वर लागेल. आज कित्येक वर्षें संस्थानामध्यें सक्तीचें प्राथमिक शिक्षण सुरू आहे. या सक्तीच्या शिक्षणामुळें बहुजनसमाजांत विद्येची वाढ होऊन तो समाज पुढारलेल्या समाजाबरोबर कार्य करण्यास तयार होत आहे. महाराजांनीं १९०४ मध्यें पुणें न्यू इंग्लिश स्कूलमध्यें झालेल्या भाषणांत म्हटल्याप्रमाणें देशांतील कोणत्याहि एका समाजाचें शिक्षण होऊन देशाचा उत्कर्ष होणार नाहीं; देशांतील सर्व घटकांना सारखी संधि मिळाली तरच सर्व राष्ट्राचा उत्कर्ष होईल. महाराजांना ही गोष्ट पटल्यामुळें त्यांनीं बहुजनसमाजाच्या शिक्षणाचा प्रश्न पहिल्या प्रथम हातीं घेतला व सक्तीच्या शिक्षणासारखे कायदे पास करून बहुजनसमाजाला शिक्षण घेणें भाग पाडलें. कोणत्याहि राजाचें पहिलें आणि महत्त्वाचें कोणतें कर्तव्य असेल तर तें आपल्या प्रजाजनांना विद्यादान देणें हें होय. प्रजाजनांपैकीं ज्या लोकांना विद्येची अभिरुचि लागलेली असते ते विद्यादानासाठीं उत्पन्न केलेल्या संधीचा फायदा घेतात; परंतु जे अज्ञानांधकारांत पडलेले असतात त्यांना स्वतः ओढून काढल्याशिवाय जगांत काय चाललें आहे हें दिसत नाहीं. आपल्या हिंदुस्थानांतल्याप्रमाणें बडोदें राज्यांतहि विद्येंत मागासलेल्या लोकांची संख्या फार आहे. राज्य चालवावयाचें म्हणजे शिकलेल्या थोड्या लोकांना संतुष्ट ठेवून चालवितां येत नाहीं. राज्य चिरस्थायी व सुकर होण्यास बहुजन समाजाचा पाठिंबा पाहिजे. प्रजेपैकीं फार मोठा भाग अज्ञानी राहिल्यास राज्यांत होणाऱ्या सुधारणांचा लोकांना फायदा घेतां येणार नाहीं. तेव्हां अज्ञानांधकारांत खितपत पडलेल्या लोकांना हातभार लावून वर आणणें हें फार मोठें व कठीण काम आहे, व तें श्री. महाराजांनीं केलें त्यासाठीं ते अभिनंदनास पात्र आहेत.

बहुजनसमाज किंवा मागासलेला वर्ग हा अतिशय हीन व गरीब स्थितींत असतो. त्याला शिक्षण घ्यावयास लावावयाचें म्हणजे त्याच्याकरितां नुसत्या शाळा उघडून चालणार नाहीं. त्याला मोफत शिक्षण दिलें पाहिजे, एवढेंच नव्हे तर पुस्तकें, कपडेलत्ते व इतर मदत यांची सोय करावयास पाहिजे. प्राथमिक शाळांतील १ ते ६ यत्तेंतील मागासलेल्या वर्गाच्या विद्यार्थि–विद्यार्थिनींसाठीं ५ हजार रुपयांची तरतूद सरकारी बजेटमध्यें करून ठेविली आहे. त्याशिवाय अंत्यजांच्या मुलांमुलींकरितां १,७२८ रुपये विद्यावेतनासाठीं राखून ठेवलेले आहेत. त्यांना शिक्षण तर मोफत मिळतें, पण त्याशिवाय त्यांना पुस्तकें, पाट्या व इतर साहित्यहि मोफत दिलें जातें. बडोदें राज्याच्या नवसारी प्रांतामध्यें मागासलेल्या वर्गाचा भरणा फार आहे. त्याठिकाणीं सरकारनें स्वखर्चानें मुलांमुलींकरितां वसतिगृहें चालविलीं आहेत. उदाहरणार्थ, सोनगड, व्यारा, महुवा, वांकळ, अनावळ, अमरेली आणि द्वारका या ठिकाणीं धाणका व वाघेर लोकांकरितां चालविलेलीं वसतिगृहें. याशिवाय अस्पृश्यांकरितां बडोदें, नवसारी, पाटण व अमरेली याठिकाणीं चालविलेलीं वसतिगृहें आहेत. या वसतिगृहांमुळें मागासलेल्या वर्गांतील लोकांना उत्तम शिक्षण मिळून शिवाय चांगल्या परिस्थितींत वाढण्याची संधि मिळते. अस्पृश्य व रानटी लोक यांच्या घरची स्थिति कोणत्याहि रीतीनें शिक्षणाला पोषक नसते. उलट आईबाप व शेजारी यांच्यामुळें वाईट संवयी लागून मुलें सुधारण्याचा संभव नसतो. अशा मुलांना नुसतें मोफत शिक्षण व विद्यावेतनें देऊन भागणार नाहीं, तर त्यांना लहानपणापासूनच त्यांच्या मूळ परिस्थितींतून काढून स्वच्छ व स्वतंत्र वातावरणांत वाढविणें जरूर आहे. ही गोष्ट, या लोकांकरितां स्वतंत्र वसतिगृहें काढणें, यामुळेंच शक्य होईल.

हायस्कुलांतील शिक्षणासाठीं मागासलेल्या वर्गांतील विद्यार्थ्यांकरितां सरकारी बजेटामध्यें १६ विद्यावेतनासाठीं रु. १,२६८ राखून ठेविले आहेत. याशिवाय अपृश्य मुलांकरितां २१ विद्यावेतनासाठीं रु. १,१८८ राखून ठेविलेले आहेत. यांना मोफत शिक्षण मिळतें तें निराळेंच. दुय्यम शिक्षणाकरितां मागासलेल्या वर्गांतील विद्यार्थ्यांकरितां स्वतंत्र वसतिगृहें नाहींत. पण जरूर पडल्यास असलेल्या वसतिगृहामध्यें त्यांना प्रथम संधि देण्यांत येते. गरीब विद्यार्थ्यांना पुस्तकें वगैरे शिक्षणसाहित्य मोफत देण्याची सोय केलेली आहे.

कॉलेजमध्यें सुद्धां मागासलेल्या वर्गाच्या शिक्षणाची सोय केलेली आहे.

स्कालर्शिपा व वसतिगृह यांची सोय मागासलेल्या वर्गाकरितां निराळी केली नसली तरी अशा वर्गातील मुलांस जरूर पडल्यास प्रथम संधि देण्यांत येते. तसेंच अंत्यजांकरितां ९ व ठाकरडा जातीकरितां २५ अशा स्पेशल स्कॉल-र्शिपा महराजांनीं नुकत्याच मंजूर केल्या आहेत. ट्रेनिंग कॉलेजांत शिक्षण घेणाऱ्या सर्वच लोकांना विद्यावेतनें मिळतात.

कलाभुवनमध्यें मागासलेल्या वर्गातील लोकांना शिक्षण देण्या-करितां रु. १,३६८ राखून ठेविलेले आहेत. तसेंच अस्पृश्य वर्गातील विद्यार्थ्यांकरितां रु. ७२० राखून ठेविलेले आहेत. नवसारी, व्यारा, सोनगड व महुवा या भागांतून जे मागासलेल्या जातींचे विद्यार्थी येतात, त्यांना कलाभुवनमध्यें मोफत शिक्षण दिलें जातें. कोणत्याहि प्रांतांतल्या अस्पृश्य विद्यार्थ्यांकडून कलाभुवनध्यें फी घेतली जात नाहीं. वसतिगृहाच्या बाबतींत कलाभुवनमध्यें स्वतंत्र सोय नसली तरी मागासलेल्या वर्गाच्या विद्यार्थ्यांस प्रथम संधि दिली जाते. पुस्तकें वगैरे शिक्षणसाहित्य मोफत देण्याची व्यवस्था झालेली आहे. सारांश, बडोदें संस्थानांतील सर्व शिक्षण-संस्थांमध्यें मागासलेल्या व अस्पृश्य वर्गाकरितां सवलती ठेविल्या आहेत. याशिवाय इतर विद्यार्थ्यांना ज्या सवलती मिळतात त्याहि मिळविण्याचा अशा विद्यार्थ्यांना हक्क पोंचतोच.

परदेशांत जाऊन उच्च शिक्षण घेण्याकरितां मागासलेल्या वर्गासाठीं जरी स्वतंत्र अशी कांहीं सोय नसली तरी, संस्थानामध्यें चालू असलेल्या ‘ फॉरिन स्टडी लोन अँड स्कॉलर्शिप रूल्सचा ’ त्यांना फायदा घेतां येतो. अशा रीतीनें मागासलेल्या वर्गातील बऱ्याच विद्यार्थ्यांना परदेशीं पाठवून शिकवून आणिलेलें सर्वांना माहीत आहे.

वरील सर्व विवेचनावरून मागासलेल्या वर्गाच्या शिक्षणाकरितां महाराजांनीं कसकसे प्रयत्न केले हें लक्षांत येण्यासारखें आहे. संस्थानांत काय किंवा संस्थानाबाहेर काय मागासलेल्या वर्गाची लोकसंख्या फार आहे. त्याच्या शिक्षणाकरितां कोणतेहि प्रयत्न अपुरेच पडणार आहेत. संस्थानामध्यें मागास-लेल्या वर्गाच्या शिक्षणाकरितां केलेले महाराजांचे प्रयत्न जरी पुष्कळ असले तरी ते महाराजांना व प्रजाजनांनाहि अपुरेच आहेत. अजूनहि कित्येक वर्षे या लोकांना महाराजांची वाढत्या प्रमाणांत मदत लागेल व ती त्यांना मिळेल अशी आम्हांला खात्री वाटते.

लोकांना दिलेलें ज्ञानदान चालू ठेवण्यासाठीं महाराजांनीं फिरत्या वाचनालयांची व्यवस्था केलेली आहे. हीहि एक अभिमानाची गोष्ट आहे. फिरतीं वाचनालयें हा बडोदें संस्थानाचा विशेष आहे. अशी व्यवस्था इतरत्र क्वचितच सांपडेल. मागासलेल्या वर्गामध्यें नुसती शैक्षणिक प्रगति करूनच महाराज थांबले नाहींत, तर त्यांनीं लोकांच्या विचारांत नवीन भर घालण्याकरितां पाश्चिमात्य भाषेंतील पुस्तकांचीं भाषांतरें करून घेऊन तीं आपल्या प्रजेंतील सुशिक्षित वर्गाला उपलब्ध होतील अशीं करून ठेविलीं आहेत. देशाचा उत्कर्ष होण्याकरितां समाज नुसता साक्षर होऊन चालत नाहीं, तर त्याच्या ज्ञानांत भर पडत गेली पाहिजे. ज्ञान पाश्चात्य असो अगर पौर्वात्य असो, तें सर्व जगाच्या मालकीचें आहे. ज्ञानावर सर्वांचा हक्क सारखा आहे. अर्थात् ज्ञान जर सर्वांना उपलब्ध करून द्यावयाचें असेल तर तें देशभाषेंत आणलें पाहिजे. ही सोय महाराज सरकारांनीं केली याबद्दल प्रजाजन व इतर लोक त्यांचे सदैव ऋणी राहातील.

अज्ञानामुळें बहुजन समाजाचें अनेकप्रकारें नुकसान झालें आहे. पूर्वींच्या चांगल्या आचारविचारांचा लोप होऊन त्यांच्या ठिकाणीं विपरित आचारविचार धर्माच्या नांवाखालीं रूढ झाले व ते बहुजन–समाजास अधोगतीस नेऊं लागले. यासाठीं विद्यादानाबरोबरच समाजसुधारणेकडेसुद्धां महाराजांना लक्ष द्यावें लागलें. अस्पृश्यांवर होणारा अन्याय, अनाठायीं होणाऱ्या दानधर्माला आळा, धार्मिक स्वातंत्र्य, विवाहव्यवस्थेंत सुधारणा इत्यादि बाबतींत महाराजांनीं कायदे पास करून घेतले आहेत.

आपल्या प्रजेंतील प्रत्येक व्यक्तीनें करावयाची गोष्ट कार्यकारणभाव लक्षांत घेऊन करावी असें महाराजांना वाटतें. केवळ पूर्वपरंपरा चालत आली आहे म्हणून अंधश्रद्धेनें सर्व गोष्टी करीत राहाव्या हें महाराजांना इष्ट वाटत नाहीं. म्हणून महाराजांनीं आपल्या संस्थानांत नवीन नवीन गोष्टी आणून लोकांमध्यें अद्भुत जागृति उत्पन्न केली. कोठेंहि त्यांना नवीन विचार किंवा नवीन विचाराचा मनुष्य सांपडला कीं, ते तावडतोब जवळ करतात व त्याचा फायदा आपल्या संस्थानामध्यें प्रथम देतात. महाराजांनीं चांगल्या माणसांचा एक संचच करून ठेविला आहे व त्याच्या मदतीनें ते आपला राज्यकारभार चालवितात. ते स्वतः फार मेहनत करतात व मेहनत करणारा मनुष्य त्यांना फार आव-

डतो. खरोखरच प्रजेचें कल्याण हा त्यांना मोक्ष वाटतो व त्या दिशेनें ते अव्याहत कार्य करीत असतात असेंच आढळून येईल.

श्री. महाराजांनीं आपल्या संस्थानामधीलच मागासलेल्या वर्गाचें कल्याण केलें आहे असें नसून बाहेरील मागासलेल्या वर्गाकडेसुद्धां त्यांनीं आपलें लक्ष पोंचविलेलें आहे. पुण्यांतील डेक्कन मराठा एज्यु० ॲसोसिएशनला त्यांचेकडून फार मोठी मदत आज कित्येक वर्षे मिळत आहे. मराठा समाजामध्यें आज जीं चार शिकलेलीं माणसें दिसत आहेत त्याचें सर्व श्रेय श्री० महाराजांकडेच आहे. मराठा समाज जसा फार मोठा तसा तो विद्येंत फार मागासलेला आहे. या समाजामध्यें राज्यकारभाराला आवश्यक असे कांहीं नैसर्गिक गुण आहेत. या लोकांस योग्य प्रकारचें शिक्षण देऊन या गुणांचा विकास केल्यास त्यांचा सर्व लोकांस फार उपयोग होईल असें वाटून महाराजांनीं त्या दृष्टीनें संस्थानांत व संस्थानाबाहेर प्रयत्न केले आहेत. डेक्कन मराठा एज्यु० ॲसो० शिवाय इतर जिल्ह्यांच्या ठिकाणीं वसतिगृहासारख्या मराठ्यांच्या ज्या कांहीं थोड्या शैक्षणिक संस्था आहेत त्यांनाहि महाराजांची थोडीफार मदत झालेली आहे. याचप्रमाणें संस्थानाबाहेरील मागासलेल्या वर्गाच्या इतर संस्थांना सुद्धां महाराजांची मदत झालेली आहे. यासाठीं अखिल मागासलेला समाज महाराजांच्या या कार्या-बद्दल सदैव ऋणी राहील याबद्दल शंका नाहीं. मागासलेल्या वर्गाची सध्यांचीं शैक्षणिक प्रगति जरी सर्वतोपरि समाधानकारक नसली तरी जी कांहीं थोडी फार दिसत आहे त्याचें श्रेय महाराजांना आहे ही गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे. या वर्गाच्या उन्नतीकरितां अद्यापि पुष्कळ प्रयत्न होणें जरूर आहे. असे प्रयत्न महाराजांकडून होतीलच, पण अशा प्रयत्नांना महाराजां-कडून मदत झाल्याशिवाय राहणार नाहीं असें आम्हाला वाटतें.

शेवटीं प्रजेच्या कल्याणाकरितां सदैव झटणाऱ्या या राजाला उदंड आयुष्य व अखंड सौख्य मिळो अशी त्या दयाघन प्रभूच्या चरणीं प्रार्थना करून हा लांबलेला लेख पुरा करितो. श्रीमंत सयाजीराव गायकवाड महाराजांचा सदैव जयजयकार असो. इत्यलम्।

# મહારાજા અને પરદેશી શિક્ષણ

(લેખક—પ્રોફેસર ગોવિન્દલાલ હરગોવિન્દ ભટ્ટ, એમ. એ.)

હઝારો વર્ષ ઉપર હિન્દુસ્તાનમાં વિદ્યાર્થીઓ દરરોજ પ્રાર્થના કરતા કે **तमसो मा ज्योतिर्गमय.** પ્રાચીન સમયની આ ભાવના એટલી બધી ઉદાત્ત છે કે વર્તમાનકાળમાં તેને પરિણામે ઘણાં સુંદર કાર્યો થઇ શકયાં છે; અને ભવિષ્યકાળમાં પણ આ ભાવનાનું બળ વધશે જ એમ કહેવામાં જરા પણ સંકોચ કરવાનું કારણ નથી. જ્ઞાનનું માહાત્મ્ય દર્શાવનારી આ પ્રાર્થનાનું રહસ્ય શ્રીમંત મહારાજા સાહેબે બરોબર સમજી તેને કાર્યમાં મૂકવાનો અદ્વિતીય પ્રયાસ કર્યો છે, અને તેને લીધે આજનું વડોદરા રાજ્ય સાઠ વર્ષના વડોદરા–રાજ્ય કરતાં બધી રીતે તદ્દન જુદું પડી જાય છે. શ્રીમંતને જ્યારે જ્યારે પ્રસંગ મળ્યો છે ત્યારે ત્યારે તેઓશ્રીએ પોતાના વિચારો પ્રજા આગળ ભારપૂર્વક ઘણી સ્પષ્ટતાથી દર્શાવ્યા છે અને જ્ઞાન તરફ પ્રજાનું લક્ષ દોર્યું છે. જગતના કોઇ પણ વિષયમાં જો શ્રીમંતને અપૂર્વ આસક્તિ હોય તો તે શિક્ષણ છે અને તેના પૂરાવા તરીકે એટલું જ કહેવું બસ છે કે વડોદરા રાજ્ય શિક્ષણ પાછળ સૌથી વધારેમાં વધારે રકમ ખરચે છે.

જ્ઞાન જેમ જેમ વધે તેમ તેમ પ્રકાશ અને તેની સાથે લાભો પણ વધે એ સત્ય વિષે બે મત વર્તમાન યુગમાં સંભવતા નથી. જેની દૃષ્ટિ સંકુચિત, જે એક જ સ્થળમાં રહી પોતાની બાબતોનો જ વિચાર કર્યા કરે અને વ્યવહારમાં શૂન્ય હોય, તેવા પુરુષને આપણે કૂવાના દેડકાની ઉપમા યોગ્ય રીતે આપીએ છીએ. પ્રાચીન કાળમાં મુસાફરી કરવાનાં સાધનો ઘણા ઓછાં હતાં છતાં પણ ઘણા ધર્મનેતાઓએ આખા હિન્દુસ્તાનનો પ્રવાસ કરી પોતાનો ધર્મની ધ્વજા અનેક સ્થળે ફરકાવવા પ્રયત્ન કર્યો છે. બૌદ્ધ ધર્મના અનુયાયીઓ ચીન, જાપાન, વગેરે દેશોમાં જઈને પણ ત્યાંના લોકોની પરિસ્થિતિનો વિચાર કરી ધર્મનો પ્રચાર કરવા ચૂકયા નથી. શંકરાચાર્ય, રામાનુજાચાર્ય, વલ્લભાચાર્ય વગેરે આચાર્યોએ હિન્દુસ્તાનની યાત્રા કરી દિગ્વિજય મેળવ્યા છે એમ ઈતિહાસ ઉપરથી માલમ પડી આવે છે. જુના કાળમાં ધર્મનું પ્રાધાન્ય હોવાથી તેને અંગે જ પર્યટન કરવામાં આવ્યું

હતું એ વાત ખરી, પણ તેમાં એક સત્ય તો રહેલું જ છે કે પર્યટનથી અનેક લાભો થાય છે. ભૂતકાળમાં હિન્દુસ્તાનના વ્હેપારીઓ પણ પોતાના વ્હેપારને અંગે જુદા જુદા દેશોમાં મુસાફરી કરતા હતા અને યૂરપ જેવા દૂર દેશમાં પણ તેમની વ્હેપારી તરીકેની ખ્યાતિ પ્રસરી હતી. અત્યારનો સમય પહેલાંના સમય કરતાં ઘણી બાબતોમાં વિલક્ષણ છે જગતની પ્રજાઓની સાથે આપણી પ્રજાને મને કે કમને હરીફાઈમાં ઉતર્યા વિના ચાલે એમ નથી. હિન્દુસ્તાનની પ્રજા જગતની પ્રજારૂપી એક મહાયંત્રમાંનું એક ચક્ર છે, અને જો હિન્દુસ્તાનને એ મહાયંત્રમાં પોતાનું યોગ્ય સ્થળ મેળવવું હોય તો તેને પ્રગતિ કરવાની જરૂર છે. આ પ્રગતિનું સાધન પરદેશી શિક્ષણ છે ઇંગ્લેંડ, જર્મની, અમેરિકા વગેરે પ્રગતિવાળા દેશોમાં જઈ, ત્યાં કેટલોક સમય રહી, ત્યાંના રાજ્યબંધારણ, સમાજવ્યવસ્થા, ધાર્મિક પરિસ્થિતિ, વિશ્વવિદ્યાલયો, વૈજ્ઞાનિક શોધો કરવાનાં કાર્યાલયો વગેરે જુદા જુદા વિષયોનો સૂક્ષ્મ અભ્યાસ કરવાની જરૂર રહે છે.

પરદેશી શિક્ષણના કેટલા લાભ છે એ જોવાને માટે જાપાનનો દાખલો આપણા આગળ મોજૂદ છે. એક વખત એવો હતો કે જાપાન જગતની દૃષ્ટિએ લઘ્વી માત્રા હતું. આવી દયાજનક પરિસ્થિતિ જોઇને કેટલાક બુદ્ધિમાન્ જાપાનીઓ વિચાર કરવા લાગ્યા અને તે વિચારણાને અંતે તેમને જણાયું કે ઇંગ્લેંડ, અમેરિકા વગેરે દેશો જે રીતે આગળ આવ્યા છે તે જ રીતે જાપાન પણ આગળ કેમ ન આવે. આ નિશ્ચય થયા પછી તેમણે પ્રથમ કેટલાક જુવાન જાપાની વિદ્યાર્થીઓને પરદેશ શિક્ષણ લેવાને મોકલ્યા; અને જ્યારે તે વિદ્યાર્થીઓ જુદા જુદા વિષયોનો અભ્યાસ કરીને જાપાન પાછા આવ્યા ત્યારે તેમને જાપાનના રાજ્ય વહીવટમાં ભાગ લેતા કર્યા. તે બધાને રાજ્યનાં જૂદાં જૂદાં ખાતાંઓ સોંપવામાં આવ્યાં અને પરદેશની કળાઓનો પ્રચાર કરવા માંડ્યો. આટલેથી જ જાપાનીઓ અટકયા નહિ; તેમણે પરદેશના હોંશીઆર માણસોને બોલાવી તેમને રાજ્યનો અધિકાર આપી, તેમના હાથ તળે જાપાનીઓને તાલીમ આપવા માંડી. આના પરિણામે જે જાપાન ‘ બીચારૂં ’ કહેવાતું હતું તે જ જાપાન અત્યારે

સિંહની કોટિમાં આવી ગયું છે. વ્હેપારમાં તેણે જગતના બધા દેશોને હંફાવ્યા છે અને પોતાની સમૃદ્ધિ અને બળનો ખ્યાલ જગતને આપી રહ્યું છે.

પરદેશ જઈ ત્યાંના શિક્ષણ અને સંસ્કૃતિના અભ્યાસથી આપણી દૃષ્ટિ વિશાળ અને તુલનાત્મક બને છે, અને તે દેશને તેની સંસ્કૃતિને માટે આપણે અન્યાય કરતા અટકીએ છીએ. એક પ્રજા બીજી પ્રજાના સંબંધમાં આવે ત્યારે તે તેને બરોબર સમજી શકે છે અને તેની સાથે પોતાના વિચારોની અને સંસ્કૃતિની આપ લે કરે છે, અને તેથી જગતની પ્રજાઓ વચ્ચે પ્રેમ ઉત્પન્ન થઈ વિશ્વમાં શાન્તિ પ્રસરે છે હિન્દુસ્થાન જ્યારે એક તરફથી પશ્ચિમના દેશો પાસેથી રાજ્યતંત્રના જુદા જુદા પ્રકારો નિયમિતતા, વૈજ્ઞાનિક પ્રયોગો, વ્હેપારી ઉસ્તાદી, પ્રજાકીય એકતા અને માનવ સમાનતા શીખે છે, તો બીજી તરફથી હિન્દુસ્તાન પોતે તે દેશોને ઉચ્ચ પ્રકારનું તત્ત્વજ્ઞાન, સરળતા અને સ્પષ્ટતાનો પાઠ શીખવે છે. આ રીતે જ જગતની પ્રજાઓ એક બીજાને ઉપકાર થઈ પડે છે.

પણ અહીં એક અગત્યની વાત ધ્યાનમાં રાખવાની જરૂર છે. પરદેશી શિક્ષણ લીધા પછી ત્યાંની સંસ્કૃતિથી મુગ્ધ બની તે સંસ્કૃતિનું આંધળું અનુકરણ કરવાનું નથી; પણ ત્યાંની પરિસ્થિતિનો અભ્યાસ કરી, તે પરિસ્થિતિને આપણી પરિસ્થિતિ સાથે સરખાવવાની જરૂર છે. રાજ્યતંત્ર, વ્હેપાર, ધર્મ, વિજ્ઞાન વગેરે બાબતોના જ્ઞાનનો ઉપયોગ આપણો સમાજ કેવી રીતે કરી શકે, ત્યાનાં તત્ત્વોને કેવું રૂપ આપવાથી આપણા સમાજને અનુકુળતા થાય—આ અને આવા બીજા વિચારો કરવાની આવશ્યકતા પણ છે. હંસની માફક સદસદ્વિવેકબુદ્ધિ રાખવાની ખાસ જરૂર છે; અને એ હશે તોજ પરદેશી શિક્ષણનો પૂરેપૂરો લાભ આપણે મેળવી શકીશું.

ઉપર જણાવેલા બધા વિચારો શ્રીમંત મહારાજા સાહેબે જુદે જુદે પ્રસંગે વ્યાખ્યાનો દ્વારા દર્શાવ્યા છે. પરદેશી શિક્ષણ મેળવીને આવેલા માણુસો રાજ્યનો વહીવટ કરવામાં ઘણા ઉપયોગી થાય છે અને પ્રજાને પરદેશના લાભો ઘેર બેઠાં મળે છે એમ શ્રીમંતનું મંતવ્ય

છે. આ ઉદાત્ત હેતુથી શ્રીમંત પરદેશી શિક્ષણવાળા માણસોને રાજ્યના જુદા જુદા અધિકારો આપે છે અને વડોદરા રાજ્યનો વહીવટ કેવી રીતે સુંદર અને આદર્શભૂત થાય અને પ્રજા કેમ સુખી થાય એ જોવા ઇચ્છા રાખે છે. શ્રીમંતની આ પવિત્ર ભાવનાને લીધે વિદ્વાન્ પુરૂષો આ રાજ્યને રામ રાજ્યની ઉપમા આપે છે.

પ્રજા અને રાજ્યને પરદેશી શિક્ષણનો લાભ મળે એ હેતુથી શ્રીમંતે ઉદાર નિયમો ઘડ્યા છે. તેઓશ્રીની એક સુંદર યોજનાને લીધે દર વર્ષે રાજ્યના નોકરોમાંથી જુદા જુદા માણસોને જુદા જુદા વિષયો શીખવાને માટે પરદેશ મોકલવામાં આવે છે. આ રીતે જનારા માણસોને રાજ્ય તરફથી શિષ્યવૃત્તિ આપવામાં આવે છે. બીજી યોજનાને અનુસરીને પરદેશ જનાર માણસોને ઉધાર રકમ આપે છે અને ત્રીજી યોજનાને અંગે રાજ્યના નોકરોને અભ્યાસાર્થિક રજા આપવામાં આવે છે, જેમાં લગભગ એક વર્ષનો આખો પગાર મળે છે.

અત્યાર સુધીમા પહેલી—શિષ્યવૃત્તિની યોજનાનો લાભ પચ્ચાસ માણસોએ લીધો છે. તેમની પાછળ શ્રીમંતે ૫,૭૪,૯૭૦ રૂપીઆ ખર્ચ્યા છે. આ પચ્ચાસ માણસોએ પરદેશમાં જઈને નીચેના વિષયોનું જ્ઞાન મેળવ્યું છે. સેનિટરી એન્જિનિઅરિંગ, ઈલેક્ટ્રિકલ એન્જિનિઅરિંગ, ધાતુશાસ્ત્ર અને ખાણો, શિલ્પશાસ્ત્ર, શિક્ષણશાસ્ત્ર, શોધખોળ, કેળવણી, દવા, વ્હેપાર, બાગ, અર્થશાસ્ત્ર, આર્થિક અને રાજકીય તંત્ર, નાણું અને સમાજશાસ્ત્ર, છાપકામ અને સ્ટેશનરી, પુસ્તકાલય, ખેતીવાડી, સહકારી મંડળ, કિન્ડરગાર્ટન, હૉટેલવ્યવસ્થા, પોલીસ કવાયત, કાયદો, સંસ્કૃત અને શિક્ષણશાસ્ત્ર વિગેરે.

બીજી—ઉધાર રકમ આપવાની—યોજનાનો લાભ અત્યાર સુધીમાં ઓગણીસ માણસોએ લીધો છે. તેમાં ૧,૩૯,૫૫૩ રૂપીઆની રકમ રોકાઇ છે. આ યોજનાને અંગે નીચેના વિષયોનું જ્ઞાન મેળવવામાં આવ્યું છે. ડેરી ફાર્મિંગ, તેલો અને ચરબી વિષેની માહીતી, સ્કાઉટ શિક્ષણ, શિક્ષણશાસ્ત્ર, મીડવાઇફરી, દવા, કેળવણી, ઈલેક્ટ્રિકલ એન્જિનિઅરિંગ, શહેર રચના, સિવિલ સર્વિસ વિગેરે.

स्वरूप व त्याच्या सिद्ध्यर्थ चालविलेली प्रयत्न त्यांना निवेदन केलें. तेव्हां फार दिवसांच्या आपल्या इच्छेप्रमाणें मराठी कोश तयार होऊं घातला आहे हें पाहून त्यांना अत्यंत समाधान वाटलें, व प्राथमिक अडचणी नाहींशा होण्यासाठीं त्यांनीं आपण होऊन ५००० रुपयांची मोठी देणगी दिली व कोशाच्या १०० प्रती आपल्या संस्थानासाठीं घेण्याचा हुकूम दिला. यानंतर कोशाच्या प्रगतीकडे त्यांचें नेहेमीं लक्ष असे. कोशाचा पहिला भाग जेव्हां त्यांनीं पाहिला तेव्हां त्यांना फार आनंद वाटला व हा कोश लवकर पुरा करून दुसरें असेंच संदर्भग्रंथाचें काम हातीं घेण्याबद्दल त्यांनीं संपादकांना समक्ष सांगितलें. हिंदी शब्दसागरालाहि त्यांनीं अशीच कांहीं मदत केली आहे. डॉ. केतकर तयार करीत असलेल्या गुजराथी ज्ञानकोशाला आगाऊ ५००० रुपये विद्याखात्याकडून देण्यांत आले, महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या २००० रु. च्या प्रती घेण्यांत आल्या होत्या. श्री. गो. स. सरदेसाई मुंबई सरकारतर्फें प्रसिद्ध करीत असलेल्या पेशवे दप्तरांतील कागदछपाईसाठीं गायकवाड सरकारनें ३००० रु. ची मदत केली आहे.

**ग्रंथोत्तेजनाचे विविध प्रकार**—अशा अनेक उपायांनीं महाराजांनीं गेलीं ५० वर्षें मराठी ग्रंथोत्तेजन वाढत्या उमेदीनें चालविलेलें दिसून येईल. त्यांनीं आतांपर्यंत योजिलेल्या उपायांचे प्रकार सांगावयाचे झाल्यास असे:—

१. पारितोषिक देऊन ग्रंथ तयार करावयाचा व मग सरकारी खर्चानें तो छापावयाचा.

२. राज्यांतील नोकरवर्गाकडून स्वतःचें काम म्हणून ग्रंथ तयार करवावयाचा व मग तो सरकारी खर्चानें छापावयाचा. मागें नायब विद्याधिकारी खानगींतील अधिकारी ( शं. मो. रानडे, सरदेसाई, इ. ) पोलीस इ. खात्यांतील नोकर ( गोविंदभाई देसाई सारखे ), यांनीं याच पद्धतीनें ग्रंथ तयार केले आहेत.

३. पगारी ग्रंथकार ठेऊन खास देखरेखीखालीं ग्रंथ तयार करवावयाचा. उदा० श्रीसयाजीज्ञानमंजूषेंतील ग्रंथ; संस्कृत संशोधकखातें स्थापून कांहीं ग्रंथांचीं भाषांतरें करविलीं.

४. ग्रंथकाराला पारितोषिक देऊन ग्रंथ तयार करवावयाचे व त्याच्याकडूनच तो छापवून घेऊन त्याच्या कांहीं ( ५० ) प्रती सरकारनें घ्याव-

याच्या. ज्ञानमंजूषा बंद पडल्यावर, पदार्थविज्ञान, कृषिकर्म इ. ग्रंथ असे छापविले.

५. ग्रंथकाराकडून ग्रंथ तयार करवून छापावयाचा, व त्याच्या ½ प्रती पारितोषिक म्हणून त्या ग्रंथकारास द्यावयाच्या. उदा० अबलोन्नतिलेखमाला, संसारमार्गोपदेशिका, इ.

६. ग्रंथकाराकडून ग्रंथ तयार करवून त्याच्याकडूनच तो छापवावयाचा व छपाईचा जेवढा खर्च झाला असेल तितक्या किंमतीच्या प्रती सरकारनें विकत घ्यावयाच्या. स्त्रीभूषण, कन्याभूषण, उपनयनविधिसार इ. ग्रंथ असे तयार झाले.

७. ग्रंथ तयार करून छापण्यासाठीं उचलून रक्कम द्यावयाची व तीबद्दल कांहीं ठराविक प्रती सरकारनें घ्यावयाच्या. गुजराथी काव्यमालाग्रंथ ( ३५ ) अशा रीतीनें तयार झाले; त्यासाठीं १६००० रुपये मंजूर झाले होते.

८. विशिष्ट विषयावरचीं पुस्तकें सरकारी खर्चानें छापून, त्यांच्या कांहीं प्रती ठेवून बाकीच्या ग्रंथकारास द्यावयाच्या. प्रो. मौलाबक्ष, मूर्तुजाखां, मनोहर यांचीं गायनावरील पुस्तकें संगीतपारिजात व संगीत रत्नाकर यांचीं भाषांतरें या प्रकारानें निघालीं.

९. ग्रंथांना उत्तेजनासाठीं देणग्या द्यावयाच्या. महाराष्ट्र शब्दकोश, पेशवे दप्तर, वाडांच्या रोजनिशा, इ.

१०. महारजांना नजर केलेल्या ग्रंथांना बक्षीसें द्यावयाचीं.

हे व आणखी कित्येक प्रकार बारकाईनें पाहूं गेल्यास आढळून येतील.

**ग्रंथोत्तेजनाचा जंगी खर्च**—या सर्व पाहणीवरून महाराजांनीं आजपर्यंत ग्रंथोत्तेजनासाठीं लाखों रुपये खर्च केले असले पाहिजेत, असें दिसून येतें. संस्कृत, मराठी, गुजराथी, हिंदी, ऊर्दू व इंग्रजी या भाषांतून अनेक ग्रंथ महाराजांच्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष मदतीनें निर्माण झाले आहेत. १९१७ पासून नोव्हेंबर १९३२ अखेर सयाजीसाहित्यमालेंत सर्व भाषांचीं मिळून २०७ पुस्तकें व सयाजीबालज्ञानमालेंत ९५ पुस्तकें प्रसिद्ध झालीं. त्यांपूर्वींच्या माला, खानगींतील पुस्तकें, विद्याखात्याकडून व इतर प्रकारच्या मदतीनें झालेलीं पुस्तकें हीं सर्व धरल्यास सुमारें ५०० ग्रंथ तरी महाराजांच्या उत्तेजनानें झाले असले पाहिजेत. गेल्या पंधरा वर्षांतच सुमारें सव्वालाख रुपये ग्रंथोत्तेजनासाठीं खर्च झाले; त्यांतील मराठीच्या वांट्यास निदान ५००००

रुपये तरी आलेच आहेत. साहित्यमाला निघण्यापूर्वीचा असा खर्च जवळ जवळ अडीच लाखापर्यंत जातो. म्हणजे आपल्या पन्नास वर्षांच्या कारकीर्दीत सुमारें चार पांच लाख रुपये ग्रंथनिर्मितीसाठीं सढळ हातानें खर्च करणारे श्रीमंत सयाजीरावांखेरीज दुसरे कोण सांपडणार! सांपडते तर देशी भाषांची उन्नति यापेक्षां केवढी तरी मोठी होती. पण महाराजांप्रमाणें विद्याप्रेमी पुरुष सामान्य जनांत जर बोटावर मोजण्याजोगे नाहींत तर ते संस्थानिकांत कोठून आढळणार!

**बडोदें—महाराष्ट्र वाङ्मयाचें एक केंद्र**—मराठी वाङ्मयाचें एक पीठ असा जो आज बडोद्यास मोठा मान आहे त्याचें बहुतेक श्रेय महाराजांना द्यावें लागेल. कारण महाराजांची अभिरुचि जर भिन्न असती व त्यांनीं साहित्याभिवृद्धीला जर आजच्याप्रमाणें अनंत हस्तांनीं मदत केली नसती तर ग्वाल्हेर, किंवा धार प्रमाणें बडोदें केवळ एक मराठी राज्य म्हणून लोकांना माहीत असतें. मराठीचें एक प्रमुख केंद्र म्हणून त्याच्याबद्दल साहित्यसेवकांना अभिमान वाटला नसता. बडोद्यास १९०९ व १९२१ या दोन सालीं साहित्य संमलनें भरलीं ही एकच गोष्ट मराठी साहित्याकडे महाराजांचें किती लक्ष आहे हें स्पष्ट दाखवितें. १८९० सालीं शंकर मोरो रानडे, दि. ब. समर्थ व खासेराव जाधव यांच्या खटपटीनें स्थापन झालेली 'सहविचारिणी' सभा ही आज महत्वाच्या वाङ्मयसंस्थांत गणली जाते या संस्थेनें हिंदुस्थानांतील सर्प, समाजसुधारणेच्या कित्येक बाजू, यासारखीं पांच सहा पुस्तकें मागें प्रसिद्ध केलीं आहेत. 'सहविचार' नांवाचें हिचें एक द्वैमासिक मुखपत्र निघतें शेट. दामोदर सांवळाराम यंदे यांची 'ग्रंथसंपादक आणि प्रसारक मंडळी' १८९७ सालीं बडोद्यासच निघाली, नंतर १९०१ सालीं ती मुंबईस गेली. या मंडळीसहि महाराजांचें बरेंच सहाय्य झालें आहे. प्रख्यात रियासतकार श्री. गोविंदराव सरदेसाई यांना साहित्यसेवेचा धडा प्रथम महाराजांनींच बडोद्यास दिला. बडोद्यास आज जेवढे म्हणून साहित्यसेवक चमकतात तेवढ्यांना महाराजांचा केव्हांना केव्हां तरी थोडाफार आश्रय मिळालेला आहेच. तेव्हां मराठीला आज कोठें थोर राजाश्रय असेल तर तो बडोद्यांतच आहे. यासाठीं इतर महाराष्ट्राला बडोद्याचा प्रेमळ हेवा वाटावा हें साहाजिक आहे.

**वाङ्मयाचें 'सयाजीयुग'**—याप्रमाणें श्रीमंत महाराजसाहेब यांनीं मराठी ग्रंथोत्तेजनासाठीं काय काय गोष्टी केल्या याचा थोडक्यांत आढावा

या लहान लेखांत घेण्याचा प्रयत्न केला. पण हा प्रयत्न परिपूर्ण झाला असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. कारण नेहमीं महाराजांचा दानव्यवहार आणि ग्रंथाश्रय कोणालाच संपूर्ण ज्ञात नसणार. अज्ञात ज्ञानप्रसारयोजना आणि ग्रंथोत्तेजन किती तरी झालेलें असणार. तेव्हां या ठिकाणीं त्यांच्या ग्रंथोत्तेजनासंबंधीं जेवढी माहिती मिळण्यासारखी होती तेवढी जमवून प्रस्तुत लेखांत अंतर्भूत करतां आली. तथापि त्यावरून महाराजांच्या थोर राष्ट्रोन्नतिकार्याची पूर्ण कल्पना सहज येणार आहे. ‘ विनाश्रया न शोभन्ते पंडिता वनिता लता । ’ या सुभाषिताप्रमाणें मराठीला हा मोठा राजाश्रय न मिळता तर तिची वाढ कितपत झाली असती याची शंका आहे. खुद्द मराठ्यांच्या साम्राज्यकालीं मराठीचें व्हावें तसें पोषण झालें नाहीं याबद्दल वाईट वाटत असतां, ब्रिटिश अमदानींत एका संस्थानिकानें, राज्यांतील इतर भाषांना मागें न ठेवितां, मराठीला सर्व बाजूंनीं उत्तेजन देण्याचा निरपेक्ष प्रयत्न केलेला पाहून आनंद होतो व मागील अशाच थोर राज्यकर्त्यांची साभिमान स्मृति जागृत होते. माळव्यांतील नवरत्नांनीं परिवेष्टित भोज–विक्रमादित्य स्वतः ग्रंथरचना करणारा कनोजचा हर्षवर्धन, सायणमाधवांच्या मदतीनें वेदवाङ्मयावर अनेक भाष्यें तयार करविणारे विजयानगरचे हरिहर–बुक्कराय, पाश्चात्त्य देशांतील इंग्लंडची साम्राज्ञी एलिझाबेथ इ. च्या मालिकेंत श्रीमंत सयाजीराव चमकून राहातील, एवढेंच नव्हे तर ‘ एलिझाबेथन युगा ’ प्रमाणें मराठी वाङ्मयाचें ‘ सयाजीराव युग ’ महाराष्ट्रसारस्वताच्या इतिहासांत गाजून राहील, असा साहित्यभक्तांना महाराजांच्या मागील पुढील विद्याभिवृद्धीच्या प्रयत्नांकडे पाहून विश्वास वाटूं लागतो.

शेवटीं, अशा राष्ट्रहिततत्पर राजपुरुषश्रेष्ठाला परमेश्वरानें दीर्घायुरारोग्य देऊन, त्यांच्या हातून देशभाषांची सर्वांगीण अभिवृद्धि चिरकाल घडवीत राहावी, अशी त्या परमज्ञानी प्रभूजवळ प्रार्थना आहे.

---

# श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या कारकीर्दींत झालेली संस्कृत साहित्याची प्रगति.

[ **लेखक**—डॉ० **श्रीपाद कृष्ण बेलवलकर**, एम्. ए., पी. एच्. डी., संस्कृत प्रोफेसर, डेक्कन कॉलेज, आणि सेक्रेटरी, भांडारकर ओरिएंटल् रिसर्च् इन्स्टिट्यूट, पुणें. ]

दोनशें वर्षांपूर्वी ज्या सर्वतोपरी दंगलीच्या व उलाढालीच्या काळांत बडोदा संस्थानचा उदय झाला व त्यानंतरच्या शेंदीडशें वर्षांत ज्या अनेक संकटांतून व स्थित्यन्तरांतून संस्थानास निभावून जावें लागलें त्यांचा विचार करितां, जुन्या संस्कृत शास्त्रांच्या व साहित्याच्या अभिवृद्ध्यर्थ बडोदासंस्थानांत कांहीं विशेष प्रकारचे प्रयत्न केले जात असतील अशी साधारणतः कल्पना होणार नाहीं. तसें पाहूं गेलें असतां—एकदोन अपवाद वगळल्यास—संस्थानच्या हद्दींत शतकानुशतकें प्राचीन संस्कृतीचें वा विद्येचें माहेरघर होऊन बसलेल्या देवळें, विहार, इत्यादिक धार्मिक संस्था म्हणण्यासारख्या नाहींतच; आणि राजाश्रयाभावीं, असल्या प्राचीन संस्थांमधूनच, जें कांहीं संस्कृत साहित्य हिंदुस्थानांत आजवर तग धरून राहिलेलें आहे, तें बऱ्यावाईट स्थितींत जोपासिलेलें आढळतें. शिवाय तसल्या विद्यांच्या अभिवृद्धीला ज्याप्रकारचें निर्वेध शांततामय वातावरण लागतें तसलें वातावरण श्रीमंत सयाजीराव महाराजांच्या कारकीर्दीपूर्वी संस्थानाच्या वांट्याला फारसें लाभलेलेंहि नव्हतें. आणि प्राचीन शास्त्रें व साहित्य ही कांहीं अशी गोष्ट नाहीं कीं मनांत येतांक्षणींच, थोडें अधिकउणें द्रव्य वेंचून, एखाद्या राजवाड्यासारखी ती अस्तित्वांत आणितां येईल. अशा सर्वस्वीं प्रतिकूल परिस्थितींत सुद्धां बडोदा संस्थानामध्यें या बाबतींत ज्या संस्थांचा व कार्यांचा उपक्रम केला गेला आहे त्याबद्दल योजकांचें निःसंशय कौतुक केलें पाहिजे.

प्राचीन शास्त्रांचें आणि वाङ्मयाचें चिकित्सकदृष्ट्या संशोधन करण्याच्या पद्धतीचा अभ्यास अमेरिकेतील हारवर्ड युनिव्हर्सिटींत पूर्ण करून स्वदेशीं आल्यानंतर थोड्याच दिवसांनीं पुणें येथें, गुरुवर्य डॉक्टर सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या नांवानें व त्यांच्या ८० व्या वाढदिवसाचे प्रसंगीं, एक “ प्राच्यविद्यासंशोधनमंदिर ” स्थापण्याचा मी आणि माझ्या सहकारी मित्रांनीं इ. स. १९१५ च्या मे महिन्यांत उपक्रम केला. त्या निमित्तानें १९१६ सालीं आम्हीं श्रीमंत सरकारांस पत्र पाठवून मुलाखतीची याचना

केली होती. त्या पत्रास आलेल्या उत्तरांत " आपण अवश्य यावें. श्री. सरकारांना आपल्या भेटीनें आनंद होईल. पण महाराजांना आपल्या संस्थानांतच आपण वर्णन केल्यासारखीच एक संशोधनसंस्था स्थापावयाची असल्यानें आपण इकडून द्रव्यदृष्ट्या मदतीची अपेक्षा करूं नये " असें लिहिलें होतें. आपल्या संस्थानांत नवीन धर्तीच्या निरनिराळ्या संस्था उभारण्याबद्दल श्री. सयाजीराव महाराजांची कीर्ति आम्हीं पूर्वींच ऐकलेली असल्यानें निदान आम्ही योजिलेल्या संस्थेपेक्षां बडोद्यांत होऊं घातलेल्या संस्थेंत विशेष कोणकोणत्या योजना असतील त्यांची तरी माहिती करून घ्यावी या उद्देशानें माझे सहकारी मित्र परलोकवासी डॉ. गुणे व मी महाराजसरकारांच्या निमंत्रणाप्रमाणें बडोद्यास गेलों, व तेथें सुमारें अर्धा तास सरकारी मुलाखत झाल्यानंतर त्यांच्याच सांगण्यावरून विद्याधिकारी व इतर तज्ज्ञ विद्वानांशीं विचारविनिमय केला. मुलाखतीवरून रिसर्च इन्स्टिटट्यूट अथवा संशोधनसंस्था म्हणजे काय, तिनें काय काय कार्य केलें पाहिजे, व त्यास कोणकोणतीं साधनें लागतील त्याची महाराजास बरीच परिपूर्ण कल्पना होती याबद्दल आमची खात्री झाली. तसेंच निदान कांहीं बाबतींत पुण्यांत स्थापन होणाऱ्या संस्थेस, बडोद्यांत निर्माण करावयाच्या संस्थेपेक्षां, आनुकूल्य लाभलें आहे हीहि गोष्ट त्यांच्या नजरेस आल्यावांचून राहिली नसावी. कारण त्या त्या बाबतींत बडोद्यांतील संस्थेच्या उणीवा दूर करण्याचा संस्थानांकडून पद्धतशीर उपक्रम करण्यांत आला, व त्यानंतर—निःसंशय महाराज सरकारांच्या प्रेरणेवरूनच असलें पाहिजे—बडोद्याच्या स्टेट लायब्ररीचे क्यूरेटर प. वा. जनार्दन सखाराम कुडाळकर हे—लायब्ररींतील प्राचीन संस्कृत पोथ्या कपाटांतून व्यवस्थित ठेवण्याची पद्धत, त्या विद्वानांस अभ्यासाकरितां द्यावयाच्या असल्यास त्याच्या अटी, निवडक ग्रंथ प्रकाशित करावयाचे असल्यास ग्रंथकर्त्यांना द्यावयाच्या पारितोषिकाचें प्रमाण, वगैरे हरएक लहान मोठ्या बाबतींत भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटट्यूटमधील अधिकाऱ्यांशीं विचार विनिमय करीत असत. असो.

ओरिएंटल इन्स्टिटट्यूट निर्माण करावयास लागणारें पहिलें साहित्य म्हणजे जुन्या हस्तलिखित पोथ्या. अशा अठरा हजारावर पोथ्या भांडारकर इन्स्टिटट्यूटला आरंभापासूनच मिळाल्या होत्या. बडोद्याच्या संस्थेचा प्रारंभ तेथील विठ्ठल मंदिरांत संग्रहीं असलेले शेंदोनशें हस्तलिखित व तितकेच मुद्रित संस्कृत ग्रंथ

यांपासून झाला. महाराजांचे बंधु श्री. संपतराव गायकवाड यांच्या ५।६ शें ग्रंथांची त्यामध्यें नंतर भर पडली. पण त्यापेक्षां महत्त्वाची भर वे० शा० सं० यज्ञेश्वरशास्त्री सुरतकर, "दत्तकचंद्रिका" व "आर्यविद्यासुधाकर" या प्रसिद्ध संस्कृत ग्रंथांचे कर्ते, यांच्या संग्रहींच्या निवडक ४५० हस्तलिखित पोथ्या व ५० वर मुद्रित ग्रंथ यांची पडली. सदरहु शास्त्री हे व्याकरण, धर्म, आणि साहित्य शास्त्रांत पारंगत असून प्रतिष्ठित विद्वान् होते. बडोदा राज्यांत न्यायखात्यांत न्यायाधीशास हिंदुधर्मशास्त्रासंबंधीं सल्ला देणारे 'पंडित' म्हणून यांची नेमणुक केली असून ते श्री० मल्हारराव महाराजांनीं स्थापन केलेल्या संस्कृत पाठशाळेंत प्रधानाध्यापकाचें काम करीत असत. अशा विद्वानाचा ग्रंथसंग्रह अर्थात् महत्त्वाचा असला पाहिजे. यानंतर कांहीं किरकोळ ग्रंथांची संग्रहांत भर पडत गेली, आणि मुख्यतः श्रीमंत महाराणी सरकारांच्या देवघरांत संग्रहीं असलेल्या सचित्र व सूक्ष्माक्षरांनीं लिहिलेल्या महाभारत (लांबी २२८ फूट), भागवत (लांबी ८४ फूट), हरिवंश (लांबी ४४ फूट), आणि गीता (लांबी १०॥ फूट) या कलेच्या दृष्टीनें बहुमोल विंडोळी-ग्रंथांचा लाभ झाला. तथापि संशोधनाचें कार्य एवढ्यानेंच भागणारें नव्हतें, म्हणून मद्रासेकडील सुप्रसिद्ध अनंत कृष्ण शास्त्री यांस बडोदा सरकारनें हिंदुस्थानांत सर्वत्र प्रचार करून, जुने व दुष्प्राप्य हस्तलिखित ग्रंथ शोधून काढून, संस्थानाकरितां पैदा करण्याच्या कामावर नेमिलें. सदरहू शास्त्री आपल्या सुविद्य पत्नीसह गांवोंगांवीं हिंडत, निरनिराळ्या ठिकाणीं पडेल त्या प्रसंगास तोंड देत, पण ग्रंथांचा सुगावा लागला म्हणजे कांहीं तरी हिकमत करून तो पैदा केल्याशिवाय सोडत नसत. सहासात वर्षांमध्यें सदरहु शास्त्र्यांनीं सहासात हजारांहून अधिक हस्तलिखित ग्रंथ संस्थानाकरितां मिळविले.

या शिवाय, बडोदें संस्थानांतलि दुसरें महत्त्वाचें शहर, इतिहासप्रसिद्ध पाटण, येथें जैनधर्माचे अनेक महत्त्वाचे व ताडपत्रावर लिहिलेले ग्रंथ जुन्या जैन भांडारांमधून संग्रहित असल्याबद्दल ख्याति होती. सदरहू भांडारें ज्या जैन साधूंच्या ताब्यांत होतीं. ते त्या ग्रंथांचा स्वतः उपयोग करण्यास असमर्थ असून दुसऱ्यासहि ते ग्रंथ सहसा दाखवित नसत. व ग्रंथ जीर्ण असल्यामुळें व त्यांची तितकीशी काळजी घेतली जात नसल्यामुळें, ते सर्वभक्षक काळाच्या आहारीं जाण्याची भीति होती. असलें ग्रंथभांडार सत्तेच्या जोरा-

वर हस्तगत होणें बरेंच कठीण असतें, व प्रसंगविशेषीं ते नापत्ता अथवा नष्ट होण्याचा संभव असतो. म्हणूनच, स्वतः जैनधर्मीय व अभ्यासू विद्यार्थी असून ग्रंथसंशोधनाची जाण व आवड असलेल्या, श्रीयुत सी. डी. दलाल यांचीं महाराजांनीं संस्कृत लायब्ररीचे पहिले लायब्रेरियन म्हणून नेमणूक केली व त्यांचें मुख्य काम, पाटण व जेसलमीर येथील भांडारें तपासून त्यांतील ग्रंथांची वर्णनात्मक सूची तयार करणें व नंतर त्यांतील विशेष महत्त्वाच्या ग्रंथांची प्रकाशनाकरितां संशोधित प्रत, टिप्पणी वगैरे देऊन व ऐतिहासिक प्रस्तावना जोडून, तयार करणें हें होतें. प्रारंभीं प्रारंभीं श्री. दलालांनाहि जैन भांडाराचा संपूर्ण उपयोग करूं दिला जात नसे. जे २।४ ग्रंथ प्रकाशनाकरितां पाहिजे असतील तेवढेच त्यांना मोठ्या मिनत-वारीनें भांडाराबाहेर नेण्याची परवानगी मिळे. याचें प्रत्यंतर म्हणून आतां उघडपणें सांगावयास हरकत नाहीं कीं इ. स. १९१६ च्या सुमारास मी "काव्यादर्श" या ग्रंथाचें संशोधन करीत असतांना, सदरहू ग्रंथाची एक ताडपत्रावरील संवत् ११९० च्या सुमारास लिहिलेली प्रत पाटणभंडारांत असून, त्यापूर्वी ४० वर्षे लिहिलेली दुसरी एक प्रत जेसलमीर येथील भंडारांत आहे असा तपास लागला. पाटण भांडारांतील प्रत मला पहावयास मिळेल काय अशी पृच्छा केली तेव्हां "तुम्ही स्वतः पाटणास १।२ दिवस याल तरच ती प्रत थोडा वेळ तुम्हांस पहावयास मिळवून देईन" असें श्री. दलाल यांनीं मला लिहून कळविलें. मी त्यांचे बरोबरच पाटणास गेलों व तेथील नागरवाड्यांत एका मित्राचे घरीं मुक्काम केला. श्री. दलाल स्वतःच्या अभ्यासा-करितां भांडारांतून जे २।३ ग्रंथ घरीं आणित त्यांबरोबर ते काव्यादर्शाचें पुस्तक आणित आणि मला सकाळीं पहावयास देऊन संध्याकाळीं परत भांडारांत नेऊन ठेवित. भांडाराधिपतींना कोणतें पुस्तक बाहेर नेलें याची दाद नसे. ते नगास नग मोजून घेत. सारांश अशा परिस्थितींत श्री. दला-लांना ग्रंथसूचीचें काम करावें लागलें. श्री. दलालांच्या आकस्मिक व शोचनीय निधनानंतर त्यांना मिळालेल्या सवलतीहि दुसऱ्या कोणांस मिळत नसाव्यात असें दिसतें; कारण इ. स. १९२३ मध्यें छापून प्रसिद्ध झालेल्या जेसलमीर भांडाराची वर्णनात्मक सूची, व सध्यां छापत असलेली पाटणा ग्रंथभांडा-राची वर्णनात्मक सूची यांतील वर्णनांची माहिती त्यांनीं तयार केलेल्या टांचणांच्या आधारावरच उभारलेली आहे. पुनः स्वतंत्र रीतीनें ग्रंथ पाहा-

ण्याची इतरांस जरूरी तरी भासत नसावी अथवा बहुधा परवानगी मिळत नसावी असें दिसतें. श्री. दलाल यांच्या सारख्या सालस, निरलस, अभ्यासकाची त्यांना सर्व प्रकारें उचित अशा कामाकरितां निवड करण्यामध्यें महाराजांनीं दाखविलेली गुणग्राहकता श्री. दलाल अकालीं कालवश न होते तर विशेष फलद्रूप झाली असती यांत शंका नाहीं. श्री. दलालांच्या पूर्वी महाराजांच्याच आज्ञेनें श्री. मणिलाल नभूभाई द्विवेदी यांनीं पाटण भांडारांतील ग्रंथाची सूचि करावयाचा प्रयत्न केला होता, पण त्यांना पाटण मधील कांहीं भंडारांतील कांहीं ग्रंथच पहावयास मिळाले. संपूर्ण १३ भांडारें श्री. दलाल यांसच पहावयास व अभ्यासावयास मिळालीं. त्याच्यानंतर दुसऱ्या कोणाला तेवढा अधिकार प्राप्त होणार नकळे.

सध्यां " ओरिएंटल् इन्स्टिटयूट " मध्यें हस्तलिखितांची संख्या १३००० वर आहे. एखाद्या गोष्टीची पिच्छा पुरविली म्हणजे आरंभीं जेथें मुळींच कांहीं नसतें तेथें केवढें संशोधनाचें अपूर्व साधन निर्माण करतां येणें शक्य आहे हें या उदाहरणावरून दिसून येईल. पण नुसता ग्रंथसंग्रह असून उपयोगी नाहीं. त्यांत कोणकोणते ग्रंथ आहेत त्यांची समग्र माहिती बाहेरच्या अभ्यासकांस होण्याकरितां त्यांची एक विस्तृत वर्णनात्मक सूची प्रसिद्ध करणें जरूर असतें. अशा बारा भागाच्या एका बृहत्सूचीची योजना तयार असून तिचा पहिला भाग १९२५ सालीं प्रसिद्ध झाला आहे. अशा सूच्यांचें काम मोठें उरस्फोडीचें असल्यामुळें सूचीचे पुढील भाग आजवर प्रसिद्ध झाले नाहींत याबद्दल आश्चर्य वाटावयास नको.

दुर्मिळ ग्रंथांचा संग्रहकरण्याच्या योजनेबरोबरच त्यांच्या प्रसिद्धीकरणाचीही योजना हातीं घ्यावी लागते. श्री० दलाल यांनीं इ. स.१९१५च्या एप्रिल मध्यें याबाबतींत केलेल्या रिपोर्टाच्या आधारेंच त्याच सालीं डिसेंबर महिन्यांत योग्य त्या रकमेची तरतूज करून "Gaikwar's Oriental Series" या ग्रंथश्रेणीचा उपक्रम करण्यांत आला. दुर्मिळ आणि अप्रसिद्ध ग्रंथच मात्र प्रसिद्ध करण्याकडे वरील श्रेणीचा पहिल्यापासून कल आहे, आणि तें एका अर्थी योग्यच आहे. ग्रंथसंशोधनाचें काम आरंभीं श्री० दलाल आणि उपरिनिर्दिष्ट अनंत कृष्ण शास्त्री यांजकडे सोंपविलें होतें. सध्यां त्या कामाची देखरेख डॉ. भट्टाचार्य यांजकडे सोंपविली आहे. आजवर या श्रेणींतून ६३ ग्रंथ प्रसिद्ध झाले असून २७ ग्रंथ छापत आहेत. प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांपैकीं

कांहीं—उदाहरणार्थ, काव्यमीमांसा ( अनुक्रमांक १ ), समरांगण ( अनु० २५ व ३२ ), मानसोल्लास ( अनु० २८ ), तत्त्वसंग्रह ( अनु० ३० व ३१ ) नाट्यवेद विवृति ( अनु० ३६ ), न्यायप्रवेश ( अनु० ३८ व ३९ ), भावप्रकाश ( अनु० ४५ ), इत्यादि ग्रंथांनीं संस्कृत साहित्याच्या इतिहासामध्यें फारच महत्त्वाची भर टाकली आहे. छापत असलेल्या ग्रंथांपैकीं इष्टसिद्धि, सूक्तिमुक्तावली, व शाबर भाष्याचें समग्र इंग्रजी भाषान्तर यांच्या प्रसिद्धीकडे विद्वानांचे नेत्र उत्सुकतेनें लागून राहिले आहेत. गेल्या पांच वर्षांमध्यें मिळून वरील श्रेणींतील ग्रंथ तयार करण्याकडे व प्रकाशन करण्याकडे मिळून ६९ हजार रुपये खर्ची पडले आहेत.

दुर्मिळ व विद्वत्तापूर्ण ग्रंथ प्रसिद्ध झाले तरी त्यांचें खरें चीज करणारे जे सरस्वतीचे भक्त त्यांचेवर श्रीचा पुरेसा कृपाकटाक्ष वांट्यास येत नसल्यामुळें प्रकाशित ग्रंथांची किंमत अगदीं माफक म्हणजे जवळजवळ लागणाऱ्या खर्चा इतकीच ठेविली पाहिजे. तसा प्रकार प्रसिद्ध झालेल्या ग्रंथासंबंधानें झाला असेलच असें म्हणवत नाहीं. कदाचित् ग्रंथांच्या पुरेशा प्रती छापिल्या जात नसल्यामुळें प्रत्येक प्रतीची किंमत जास्त ठेवावी लागत असेल. तसें असेल तर ती योजनेची चूक असून प्रस्तुत ग्रंथप्रकाशनश्रेणी काढण्याच्या अंतिम उद्देशास तें, विघातक होईल असें नमूद करणें भाग आहे. तीनशें किंवा पांचशें प्रती छापण्याच्या मानानें हजार प्रती छापण्यास विशेष अधिक खर्च लागत नाहीं, तसें करण्यानें एकंदर खर्च जास्त प्रतींवर विभागून जाऊन दरप्रतीची किंमत कमी करितां येते, व हल्लीं छापून प्रसिद्ध झालेल्या प्रती कांहीं संस्थांना अथवा व्यक्तींना भेट म्हणून देण्याच्या बाबतींत काटेतोलपणा सुरू असल्याचा जो प्रवाद क्वचित् ऐकूं येतो तो थांबविणें, थोड्या अधिक प्रती काढल्या म्हणजे, सुकर होईल. असो.

बडोद्यांतील या संशोधनसंस्थेचें नांव ओरिएंटल इन्स्टिट्यूट एवढेंच ठेवण्यामध्यें, व तिला ओरिएंटल् रिसर्च इन्स्टिट्यूशन म्हणण्यामध्यें, रिसर्चच्या एका अंगाचें, म्हणजे, विद्यार्थ्यांना संशोधनाच्या मूलतत्त्वांचें पद्धतशीर ज्ञान करून देऊन त्यांच्या करवीं संशोधन करवून घेण्याच्या कामाकडे कमी लक्ष देण्याचा हेतु असेल असें म्हणवत नाहीं. या कामाकरितां हस्तलिखित ग्रंथसंग्रहा इतकेंच महत्त्वाचें दुसरें साधन म्हणजे त्या त्या

विषयांवरील विविध मुद्रित ग्रंथांचा संग्रह हें होय. बडोदा सेंट्रल लायब्ररीमध्यें सर्वच शास्त्रांचीं पुस्तकें आहेत. तथापि प्राच्यविद्यासंशोधनास उपयोगी पडणारीं पुस्तकें, विशेषतः बडोदा कॉलेजांतील ग्रंथांचा विचार केला असतां, वरील कामास अगदींच अपुरीं पडण्याजोगीं असतील असें म्हणवत नाहीं. शिवाय राजधानीच्या ठिकाणींच आर्ट्स कॉलेज व इतर शिक्षणाच्या संस्था असल्यामुळें, पुरेसा अधिकारी विद्यार्थीवर्ग व शिक्षक हेहि तयार आहेत. तेव्हां या संशोधनकार्याकरितांच म्हणून शिष्यवृत्त्या वगैरे ठेऊन या प्राच्यसंशोधनाच्या महत्त्वाच्या अंगाचा उपक्रम ओरिएंटल इन्स्टिटयूटद्वारां केल्यास उचित होईल असें वाटतें. असा तरुण व उत्साही विद्यार्थीवर्ग तयार झाला म्हणजेच, अभ्यासकांच्या उपयोगाकरितां निरनिराळ्या विषयांवरील ग्रंथांतून अथवा नियतकालिकांतून येणाऱ्या माहितीची संदर्भटांचणें तयार करणें वगैरे, पाश्चात्य देशांतून अत्यावश्यक अशीं मानिलेलीं "रिसर्च' इन्स्टिट्यूटचीं अंगोपांगें, सज्ज करून ठेवणें शक्य होईल.—जातां जातां हा उल्लेख करणें जरूर आहे कीं, संस्कृत व हिंदु साहित्याबरोबरच प्राकृत, जैन, बौद्ध, पर्शियन इत्यादि साहित्यांचाहि परामर्ष संस्थेकडून घेतला जातो. गुजराथी व हिंदींतून ग्रंथांचीं भाषांतरेंहि ज्ञानाचा सार्वत्रिक प्रसार व्हावा म्हणून करवून प्रसिद्ध केलीं जात आहेत. पण हा विषय प्रस्तुत निबंधाच्या कक्षेबाहेर जात असल्यानें येथें त्याचा केवळ उल्लेख करूनच सोडून द्यावा लागत आहे.

आतांपावेतों बडोदानराधिपाच्या प्रेरणेनें केल्या जात असलेल्या ज्या कामगिरीचा उल्लेख आलेला आहे ती पाश्चात्यांच्या चिकित्सक पद्धतीची झाली व तिला लागणारीं विविध साधनें किती आस्थेनें आणि तत्परतेनें संग्रहीत केलीं गेलीं आहेत व जात आहेत त्याचा निर्देश केला. हा प्रस्तुत निबंधाचा महत्त्वाचा पूर्वभागच झाला असें म्हटलें पाहिजे. कारण परंपरागत शास्त्रीय ज्ञान अशा रीतीनें ग्रंथनिविष्ट करून ठेवण्याइतकेंच महत्त्वाचें काम म्हणजे या परंपरागत ज्ञानाची अध्ययन अध्यापनद्वारा जोपासना करणें हें होय. आजकालच्या धकाधकीच्या मामल्यांत हें परंपरागत शास्त्रीय ज्ञान वर्षानुवर्षें अभ्यास करून कंठस्थ करून ठेवणाऱ्यांचा निभाव लागत नाहीं हें तसल्या पहिल्या प्रतींच्या विद्वानांच्या प्रत्यहि घटत जाणाऱ्या संख्येवरून सर्वांच्या निदर्शनास येत आहेच व हे "भारवाह स्थाणू" आयते विलयास

जात आहेत तर जाऊं द्यात असें म्हणून त्यांच्या रक्षणार्थ सामर्थ्यवानाला सुद्धां आपल्या एखाद्या लहानशा करांगुलीचा सुद्धां टेकू देण्याची आवश्यकता वाटत नाहीं. अशा परिस्थितींत देखील श्री० सयाजीराव महाराज यांनीं संस्कृत साहित्याच्या याही अंगाची जोपासना व तीहि केवळ मेदोवृद्धीकरितां नव्हे तर त्याला खरें कार्यक्षम बनविण्याच्या हेतूनें—चालविली आहे ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. विद्वानांचा सत्कार करणें व त्यांना देकार देणें हा राजेलोकांचा अधिकारच आहे. दक्षिणेंत पेशव्यांनीं जसा श्रावणमासीं दक्षिणा देण्याचा उपक्रम, आपल्या कारकीर्दीच्या अव्वल-पासून अखेरीपर्यंत, अव्याहत चालू ठेविला होता, तसा तो पेशव्यांच्या हाता-खालील राजेरजवाड्यांनींहि सुरू केला होता, व कांहीं ठिकाणीं तो क्रम आजवरहि चालूच आहे. बडोद्यांतहि पूर्वीपासून “श्रावणमास दक्षिणा” सुरू होत्या. आलेल्या विद्वानांची लायखी पाहून, परीक्षा घेऊन, मगच देकार द्यावयाचा ही रीतच होती; पण कालमानानें या देकाराला पारितोषिकाचें रूप जाऊन भिक्षेचें रूप प्राप्त होऊं लागलें. शिवाय एकदा परिक्षा होऊन दक्षिणेची रक्कम ठरली म्हणजे तें वर्षासनच होऊन बसे. मग प्राप्त झालेल्या विद्येचें अध्ययनअध्यापनद्वारा संगोपन व वाढ केली जात असो वा नसो. या सर्व परिस्थितीचा विचार करून महाराजांनीं श्रावणमास दक्षिणापरीक्षेचे नियम व अभ्यासक्रम पूर्ण विचाराअंतीं योग्य तें परिवर्तन करून निश्चित केले आहेत व तेणेंकरून या दक्षिणादानाचे मूळ हेतू यथावत् साध्य होण्यास फार मोठी मदत होईल असें मला वाटतें. या विषयाचें याहून विस्तृत विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. असो.

प्राचीन तऱ्हेच्या विद्वानांना यथोचित आश्रय देण्याच्या संकल्पाची नुस-तीच घोषणा करून भागत नाहीं, तर अशा तऱ्हेचे विद्वान् निर्माण कर-णाऱ्या संस्था, म्हणजे अथ पासून इति पर्यंत सर्व शास्त्रांचें शिक्षण देणाऱ्या संस्कृत पाठशाला, ठिकठिकाणीं स्थापन केल्या पाहिजेत, याचीहि जाणीव श्रीमंत महाराजसरकारांस आहे हें नमूद केलें पाहिजे. जुन्या पाठशाला हिंदुस्थानांत चोहोंकडेच आहेत. पण त्या केवळ चालचलाऊ, पोटभरू, मोडकळीस आलेल्या अशाच सर्वत्र आढळण्यांत येतात. बडोदें येथील राजकीय संस्कृत महाविद्यालय ही संस्था या सर्वसाधारण विधानास अपवादात्मक आहे हें भूषणावह आहे. या पाठशालेच्या नियमांचें २।३ दां सूक्ष्म अवलोकन करून

विचारपूर्वक परिवर्तन करण्यांत आलेलें आहे. बहुतेक ज्योतिष आयुर्वेद सुद्धां सर्व शास्त्रांच्या अध्ययनाची तेथें सोय आहेच. शिवाय प्राकृत व पाली आणि जैन व बौद्ध तत्त्वज्ञान यांच्या शाखांचाहि महाविद्यालयांत अंतर्भाव केलेला आहे. ज्यांना संपूर्ण शाखांचा अभ्यास झेंपणार नाहीं अशांना मध्यम प्रतीचा अभ्यासक्रम ठेवला आहे, त्याचप्रमाणें पाश्चात्य पद्धतीनें संस्कृत शिकणारांनाहि जरूरीप्रमाणें विविक्षित शास्त्रांचें अध्ययन करण्याची सोय केली आहे, आणि त्याहूनहि विशेष म्हणजे, केवळ पुजारी अथवा पुराणीक, तसेंच भिक्षुकी किंवा याज्ञिकी करणारांनाहि, जें कार्य स्वतः करावयाचें किंवा करवावयाचें तें समजून करावें वा करवून घ्यावें, नुसतीच पोपटपंची नसावी, या करितां जी संस्कृत भाषाज्ञानाची व प्रयोगविज्ञानाची आवश्यकता आहे ती त्यांना सुगम रीतीनें प्राप्त करून देण्याची योजनाहि महाविद्यालयाच्या कार्यक्रमांत अंतर्भूत झालेली आहे. शिवाय अशा रीतीनें तयार होऊन उत्तीर्णपत्रिका मिळवितील अशांनाच राजदरबारीं व इतरत्र आश्रय मिळावा अशी प्रथा पाडलेली असल्यामुळें पुरवठ्याबरोबरच मागणीचीहि तरतूद सहजासहजीं करून ठेविली गेली आहे. राजकीय महाविद्यालयांत हल्लीं बारा शास्त्री अध्यापक असून अभ्यासक्रम तीन ते बारा वर्षांचा आहे. शिक्षण मोफत असून विद्यार्थ्यांना लायखीप्रमाणें शिष्यवृत्त्यां, बक्षिसें, पदव्या वगैरे देण्यांत येतात. एकंदर शिष्यवृत्त्यांची संख्या ५० असून त्या दरमहा रु. ८ ते रु. १२ च्या आहेत. यावरून सर्व विद्यार्थ्यांची संख्या सरासरी ७५ ते १०० असावी.

राजकीय संस्कृत महाविद्यालयांतून उत्तीर्ण होऊन पदव्या मिळविलेले पंडीत कांहीं संस्थानचेच रहिवाशी असल्यामुळें संस्थानांतच राहतात, व त्यांना राजकीय अथवा खासगी आश्रय मिळतो अथवा स्वतंत्र धंदा चालवितां येतो. कांहीं संस्थानाबाहेर नोकरीवर आहेत. त्याचप्रमाणें संस्थानाबाहेर विद्या संपादून निरनिराळ्या शास्त्रांत प्रवीण असलेले कांहीं विद्वान् पंडितहि संस्थानांत आहेत. अशा विद्वद्रत्नांपैकीं वे. शा. सं. यज्ञेश्वरशास्त्री यांचा उल्लेख वर ( पॅरा ३ ) आलाच आहे. त्यांचेच सहाध्यायी वे. शा. सं. आबाशास्त्री हे न्यायशास्त्रांत पारंगत होते व त्यांनीं सुप्रसिद्ध मथुरानाथ भट्टाचार्यांच्या साक्षात् शिष्यापाशीं अध्ययन केलें. यज्ञेश्वरशास्त्र्यांचे चिरंजीव कृष्णशास्त्री हेहि वडीलाप्रमाणेंच जाडे विद्वान् असून त्यांनीं “ संगीत-

पारिजात " या ग्रंथाचें भाषान्तर केलें आहे. वरील पितापुत्रांप्रमाणेंच वे. शा. सं. त्र्यंबकनाथ दयानाथ शास्त्री व त्यांचे पुत्र बदरीनाथ यांची न्याय व वेदांत शास्त्रांतील योग्यता मोठी होती. पंडित बदरीनाथ यांस श्री. महाराजसरकार यांनीं "तर्कवाचस्पति" ही बहुमानाची पदवी अर्पण केली होती, व त्यांना ब्रिटिश सरकारांकडून "महामहोपाध्याय" हा किताबहि प्राप्त झाला होता. या शिवाय इतरहि विद्वान् पंडित महाराजांच्या कारकीर्दींत होऊन गेले व सध्यां विद्यमानहि आहेत. अत्युत्कृष्ट गुणाचें चीज महाराजांच्या हातून झालें नाहीं असें विरळाच घडे. स्वकीय विद्वानांहूनहि अधिक पुरस्कार परप्रांतीय विद्वानांचा महाराजांकडून केला जातो असा प्रवाद आहे, व तो दूषण नसून भूषणच आहे.

हिंदुस्थानांत अथवा हिंदुस्थानाबाहेर कोणतेंहि स्थळ, संस्था, किंवा व्यक्ति महाराजांच्या दृष्टीस पडली म्हणजे याचा बडोदा संस्थानाकरतां कोणत्यारीतीनें उपयोग करून घेतां येईल ह्याचा विचार त्यांचे मनांत प्रथम उत्पन्न होतो हें जरी खरें असलें तरी एखादें कार्य महत्त्वाचें व देशाच्या उत्कर्षास कारणीभूत होणारें असल्यास तें केवळ आपल्या संस्थानांत होत नाहीं–होणें शक्य नाहीं-एवढ्याच करितां त्याला महाराजांनीं सक्रिय सहानुभूति दाखविली नाहीं असें सहसा झालें नाहीं. प्रस्तुत निबंधांतील विषयाला धरून वरील प्रवृत्तीचें उदाहरण द्यावयाचें असल्यास तें पुणें येथें भांडारकर इन्स्टिट्यूटमार्फत सुरू असलेल्या महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीचें देतां येईल. निबंधाच्या प्रारंभीं निर्दिष्ट केलेल्या कारणाकरितां भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनमंदिराला जरी महाराजांनीं केवळ एक हजार रुपयांचीच देणगी दिली असली तरी वरील कार्याला संस्थानांतून दरसाल रुपये ५०० ची मदत आजतागाईत होत आहे. त्याचप्रमाणें दुसरें उदाहरण म्हणजे हिंदुस्थानांत दर दोन वर्षांनीं भरणारी " ऑल–इन्डिया ओरिएंटल कॉन्फरन्स् " चीं अधिवेशनें हीं होत. संस्थानांतून अधिवेशनास नियमित देणगी देण्यांत येते, व पुढलें म्हणजे सातवें अधिवेशन तर खुद्द बडोद्यांतच भरवावयाचें आहे. सारांश, सध्याच्या शास्त्रीय युगांत ज्या विद्येची चांगली निगा कोठेंहि फारशी होत नाहीं व हेटाळणी मात्र प्रत्यहीं होत आहे अशा या गीर्वाण विद्येच्या उत्कर्षाकरितां, तिच्या मधील कालक्रमानुसार दोष काढून टाकून, तिची बळकट पायावर पुनश्च प्रतिष्ठापना व्हावी म्हणून,

वर दर्शविलेल्या अनेक मार्गांनीं, श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या कारकीर्दींत यशस्वी प्रयत्न होत असलेले पाहून, सध्याच्या निबिड निराशामय युगांत सुद्धां मनास क्षणभर भावी कालाबद्दल आशेचा ओलावा वाटतो हें येथें कृतज्ञतापूर्वक नमूद करणें प्रस्तुत निबंधकारास आपलें कर्तव्य वाटतें, व तें तो येथें नम्रतापूर्वक बजाविण्याची परवानगी घेत आहे. इति शम् ।

---

## શ્રીમંત સરકાર મહારાજા સાહેબ સયાજીરાવ ગાયકવાડ એઓશ્રીની સાહિત્યોપાસના.

( લેખકઃ—શ્રીયુત જયસુખલાલ પુરૂષોત્તમરાય જોષી પુરા, એમ. એ. )

**આમુખ.**

વડોદરા રાજ્યની વિદ્યાવાડીને આટલા બધા પ્રમાણમાં વિવિધ વૃક્ષવલ્લરીઓથી વિભૂષિત કરી વિલસાવનાર વિભૂતિ કોણ છે એવો પ્રશ્ન ભવિષ્યમાં જ્યારે કોઈ તલસ્પર્શી બુદ્ધિવાળો સાહિત્ય ઈતિહાસકાર ઉપસ્થિત કરશે ત્યારે તેને એકજ સચોટ ઉત્તર મળી જશે કે એ વિભૂતિ તે શ્રીમંત સરકાર મહારાજા સાહેબ શ્રીસયાજીરાવ ગાયકવાડ જ છે. ત્યારે આ શ્રીમંત મહારાજાસાહેબ એવી વિભૂતિરૂપે કેવી અને શી રીતે પ્રકાશી ઉઠ્યા છે તે જાણી લેવું એ આપણો ધર્મ થઈ પડે તેમ છે. ભુતકાળની વાત બાજુ ઉપર રાખીને બોલીએ, તો આપણા વર્તમાનકાળ વિષે ગુજરાત–કાઠિયાવાડમાં થતા રહેલ આપણા વાઙ્મયના પ્રકર્ષને લગતા પ્રયાસો અને એવા પ્રયાસોના પરિણામમાં તેની કાયાનાં વિવિધ અંગોમાં થઈ આવેલ પરિવર્તનની બાબતમાં આપણે શ્રીમંત મહારાજા સાહેબ–એઓશ્રીને અર્વાચીન "ભોજ" ગણી શકીએ તેમ છીએ. ભોજ રાજાના દરબારમાં જેમ અનેકવિધ કોટીના વિદ્વાનો સન્માન પામતા હતા તેમ, તેટલા પ્રમાણમાં નહિ તો કાળભેદથી થઇ આવે તેટલા પ્રમાણમાં આપણા આ શ્રીમંત મહારાજાસાહેબના દરબારમાં આપણા પિતૃદેશ ભરતખંડના

વિવિધ ભાગોમાં પ્રકાશી ઉઠતા વિદ્વાનોનું સન્માન યથા પ્રસંગ સંતત થતું રહેલું છે એમ આપણે એઓશ્રીનું જીવનવૃત્ત વિચારીને સહજ સમજી શકીએ તેમ છીએ. યુરોપીય સંસ્કૃતિના સંસર્ગથી આપણા દેશચિત્તમાં જે ભાવવિકાર થવા પામ્યો છે તે વિષે આપણે જ્યારે વિચાર કરીએ છીએ, ત્યારે આપણા આ શ્રીમંત મહારાજા સાહેબની અસાધારણ પ્રતિભાએ, અન્ય સાધનોથી નહિ તો સાહિત્યની મદદથી જે કેટલાંક પરિણામો ઉપજાવેલાં છે તે એવાં છે કે તેઓ આપણને ભવિષ્યકાળના ગર્ભમાં રહેલ બાબતનું દર્શન કરાવ્યા વિના રહે તેમ નથી. શ્રીમંત મહારાજા સાહેબ એક તરફથી–બાહ્ય દૃષ્ટિએ–જેમ અર્વાચીન વિદ્યાઓ અને સંસ્કૃતિના ઉપાસક દેખાય છે તેમ બીજી તરફથી સૂક્ષ્મ દૃષ્ટિથી જોનારને તેઓશ્રી આપણી પ્રાચીન વિદ્યાઓ અને સંસ્કૃતિના એક ખરા ઉદ્ધારક પૂજક દેખાયા વિના રહે તેમ પણ નથી. સંસ્કૃતિમાત્રનું ઘડતર સાહિત્યદ્વારા થાય છે, અને બીજા શબ્દોમાં કહીએ તો સાહિત્યદર્પણમાં જ સંસ્કૃતિમાત્ર પ્રતિબિંબિત થઇ રહે છે. આ વાત આપણા શ્રીમંત મહારાજા સાહેબ સારી પેઠે સમજી શકેલા હોઇને તેઓશ્રીએ એક વિશાળ સાહિત્યમંદિર બંધાવી લોકમાત્રને અર્પણ કરી દેવાને માટે મોટો પરિશ્રમ ઊઠાવેલો છે. વસ્તુતઃ તેવો શ્રી પોતે પ્રાચીન તેમ જ અર્વાચીન જ્ઞાનસરિતાઓના સંગમરૂપ બનીને પોતાના રાજ્યમાં અને પછી રાજ્ય બહારના પ્રદેશોમાં ત્રિવેણી રૂપે વિહરતા થયલા છે એ એક અબાધ્ય સત્ય છે. ભાગ્યદેવીના કૃપાપાત્ર થઇને તેઓશ્રીએ જેમ એક તરફથી રાજ્યશ્રી પ્રાપ્ત કરેલ છે તેમ બીજી તરફથી કોઈ અદ્‌ભુત યોગને પરિણામે તેઓશ્રીને સરસ્વતીદેવીના અંકમાં રમવાનો અધિકાર પણ મળી ચૂકેલો છે; અને એવા એ વિરલ સુયોગ–સંયોગને લીધે એઓશ્રીને દીર્ઘ ગણાય તેવો રાજકાળ આપણા દેશના આધુનિક ઈતિહાસમાં અનેકધા નોંધાઈ રહેવા જેટલી વિલક્ષણ ઉત્કૃષ્ટતાને પામી રહેલો પણ છે. આમ હોઇને એઓશ્રીના માંગલિક જય–સ્મારક રૂપે, એઓશ્રીએ આદરેલ સાહિત્યયજ્ઞને લગતી હકીકતને આ લઘુલેખ દ્વારા અક્ષરાંકિત કરી દેવી એ સર્વથા યોગ્ય જ જણાશે એમ મારૂં માનવું થાય છે પણ ખરૂં.

**શતમુખી સાહિત્યગંગા.**

શ્રીમંત મહારાજા સાહેબ પોતે એક જન્મસિદ્ધ સ્વતંત્ર વિચારક અને લેખક હોઈ પોતાના મનથી પોતાની કોટીના વિચારકો તથા લેખકોને દેશભરમાંથી ગોતી કાઢવાની અને તેમનો ન્યૂનાધિક અંશે ઉપયોગ કરી લેવાની અદ્ભુત શક્તિ ધરાવે છે, અને તેથી તેઓશ્રીએ પોતાના રાજકાળમાં આપણા હિંદુસ્તાનના જુદા જુદા ભાગના સાહિત્ય ભક્તોને યથા પ્રસંગ પોતાના દરબારથી જુદી જુદી રીતે સન્માનવાની પ્રથાનું અવલંબન કરી રાખેલું છે, એમ જે કોઈ જાણકાર છે તે સહજ કહી શકે તેમ છે જ. પોતાના રાજ્યમાં વહેતી પરંતુ ક્ષીણજળ થઇ ગયલી સાહિત્યગંગાને એઓશ્રીએ છલકાતી કરી શતમુખી બનાવી દીધી છે, એ વાત કોણ નથી જાણતું ? એ સાહિત્યગંગાનાં મધુર જળનું પાન કરી જવાનું સદ્ભાગ્ય, અખિલ હિંદુસ્થાનના કેટલા બધા સાહિત્યભક્તોને પ્રાપ્ત થયલું છે ? સાહિત્ય દૃષ્ટિએ જોશું તો શ્રીમંત મહારાજા સાહેબ સયાજીરાવ ગાયકવાડ અકેલા વડોદરા રાજ્યના રાજા નથી. પરંતુ ભરતખંડ ભરની સાહિત્યસૃષ્ટિના મહારાજા પણ છે. તેઓશ્રીની સાહિત્યકાયામાંથી જે શ્વાસો નીકળેલા છે તેમનાં આંદોલનો દેશમાત્રમાં વ્યાપક થયેલા છે અને તેમણે જે પરિણામો ઊપજાવેલાં છે તે એવાં છે કે તે ભવિષ્યનો ઇતિહાસકાર માપી શકશે, બડોદરા રાજ્યને આપણા આ શ્રીમંત મહારાજા સાહેબનું શરીર ગણીએ અને એઓશ્રીને એ શરીરમાં રહેલ જીવાત્મા ગણીએ, તો અમારે અહીં કહેવું જોઇએ કે, એ જીવાત્માથી પ્રેરાયલા શરીરનું દરેક દરેક અંગ—દરેક દરેક રાજ્યનું ખાતું—શ્રીમંત મહારાજા સાહેબની સાહિત્યલીલાને અનુરૂપ ચેષ્ટા કરી રહેલું છે, અર્થાત્, વડોદરા રાજ્યનાં બધાંય ખાતાં અને તેમા પણ ખાનગીખાતું, ન્યાયખાતું, મુલ્કીખાતું વ્યાપાર—ઉદ્યોગખાતું, વગેરે શ્રીમંત મહારાજા સાહેબ—એઓશ્રીની પ્રેરણાથી એઓશ્રીનું વિદ્યાખાતું સાહિત્યરસની જે છોળ ઉડાવી રહેલ છે તેમાં પોતાનો હિસ્સો આપી રહેલ છે, અને એ જ આ શ્રીમંત મહારાજા સાહેબનો સાહિત્યવિજય ગણાશે.

**સાહિત્યોપાસના આરંભ.**

શ્રીમંત મહારાજા સાહેબે સાહિત્યની ઉપાસના કરવાનો આરંભ પોતાના યૌવનમાંથીજ કરેલો છે, અને આ વાતની પ્રતીતિ આપણને એઓશ્રીએ ઉઠાવેલ જ્ઞાનવર્ધક પરિશ્રમથી તેમજ તેઓશ્રીએ પોતે વર્ષો પૂર્વે લખેલ રોમની ચઢતી પડતીના ઇતિહાસ નામક ગ્રંથ વગેરે કૃતિઓનાં દર્શનથી થઇ આવે તેમ છે. એ પછી એઓશ્રીએ એ પ્રવૃત્તિ છોડી દીધેલી નથી, પરંતું રાજ્યવિષયક કામોનો ભાર વધતો ગયો છે તેમ તેમ તેઓશ્રીએ પોતે વાંચવા વિચારવાનું ચાલુ રાખી જાતે લખવાનું ઓછું કરી નાંખી પોતાના સાહિત્ય વિષયક ભાવો સુચવવાની અને તેવા ભાવોને અનુરૂપ ગ્રંથો તૈયાર કરાવી પ્રકટ કરાવવાની નીતિ અખ્ત્યાર કરી દીધેલી છે. શરૂઆતમાં આ ગ્રંથોત્પાદક કામ એઓશ્રી પોતાના ખાનગી ખાતા મારફત અને બહુધા રા. રા. ગોવિંદરાવ સખારામ સરદેસાઈ કે જેઓ હાલ એક પ્રખર મરાઠી ઇતિહાસ કાર તરીકે જાણીતા થયેલા છે તેમની મારફત કરાવતા હતા. પરંતુ દિવસો જતા ગયા તેમ તેમ શ્રીમંત મહારાજા સાહેબ—એઓશ્રીના ચિત્તપ્રદેશમાં વહેતી સાહિત્યસરિતા અધિકાધિક વેગવતી એટલી તો થતી ગઈ કે તેઓશ્રીને પોતાની કાર્યપ્રણાલી બદલવાની આવશ્યકતા જણાઈ, અને તેના પરિણામે ઇ. સ. ૧૮૯૫ માં એ સાહિત્યવૃદ્ધિ કરવાનું કામ એઓશ્રીએ પોતાના રાજ્યના કેળવણી ખાતાને બહુભાગે સોંપી દીધું. અહીં અમે 'બહુભાગે' શબ્દ વાપરેલ છે તેમાં રહસ્ય સમાયલું છે, અને તે એ કે કેળવણી ખાતું જોકે એ સાહિત્ય વિષયક પ્રવૃત્તિ કરી રહેલ છે તોપણ શ્રીમંત મહારાજા સાહેબ—એઓશ્રી ખુદની તે પ્રવૃત્તિ ઉપર હંમેશાં નજર રહે છે એટલું તો નહિ, પરંતુ એ પોતાની પ્રિય પ્રવૃત્તિમાં પ્રાણ પૂરતાં રહેવાના હેતુથી તેઓશ્રી વારંવાર વિવિધ આજ્ઞાઓ આપે છે, નવાં નવાં સાધનો પૂરાં પાડે છે અને ઘણીવાર જાતે શ્રમ ઉઠાવી તેની નિરીક્ષા પણ કરે છે. 'કેળવણીખાતું હવે એ કામ કરશે' એવી ભાવના એઓશ્રીના ચિત્તમાં કદિ પણ પૂર્ણવિરામ પામતી નથી, અને તેથી તેઓશ્રી પોતે પરભાષાના શિષ્ટ ગ્રંથો વાંચી વિચારી તેમના અનુવાદ દેશીભાષામાં કરાવી પ્રસિદ્ધ કરવાની પ્રેરણા પણ આપ્યાં કરે છે. ઘણીવાર પોતાના

રાજ્યબહારના વિદ્વાનોને ગોતી કાઢી, આમંત્રણ કરી પોતાના દરબારમાં બોલાવે છે અને તેમનો ઉપયોગ વિવિધ રીતે કરી તેમને સન્માને પણ છે. પ્રસંગે પ્રસંગે, પ્રાચીન અર્વાચીન જ્ઞાનવિજ્ઞાનમાં કુશળ ગણાતા પંડિતોને તેઓશ્રી પોતાની રાજસભામાં બોલાવી તેમની પાસેથી વ્યાખ્યાનો સાંભળે સંભળાવે છે, અને કોઇ કોઇ વાદ તો વિવાદાત્મક વ્યાખ્યાનો રચાવીને તેઓશ્રી બુદ્ધિસાગરનું મંથન કરાવી તેમાંથી જ્ઞાનનવનીત મેળવવાની તજવીજો પણ કરે છે. આ બધા પ્રકારની સાહિત્યોત્તેજક પ્રવૃત્તિઓ વડોદરા રાજ્યના લોકજીવનને હંમેશાં પ્રગતિને પંથે વિચરતું રાખે છે અને શ્રીમંત મહારાજા સાહેબ જે પ્રકારનો સાહિત્યયજ્ઞ કરી રહેલા છે તેનાં ફળ કેવાં આવશે તેની ઝાંખી કરવાનું સદ્ભાગ્ય તેઓશ્રીને પ્રાપ્ત થતું ગયું છે.

**શ્રીમંતની બહુભાષા ભક્તિ.**

તથાપિ શ્રીમંત મહારાજા સાહેબ દેશી ભાષાની ભક્તિ કરે છે તે ઉપરથી એમ સમજવાનું નથી કે તેઓ માત્ર ગુજરાતી ભાષાની સેવા કરી રહેલા છે. શ્રીમંત મહારાજાસાહેબે ગુજરાતી ભાષાને રાજ્યભાષા તરીકે ઠરાવી છે અને તેનો પ્રચાર વધાર્યો છે એ વાત જોકે ખરી છે; તથાપિ એઓશ્રીનું માનવું એવું છે કે, અખિલ હિંદુસ્તાન દેશને એકશરીરરૂપે ગણવાનું સર્વથા જરૂરનું કોઇ તેના એક જ અંગને ખીલવવાથી આખાય શરીરનો વિકાસ સધાશે નહિ, અને તેથી કરીને બને તેટલા પ્રમાણમાં બધાંય અંગોને હૃષ્ટપુષ્ટ બનાવવાં એ સર્વાંગસિદ્ધિ મેળવવાને અર્થે જરૂરનું છે. આવા પ્રકારની ઉદાત્ત ભાવના શ્રીમંત મહારાજા સાહેબની હોઇને તેઓશ્રીએ ગુજરાતી સાહિત્યની ખીલવણી કરવાની જે અનેક યોજનાઓ કરેલી છે તેમની સાથે સાથે બીજી કેટલીક ભાષાઓનો વિકાસ થઈ શકે તેવી અનુકુળતા કરી આપેલી પણ છે. ખાસ કરીને મહારાષ્ટ્રીય અને હિન્દી તેમ જ અંશતઃ ઉર્દુ ભાષામાં પ્રગટ થતા વાઙ્મયને તેઓશ્રીતરફથી સારૂં ઉત્તેજન અપાય છે, અને એ ભાષાત્રયમાં ગ્રંથો લખાવી પ્રકટ કરવાની યોજના ઘડાવીને તેઓશ્રીએ પોતાના કેળવણીખાતા મારફત અમલમાં પણ મુકાવી છે. વળી અંગ્રેજી ભાષામાં પ્રસિદ્ધ થતા વાઙ્મયની ઉપકારકર્તા તેઓ ઓછી સમજતા

નથી. ભરતખંડના જુદા જુદા ભાગોમાં પ્રખર વિદ્વાનોના હાથે લખાતા દેશહિતસાધક અનેક અંગ્રેજી ગ્રંથોને પ્રકટ કરાવવામાં તેઓશ્રીએ સારી આર્થીક મદદ આપી છે અને આપતાં રહેવાનું ચાલુ પણ રાખ્યું છે. તોપણ ખાસ કરીને મુખ્યતઃ ગુજરાતી અને તેનાથી કાંઇક ઉતરતા પ્રમાણમાં મરાઠી અને તે પછી હિન્દી અને ઉર્દુ સાહિત્યને તેઓશ્રીના રાજ્ય તરફથી જેટલી મદદ મળે છે તેટલી મદદ ઇતર ભાષાના સાહિત્યને અપાતી નથી એ પણ સત્ય છે. તેઓશ્રી જન્મથી મરાઠા ક્ષત્રિય છે અને તેથી તેઓશ્રી મરાઠી સાહિત્યને ઉત્તેજન આપી રહેલા છે એમ નથી. મહારાષ્ટ્રની અસર ગુજરાત ઉપર અને ગુજરાતની અસર મહારાષ્ટ્ર ઉપર પૂર્વકાળમાં થયાં કરતી હતી તેમ હવે પછીના કાળમાં પણ થયાંજ કરશે એવાત આપણા આ શ્રીમંત મહારાજા સાહેબ પોતાની જ્ઞાનદૃષ્ટીથી સમજી શકેલા છે, અને એવી એ સમજનું કારણ એ છે કે, ગુજરાત અને મહારાષ્ટ્ર એ બે દેશો એક બીજાની સાથે ભૌગોલિક બંધુતાના સંબંધથી સંકળાયલા છે. આ પ્રકારે શ્રીમંત મહારાજા સાહેબે એક દ્રષ્ટાનું પદ મેળવેલું છે, અને તે એવું છે કે, તેનું ભાન આપણી પ્રજાને કોઇ ઉત્તરકાલીન ઇતિહાસકાર કરાવી શકશે. વળી હિન્દી ભાષાની ઉપયોગિતા એઓશ્રીના હૈયા ઉપર એવી તો ભૂલી રહેલી છે કે તેની કલ્પના આપણાથી સહજ થઇ શકે તેમ નથી. હિન્દીભાષારૂપી રૂધીરના પરિસરણથી જ હિન્દુસ્તાન દેશની કાયા સચેતન રહી શકશે એવી રહસ્યપૂર્ણ ભાવના જો શ્રીમંત મહારાજા સાહેબના ચિત્તને ડોલાવી રહેલી હોય તો તે વાત તેઓશ્રીના જેવા દેશભક્ત અને સાહિત્યભક્ત મહારાજાના સંબંધમાં નવાઇ પમાડનારી ગણાશે નહિ. અર્થાત્ આપણા શ્રીમંત મહારાજા સાહેબ એક સાચા બહુભાષાભક્ત અને સાહિત્યસેવક છે એ વાત પરત્વે મતભેદને અવકાશ મળી શકે તેમ નથી જ.

**સાહિત્યસેવાનાં મુખ.**

હવે આપણે તેઓશ્રીએ વિવિધ મુખોદ્વારા કરેલ સાહિત્યવર્ધક યોજનાઓ, હયાતીમાં આણેલ સંસ્થાઓ, તેમજ પરિપુષ્ટ કરેલ પ્રવૃત્તિઓ વગેરે બાબતોનું સંક્ષિપ્ત અવલોકન કરી લેશું.

આપણે અગાઉ વાંચી ગયા છીએ તેમ

તેઓશ્રીએ શરૂઆતમાં છૂટક છૂટક પ્રેરણા તથા ઉત્તેજન આપીને ગ્રંથભંડોળ વધારવવાને પ્રયાસ કરેલો હતો. પરંતુ પાછળથી એ સાહિત્યવર્ધક પ્રયાસને વધારે વ્યવસ્થિત કરવાની આવશ્યકતા જણાતાં એઓશ્રીએ એ કામ કરવા કમાવવાની સોંપણી સ્વાભાવિક ક્રમે પોતાના રાજ્યના કેળવણી ખાતાને કરી દીધી, અને એ કામ વધારે મોટા પાયા ઉપર ચાલતું રહે તેટલા માટે નીચે જણાવેલ યોજનાઓને તેઓશ્રીએ હયાતીમાં આણેલી પણ છે—

**પારિતોષિક આપી પુસ્તકો લખાવવાં.**

( ૧ ) સારા સારા લેખકોને પારિતોષિક આપીને તેમની પાસે વિવિધ વિષયોને લગતાં પુસ્તકો તૈયાર કરાવવાં અને તેમને રાજ્યને ખર્ચે છપાવી પ્રસિદ્ધ કરવાં અને બને તેટલા પ્રમાણમાં સસ્તી કીંમતે તેમને વેંચવાં અગર તો સાર્વજનિક સંસ્થાઓને યથાપ્રસંગ તેમને ભેટ રૂપે આપવાં. આ બધું કામ કેળવણીખાતું કરી રહેલું છે. પરંતુ આ કામ કેળવણીખાતું પોતાના બીજા કામ સાથે કરતું હતું તેથી આ પદ્ધતિથી કામ જો કે ઘણું થયલું છે, તથાપિ તેમાં ફેરફાર કરવાની જરૂર પાછળથી જણાતાં એ કામને અલગ પાડી, એ ખાતાની એક શાખામારફત સાહિત્ય-વૃદ્ધિ કરતાં રહેવાની યોજના અમલમાં આણી છે.

**જુદા જુદા ખાતાનું સાહિત્ય.**

( ૨ ) પુસ્તકો રચાવવાનું કામ મુખ્યતઃ જો કે કેળવણીખાતાનું છે, તથાપિ રાજ્યનાં બીજાં ખાતાંઓ પણ વિશિષ્ટ વિષયોને લગતાં પુસ્તકો તૈયાર કરાવ્યા કરે છે, અને એ રીતે ન્યાયખાતાએ, પોલીસખાતાએ ખેતીવાડી ખાતાએ, વેપાર ઉદ્યોગ ખાતાએ અને બીજાં કેટલાંક ખાતાંએ પોતપોતાના કામને વધારે લોકોપકાર બનાવવાના હેતુથી દેશીભાષામાં અનેક ગ્રંથો તૈયાર કરાવી પ્રકટ પણ કરેલા છે, અને હજુસુધી એવા એવા પ્રકારની પ્રવૃત્તિ ચાલુ પણ રહેલી છે.

**પાઠ્યપુસ્તકો**

( ૩ ) રાજ્યની નિશાળોમાં વાપરી શકાય તેવાં **અનેક પુસ્તકો** તૈયાર કરાવવામાં આવેલ છે, જેમાં છોકરાંછોક-રીઓને ઉપયોગી થઈ પડે તેવી વાચનમાળાઓ, ઇતિહાસ તથા ભૂગોલને લગતાં નાનાં મોટાં પુસ્તકો, વ્યાકરેણ અને અંકગણિતના ગ્રંથો તેમજ ધર્મ અને નીતિ-વિષયક ગ્રંથોનો સથાવેશ થાય છે. આ પુસ્તકોપૈકી કેવળ અભ્યા-સનાં પુસ્તકો રચવા રચાવવાના કામમાં સ્વ. રા. બ. હરગોવિંદદાસ દ્વારકાદાસ કાંટાવાળા કે જેઓ રાજ્યના વિદ્યાધિકારી હતા તેમનો હિસ્સો મોટો હતો, અને ધર્મનીતિના ગ્રંથો ગુજરાતના સુપ્રસિદ્ધ વિદ્વાન્ રા. રા. આનન્દશંકર બાપુભાઈ ધ્રવની કને રચાવવામાં આવેલા છે.

**જ્ઞાનમંજુષા અને પરિભાષાકોશનો આરંભ**

( ૪ ) વડોદરામાં '**કલાભવન**' નામક સંસ્થાની સ્થાપના થતાં, તેમાં શીખવાતા વૈજ્ઞાનિક વિષયોને દેશી-ભાષામારફત શીખવવાનાં સાધનો ન હોવાથી, તા. ૨૩–૧૧–૮૮ ના રોજ શ્રીમંત મહારાજા સાહેબે રૂા. ૫૦૦૦૦ ( પચાસ હજાર )ની રકમ ઉદાર ભાવથી મંજુર કરી તે કામની વ્યવસ્થા આપણા સુપ્રસિધ્ધ રસાયનશાસ્ત્રી સ્વ. ત્રિભુવનદાસ કલ્યાણદાસ ગજ્જર કે જેઓ તે વખતે કલાભવનના મુખ્ય અધ્યાપક હતા તેમને સોંપી દીધેલી અને તેના પરિણામમાં "**જ્ઞાનમંજુષા**" નામક ગ્રંથમાળાની ઉત્પત્તિ થઇ આવેલી છે. આ માળામાં વિવિધ વિજ્ઞાનોને લગતાં ઘણાં પુસ્તકો શુદ્ધ દેશીભાષામાં ગુંથવામાં આવેલ છે. આ "જ્ઞાનમંજુષા" ગ્રંથમાળાને અંગે એક બહુભાષા 'પારિભાષિક કોશ ' તૈયાર કરવાની યોજના પણ થયલી. આ કામ ઘણુ અટપટું તેમજ મુશ્કેલ હતું, તથાપિ શ્રીયુત ત્રિભુવનદાસ ગજ્જરના પ્રખર ઉત્સાહને લીધે એ કામ કેટલાક પ્રમાણમાં થયું ન થયુ ત્યાં તો જો કામ બંધ કરવાનો પ્રસંગ આવી પડ્યો, અને જ્ઞાનમંજુષાનું તથા પરિભાષાકોશનું કામ અલ્પ-કાળ પર્યન્ત બંધ પડી ગયું. આ જ્ઞાનમંજુષા તેમજ બહુભાષા કોશની પાછળ આશરે રૂા. ૬૧૦૦૦ એકસઠહજારનુ ખર્ચ થયલું છે.

**ભાષાંતર ખાતાની સ્થાપના.**

(૫) ઉપર પ્રમાણે '**જ્ઞાનમંજુષા**' નામક ગ્રંથમાળાને લગતું કામ બંધ પડ્યા પછી કોઈ એક સારા વિદ્વાનને નોકરીમાં રાખી, કેળવણીખાતાની દેખરેખ નીચે ગ્રંથો તૈયાર કરાવવાની યોજનાને જન્મ આપવામાં આવેલો. આ યોજના પ્રમાણે તા. ૧-૧૨-૯૩ થી તા. ૨૬-૬-૯૫ સુધી આપણા ગુજરાતના સુપ્રસિદ્ધ તત્ત્વજ્ઞ અને લેખક મણિલાલ નથુભાઇ દ્વિવેદીને નોકરીમાં રાખેલા, અને એક સંશોધક ખાતું ખોલીને પાટણના જૈનભંડાર વગેરેમાંનાં સંસ્કૃત પુસ્તકોનાં તેમજ કેટલાક પ્રાકૃત ગ્રંથોનાં ભાષાંતર કરાવવામાં આવેલાં કુમારપાળચરિત્ર, અનેકાન્તવાદપ્રવેશ વગેરે ગ્રંથો આ યોજના પૈકીના છે. આ વિદ્વાનની નોકરીની મુદત દરમ્યાન કુલ ૨૧ ગ્રંથો સંશોધાઇ તૈયાર થતા હતા, પૈકી કેટલાક સ્વ. શાસ્ત્રી અમૃતરામજી જ્યોતિર્માર્તંડની દેખરેખ નીચે પ્રકટ કરાવવામાં આવેલ પણ છે, અને બાકીનાને વિદ્યાધિકારી કચેરી મારફત અમુદ્રિત અવસ્થામાં સાચવી રાખવામાં આવ્યા છે.

**પ્રાચીન કાવ્યમાળા**

સ્વ. રા. બ. હરગોવિંદદાસ કાંટાવાળા તથા સ્વ. શાસ્ત્રી નાથાશંકર ઇ. સ. ૧૮૮૫ ની સાલથી એક ત્રિમાસિક ચોપાનિયાદ્વારા પ્રાચીન ગુજરાતી કાવ્યોને પ્રકટ કરતા હતા. આ વાત શ્રીમંત મહારાજા સાહેબને શ્રુત થતાં તેમનો સાહિત્ય પ્રેમ એટલે તો ઉભરાઈ આવ્યો કે તેઓ શ્રીએ પોતાના તે સમયના દીવાન સાહેબ મહુંમ મણિભાઇ જશભાઈ હસ્તક રૂા ૧૨૦૦૦ (બારાહજારની) રકમ પ્રાચીન કાવ્યોનો ઉદ્ધાર કરવાને અર્થે મંજુર કરી મુકી દીધી અને એક સમિતિ નીમી. તેની મારફત તે કામ કરાવવાની આજ્ઞા આપી. આ સમિતિએ તા. ૧-૮-૮૯ થી '**પ્રાચીન કાવ્યમાળા**' ગ્રથવા તથા પ્રગટ કરવાનો આરંભ કરેલો. એ વખતના વિદ્યાધિકારી સ્વ રા. બ. હરગોવિંદદાસભાઈની દેખરેખ નીચે એ માળાને લગતું કામ થતું હતું, અને એ માળાને સટીક કરી અધિક ઉપયોગી બનાવવામાં વડોદરાના પ્રખ્યાત વિદ્વાન્ શિક્ષક છોટાલાલ નરભેરામ ભટે ઘણો પરિશ્રમ ઉઠા-

વેલો પણ છે. આ માળામાં કુલ ૩૫ ( પાંત્રીશ ) પુસ્તકો ગ્રથાયાં છે, અને તેમની પાછળ એકંદર રૂા, ૧૬૦૦૦ ( સોળ હજાર ) ખર્ચાયા છે. આ માળા ગુજરાતમાં ઘણી જાણીતી છે, અને તેમાંનાં પુસ્તકોની માગણી આજે પણ થતી રહેતી હોવાથી તેમની યથા પ્રસંગ નવીનવી આવૃત્તિઓ પ્રકટ કરવાનું કામ પાછળથી એટલે ઈ. સ. ૧૯૧૦ માં શ્રીમંત મહારાજા સાહેબે કૃપાવંત થઈને મર્હુમ હરગોવિંદદાસભાઈને સોંપી આપેલું છે પણ ખરૂં.

**સંસ્કૃત વાઙ્મયને ઉત્તેજન અને તેનો પ્રચાર.**

સંસ્કૃત વાઙ્મયનું પોષણ થતું રહે તેટલા માટે વડોદરા રાજ્ય તરફથી પ્રતિવર્ષ શ્રાવણમાસમાં દક્ષિણાપરીક્ષા લેવાય છે, અને અખિલ ભરતખંડમાંથી આવતાં વિદ્વાનો સંસ્કૃત વાઙ્મયની શાખાપ્રશાખાને લગતી પરીક્ષા યથારૂચિ આપે છે. આ પરીક્ષા ઉત્તીર્ણ થનારને પદવી આપી વાર્ષિક વેતન ( દક્ષિણા ) અપાતી પણ રહે છે. આ જૂની પ્રથા શ્રીમંત મહારાજા સાહેબે કાંઇક વધારે વ્યવસ્થિત કરીને ચાલુ રાખી છે. પરંતુ એ એક સંસ્થાથી સંકૃત વિદ્યાનો સર્વથા ઉદ્ધાર થઈ શકે નહિ એમ સમજીને તેઓશ્રીએ, હિંદુધર્મશાસ્ત્રોને દેશી ભાષામાં ઉતારી લોકગમ્ય કરવાના હેતુથી એક '**કાયદાસમિતિ ( લૉ-કમિટી )**' નીમેલી. પરંતુ તા. ૩-૨-૯૯ ના રોજ હુઝુર હુકમ કરીને શ્રીમંત મહારાજા સાહેબે એ કામની સોંપણી પણ કેળવણીખાતાને કરી દીધેલ છે. આ કાયદા-સમિતિએ સાત ગ્રંથો તૈયાર કરાવેલા, જે પૈકી દત્તકચંદ્રિકા, નિર્ણય-સિંધુના પરિચ્છેદ ૧-૩, વિવાદતાંડવ અને સંસ્કાર કૌસ્તુભ છપાઇને બહાર પડેલા છે, અને દત્તકમીમાંસા, વીરમિત્રોદય વગેરે ગ્રંથો અદ્યાપિ અપ્રસિદ્ધ અવસ્થામાં રહેલ છે. આ ઉપરાંત શ્રીમંત મહા-રાજા સાહેબની આજ્ઞાથી દાનચંદ્રિકા, આચારમયુખ, નારાયણ ભટ્ટી પ્રયોગ વગેરે ગ્રંથો પણ તૈયાર કરાવવામાં આવેલ છે. વળી તેઓશ્રીએ વાયુપુરાણનું તેમજ શ્રીયુત સાક્ષર આનંદકર બાપુભાઈ ધ્રુવની કનેથી "શ્રી રામાનુજ ભાષ્યસહિત વેદાંતસુત્રો" નું ભાષાંતર પણ કરાવેલ છે, તેમ જ પાછળતી હયાતીમાં અણુચલ ભાષાંતર કચેરી મારફત શ્રીયુત

મોતીલાલ રવિશંકર ઘોડા પાસે 'ઋગ્વેદ સંહિતા'ને તથા 'શ્રીશંકરાનન્દી ટીકાવાવાળી ભગવદ્ગીતા'ને અને તે પછી તેજ કચેરી મારફત આ લેખકને હાથે કૌટિલ્યકૃત 'અર્થશાસ્ત્ર'ને તેમજ શ્રીયુત છોટાલાલ નરભેરામ ભટ પાસે 'સિદ્ધાંત દર્શન વગેરેને ગુજરાતી ભાષામાં ઉતરાવી, સંસ્કૃત ભાંષાના શિષ્ટ ગ્રંથોનું આસ્વાદન ગુજરાતને કરાવી દીધું છે.

આ બધું શ્રીમંત મહારાજા સાહેબે પોતાના સાહિત્યરસને વહેતો કરી કરાવેલું છે ખરૂં. તથાપિ તેઓશ્રીની પ્રવૃત્તિ તેટલીથી જ અટકી પડેલી નથી. સંસ્કૃત ભાષાનો ધનાગાર નષ્ટ થઈ ન જાય એવા હેતુથી તેઓશ્રીએ એક મોટું 'સંસ્કૃત પુસ્તકાલય' સ્થાપી તેમાં પ્રકટઅપ્રકટ સંસ્કૃત ગ્રંથોને આખાય દેશમાંથી ખોળાવી ખોળાવીને એકત્ર કરેલા છે, અને તેમને છપાવીને પ્રકાશમાં લાવવાને અર્થે "**ગાયકવાડ ઓરીએનટલ સીરીઝ**" એ નામની એક ગ્રંથમાળા પ્રકટ કરાતી રહે તેવી યોજના કરી આપેલી છે, અને તે યોજના સારી પેઠે સફળ પણ થયલી છે.

**ગ્રંથોત્તેજન.**

આ સિવાય શ્રીમંત મહારાજા સાહેબે ગુજરાતી, મરાઠી, ઉર્દૂ, અંગ્રેજી વગેરે વિવિધ ભાષામાં લખાતા રહેતા ગ્રંથોને ન્યુનાધિક પ્રમાણમાં ઉત્તેજન આપી લેખકસૃષ્ટિને પોષવાની યોજના પણ ઘડેલી છે. દરસાલ લગભગ રૂપીઆ બે હજાર જેટલી રકમ ગ્રંથોત્તેજનના કામમાં વાપરવાની જોગવાઇ રાખવામાં આવે છે, અને તે રકમમાંથી ગ્રંથકારોપાસેથી જેમની તેમની કૃતિઓની નકલો ખરીદવામાં આવે છે. દેશના જુદા જુદાં ભાગમાંથી લેખકો પોતપોતાની પ્રસિદ્ધ કૃતિઓની બે બે નકલો વિદ્યાખાતાતરફ મોકલી દે એટલે પછી એ પ્રમાણે આવેલ પુસ્તકોને એક "ગ્રંથ પરીક્ષક સમિતિ" તરફ મોકલી આપવામાં આવે છે અને તે સમિતિ તેવાં પુસ્તકોને ઠરાવેલ ધોરણની દૃષ્ટિએ તપાસી તે પરત્વે પોતાનો અભિપ્રાય આપે છે. એ પછી એ અભિપ્રાયને નજરમાં રાખી વિદ્યાધિકારી નાણાંની

અનુકૂળતાના પ્રમાણમાં તેવા પસંદ કરાયલ પુસ્તકની નકલો ગ્રંથકાર પાસેથી ખરીદે છે, અને તે પ્રમાણે ખરીદાયલ પુસ્તકની નકલોની વહેંચણી નિશાળોમાં તથા પુસ્તકાલયોમાં કરી દેછે. વળી એપ્રમાણે ઉત્તેજાયલા પુસ્તકો નિશાળોમાં ઈનામ તરીકે વહેંચાવાને તેમજ પુસ્તકાલયોમાં રખાઈ શકાવાને માટે અગર તે એમાંથી એક પ્રકારે સ્વીકારાવાને પાત્ર ગણાય છે અને તેથી કરીને પણ લેખકોને એક રીતે સંતત ઉત્તેજન મળતાં રહેવાનો યોગ મળી આવે છે પણ ખરો.

**ભાષાંતર ખાતાની પુનઃસ્થાપના.**

શ્રીમંત મહારાજા સાહેબ–એઓશ્રીના ચિત્તમાં એક એવો ભાવ સ્ફુરી રહેલો છે કે રાજ્યમાં જેમ જુદા જુદા કામ માટે જુદું જુદું ખાતું છે તેમ સાહિત્યની વૃદ્ધિ થતી રહે તેટલા માટે એક સ્વતંત્ર ખાતું પણ હોવું જ જોઈએ; અને એ ભાવ એઓશ્રીએ સ્વ. શ્રીયુત મણિલાલ નથુભાઈ દ્વિવેદીને પોતાની નોકરીમાં લઇને પ્રકટ કરેલો, એવું પણ આપણે પૂર્વે વાંચી ગયા છીએ. પરંતુ એ એઓશ્રીની ભાવસરિતા સરસ્વતી નદીની પેઠે રાજ્યનાં અન્ય કાર્યોના રણપ્રદેશને લીધે કોઈ કોઇ વાર અદૃષ્ટ વહેતી રહે એવું થઈ આવતું હતું. અંતે ઇ. સ. ૧૯૦૮ ઑક્ટોબર માસમાં એઓશ્રીએ વિદ્યાધિકારી કચેરીમાં ભાષાંતરકારની એક જગ્યા કાઢી ઇ. સ. ૧૯૦૯ ના જાનેવારીથી આ લેખકને તે ઉપર નીમી દીધો. આ યોજનાના પરિણામે આ લેખકના હાથે ‘મૉન્તેનના નિબંધો’, ‘અંગ્રેજી સાહિત્ય અને પુરાણ કથા’, ‘વાણિજ્યશાસ્ત્ર’ વગેરે ભાષાંતરરૂપે પુસ્તકો લખાયાં, અને વળી શ્રીમંત મહારાજા સાહેબ એઓશ્રીની પોતાની આજ્ઞાથી “હિન્દુસ્તાન તથા યુરોપની પુરાણ કથાઓની તુલનાત્મક સમીક્ષા” નામક સ્વતંત્ર શોધખોળવાળું પુસ્તક પણ રચાયું છે. એ ઉપરાંત ગુજરાતની વિવિધ જ્ઞાતિઓના રીતિરીવાજોના સંગ્રહ રૂપે તૈયાર કરાયલ એકીકરણો પણ સંશોધાઇને પ્રકટ થવા પામેલાં, અને એ વખતનાં પાઠ્ય પુસ્તકોમાં પણ આવશ્યક સુધારણા કરવામાં આવી હતી.

**ભાષાંતર ખાતા-નો બીજો અવતાર.**

આમ શ્રીમંત મહારાજા સાહેબની પ્રેરણાથી સાહિત્ય પ્રવૃત્તિ વડોદરામાં થયાં કરતી હતી તો ખરી; પરંતુ એ બધી પ્રવૃત્તિઓ તૂટક તૂટક હોઇને તેમને લગતું સ્થૌલ્ય સ્પષ્ટ દેખાતું ન હતું. શ્રીમંત મહારાજા સાહેબનો હેતુ તો એ બધી પ્રવૃત્તિઓનો સંગત રચીને તેમાંથી સાહિત્યસિન્ધુ વહેવડાવવાનો હતો, અને એ હેતુ અંતે ઈ. સ. ૧૯૧૨ માં બર આવી શકયો. આ સાલમાં શ્રીમંત મહારાજા સાહેબની સાહિત્યવિલાસી મનોદશાને અનુસરીને ગુજરાતી સાહિત્ય પરિષદનું ચોથું અધિવેશન વડોદરામાં જ શ્રીમંત મહારાજા સાહેબના ઉદાર આશ્રયથી નિયોજવામાં આવ્યું, અને ગુજરાતના સુવિખ્યાત સાક્ષર સ્વ૦ દી. બ. રણછોડભાઈ ઉદયરામ એ પરિષદના પ્રમુખ થયા. આ પ્રમાણે વિદ્વાનોનો મેળો વડોદરાના ઈન્દુમતી મહાલમાં ભરાતાં શ્રીમંત મહારાજા સાહેબનો સાહિત્યરસ એટલો તો ઉભરાઇ આવ્યો કે, તેઓશ્રીએ કૃપાવંત થઈને સાહિત્યવિષયક ભાષણો આપ્યાં એટલું તો નહિ, પરંતુ બે લાખ રૂપીઆની રકમ પોતાના ખાનગી ખાતામાંથી અલગ કાઢી તેના વ્યાજમાંથી વિવિધ વિષયોને લગતાં પુસ્તકો લખાવવા તથા પ્રકટ કરાવવાની આજ્ઞા આપી પણ દીધી. શ્રીમંત મહારાજા સાહેબના મંગલ જીવનનો આ દિવસ અને એ દિવસે રોપાયલ પૂર્વોક્ત પ્રકારનો કીર્તિ-સ્થંભ કોઈથી કદિપણ વીસરી શકાય તેમ નથી. તથાપિ રાજ્યરથનાં ચક્રો ઘણેભાગે ધીમાં ધીમાં ગતિ કરનારાં હોય છે તે પ્રમાણે આ શ્રીમંત મહારાજા સાહેબની યોજનાને ફળવાનો યોગ બીજાં પાંચ વર્ષ સુધી આવી શકયો નહિ. અખરે ઇ. સ. ૧૯૧૭ ના મે માસમાં એક સાહિત્યવર્ધક યોજના સાંગોપાંગ ઘડી રજુ કરવાની આજ્ઞા આ લેખકને અપાઈ, અને તે આજ્ઞાનુસાર એક યોજના ઘડી તે સમયના દીવાન સર મનુભાઈ નંદશંકર મહેતા સમક્ષ મુકતાં તેમણે શ્રીમંત મહારાજા સાહેબની ઇચ્છાનુસાર તે મંજુર કરી તેનો અમલ કરવાનું કામ પણ આ લેખકને સોંપી દીધું. આ પ્રમાણે ભાષાંતર કચેરીનું કામ ત્રીજા અવતારને પામ્યું. આ વખતે સ્વ. એ. બી. કલાર્ક નામના અંગ્રેજ ગૃહસ્થ વિદ્યાધિકારીના પદે હતા, અને આ લેખકે તેમના

હાથ નીચે " ભાષાંતર મદદનીસ " તરીકે રહીને ભાષાંતર કચેરી તરફથી થતા રહેલ કામનો મંગલારંભ કરેલો હતો. ભાષાંતરખાતામાં થનાર કામને માટે આવશ્યક નિયમો ઘડી કાઢી તેમને મંજુર કરાવી લેવાનું પહેલું કામ થયું અને ત્યારબાદ તુર્ત " **શ્રીસયાજી સાહિત્યમાળા** " અને " **શ્રીસયાજી બાળજ્ઞાનમાળા** "—એમ બે પ્રકારની ગ્રંથાવલિને જન્મ આપવામાં આવ્યો. આ ઉભય ગ્રંથમાળાની વિશિષ્ટતા એ છે કે એમાં જ્ઞાનવિજ્ઞાનના લગભગ બધા વિષયોનો સમાવેશ કરવામાં આવ્યો છે અને કેવળ ભાષાંતરરૂપે ગ્રંથોનુ સ્વરૂપ ન રખાતાં આપણા દેશની પરિસ્થિતિને અનુરૂપ તેમાં ફેરફાર પણ કરવામાં આવે છે. વળી એ માળામાં વિવિધ વિજ્ઞાનનાં પુસ્તકો ઘણાં હોઈ એ સર્વ પુસ્તકોમાંથી પરભાષાના પારિભાષિક શબ્દોને દૂર રાખવામાં આવ્યા છે, અને ખાસ તૈયાર કરેલ પારિભાષિક શબ્દોનો ઉપયોગ તેમાં કરાયલો છે. શુદ્ધ દેશી ભાષાદ્વારા વૈજ્ઞાનિક વિષયોનું જ્ઞાન ન મળી શકે એવું માનનારાઓએ આ પુસ્તકો જોવાં પડે તેમ છે. એ પુસ્તકો પૈકી ઘણાં તો શિષ્ટ ગ્રંથોનાં ભાષાંતર છે. તથાપિ તેમાં સ્વતંત્ર પુસ્તકો નથી તેમ નથી. એવાં પુસ્તકોની સંખ્યા પણ સારી છે. આ ગ્રંથમાળામાં કેવળ ગુજરાતી ગ્રંથો ગુંથાયલા નથી તેમાં મરાઠી, હિંદી તેમજ ઉર્દુ ભાષામાં લખાયલ ગ્રંથોની ગુંથણી પણ થયલી છે. ઈ. સ. ૧૯૨૪ માં આ બે માળા માટે આશરે ૩૫૦ ત્રણસો પચાશ પુસ્તકો તૈયાર થયલ હતાં અને તે પછી દર વર્ષે થોડો થોડો પણ વધારો થતો રહેલ છે. ઈ. સ ૧૯૩૨ ના નવેંબર માસ આખર સુધીમાં, શ્રીસયાજી સાહિત્યમાળામાં ૨૦૭ ( બસો સાત ) પુસ્તકો અને શ્રીસયાજી બાળજ્ઞાનમાળામાં ૯૫ ( પંચાણું ) પુસ્તકો છપાઈને પ્રકટ થવા પામેલાં છે. આ ઉભય ગ્રંથાવલિઓએ ગુજરાતી તેમજ મરાઠી તથા હિંદી સાહિત્યના ભંડોળમાં સંગીન અને મહત્ત્વનો વધારો કરેલો છે, અને કાળના વહેવાની સાથે, વડોદરા રાજ્ય તરફથી ઉત્પન્ન કરાયલ આ સાહિત્ય આપણા આ દેશને સ્વભાષાદ્વારા જ્ઞાનવૃદ્ધ થવામાં ખરેખર મદદગાર થઈ પડશે એમ પણ કહી શકાય. આ સ્થળે નોંધવું જોઈએ કે, શ્રીમંત મહારાજા સાહેબનો સાહિત્યપ્રેમ એટલો છે કે, છપાતા દરેક પુસ્તકની બે નકલો શ્રીમંત મહારાજાસાહેબ

of the problem were carefully studied. It was found that the people were not prepared to take advantage of increased facilities to fight disease and pestilence. They were too pathetically steeped in ignorance, poverty and superstition to care for doctors and nurses and all the ungodly things they connoted. They were content with quacks, Vaidyas and Hakims who professed to have studied the Ayurvedic and Yunani systems of medicine, and prescribed at random from their small Materia Medica of a few herbal and synthetic remedies. These doctors also professed to have secured control over the spirits who were held responsible for many diseases. Whether they had this control or not, it is certain their hold on the minds of the ignorant was very firm. This grip was to be loosened through wide spread education. It was a work requiring patience, and was not likely to give quick results–a new heaven and a new earth by a wave of magician's wand.

His Highness' Government however bent their energies steadily in this direction, and gradually succeeded in overcoming people's prejudices against modern hospitals and medical profession.

The story of the transformation brought about in the space of fifty years will indeed make enchanting reading but it would consume greater space than is available here. Yet a bare recital of the chronology, dates on which the various hospitals, nursing homes, dispensaries and asylums came to be established, will not be uninteresting.

When His Highness was installed on the *gadi* there was one hospital in Baroda called the State Hospital built in 1855 in the time of the Maharaja Ganpatrao. There was one dispensary in Amreli dating back to Malharrao Maharaja, and two so-called hospitals were attached to the divisions of the army stationed at Dwarka and Dhari. That was all.

The State Medical department was organised on a sound basis in 1876. Care was taken to equip the existing hospitals and dispensaries with the best qualified staff. Extensions of the hospitals were projected and new ones opened. The

Malharrao dispensary was enlarged and converted into a hospital in 1877. The same year saw the opening of the Jamnabai Hospital in the heart of Baroda City. It is admirably situated to meet the requirements of the people living in the city. Taking the State Hospital as nucleus, new additions were made round it in 1886, 1898, 1899, 1907, 1914 and 1918. The additions in 1898 and 1914 deserve special mention. In 1898 was built the Victoria Jubilee ward to house female patients. In 1914 was built what is now known as the Himatlal Shivalal Ward for Maternity cases.

While many additions were being made to the main hospital in Baroda, the districts and taluka towns were not being ignored. All the district towns and some of the more populous towns were provided with first class hospitals. It is noteworthy that they were not all set up departmentally. Many of them owe their origin to the generosity of public spirited members of the general public. Their creation by donation from private individuals is a signal tribute of recognition of the wisdom of the policy of Government initiated at the instance of the fore-sighted Maharaja Saheb. While the bigger towns were getting hospitals and dispensaries, the smaller villages were served by a net-work of dispensaries scattered all over the territories.

As is but natural the capital city has been the most frequent recipient of the latest amenities in the field of medicine and surgery. The State General Hospital is now one of the best-staffed and equiped hospitals in India. It is responsible not merely for the treatment of patients but also for training nurses and midwives–a scheme which has received most favourable reception at the hands of the public. The growing number of in-patients and outdoor patients and students, is an eloquent expression of the affectionate regard in which the hospital is held by the general public.

Simultaneously with the growth and expanse of medical institutions there has been a growing awakening on the part of the people to the need of living in hygienic surroundings. This awakening is the result of the steady efforts of His

Highness' Government to show to people how their lives become better and happier by more sanitary surroundings. In towns, the provision of extensive parks, pipe-water supply and drainage, stringent municipal rules about house buildings; in villages the setting apart of sites for unhealthy occupations like the potters' and tanners'; the steady flow of ideas about sanitation made to impinge on the people's consciousness through the medium of the Revenue department; the encouragement given to head-men of villages for keeping their villages clean; these and many other devices, too numerous to mention, are responsible for the change in the people's attitude towards the work of the departments of medicine and sanitation.

The picture which the situation presents is indeed not as bright as might be desired nor is the future free from misgivings; yet the task accomplished has not been a light one and let us with thankful hearts pray God that He in His infinite grace may long spare us our beloved Maharaja to whose inspiration and guidance we owe it to be well set on the upward path of progress.

---

## सार्वजनिक बांधकामें

( लेखकः—श्रीयुत **वासुदेव रामचंद्र तळवलकर.** एल्. सी. ई., ए. आर. आय्. बी. ए., )

जाहीर बांधकाम खातें हें महाराजांचें आवडतें खातें! केव्हांहि पहा श्रीमंतांची स्वारी कोठी कचेरीकडे वळली कीं, पब्लिक वर्कस् खात्यांत गेल्याशिवाय बहुधा राहावयाचीच नाहीं. नुक्तीच परवां घडलेली गोष्ट ताजें उदाहरण म्हणून देतां येईल. ती अशी:—

श्रीमंत महाराज विलायतेहून बडोद्यास ता. ६ डिसेंबर १९३२ रोजीं आले. दुसऱ्या दिवशीं कचेरीमध्यें आल्याबरोबर द्वारमंडपांतून हल्लीं जेथें सेक्रेटरीएट लायब्ररी आहे तेथें जाऊन मोटर थांबविली व चीफ इंजीनीअराचा तपास केला.

गोष्ट साधी परंतु जाहीर बांधकामाबद्दल महाराजांचे ठायीं असलेली आवड आणि कळकळ ह्यांची साक्ष पटविणारी असल्यानें येथें तिचा उल्लेख केला आहे.

कचेरीमध्यें येऊन महाराज चालू बांधकाम कोठपावेतों पुरें होत आलें आहे; जुन्या केलेल्या आंखीव रचनेंत (plan) व हल्लीं तयार झालेल्या बांधकामांत कितीसा फरक पडला; तो फरक इष्ट कीं अनिष्ट; सोयीचा कीं गैरसोयीचा, वगैरेबद्दल पुसतपास व नवीन घाटत असलेल्या विचारांचें दिग्दर्शन, जमल्यास स्वतःहि हातानें एखादी आकृती काढून आपली आवड सुचविणें इत्यादि कामें महाराज अत्यंत उत्साहानें व कलेच्या रसोद्ग्राही दृष्टीनें करतात.

महाराजांच्या ठायीं वसत असलेल्या कलाभिरुचीची साक्ष त्यांनीं करविलेलीं 'जाहीर बांधकामें' देत आहेतच. त्याच बांधकामांच्या योगानें पौर्वात्य स्थापत्यशास्त्राचें श्रीमंतांनीं स्वतःच्या आवडीनें कसें पुनरुज्जीवन केलें, व 'राजा प्रकृतिरंजनात्' ह्या म्हणीची सार्थकता कशी करून दाखविली ह्याचें छोटेसें दिग्दर्शन प्रस्तुतच्या लेखांत आम्हीं करणार आहोंत.

## बडोद्याचें प्राचीनत्व

'आमचीं देशी संस्थानें' या नांवाची लेखमाला नवयुगांत सन १९१८ सालीं प्रसिद्ध झाली. तींत बडोदें संस्थानाबद्दल केलेल्या ऐतिहासिक विधानांत ऐतिहासिक सत्याच्या दृष्टीनें कांहींशी विसंगती दिसून येते. तद्विरुद्ध आमचें म्हणणें ऐतिहासिक सत्य हुडकून काढण्यास साधनीभूत होणारें असल्यानें आम्हीं पुढील कांहीं विचार लोकांपुढें मांडीत आहों:—

गुजराथेंतील राष्ट्रकूट घराण्यांतील राजा कर्कराज यानें इ. स. ८१२ मध्यें जें एक भूमिदान केलें त्याचा ताम्रपट प्रसिद्ध आहे. दान करतांना 'वडपद्रक' नांवाच्या स्थलाचा व त्याच्या चतुःसीमेचा उल्लेख त्यानें केला आहे. त्यांत उल्लेखिलेलें वडपद्रक म्हणजे बडोदें, अंकुटिक म्हणजे अकोटा, महासेनक म्हणजे भेसाणा तलाव ऊर्फ हल्लींचें विलासपूर, जम्बूवाविक

१ बडोदें शहराचा इतिहास दमाजीराव गायकवाडाच्या कारकीर्दीपासून सुरु होतो. पण त्या पूर्वीचा तो १००० वर्षांचा जुना आहे. बडोद्याचा पहिला नामनिर्देश राष्ट्रकूट वंशांतील कर्कराजाच्या शिलालेखांत (स. ८१२-८२१) सांपडतो. लक्ष्मीविलास राजवाड्याच्या बगीच्यांत असलेली अमीनसाहेबांची कबर पूर्वी जैनमंदीर होतें. नवलाखी विहीर गुजराथचा सुभा जाफरखान ह्याचा वजीर सुलेमान ह्यानें इ. स. १४२९ मध्यें बांधली.'—नवयूग१९१८.

२ Ind. Anti. Vol. XII.

३ पहा नगरपट (City Survey Map) १८७५.

म्हणजे जम्बूबेट. जम्बू नांवाचें स्थळ विहिरीमुळें प्रसिद्ध आहे. शेवट उल्लेखिलेलें जम्बूवाविक ह्यांतील ' वाविका ' बहुधा हल्लींची नवलाखी विहीर असावी अशी आमची कल्पना आहे. ह्या नवलाखींत एक गुप्त लिपींत असलेला त्रोटक लेख आम्हांस आढळला आहे त्यावरून ही विहीर ७ व्या शतकाचे सुमारास बांधण्यांत आली असावी असें अनुमान काढावयास आधार मिळतो.

ह्या नवलाखींत एक मुसलमानी शिलालेख सांपडल्यावरून ही विहीर जाफरखान ह्यानें बांधली असें कांहीं लेखकांचें म्हणणें आहे. परंतु आम्हांस त्याच विहीरींत सांपडलेल्या गुप्तकालीन शिलालेखावरून वरील लेखकाचें म्हणणें आम्हांस पटत नाहीं. गुप्तकालीन शिलालेखाखेरीज दुसराहि आधार आम्हीं देऊं शकूं.

नवलाखी जवळच पीरघोडा ह्या नांवाचें एक मुसलमानांचें थडगें आहे. ही इमारत मूळ जैन किंवा हिंदू लोकांनीं बांधली असावी असें तिच्या शिल्प-कामावरून दिसतें. व ती बांधून पुरी होण्यापूर्वींच मुसलमानांनीं तो सर्व प्रदेश काबीज केला असावा असें वाटतें.

इतिहाससंशोधकांस प्रिय पण इतरांस रुक्ष वाटणारी ही माहिती विस्तारानें सांगत बसण्याचें हें स्थळ नव्हे. गुप्तकालीन शिलालेख व पीरघोड्याच्या बांधणीवरून सुचलेले विचार आम्हीं सप्रमाण लवकरच वाचकांपुढें मांडणार आहोंत. तूर्त आम्हांस इतकेंच दर्शवावयाचें आहे कीं, 'नवयुगांतील' लेखक म्हणतात त्याहून बडोदें शहर बरेंच प्राचीन आहे. प्राचीनत्व हा मौल्यवान गूण आहे व तो गूण बडोद्यास देण्यास येथील ' जाहीर बांधकामें'च कारणी-भूत होत आहेत.

## नगररचनाविस्तार

पूर्वींचें बडोदें व हल्लींचें बडोदें ह्यांत जमीन अस्मानचें अंतर आहे. आमचें हें म्हणणें शाब्दिक व लाक्षणिक अर्थानें तंतोतंत खरें आहे, हें पुढील विवेचना-वरून दिसून येईल.

चहूं बाजूंनीं कोट असलेलें भुईकोट किल्ल्यासारखें शहर, आजूबाजूची वालुकामय जमीन, ठिकठिकाणीं दिसून येणारी उंच सखल जागा, भोंवताली असलेली घनदाट वृक्षराई, ठायीं ठायीं दिसून येणारे पीर व बावड्या,

जुन्या धाटणीचीं घरें व वाडे वगैरे कुठें ? व आजच्या विशाल सडका, सुंदर जलाशय, गोडशीं उपवनें, गगनचुंबी इमारती, राजवाड्यांचें वैभव, दुतर्फा असलेली वृक्षराजी, समोरच समोर लांबवर जाणारे रस्ते वगैरे सर्व पाहिले तर आमचें म्हणणें कितपत खरें आहे ह्याची सत्यता अनुभवावयास मिळेल.

आपलें राजधानीचें शहर सालंकृत दिसावें ह्याबद्दल श्रीमंतांनीं नगरविस्ताराकडे स्वतःच्या हौशीनें लक्ष पुरविलें आहे. लोकांच्या सोयी पहातांना कलेची दृष्टी आणि प्रगतीची दिशा डोळ्यापुढें ठेवल्यामुळें पूर्वीच्या वनास आज ' नंदना'ची शोभा आणतां आली.

स्टेशनपासून मांडवीपावेतों आल्यास रस्त्यानें आजूबाजूस ज्या इमारती दिसतील त्यांनीं शहराला किती सौंदर्य प्राप्त करून दिलें आहे ह्याचा विचार मनांत उद्भवतो. सुरसागर तलावाच्या उत्तरभागीं उभें रहावें आणि समोर दिसणारें दृश्य बघावें. समोर मिडल स्कूल, फीमेल ट्रेनिंग कॉलेज ह्यांच्या इमारती; पूर्व बाजूस जरा आडवी अशी न्यायमंदिराची भव्य इमारत; पश्चिमभागीं असलेलें फीमेल ट्रेनिंग कॉलेजचें बोर्डिंग, हें पहातांना महाराजांनीं हा टापू किती सुंदरतेनें सजविला आहे ह्याची सत्यता पटेल. ह्याच जलाशयाच्या पूर्वभागीं मोठासा बगीचा, आणि उत्तरभागीं एक भव्य इमारत पुढें मागें होण्याचा संभव आहे. आणि तसें झाल्यास ह्या टापूची शोभा द्विगुणीत होणार आहे. अशाच प्रकारचा दुसरा एक टापू सध्यां सजविला जात आहे. स्टेशनवरून निघालें कीं, पहिल्यांदा हायस्कूलची इमारत लागते. तेथून जरा पुढें आलें कीं, हल्लीं बांधकाम चालू असलेली मोठी भव्य अशी सायन्स इन्स्टिट्यूटची इमारत लागते. त्यापुढें आलें कीं, बडोदें कॉलेजची डौलदार इमारत दृष्टीस पडते. मध्यें सयाजीराव टॉवर व उजव्या बाजूस दूरच दूर जाणारा असा सयाजीगंजचा रस्ता व त्याचे टोंकाशीं असलेली ' अमीन-निवास ' ह्या नांवाची इमारत असा हा टापू आहे. शहरांत जाणाऱ्यास कॉलेजनंतर महाराजांचा अश्वारूढ पुतळा लागतो. पूल ओलांडल्यानंतर राजघराण्यांतील राजपुरुषांच्या छत्र्या, नवीन बांधले जात असलेलें भव्य कीर्तिमंदीर, तसेंच इस्पितळाच्या इमारती नगरशृंगाराची साक्ष देतात.

तेव्हां नगरविस्तार व रचना ह्यामध्यें श्रीमंतांनीं स्वतःची आवड, लोकांची

सोय, कलेची दृष्टी, स्थापत्यशास्त्राचें पुनरुज्जीवन, जुन्या कलेची जोपासना इत्यादि गोष्टी नजरेसमोर ठेवल्या ही अत्यंत अभिमानाची गोष्ट आहे.

## श्रीमंतांची आवड

महाराजांच्या चरित्राचें अवलोकन केलें तर आपल्याला त्या चरित्राचे चार मुख्य भाग पाडतां येतील. इ. स. १८८१ सालीं श्रीमंतांचा राज्यारोहण समारंभ झाल्यानंतर पहिलीं ६।७ वर्षें राज्यपद्धतीची पुनर्घटना व तिचा अंमल ह्यांमध्यें गेलीं. ह्यास आम्ही 'घटना काल' असें संबोधितों. इ. स. १८८७-९५ पावेतोंचा काल महाराजांच्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें करावा लागलेला प्रवास व पर्यटण यांत गेला असल्यामुळें आम्हीं त्यांस 'अनुभव–काल' असें नांव देतों. महाराज प्रत्येक गोष्ट नेहमीं विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें अभ्यासीत असल्यानें ह्या कालास 'अभ्यास काल' असें नांव जरी दिलें तरी सार्थ होण्यासारखें आहे. ह्या पुढचा काल म्हणजे १८९५ ते १९०९ पावेतोंचा. मनामध्यें जमविलेल्या नवकल्पना, नानाविध विचार, त्यांचा उच्चार व आचार ह्या दृष्टीनें महत्वाचा आहे. म्हणून ह्या कालखंडास आम्ही 'विचारकाल' असें संबोधितों व तदनंतरचा म्हणजे १९०९ ते १९३३ पावेतोंचा काल प्रगतीचा, स्थैर्याचा, सर्वव्यापी सुधारणेचा असल्यानें ह्या कालास आम्हीं 'प्रगतिकाल' म्हणून म्हणतों.

वर उल्लखिलेल्या कालखंडांत 'अनुभवकाल' प्रस्तुतच्या लेखाच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाचा आहे देशाटन केल्यानें पंडित मैत्री होते, सभेंत, समाजांत संचार करतां येतो, शास्त्रग्रंथ विलोकन करतां येतें व ह्या सर्वांच्या योगानें मनुष्य चतुर, सर्वव्यापी ( All-round ) बनतो. त्याचप्रमाणें महाराजांचे अनुभव आहेत उत्तरहिंदुस्थानचा प्रवास, विलायतेचा प्रवास, विशेषतः लंडन, प्यारिस, रोम वगैरे ठिकाणचे त्यांचे मुक्काम, त्यांच्या आवडीनिवडींना योग्य वळण देण्यास व कलाविकासाची दृष्टी त्यांचे ठायीं उत्पन्न करण्यास विशेष कारणीभूत झाले असावेत असें 'जाहीर बांधकामा' वरून स्पष्ट दिसतें. उदाहरणार्थः—राजमहालांतील मोझेकचें काम, मकरपुरा राजवाड्यांतील बाग, कॉलजेची इमारत, राजमहालाच्या प्रांगणांतील "निम्नोद्यान" ( Sunk Gardens ) वगैरे कामें पाश्चात्य धर्तीवर केलेलीं आढळतात. ह्या सर्वांचा तुलनात्मक अभ्यास केल्यास स्वतंत्र प्रबंध

लिहावा लागेल इतकें साहित्य पुरेसें आहे. परंतु येथें स्थलसंकोचास्तव फक्त नामनिर्देशच करीत आहोंत.

## स्थापत्यशास्त्रावर कांहीं विचार

स्थापत्यशास्त्राच्या दृष्टीनें प्रत्येक चांगल्या इमारतीचे ठायीं मुख्यतः खालील गुण असावे लागतातः—

१ प्रमाणबद्ध मांडणी, २ समतोलपणा, ३ मध्यस्थानीं असलेलें आकृतीचें सुंदर प्रमुख दर्शन, ४ उचित मापयोजना, ५ बाह्यांगाची आकर्षकता, ६ छाया आणि प्रकाश ह्यांचें मिश्रण, ७ कारागिराची कुशलता, ८ इमारती पुढील विस्तृत पटांगण, व ९ इमारतीचें उच्चस्थान.

ह्या दृष्टीनें बडोयाच्या बहुतेक सर्व जाहीर इमारती वरील कसोटीस पूर्णपणें न उतरल्या तरी कांहीं विशिष्ट गुण त्यांचे अंगीं व भोंवतालीं असल्यानें त्यांची गणना श्रेष्ठ स्वरूपांत करतां येते, हें पुढें संकलित केलेल्या माहितीवरून दिसून येईल.

## राजवाडे

शहराचे मध्यभागीं जुना सरकारवाडा म्हणून ओळखला जाणारा राजवाडा आजहि अस्तित्वांत आहे. इ. स. १८७५ सालीं सुरू झालेल्या रीजन्सीच्या अमदानींत ह्या राजवाड्यांत राजकुटुंब रहात असे. ह्या राजवाड्यास पुष्कळसे चौक असले व त्या मानानें राजवाडा मोठा विस्तीर्ण असला, तरी त्यांत हवा व प्रकाश ह्यांचा पूर्ण अभाव, अरुंद व अवघड जिने, प्रशस्त पण गैरसोयीचीं अशीं मोठमोठीं दालनें वगैरे बऱ्याच गैरसोयी त्यांत असल्यानें राजकुटुंबास रहाण्यास तो राजवाडा योग्य नव्हता. जुन्या राजवाड्याशेजारींच थोड्या नव्या धर्तीवर कै. श्रीमंत मल्हारराव महाराजांनीं बांधलेल्या नजरबाग राजवाड्यांत रहाणेंहि राजमंडळींस बरें वाटेना. मकरपुऱ्यास असलेला राजवाडा शहरापासून बराच दूरवर असल्यानें त्या वेळेचे राजपालक व दिवाण राजा सर टी. माधवराव ह्यांस कामकाजाच्या दृष्टीनें तोहि गैरसोयीचा वाटणें साहजीकच होतें. मोतीबागेंतील बंगला लहान असल्यामुळें एवढ्या मोठ्या राजकुटुंबाचा ह्यांत समावेश होणें शक्य नव्हतें म्हणून शहराजवळ हवेशीर ठिकाणीं नवा राजवाडा बांधावा असें ठरविण्यांत आलें.

ह्या सुमारास नगरविस्तार पश्चिमेच्या बाजूस होत होता. इ. स. १८७५ सालीं तयार केलेल्या नगरपटा–( City survey map ) वरून असें दिसतें कीं, शेठसावकार, अमीर उमराव अशा धनाढ्य लोकांच्या इमारती, बागबगीचे ह्या बाजूस होत होते. नदीचे सांनिध्यामुळें हा भूमिप्रदेश थंड व हवेशीर वाटणें साहजीकच होतें. म्हणूनच नवीन राजवाड्यासाठीं ह्याच भागांतील जागा मुक्रर करण्यांत आली. राजवाड्याचें काम करणारे शिल्पशास्त्रज्ञ म्हणून मेजर मँट ह्यांची सरकारांतून योजना झाली.

बडोद्यांतील नवीन बांधल्या जाणाऱ्या सर्व इमारती सर्वमान्य हिंदुपद्धतीच्याच असाव्यात ह्याबद्दल दुमत नव्हतें. स्वाभिमानी राजा सर टी. माधवराव व त्यांचें मंडळ पौर्वात्य स्थापत्याचे चहाते असल्यानें पौर्वात्य स्थापत्यकलेचें पुनरुज्जीवन व संगोपन केल्याचें श्रेय तत्कालीनांस अंशभागानें व श्रीमंत महाराजसाहेबांस पूर्णांशानें देतां येईल.

इतर संस्थानांतून विशेषतः कोल्हापूर, जयपूर, ग्वाल्हेर, डीग, उदेपूर वगैरे वगैरे संस्थानांतून प्राचीन वास्तु–शास्त्राबद्दल विशेषशी आवड दिसून येत होती. केव्हां केव्हां हत्तीची अंबारी बांधणें, लग्नसमारंभाकरतां मंडप बांधणें, देवघरांतील डोल्हारा बांधणें, अशा अनेक लहान मोठ्या प्रसंगीं जुन्या कारागीरांचें कौशल्य दृष्टीस पडे. तेव्हां अशाच वा इतर स्वाभिमानपूर्ण राजनेत्यांचें प्रोत्साहन जुन्या शिल्पशास्त्रास मिळाल्यामुळें पौर्वात्य संस्कृती टिकाव धरूं शकली.

अशाच प्रकारचें प्रोत्साहन श्रीमंत महाराजांनीं दिल्यामुळें लक्ष्मीविलास राजवाड्यासारखी मोठी इमारत पौर्वात्य पद्धतीवर होऊं शकली. एकोणिसाव्या शतकांत पौर्वात्य पद्धतीवर बांधलेली एवढी मोठी इमारत दुसरी कोठेंहि नाहीं, म्हणूनच तिची महती विशेष आहे.

इ. स. १८७९।८० सालीं नवीन राजवाडा बांधण्याची कल्पना निघाली. त्या वेळीं श्रीमंत ताराबाईसाहेब व श्रीमंत महाराज ह्यांचे विवाहसमारंभ लवकरच व्हावयाचे असल्यानें नवीन कुटुंबास रहाण्यास नूतन राजवाडा हा हवाच, ह्या दृष्टीनें कामाची सुरवात केली असावी. राजवाड्याचें काम पुरें होण्यास १२ वर्षें–एक तप–लागलीं. श्रीमंत महाराजसाहेब ह्या राजवाड्यांत इ. स. १८९१ सालीं प्रथम रहावयास गेले.

राजवाड्याची उत्तर दक्षिण लांबी ५१२ फूट असून पूर्व पश्चिम रुंदी २०० फूट आहे. राजवाड्याच्या मनोऱ्याची उंची २०४ फूट आहे. ह्या राजवाड्याचे मुख्य भाग चार आहेत. पहिला राजदरबाराकरतां असून त्याचे पश्चिमेस हत्ती महाल ( Hathi Hall ) आहे. दरबारचे लोकांस आंत जाण्यासाठीं प्रवेशद्वार ( entrance ) उत्तरेस आहे. दरबारचा मुख्य दिवाणखाना ९४ फूट लांब व ५४ फूट रुंद दुमजली आहे. तिन्ही बाजूस पहिल्या मजल्यावर प्रेक्षकांकरितां लांकडी झरोके ठेवण्यांत आले आहेत. पूर्व बाजूस सिंहासनाची जागा आहे. युरोपमध्यें ज्याप्रमाणें मोठमोठ्या देवळांमधून वा इमारतींतून स्टेन्ड ग्लासच्या ( रंगीत कांचांच्या ) तसबिरा असतात त्या पद्धतीवर ह्या राजवाड्यांतील दरबार हॉलमध्यें यशोदाकृष्णाच्या दोन, रामपंचायतन व विष्णुपंचायतन अशा चार तसबिरा खास विलायतेहून तयार करवून आणल्या आहेत.

दरबारचे दिवाणखान्याचे भिंतांस संगमरवराप्रमाणें गुळगुळीत व सफाईदार गिलावा ( plaster ); राजवैभवास साजेलसें मोझेकचें काम, रंगीबेरंगी तक्तपोशी, सोनेरी वर्खानें सुशोभित केलेल्या गिच्या चौकडी वगैरेमुळें दिवाणखाना अत्यंत प्रेक्षणीय झाला आहे. सोनेरी मोझेकचे कामाकरतां कारागीर इटलीहून आणविले होते.

ह्या राजवाड्याचा महाराज रहातात तो भाग दक्षिणेस आहे. ह्या भागाच्या मध्यभागीं एक कारंज्याचा चौक आहे. महाराजांच्या भागास दोन चौक व दुमजली इमारत आहे. त्यास स्वतंत्र द्वारमंडप ( porch ) व संगमरवरी जिना आहे. ह्या बाजूंनीं शिरतांना उजव्या बाजूस कामकाजाचीं दालनें व डाव्या बाजूस ए. डी. सी. ची खोली व प्यालेस ऑफिस वगैरेसाठीं दालनें आहेत. वरच्या मजल्यावर उजव्या बाजूस दिवाणखाना, श्री. महाराजांचें ग्रंथसंग्रहालय व भोजनस्थान ( Dining Hall ) असून डाव्या बाजूस दिवसा रहाण्यासाठीं खासगी दालनें आहेत. ह्यावरील दुसऱ्या मजल्यावर श्रीमंतांचें शयनागार आहे. राजपाहुण्यांची रहाण्याचीं दालनें ह्याच मजल्यावर आहेत.

श्रीमंत महाराजसाहेबांच्या विभागाच्या दक्षिणभागीं श्रीमंत सौ. मा. महाराणीसाहेबांचें निवासस्थान आहे. त्यांसहि स्वतंत्र द्वारमंडप असून इतर सर्व दालनें श्रीमंतांच्या निवासस्थानासारखींच आहेत.

श्री. सौ. मा. महाराणीसाहेबाकरतां एक स्वतंत्र दरबाराचा दिवाणखाना आहे. तोच लक्ष्मीविलास राजवाड्याचा चौथा मुख्य भाग होय.

ह्या शिवाय दवाखाना, जामदारखाना, बिलियर्डरूम, ऐने महाल, गादी-महाल वगैरे स्वतंत्र विभाग राजवाड्यांत पूर्व बाजूस आहेत. पाकगृह नजी-कच असून स्वतंत्र आहे.

ह्या राजवाड्याचें बाह्यांग दगडी आहे. अग्रभाग उत्तर व पश्चिमदिग्भागीं असून कलाकुसरीनें अलंकृत केला आहे. ह्या राजवाड्याची बांधणी उत्तर हिंदुस्थानांतील शिल्पशास्त्राच्या धर्तीवर आहे. प्रख्यात शिल्पशास्त्रज्ञ व लेखक सर जेम्स फर्ग्युसन ह्या पद्धतीस ' आर्य-भारती ' ( Indo-Aryan ) संप्र-दाय म्हणून संबोधितो, आणि पुष्कळ अंशीं राजवाडा पाहून जाणाऱ्या मंडळींस तसेंच वाटतें.

राजवाड्याभोंवतीं असलेला बाग, पश्चिमेच्या बाजूस असलेले विस्तीर्ण कारंजे व निम्नोद्यान ( Sunk garden ), त्याभोंवती असलेलीं फुलझाडें व तेथून समोर दिसणारा राजवाडा वगैरे दृश्य अत्यंत रमणीय वाटतें.

## मकरपुरा

शहरापासून ४ मैलांवर असलेला मकरपुऱ्याचा राजवाडा कै. श्रीमंत खंडेराव महाराजांनीं शिकारीचे सोयीसाठीं बांधला. इ. स. १८८३ सालीं ह्या वाड्याचाच विस्तार म्हणून श्रीमंत महाराजांच्या कारकीर्दींत एक भाग नवीन पद्धतीवर बांधण्यास सुरुवात होऊन तो इ. स. १८९० सालीं पुरा झाला ह्याचे नकाशे मि. चिझम ह्यांनीं तयार केले होते. हा राजवाडा विटांचा बांधला असून तो इटालियन रेनेसान्स धर्तीवर आहे. ह्यास मुख्य ठिकाणीं चुन्याच्या गिलाव्यानें मढविण्यांत आलें आहे. इंग्रजींत ह्यास ( Stucco ) म्हणून म्हणतात.

राजवाड्याभोंवती इटालियन पद्धतीचा सुंदर बाग आहे. ह्यांत संगमरवरी कारंजे, सभामंडप, ठिकठिकाणीं ठेवलेले पूर्णाकृती पुतळे ( Life size ), भोंवतीं पसरलेलें ' हरित तृणाच्या मखमालीचें हिरवे गार गालिचे ', नाना-विध रंगाच्या फुलांचे सुंदर ताटवे वगरेमुळें मन आकर्षून अगदीं गुंग होऊन जातें. ह्या सुंदर बागेची रचना करण्यास विलायतेंतील सुप्रसिद्ध बागवान मि. गोल्डरिंग ह्यांची नेमणूक झाली होती.

## प्रतापविलास

कै. युवराज श्रीमंत फत्तेसिंहराव गायकवाड ह्यांच्या करतांच खास हा राजवाडा बांधण्यांत आला होता. हल्लीं तेथें त्यांचे चिरंजीव राजपौत्र श्रीमंत युवराज प्रतापसिंह रहात असतात. हा राजवाडा दगडी असून इंग्लिश रेनेसान्स पद्धतीवर बांधला आहे. ह्याचे नकाशे मुंबईचे शिल्पशास्त्रज्ञ मि. स्टिव्हन्स ह्यांनीं तयार केले होते.

## इतर राजनिवास

ह्याशिवाय उटकमंड येथील वुड—स्टॉक बंगला, मुंबईचा जयमहाल पॅलेस वगैरे इमारती प्रसिद्ध आहेत.

पूर्वीचे अमदानींत बांधलेला नजरबाग राजवाडा सुसज्ज स्थितींत ठेवण्यांत आला आहे. श्रीमंत महाराजांचे कारकीर्दींत ह्या वाड्यास राज—पाहुण्यांकरतां स्वतंत्र भाग वाड्याचा विस्तार म्हणून जोडण्यांत आला आहे. नजरबाग राजवाड्यांत हल्लीं जवाहिरखाना व कै. श्री. खंडेराव महाराजांनीं मक्केस पाठविण्याकरतां तयार करविलेले मोत्याचे दोन सुंदर गालिचे ठेवण्यांत आले आहेत.

लक्ष्मीविलास राजवाडा हा राजदंपतीचें निवासस्थान आहे. खाशा स्वाऱ्या येथें असतांना नामदार व्हॉइसरॉय अगर इतर बडे पाहुणे आले असतां मकरपुरा राजवाड्यांत त्यांच्या मुक्कामाची सोय करण्यांत येते. लग्नकार्य प्रसंगीं व्याही मंडळींच्या जानवशासाठीं बहुशा नजरबाग राजवाडाच देण्यांत येतो.

## कचेऱ्या

रीजन्सीच्या अंमलांत कोठी कचेरी बांधून झाली होती. नंतर लवकरच सर्व्हे सेटलमेंट कचेरी हल्लीं ज्या ठिकाणीं बसते ती इमारत तयार झाली. इ. स. १८९५ पर्यंत राज्यांतील सर्व ठिकाणीं महाल कचेऱ्या, पोलीस ठाणीं, मुनसफ कोर्टें वगैरे इमारती बांधण्यांत आल्या. नवसरीची मुख्य कचेरी बांधण्यासहि त्याच वेळीं सुरुवात झाली. अमरेलीची मुख्य कचेरी श्रीमंत महाराजांच्या नव्या अमदानींत मि. चिझम ह्यांच्या देखरेखीखालीं सन १८९३ मध्यें बांधून पुरी झाली. मेहेसाण्यास कचेरीसाठीं बांधलेली इमारत

मुसलमानी पद्धतीवर बांधली असून मि. स्टिव्हन्स ह्यांच्या देखरेखीखालीं तिचें बांधकाम झालें. ह्या इमारतीचें बांधकाम शिल्पशास्त्राच्या दृष्टीनें वाखाणण्याजोगें महत्त्वाचें होणारें असल्यामुळें त्यास दहा वर्षे लागली ( १८९३–१९०३ ). राज्याचें दप्तर दिवसेंदिवस वाढत चाललें होतें. म्हणून इ. स. १८९५ सालीं रेकर्ड टॉवर ह्या नांवाची स्वतंत्र इमारत बडोद्यास कोठी कचेरीसमोर बांधण्यांत आली. इ. स. १९०७ चे सुमारास जुना सरकारवाडा कचेऱ्या व शाळांकरतां खानगी खात्यांतून इमारत खात्याकडे सोंपविण्यांत आला. इ. स. १९१३ मध्यें दप्तरें ठेवण्याकरतांच खास अशीं नव्या धर्तीवर रेकर्ड ब्लॉक नांवाची नवी इमारत रेकर्ड टॉवर जवळ बांधण्यांत आली. त्यांत दप्तरें ठेवण्यास लाकडी घोड्याऐवजीं मजल्याचे लोखंडी घोडे पुरविण्यांत आले, व रेकर्ड टॉवर ह्या इमारतीचा उपयोग कचेऱ्यांकडे होऊं लागला. इ. स. १९१३ मध्यें ऑफिस ब्लॉक नांवाची आणखी एक लहानशी इमारत बांधण्यांत आली. रेकर्ड टॉवर रोमॅनस्क धर्तीवर बांधलं आहे असें म्हटलें तरी चालेल. ह्याचे नकाशे मद्रासचे शिल्पशास्त्रज्ञ मि. कॅंबेल ह्यांनीं केलें असें ऐकिवांत आहे. रेकर्ड ब्लॉक व ऑफिस ब्लॉक मि. कॉईल ह्यांनीं रेनेसान्स धर्तीवर बांधिले आहेत.

मि. कॉईल ह्यांनीं कोठीस जोडून हुजुर मध्यवर्ति कचेरी बांधिली. ह्या इमारतीची सुरुवात १९१४ मध्यें होऊन १९१७ मध्यें इमारत पुरी झाली. ह्यामध्यें मध्यवर्ति कचेरी व धारा सभेचा दिवाणखाना ह्यांचा मुख्यतः समावेश करण्यांत आला आहे. तळधरांत दप्तरखाना आहे. ह्यापूर्वी मध्यवर्ति कचेरी कोठींत बसत असे. हल्लींची मध्यवर्ति कचेरीची इमारत इंग्लडमध्यें प्रचारांत असलेल्या गॉथिक पद्धतीवर बांधण्यांत आली आहे.

जुन्या अमदानींत सर्व कचेऱ्यांचा समावेश एका ठिकाणींच होत असे. परंतु राज्यकारभाराच्या विस्तारामुळें जसजशा इमारती वेगवेगळया होऊं लागल्या तसतशा कचेऱ्या कोठींतून निरनिराळया निघाल्या. नवा दवाखाना बांधून झाल्याबरोबर चीफ मेडिकल ऑफिसरची कचेरी तिकडे गेली. मध्यवर्ती कचेरीसाठीं इमारत तयार झाल्याबरोबर दिवाणकचेरी, हुजुरकामदार कचेरी वगैरे कचेऱ्या त्या इमारतींत नेण्यांत आल्या. रेल्वे ऑफिस देखील कामाच्या सोयीसाठीं गोयागेटकडे नेण्यांत आलें. एकंदरीनें पहातां येथील वाढत्या राज्यकारभारास दर ५।७ वर्षांनीं एक नवीन इमारत लागते

व त्याप्रमाणें प्रसंग पडेल तेव्हां कचेऱ्यासाठीं नवीन इमारत बांधण्याचे नकाशे तयार ठेवण्यांत येतात.

चिमणबागेंतील खानगी कचेरी व जयसिंहराव लायब्ररी ह्यांचेमध्यें असलेलें उघडें मैदान एखादी कचेरी बांधण्यासाठींच खास राखून ठेवण्यांत आलें आहे. कोठीचें पटांगणांत मध्यवर्ति कचेरी ज्या धर्तीवर बांधण्यांत आली आहे त्याच धर्तीवर दक्षिणेचे बाजूस आणखी एक इमारत उठवून मध्यवर्ती कचेरीच्या बाह्य स्वरूपाशीं समता आणावी अशी श्रीमतांची इच्छा आहे, आणि त्यांच्या आज्ञेनुसार नकाशे देखील तयार करण्यांत आले आहेत.

## मध्यवर्ति तुरुंग

इ. स. १८८३–८४ च्या वार्षिक अहवालावरून असें दिसतें कीं, बंदिवासीयांचीं मनें सुसंस्कृत व्हावींत व त्यांची स्थिति सुधरावी ह्या उच्च हेतूनें नीति व सद्वर्तन ह्या विषयांवर आठवड्यांतून एक दिवस बोधपर उपदेश करण्यांत येत असे. अशा कालांत बडोद्यांत पहिलीच इमारत मध्यवर्ति कारागृहासाठीं बांधण्यांत आली. इ. स. १८८१ मध्यें ही इमारत बांधून पुरी झाली. कारागृहासाठीं एकंदर ६,७२,००० रु. खर्च करण्यांत आला. हिंदुस्थानांतील नमुनेदार कारागृहाची रचना अभ्यासून येथील कारागृह बांधण्यांत आलें.

कारागृहाची रचना वर्तुलाकृती असून केंद्रस्थानीं रक्षकाकरतां उंच मनोरा बांधण्यांत आला आहे. बंदिवानांचीं शय्यागृहें, एकांतवासाच्या जागा परिघाचे समान भाग करणाऱ्या अनेक त्रिज्ज्यांवर करण्यांत आल्या असल्यामुळें अंतस्थ रक्षकाचें कार्य फार सुलभ झालें आहे. कारागृहाचा बाह्य तट चतुष्कोणी असून चारी कोपऱ्यांवर व मध्यभागीं रक्षकाकरतां मनोरे बांधण्यांत आले आहेत. पूर्वाभिमुख तटाचे मध्यभागीं प्रवेशद्वार असल्यानें तेथें पहाऱ्यासाठीं मनोरे नाहींत. तटाचे आंत रुग्णालय, बंदिवानांस धंदेशिक्षण देण्याचा वर्ग व कार्यालय वगैरे सोयी करण्यांत आल्या आहेत. तटाबाहेर अधिकारी वर्गाकरतां निवासस्थानें असून सभोंवतीं कृषीकर्मासाठीं विस्तृत आवार आहे.

ह्यानंतर नवसरी, अमरेली, मेहेसाणा, द्वारका वगैरे ठिकाणीं कारागृहें बांधण्यांत आलीं आहेत.

मध्यवर्ति कारागृहांत न्यायप्रविष्ट कैद्यां–( under-trial prisoners )

करतां स्वतंत्र गृह असून त्यांचा गुन्हेगारांशीं संबंध न येईल असा बंदोबस्त करण्यांत आला आहे.

या कारागृहांत उत्तम गालिचे, सतरंज्या, वेतकाम, सुती व रेशमी कापड वगैरे जिन्नस तयार होतात. तसेंच तटाबाहेरच्या भागांत बागाईत करण्यांत येते. कांहीं दिवस येथें बोर्स्टल धर्तीचें कार्यालय चालू ठेवण्यांत आलें होतें. पण पुढें मॉडेल फार्ममध्यें ह्या संस्थेचा समावेश करण्यांत आला. येथें विशिष्ट प्रकारचे व उत्तम वर्तणुकीचे गुन्हेगार ठेवण्यांत येतात. १६ ते २१ वर्षांचे आंतील गुन्हेगारांची सोयहि येथेंच करण्यांत येते.

## रुग्णालय ( State General Hospital )

राज्यारोहणानंतर थोड्याच दिवसांनी श्रीमंतांनीं प्रजेच्या आरोग्यरक्षणार्थ उच्चप्रतीचीं रुग्णालयें राजधानींत व इतरत्र बांधण्यासंबंधीं आपला उद्देश जाहीर केला. इ. स. १८८६ चे सुमारास बडोद्यास डफरिन इस्पितळ नांवाचें सार्वजनिक रुग्णालय बांधून पुरें झालें, आणि त्याचा उद्‌घाटनसमारंभ व्हॉइसराय लॉर्ड डफरिन ह्यांच्या हस्तें ता. ८-११-१८८६ रोजीं झाला. त्या वेळचें रुग्णालयाचें संकुचित स्वरूप व आजचें दिसणारें प्रचंड स्वरूप हीं दोन्हीं लक्षांत घेतली तर जुन्या, नव्यांतलें जमीनअस्मानाचें अंतर दिसून येईल. रुग्णालयांतील आवारांत त्याच्या विविध अंगोपांगांसाठीं बांधलेल्या इतर इमारती पाहिल्या म्हणजे एक मोठें कार्यक्षेत्र आहे असें वाटूं लागतें. त्यांतील विविध कार्यांची ओळख करून देण्यास श्रीमंतांचे प्रजाहिततत्परता, दानशूरता, भूतदया वगैरे गुण वाटाड्यासारखे आपणाबरोबर आंत येऊन दाखवितात व म्हणतात—‘ पहा, ही घरीं राहून येथील औषध नेणारांसाठीं व्यवस्था; त्याच्यापुढें ‘ क्ष ’ किरणाच्या साहाय्यानें होणाऱ्या सुश्रूषेची खोली पहा; हें खास डोळ्यांचे तज्ज्ञ ह्यांचें कार्यक्षेत्र; त्यानंतर ही दवाखान्यांत राहून औषधोपचार घेणाऱ्या मंडळींची शुश्रूषा पहा; त्यापुढें हें ‘ कृमीचिकित्सालय ’ ( Bacteriological Laboratory ) व पलीकडे प्रसूतिगृह ! ! ’ ह्या सर्व संस्था पाहिल्यानंतर प्रत्येकजण आश्चर्यानें थक्क होऊन जातो व वाटाड्यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

इ. स. १८८६ सालीं बांधलेल्या ह्या रुग्णालयाचा विस्तार होत होत ३१ वर्षांनीं तें परिपूर्ण स्वरूपांत दिसूं लागलें. इ. स. १९१७ मध्यें रुग्णालयांतील एका भागाचा उद्‌घाटन समारंभ लेडी विलिंग्डन ह्यांच्या हस्तें झाला.

रुग्णालयाभोंवतीं सुंदरसा बगीचा आहे. स्वच्छता व टापटीप, रोग्याबद्दल प्रेम व कळकळ अशी येथें आढळून येत असल्यामुळें ही विशेष श्रेष्ठ स्वरूपाची संस्था समजली जाते.

## सार्वजनिक बाग

ह्या उपवनाचा विस्तार सुमारें ११३ एकर आहे. उपवनाची रचना विश्वामित्री नदीचे कांठीं करण्यांत आल्यामुळें त्यांस विशेष रमणीयत्व प्राप्त झालें आहे उन्हाळयांतहि नदींत पाणी राखून ठेवलें जातें. त्यावेळीं पाण्यावरून वहाणारा सायंकालीन शीतल वारा, पावसाळ्यांत दिसून येणारी नदीची विशालता व हिंवाळयांत अनुभवास येणारें स्तब्ध वातावरण वगैरेमुळें सार्वजनिक बाग हें जणूं आनंदाचें निवासस्थानच वाटतें.

गगनचुंबित वृक्ष, निरनिराळे लतामंडप, अनेक हिरवळी, कांहीं ठिकाणीं ठेवलेले पुतळे, लांब चलांब व दूरच दूर असे दिसणारे रस्ते, दुतर्फा वाढलेलीं झाडें, खालीं फारशी खळबळ न करणारा विश्वामित्रीचा वसिष्ठी थाटाचा प्रवाह, वर झोंके घेत असलेला झुलता पूल, सभोंवार पसरलेलें शांत व गोड वातावरण ह्या सौंदर्यसमुच्चयानें अनेक कवींस स्फूर्ति दिली; अनेक लेखकांस वर्ण्यविषय मिळवून दिला; अनेक कादंबरीकारांस कथानकाला हवी असलेली पार्श्वभूमि सजवून दिली; अनेक चित्रपटकारांना दुर्लभ असा चित्ताकर्षक देखावा सुलभ करून दिला; कित्येकांस ‘ हरपलें श्रेय ’ सांपडून दिलें, आणि कित्येकांस ‘ सौंदर्य हेंच आनंदाचें निवासस्थान, आणि आनंद हें परमेश्वराचें निवासस्थान ’ असें सत्य पटवून दिलें.

असा हा सार्वजनिक बाग सन १८७९ सालीं जानेवारीच्या ८ तारखेस उघडण्यांत आला. ह्यांत अजबखाना ( Museum ), चित्रसंग्रहालय (Picture Gallery ), वादन–मंदिर ( Band Stand ) वगैरे इमारतींचा समावेश होतो. सर्व प्रकारचे पशुपक्षीहि येथें ठेवण्यांत आले असून एरवीं त्यांस हवी असलेली **वन्यावस्था** येथेंहि आजूबाजूस निर्माण केली आहे. त्यामुळें त्यांना आपण येथें ‘ त्रयस्थ ’ आहोंत असें वाटत नसेल

सार्वजनिक बाग ज्या वेळीं लोकांस खुला करण्यांत आला त्या वेळीं केलेल्या भाषणांत श्रीमंत महाराजसाहेब म्हणाले —

‘ शहरांत वस्ती अतिशय दाट असल्यामुळें प्रत्येकाच्या घराभोंवतीं बाग

असणें शक्य नाहीं. म्हणूनच लोकांच्या सोयीसाठीं व मनोरंजनासाठीं ह्या सार्वजनिक संस्थेचें उद्घाटन करण्यांत येत आहे. बागेंतील श्वेतशिबिरा ( White Pavilion ) शिवायचा सर्व भाग लोकांकडून सार्वत्रिक स्वरूपांत वापरला जावा अशी आमची इच्छा आहे.'

प्रजेची गरज ओळखण्यांत व भागविण्यांत श्रीमंतांनीं मार्मिक वात्सल्यच दाखविलें आहे ह्यांत शंका नाहीं.

## ज्युबिली गार्डन

इ. स. १९०६ सालीं रौप्य महोत्सव साजरा करण्यांत आला. त्याचें स्मरणार्थ शहराचे कोटाबाहेरील एका मुख्य भागीं एक बाग करण्यांत आला त्यास ज्युबिली बाग म्हणतात. ह्या जागीं पूर्वीं दाट वस्ती होती ती कमी व्हावी व शहरांत बाग असावा ह्या हेतूनें बाग करण्यांत आला. येथें सायंकाळीं लोकांची फार गर्दी असते. ह्या बागेंतच गौतमबुद्धाचा पुतळा बसविलेला असून त्याच्या धर्माचीं मूलतत्त्वें व्यासपीठांतील कोणशिलेवर कोरण्यांत आलीं आहेत.

शहरांतील नजरबागेसभोंवतालचा बाग सार्वजनिक उपयोगाकरतां खुला ठेवण्यांत आला आहे. तसेंच सूर्यनारायणाचें मंदिराभोंवती लहान बाग, कोठी कचेरीपासून तों थेट प्रतापविलास राजवाड्यापर्यंतच्या सडकेचे बाजूस ठिकठिकाणीं असलेले बाग, हॉस्पिटल, कॉलेज, हायस्कूल वगैरे सरकारी इमारतीं-भोंवती असलेले बगीचे ह्यामुळें शहरास बरीच शोभा आली आहे.

गुजरात प्रांतामध्यें जलाशयांचे अभावीं बाग हिरवे गार ठेवणें बरेंच कठीण पडतें. बडोद्यास जरी नळानें पाणी आणलें आहे तरी तें बागेला देण्याइतकें मुबलक नाहीं. म्हणून उन्हाळ्यांत त्या मानानें बागेची फार आबाळ होते. येथें पाण्याचा जर सुकाळ असता तर बडोदें शहर हें जणूं उपवनांतच रचलें आहे कीं काय असा भास झाला असता.

## शिक्षणसंस्था—कॉलेज

इ. स. १९२७ सालीं झालेल्या जलप्रलयाची आठवण अजून लोक विसरले नसतील. अगदीं अशाच प्रकारें इ. स. १८७७ सालींहि जवळ जवळ इतकाच भयंकर पूर आल्यामुळें लोकांची बरीच दैना उडाली होती. तेव्हां अशा जल-

प्रलयाच्या सार्वजनिक संकटापासून बचाव व्हावा म्हणून त्यावेळीं नुकतेंच सुरू केलेल्या कॉलेजच्या बांधकामांत फेरफार करून चौथरा जास्त उंच घेण्याचें ठरवावें लागलें. त्यामुळें इमारतीस उच्चस्थान प्राप्त होऊन बाह्यांग विशेष आकर्षक बनलें. ह्या उच्चस्थानीय इमारतीचा सन १९२७ मध्यें आलेल्या महापुरांत लोकांची धनदौलत बचावण्याकडे कसा उपयोग झाला हें सर्व-श्रुत आहेच.

इ. स. १८८० सालीं नवा राजवाडा बांधतांना शहरामध्यें कोणत्या इमारती कोणत्या जागीं बांधाव्यात हें कांहीं निश्चित ठरविलें नव्हतें. तरी पण सर्व इमारती शहराच्या पश्चिमेच्या भागांतच बांधण्यांत याव्यात असें ठरविण्यांत आलें असावें असा आमचा समज आहे. रेल्वेस्टेशन हेंच बहुधा शहराचें केंद्रस्थान स्वाभाविक रीतीनें असूं शकतें. त्याच्या आजूबाजूस इमारती, शहर वगैरे अनायासें वसते.

कॉलेजची इमारत अशाच परिस्थितींत आणि विचारानेंच बांधली गेली असावी. दुसरें असें कीं, कँपमध्यें रहाणाऱ्या लोकांस शिक्षणविषयक एखादी संस्थाहि नसल्यामुळें तशाप्रकारची संस्था असावी अशी त्यांची मागणी होती. ती मागणीहि विचारांत घेऊन हें स्थल निश्चित केलें असावेसें वाटतें. सार्वजनिक उपवनाची जागा देखील नदीकांठींच पसंत केल्यामुळें तें स्थळ देखील जाणाऱ्या येणाऱ्यांच्या वाटेवरच येतें व त्याचा उपयोग उपभोगदृष्ट्या होतो. कसेंहि जरी असलें तरी कॉलेजसारखी संस्था शहरापासून बऱ्याच अंतरावर राहिली. सार्वजनिक उपवन व कॉलेज ह्या दोहोंनीं स्टेशनच्या पूर्वभागीं बरीचशी जागा अडविल्यामुळें तद्नुषंगीक इमारती बांधण्यास स्थळ म्हणून दुसरें राहिलें नाहीं. इतकेंच नव्हे तर कॉलेजच्या भव्य इमारतीस साजेसें प्रांगण ठेवतां आलें नाहीं आणि त्यामुळें त्या इमारतीची छाप जशी बसावी तशी बसत नाहीं. म्हणून ही भव्य इमारत नगररचनेच्या दृष्टीनें जितक्या सुस्थलीं बांधावयास हवी होती तितक्या सुस्थलीं बांधली गेली नाहीं ह्याबद्दल जरा वाईट वाटतें.

ही इमारत इ. स. १८८३ मध्यें बांधून पुरी झाली. त्यावर खर्च सुमारें ८ लक्ष रुपये झाला. शिल्पशास्त्रज्ञ मि. चिझम ह्यांनीं ह्या इमारतीचे नकाशे तयार केले. ह्या इमारतींत विशेष वाखाणण्याजोगें असें काम म्हणजे घुमटाचें. घुमटाच्या डाव्या व उजव्या बाजूस दोन सारखे भाग केले असून इमारतीचा

सर्व आकार सारखा आहे. ही इमारत दोन मजली असून वरचा व खालचा मजला सारखा आहे.

कॉलेजची भव्य इमारत बांधतांना तिचे बाजूचे दोन समान भाग व ते जोडण्यास एक चौरस विशाल दालन अशी योजना करण्यांत आली. इमारतीचें बाह्य स्वरूप डौलदार असून अतिशय भव्य व मनोहर आहे. वास्तुशास्त्राचे मुख्य गुण म्हणजे समतोलपणा, प्रमाणबद्ध मांडणी, उचित योजना हे प्रामुख्यानें त्यांत वास करीत असल्यानें ह्या इमारतीच्या विशालत्वानें मनावर बराच परिणाम होतो.

कॉलेजच्या मध्यभागीं असलेला गोल घुमट हिंदुस्थानांत इंग्रजी अमदानी सुरू झाल्यानंतर पाश्चात्य शिल्पशास्त्रज्ञांनी प्रथमतःच बांधला आहे. ही कला नवीनच असल्यामुळें सर्वांचें लक्ष त्याकडे वेधलें गेलें. म्हणून शास्त्रीय दृष्ट्या देखील ह्या इमारतीचें महत्व विशेष आहे.

मुख्य दालन तळमजल्यावर असून घुमट जेथें सुरू होतो तेथें आकृति अष्टकोनी केली आहे. अशाच प्रकारची आकृति घडवून आणण्याचा प्रघात जुन्या युगांत आपणाकडेहि होता, हें विजापुरच्या गोल घुमटावरून दिसून येईल. ११० फूट व्यासाचा एवढा मोठा घुमट हिंदुस्थानांत इतरत्र कोठेंहि नाहीं. ह्याच्याच खालोखाल येथील कॉलेजच्या इमारतीचा घुमट येतो.

घुमटाचे बांधणीची विशेष काळजी घ्यावयाची म्हणजे तो ज्या ठिकाणापासून उभारण्यांत येतो तेथें त्याचे आधारस्तंभांची मध्यबिंदुपासून पसरण्याकडे प्रवृत्ति असते. व त्यामुळें घुमट ज्या भिंतीवर उभारलेला असतो तिचा कल बाहेर झुकण्याकडे असतो. चौकोनी दालनावर गोलाकृति घुमट चढवावयाचा म्हटल्यास चौकोनी आकृतीचें गोलाकृतींत पर्यवसान करावें लागतें. येथील कॉलेजच्या इमारतींत अष्टकोनाच्या आकृतींत चतुष्कोनाची समाप्ती विजापुरच्या घुमटाप्रमाणें केलेली आढळते. ह्या परिवर्तनामुळें पायाशीं घुमटाचा परीघ लहान होतो व त्यामुळें बाहेर झुकण्याचा त्याचा कल कमी होतो.

कॉलिजच्या घुमटाचे दोन भाग आहेत. बाहेरील भाग हलका असून त्याचा आधार आंत असलेल्या घुमटावर आहे. पायाशीं असलेल्या अष्टकोनी आकृतीच्या प्रत्येक कोनापासून निघणाऱ्या कण्यावर बाहेरच्या घुमटाचा

आकार आहे व आंतील कण्यामधील जागा विटांच्या छतांनीं भरून काढली आहे. म्हणून त्यास आंतील घुमट व बाहेरील घुमट असें म्हणण्यांत येतें. हीं बांधणी कौशल्यपूर्ण असून ती १५ व्या शतकांत फ्लॉरेन्स येथें ब्रुनेलेशकी नांवाच्या शिल्पशास्त्रज्ञानें प्रचारांत आणली.

कॉलेजचें बाह्यस्वरूप सॅरासिनिक म्हणजे मुसलमानी धर्तीवर आहे व आंत मात्र निरनिराळ्या आवडीनिवडीनुरूप केलेलें बांधकाम आहे. असें करणें इष्ट कीं अनिष्ट, हा वादग्रस्त प्रश्न आहे. कॉलेजच्या बांधणीपासून घुमट बांधण्याच्या प्रचारामुळें ब्रिटिश अमदानीपूर्वी असलेल्या स्थापत्य पद्धतीचें पुनरुज्जीवन झालें.

कॉलेजच्या इमारतीचें काम पुरें झाल्यानंतर मि. चिझम विलायतेस गेले. त्यानंतर त्यांनीं Royal Instiute of British Architects या सभेपुढें घुमट व त्याची शास्त्रीय बांधणी ह्या विषयावर एक निबंध वाचला. त्यांत बडोदें येथील कॉलेजच्या घुमटाचें प्रामुख्यानें वर्णन केलें होतें.

## हायस्कूल

कॉलेजच्या इमारतींतच पूर्वी हायस्कूल बसत असें, पण शिक्षणाच्या वाढत्या प्रसारामुळें कॉलेजची इमारत त्या मानानें लहान पडूं लागली. म्हणून हायस्कूल करतां स्वतंत्र इमारत स्टेशनच्या पूर्व भागीं व कॉलेजच्या जरा पुढें बांधण्याचें ठरविण्यांत आलें. सन १९१३ मध्यें कामास सुरवात होऊन तें काम स. १९१७ मध्यें पुरें झालें. ह्या इमारतीचे नकाशे सर वुइल्यम इमरसन ह्याजकडून तयार करविण्यांत आले.

हायस्कूलची इमारत पौर्वात्य पद्धतीवर बांधली गेली आहे. लाल विटांचा एक थर व पांढऱ्या दगडाचा दुसरा अशा क्रमानें रचना असल्यामुळें बाह्यस्वरूप चित्तवेधक वाटतें. अशी रचना फार प्राचीनकालापासून अस्तित्वांत असून ह्या रचनेस बायझेंटाईन अशी संज्ञा आहे. कॉन्स्टँटीनोपल शहरांत ह्या रचनेनें बांधलेली अनेक देवळें, प्रासाद आजहि अस्तित्वांत आहेत. बायझेंटाईन पद्धतीचें आणखी मुख्य लक्षण म्हणजे मुख्यस्थानीं निदान घुमट असावा. त्याप्रमाणें ह्या इमारतींत तीन घुमट आहेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पाश्चात्य बायझेंटाईन व पौर्वात्य भारतीय कलेचे थोडेसें संमिश्रण ह्या इमारतींत दिसून येतें.

हायस्कूलच्या शेजारींच ज्युबिली सायन्स इन्स्टिटयूट ह्या नांवाचें मोठें कॉलेज सध्यां बांधण्यांत येत आहे. ती संस्था फक्त सायन्सच्याच विद्यार्थ्यांच्या उपयोगी पडणारी आहे. शिक्षण दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर असल्यानें व वाङ्मयीन शिक्षणापेक्षां शास्त्रीय ( science ) शिक्षण विशेष मोलाचें वाटूं लागल्यामुळें अशा संस्थेची देखील गरज बडोद्याला भासत आहे. ह्या इमारतीचें बांधकाम आज सुरूं असून तिच्यासाठीं सहा लाख रुपये मंजूर झाले आहेत.

## कीर्तिमंदिर

Lives of great men all remind us
We can make our lives sublime

—Longfellow

थोर महात्म्यांचा थोरपणा सदा सर्वकाळ आपल्या नजरेसमोर असावा, चिरस्मरणीय व्हावा, त्यांच्या कृतीचें रसोद्ग्रहण करण्याची दृष्टि आपल्याठायीं असावी, आपणहि तत्समान होण्याचा प्रयत्न करावा वगैरे उच्च विचार थोर महात्म्यांच्या चरित्राबद्दल प्रत्येक व्यक्तिमात्राचे मनांत येतात. त्याप्रमाणें श्रीमंत महाराजांचे ठायीं असे नुसते विचारच काय पण ते विचार प्रत्यक्ष कृतींत उतरविण्याची उत्कट इच्छाहि होती. ही इच्छा उत्पन्न होण्यास महाराजांचें देशाटनच कारण असावें. फ्रान्समधील पॅन्थीऑन व इंग्लंडमधील वेस्टमिनिस्टर ॲबे ह्या दोन संस्था पाहिल्यावर आपणाकडेहि असेंच एखादें कीर्तिमंदिर असावें असें महाराजांना वाटूं लागलें असावें. ह्या इच्छेस श्रीमंताच्या सुवर्ण महोत्सवाचे वेळीं मूर्तस्वरूप आलें व त्यांनीं कीर्तिमंदिराचा पाया ता. १५-१-१९२६ रोजीं घातला.

श्रीमंत महाराजसाहेब त्यावेळीं केलेल्या भाषणांत म्हणाले, ‘ राज्याच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं ज्यांनीं ज्यांनीं परिश्रम केले असतील त्यांच्या उपकाराची जाणीव असूं देणें हें आपलें कर्तव्य आहे. त्यांचें कार्य आपल्यासमोर चिरस्मरणीय स्वरूपांत रहावें ह्या हेतूनेंच कीर्तिमंदिर स्थापन करण्यांत येत आहे. कीर्तिमंदिरांत आल्याबरोबर ह्या मोठ्या लोकांच्या दर्शनानें आपल्या मनांत भक्तिभाव जागृत होतील आणि जे कोणी दर्शनार्थ येतील त्यांच्याहि मनांत अशाच प्रकारचा पूज्यभाव उत्पन्न होईल.

कीर्तिमंदिर बांधावें असें सन १९२४ सालीं ठरलें व त्याप्रमाणें योजना तयार करण्याबद्दल श्रीमंतांची आज्ञा झाली. नेहमींच्या पद्धतप्रमाणें श्रीमंतांना आंखीव चित्रें ( Plans ) सादर करण्यांत येत असत, त्यावेळीं महाराजांनीं त्यांत कसकशा उपयुक्त सूचना केल्या व स्वतःची आवड सुचविली हें खालील उदाहरणावरून दिसून येईलः—

१. बडोद्यांतील इतर इमारतींप्रमाणें ह्या इमारतींत देखील घुमट असावा असें पूर्वीच्या योजनेंत ठरलें होतें. परंतु ह्या इमारतींत विशेष नाविन्य दिसावें म्हणून घुमटाऐवजीं शिखर ठेवण्यांत यावें असें श्रीमंतांनीं ठरविलें.

२. कीर्तिमंदिरांत पूर्वीच्या महाराज आणि महाराणीसाठीं पुरेशी समाधी-स्थलें असावीत आणि इतर कीर्तिमान मंडळींच्या पुण्यस्मरणार्थ पुष्कळसे कोनाडे ठेवण्याबद्दल श्रीमंतांनीं सांगितलें.

३. पुढें मागें ह्याच जागेला नगरविस्ताराच्या दृष्टीनें बरेंच महत्व येण्याचा संभव असल्यानें विश्वामित्री नदीच्या फांट्यावर एक मोठा पूल बांधण्याचेंहि सूचित केलें.

४. कीर्तिमंदिराच्या सभामंडपाच्या पहिल्या स्वरूपांत महाराजांनीं बरेच फेरफार करविले. पूर्वी सुचविलेली रचना बांधकाम दृष्टीनें भरीव ( solid ) स्वरूपाची होती. महाराजांनीं सुचविलेली योजना थोडीशी हलकी ( light ), पण सुटसुटीत व व्यवस्थित अशी आहे.

अशा प्रकारच्या सूचना श्रीमंतांनीं अनेक वेळां आंखीव चित्रें पाहून केल्या आहेत व त्यांच्याच सूचनेनुरूप झालेलीं कामें त्यांच्या आवडीनिवडीची साक्ष कलात्मक स्वरूपांत देत आहेतच.

कीर्तिमंदिर आणि ज्युबिली सायन्स इन्स्टिटयूट ह्या दोन्हीं इमारतींचीं बांधकामें सध्यां चालू असल्यामुळें त्याबद्दल विशेष उल्लेख केला नाहीं.

## इमारतीवर झालेल्या खर्चाची जंत्री.

राज्यकारभारच्या अहवालावरून असें दिसून येतें कीं, राज्याच्या उत्पन्नां-पैकीं १५ टक्के उत्पन्न जाहीर बांधकामांवर दरवर्षी खर्च करण्यांत येतें. ह्यांत रस्ते, पाटबंधारे, इमारती वगैरेंचा समावेश होतो. हीं सर्व कामें लोकांची सोय, सार्वजनिक हितसंवर्धन, वगैरे करतांच करण्यांत येतात. आजपावेतों श्रीमं-

तांनीं अनेक शिक्षणसंस्था, राजकीय शासनसंस्था ह्यांकडे पुष्कळ पैसे खर्च केले आहेत. त्यांतील मुख्य बाबती खालीलप्रमाणें नमूद करतां येतील:

(आंकडे लाखाचे आहेत)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | कॉलेज | ८·३ | १२ | मकरपुरा राजवाडा | १२·८ |
| २ | मिडल स्कूल | १·४ | १३ | प्रतापविलास | १२·० |
| ३ | फीमेल ट्रेनिंग कॉलेज | ०·९ | १४ | न्यायमंदिर | ७·३ |
| ४ | मेल ट्रेनिंग कॉलेज | १·१ | १५ | खंडेराव मार्केट | १·४ |
| ५ | म्युझियम् | २·६ | १६ | सेंट्रल जेल | ७·७ |
| ६ | पिक्चर गॅलॅरी | १·६ | १७ | हॉस्पिटलस् | ६·८ |
| ७ | सार्वजनिक बाग | ११·२ | १८ | वॉटर वर्कस् | ४३·० |
| ८ | ज्युबिली बाग | ०·५ | १९ | सायन्स इन्स्टिटयूट | ६·३ |
| ९ | कलाभवन | ५·५ | २० | सेंट्रल लायब्ररी | १·९ |
| १० | कीर्तिमंदिर | ४·१ | २१ | बडोदें हायस्कूल | २·८ |
| ११ | लक्ष्मीविलास राजवाडा | ५२·५ | २२ | ड्रेनेज काम | २५·० |

वरील बाबतींत पाटबंधारे, रेल्वे व राज्यांत बडोदें शहराशिवाय इतर ठिकाणीं बांधलेल्या इमारतींचा उल्लेख केलेला नाहीं. एकंदर झालेल्या खर्चाचा आंकडा गोळा करूं म्हटलें तर तो २१ कोटीपावेतों जाईल असें वाटतें.

## उपसंहार

हा सर्व खर्च श्रीमंत सरकार केवळ रयतेच्या सुखासाठीं, प्रगतीसाठीं, लोकशिक्षणासाठींच करीत आहेत हें पाहिलें म्हणजे मन आनंदीत होतें, आणि ‘कृतज्ञतेचे अश्रू’ डोळ्यांत जमूं लागतात. सार्वजनिक बांधकामें कलावैशिष्ट्यानें देत असलेली साक्ष ऐकून प्रत्येक जण उपकारबुद्धिनें श्रीमंतांना दुवाच देईल ह्यांत शंका नाहीं.

---

## MAHARAJA AS AN ADMINISTRATOR.

(*By Rao Bahadur Govindbhai H. Desai, B.A., LL.B.*)

On the auspicious occasion of His Highness Sayajirao Gaekwad III completing the seventieth year of his eventful life and entering the seventy-first, it would be interesting to have a brief survey of his administration of the Baroda State for over 50 years from the 28th of December 1881, when he assumed the reins of Government in his own hand. The first and the most striking fact is that His Highness' reign presents a pleasing contrast with that of the past rulers of Baroda. The internal feuds and strifes and the external wars and dissensions ; the greed of money and territory and the apathy for public good and prosperity have become things of the past. Raja Sir T. Madhavrao and his band of helpers had laid the foundations, and sketched out a programme for a systematic and civilized Government. But to make the administrative machinery effective, to grapple with difficulties in questions of internal reforms and to urge the State forward on the lines of progress was the task which the young Maharaja found reserved for himself. The work accomplished during more than half a century has been most remarkable and its effects far reaching for the progress and welfare for the people of Baroda.

Volumes can be written on the achievements of His Highness, as ruler of the Baroda State. But only a brief summary of them can be given here. The old *ijara* and *bhagvatai* system has been abolished, a scientific land revenue survey and settlement has taken the place of the old *ijara* and *bhagvaai* ; petty and vexatious imposts have been abolished ; and duties which hampered trade have ceased to exist. Departments of Government such as Revenue, Law, Police, Public Works, Education, Medical, Sanitation, Agriculture, Co-operative, Commerce and Industries, Finance &c., have been formed on the model of those in British India ; an efficient and intelligent public service has been created ; power statements are provided for all officers

and rules and regulations are prescribed in detail so that the machinery of administration may be carried on effectively and efficiently. Old laws have been amended, new codes have been framed, and the executive and judicial functions have been separated. Marked educational progress has been made. The number of vernacular schools which was less than a hundred before the Maharaja came to the throne is to-day nearly 3,000, and primary education is both free and compulsory. There is an Arts College, several technical schools, nearly 50 High Schools, eighty anglo-vernacular schools, a Girls' High School, Training Colleges for Male and Female teachers, Music schools and Sanskrit Pathashalas. A number of students and even officers have been sent from time to time to study subjects in Europe and America. Sanitation and Medical relief have been fostered. Hospitals in the principal towns and dispensaries in smaller places and travelling dispensaries for the backward parts of the country have been provided. Roads and Railways have been constructed, and buildings for offices, schools, dispensaries, courts, village chowras, Police Thanas, and rest houses have been provided. The capital city of Baroda, and most of the moffusil towns, and even some of the villages have been provided with water works and electric installations for supply of light and power. A complete system of local self-government has been built up. All the towns have been provided with municipalities with powers of Self-government on the initiation of His Highness himself. Requisite facilities are given to the British Postal and Telegraph authorities for providing additional post offices and letter boxes in the different parts of the State for the convenience of the people; and measures are adopted on the most approved lines, for the prevention of famine, plague and other calamities. His Highness has been, throughout his reign, a personal ruler; and it will be the duty of the historian to acknowledge that the credit for the great achievements recorded in the Government of the State during the last 55 years is his. True that he has had the assistance of able and zealous officers. But

even they owe their efficiency to his personal guidance and supervision, and without them would achieve nothing.

A comparison between the Baroda of 1875 when the Maharaja came to the throne and the Baroda of 1933 will show how great is the debt owed by the State and its people to His Highness; and one cannot but think that were those who were acquainted with the conditions which prevailed in Baroda in former years permitted again to revisit it, they would find that miracles had been performed, that the impossible had been achieved in a single reign. The secret of these miracle lies in the fact that His Highness has worked for the advancement of the State and the progress of his people on the path of prosperity and contentment with a remarkable singleness of purpose all his life. Whether in Baroda or outside, the welfare of his people had been the great ideal which His Highness had always kept before him. It is owing to this that he has been one of the most progressive rulers among the Princes of India. By his great natural capacity developed by experience, gained by visiting the leading social, political and commercial centres of Europe, he has risen to a position in which he is beloved by his own people, regarded with much respect by those with whom he comes in contact, and honoured by His Imperial Majesty the King Emperor for whom his unswearing loyalty is ever manifested. The Maharaja has a wonderful administrative genius in devising new things and curing defects in the old. He bears on his single shoulders the arduous task of re-modelling departments, controlling the administrative machinery, guiding his officers and bringing the administration to a high level of efficiency. His Highness constantly thinks of the good of his State, the betterment of its administration, and the good of his people. It was while he was in United States of America that he conceived the beneficient and happy idea, from what he saw there, of the establishment of liabraries in the State, which in addition to the Central Library at the capital, has now 45 town libraries, nearly 800 village libraries, 12 special libraries for women and children, and 160 reading rooms in its

different parts; and in places where there are no libraries, boxes of books are circulated for the perusal of the people. It was also while His Highness was in that great country that he conceived and put into effect his idea of starting Ambulance and Home Hygienic Classes and Children's Court for the trial of Juvenile offenders. Old-age pensions, poor-houses, regulation of public charities, payment of weekly wages, social and economic surveys, village re-organization and other problems have not escaped the vigilant eye of the Maharaja.

Agriculture being the most important industry in the State, giving employment to over 70 per cent of the population has naturally received the utmost care and consideration from the Maharaja. Improvement, necessary to secure increased quantity and improved quality of the produce is looked after by a separate department under an officer trained in scientific agriculture. Researches are made and demonstrations of results achieved and of improved types of implements and tracters are given to popularise improvements. Veterinary hospitals have been started in almost all the head quarter towns. An agricultural calendar is published yearly and a village uplift journal is published quarterly in the Gujarati language with a view to spread useful information about scientific agriculture and co-operation among the masses. Model farms are opened in all districts and practical instruction is given to the sons of cultivators. At the same time the financial side of agriculture is looked after by the Co-operative department and co-operative banks started in most places. There are over a thousand co-operative societies out of which nearly eight hundred are agricultural credit societies.

In a country where everything depends upon the timeliness and efficiency of the annual rains, it is irrigation that must necessarily take the largest place in all plans of agricultural improvement. Realising this obvious truth His Highness has not only made many irrigational tanks in the various parts of the State but has annually given large advances for sinking wells. Irrigation by wells having been most successful, every

६ वर्षे होईपर्यंतचें कोणाहि मुलाचें शिक्षण किती होतें हें पाहिलें म्हणजे त्यावरून महाराजांना या सहा वर्षांच्या काळांत शिक्षणाचा लाभ कितीसा झाला असेल याची कल्पना सहज येईल. हल्लींच्या काळीं शिक्षणाला आरंभ केल्यापासून ५ वर्षे केवळ मराठी शिक्षणांत जातात व सहाव्या वर्षी साधारणत: इंग्रजीला सुरुवात होते. श्रीमंत सयाजीराव यांना मराठी, गुजराती, इंग्रजी व उर्दु अशा चार भाषा आरंभापासूनच शिकविण्यास सुरुवात केली, व त्या चार भाषांसाठीं चार निरनिराळे मास्तर ठेवण्यांत आले. यावरून त्यांची किती ओढाताण होत असेल व कोणत्याहि एका भाषेचें शिक्षण मिळविणें किती कठिण गेलें असेल याची कल्पनाच करणें बरें ! अर्थात् भाषाविषया-शिवाय इतर कोठल्याहि विषयाकडे लक्ष देणें त्यांना अशक्यच होतें. यानंतर सन १८८१ सालीं त्यांना अठरा वर्षांच्या वयांत संपूर्ण राज्याधिकार सोंप-ण्यांत आले व यापुढील सहा वर्षे आपल्या राज्यांत फिरून व राजधानीच्या जागीं राहून राज्यकारभाराचें प्रत्यक्ष शिक्षण व अनुभव घेण्यांत त्यांना घालवावीं लागलीं. यानंतर सन १८८७ सालीं त्यांनीं युरोपची पहिली सफर केली. अर्थात् ती करीपर्यंत साहित्य, संगीत, शिल्प अथवा चित्रकला इत्या-दिकांची नुसती तोंडओळख देखील करून घेण्याची संधि त्यांना मिळाली नाहीं हें स्पष्ट दिसून येतें. असें असतां, पहिल्याच युरोपच्या सफरींत त्यांनीं निरनिराळ्या देशांत शिल्पकलेचे, मूर्तिकलेचे, व चित्रकलेचे जे नमुने पाहिले, त्यांवर त्यांनीं जे अभिप्राय दिले आहेत, ते पाहतां मन आश्चर्यचकित होतें, व त्यांना या ललितकलांची जन्मजात अभिरुचि होती असें प्रतीत होतें. महाराजांच्या कारकीर्दीच्या आरंभापासून व्यवस्थितपणा हा त्यांचा अप्रतिम गुण दृष्टोत्पत्तीस येतो व त्यामुळेंच त्या काळापासून त्यांनीं लिहि-लेलीं पत्रें नीट पद्धतशीर रीतीनें राखून ठेवण्यांत आलीं आहेत. त्या पत्रांतून हे ललितकलांबद्दलचे अभिप्राय त्यांनीं व्यक्त केले आहेत. ते वाचले म्हणजे उत्कृष्ट कलाभिज्ञाचें कसब त्यांच्या अंगीं इतक्या अल्प वयांत व अशिक्षित स्थितींत असल्याची खात्री पटेल. उदाहरणार्थ, या पहिल्याच प्रवासांत ते रोम येथें गेले असतां सेंट पीटर्सच्या प्रचंड मंदिराबद्दल ते लिहितात, ‘ त्या मंदिराबाहेरील चौक अफाट व भव्य आहे, पण मंदिराच्या पुढचा भाग अगदीं बेडौल असून त्यामुळें मुख्य मंदिराची शोभा कमी होते. मंदि-राच्या आंतला भाग भव्य आहे व मंदिराच्या छताच्या मुख्य कमानीला

खूप नक्षी केली आहे, पण या अतिशय नक्षीमुळें तिचा भव्यपणा नाहींसा झाला आहे.' त्याचप्रमाणें ते व्हेनिसला गेले असतां तेथील प्रसिद्ध सेंट मार्कच्या मंदिराचें जें वर्णन त्यांनीं केलें आहे, तें त्यांच्या कलावित्पणाचें सुंदर उदाहरण आहे. ते म्हणतातः—'या मंदिरांतील अत्यंत सूक्ष्म व भरघोंस नक्षीकाम पाहिलें म्हणजे पदोपदीं हिंदुस्थानांतील शिल्पकलेची आठवण होते, व इटलींतील अशा सर्व नक्षीकामाचें उद्गमस्थान हिंदुस्थानांत असल्याची जाणीव होते. कारण पाश्चात्य शिल्पकलेहून हें नक्षीकाम अगदीं निराळें असें दिसून येतें. तिकडील शिल्पकलेचें स्वरूप शुद्ध, परंतु साधें, भव्य, पण खोल, व विशाल पण समर्याद अशा स्वरूपाचें असतें. युरोपांतील एकंदर शिल्पकलेच्या तुलनेनें पाहतां या मंदिरांतील व इटलींतील इतर ठिकाणच्या नक्षीकामाच्या विपुलतेची ही पद्धति पाहुण्यासारखी भासते. या मंदिरांतील ऐश्वर्य, मोहकता, व प्रकाश, त्यांत मनमुराद् वापरण्यांत आलेला संगमरवरी दगड व सोनरी काम, त्यांतील, लाल, जांभळा व तांबडा हे रंग, त्यांतील भिंतीवरील चित्रांत दिसून येणारा भडकपणा हे सर्व गुण पौर्वात्य असून, तत्त्वतः ते पाश्चात्य शिल्पकलेहून भिन्न दिसतात." त्यानंतर ते मिलन येथें गेले असतां तेथील कॅथीड्रलबद्दल ते लिहितातः–'त्याचें नक्षीकाम पाहून तर मनुष्याची मति गुंग होऊन जाते. त्याचे असंख्य कळस, शिखरें, कोनाडे, व त्यांतील १९२३ पुतळे हे सर्व निःसंशय नाजुक व भव्य आहेत, पण त्या सर्वांत एकात्मता आढळून येत नाहीं. या सर्व दृश्यांचा एकंदर परिणाम जरी मनावर अत्यंत विस्मयकारक असा होतो, तरी त्यामुळें चित्ताला शांतता व समाधान प्राप्त होत नाहींत. या मंदिराच्या आंत गेल्यावर मात्र, तेथील उच्च व अफाट छत, त्यांतील सहाशें एकोणऐंशीं पुतळे व संगमरवरी दगडाच्या खांबांचा चक्रव्यूह पाहून अंतःकरणांत असा एक प्रकारचा उदात्त व भक्तिपूर्ण विकार उत्पन्न होतो कीं त्याचें वर्णन करणें अशक्य आहे.'

अशाच प्रकारानें अनेक शिल्पांचें जें वर्णन श्रीमंतांनीं आपल्या पत्रांतून दिलें आहे, तें वाचलें म्हणजे, त्यांची कलाभिरुचि ही सहज आहे, या म्हणण्याची यथार्थता पटेल. अशा प्रकारें अनेक वर्षें सर्व पृथ्वीचें पर्यटन अनेकवार करून त्यांतील सर्व कलांचें अत्यंत सूक्ष्म अवलोकन त्यांनीं केलें आहे.

यानंतर पुढें ते इंग्लंडांत गेल्यावर तेथील प्रसिद्ध चित्रसंग्रह असलेली 'नॅशनल गॅलरी' पहाण्यास ते गेले. त्याबद्दल ते म्हणतातः—'इतका उत्कृष्ट चित्रांचा संग्रह इतक्या भिकार इमारतींत ठेवलेला पाहून मनाला धक्काच बसतो.' ही इमारत एकंदरीनें पहातां ट्राफलगारचौकाला गालबोट असल्याप्रमाणें दिसते. याच चौकांतील नेल्सनचा पुतळा तर इतका बेढब दिसतो कीं विचारूंच नये! त्या पुतळ्याचा चबुतरा इतका अप्रमाण लहान आहे, व त्यावरील तो पुतळा इतका उंच आहे कीं, तो पुतळा नसून एखादा बांबूचा शेंकाटाच आहे असें वाटतें.'

अर्थात् त्यांच्यासारख्या स्वराज्यप्रेमी राजाला त्या सर्व कलांची प्रतिष्ठापना व उन्नति आपल्या राज्यांतहि यथाशक्ति करावी अशी इच्छा न होणें अशक्य आहे. या दृष्टीनें त्यांनीं मूर्तिकलेकडे आपलें लक्ष वळविलें. त्यांनीं सन १८९३ सालीं इटलींतून 'फेलिसी' या अप्रतिम मूर्तिकाराला बडोद्यास आणविलें व त्याला सन १८९७ पर्यंत ठेऊन घेऊन त्याच्याकडून अनेक आरसपानाचे व ब्रॉँझचे पुतळे तयार करवून घेऊन त्यांनीं ते हल्लीं राजवाड्यांतून ठेविले आहेत. हा मूर्तिकार फार अप्रतिम कलाविद् होता. त्यानें बनविलेल्या पुतळ्यांतील दरेक अवयवांतून उत्कृष्ट कारागिरी दिसून येत आहे. सूक्ष्म गोष्टींतहि यथातथ्यता आणणें हा त्या काळीं मूर्तिकलेचा गुणविशेष मानला जात होता, व त्याप्रमाणें डोक्यापासून तों तहत पायाच्या बोटापर्यंत सर्व अवयवांत हुबेहूबपणा व सत्यता त्यानें आणिली आहे. हल्लीं या कलेसंबंधानें दृष्टि भिन्न झाली आहे. मुख्यतः चेहऱ्यांत व मूर्तीच्या आवेशांत अथवा पावित्र्यांत त्या पुतळ्याची मूळ कल्पना व्यक्त करून बाकीच्या अवयवांकडे फारसें लक्ष द्यावयाचें नाहीं, अशी हल्लींची या कलेची दृष्टि आहे व हिला त्या विषयाची bold treatment अथवा 'स्थूलदृष्टि' असें नांव देण्यांत येतें. फेलिसीची दृष्टि अर्थातच तत्कालीन असल्यानें त्याच्या पुतळ्यांत सूक्ष्म गोष्टींत यथातथ्यता उत्कृष्ट साधलेली आहे. त्याच्या पुतळ्यांत श्रीमंत सौ. महाराणी साहेबांचा आरसपानी पूर्णाकृति पुतळा उत्कृष्ट साधला आहे. चेहऱ्यावरील तेजःपुंज व सुबुद्ध मुद्रा, उभे राहण्याची ढब, नेसण्याच्या चुण्या वगैरे सुंदर साधल्या आहेत. या शिवाय श्रीमंतांचे वडील काशीराव गायकवाड यांची बसलेली पूर्ण मूर्ति ब्रॉँझ धातूची बनविलेली प्रेक्षणीय आहे. हातांत तलवार, बसण्याचें

वीरासन, मोठें जुन्या पद्धतीचें पागोटें, पिळदार मिशा, चुण्याचा आंगरखा व सुरवार हीं सर्व फारच सुंदर साधलीं आहेत. त्याचप्रमाणें श्रीमंताचे उभयपुत्र कै. श्री. फत्तेसिंहराव व जयसिंहराव यांची जोडी उभी असल्याचा ब्रॉझचा जोड पुतळाहि फार सुंदर आहे. श्री. फत्तेसिंहरावांनीं स्कॉटलंड देशांतील पोषाखाप्रमाणें कोट, किल्ट, हायलँडर टोपी, व पायमोजे घातले असून श्री. जयसिंहरावांच्या हातांत लोखंडाचें फिरविण्याचें चाक आहे या शिवाय लक्ष्मीविलास राजवाड्याच्या मुख्य पोर्चमध्यें पाणी वाहणारा भिस्ती, नाचणारी बाई, दोन चित्ते व त्यांना पाळणारे रक्षक, सारंगीवाला व एक संन्याशी यांचे पुतळे—भर आकाराचे नव्हे-ठेवले आहेत, त्या सर्वांच्या चेहऱ्यावर त्या त्या प्रकारचा भाव फार सुंदर वठविला आहे. या शिवाय मुख्य दरबारच्या दिवाणखान्यांत या राज्यांतील पूर्वींचे दिवाण काजी शहाबुद्दीन, लक्ष्मण जगन्नाथ व मणिभाई जसभाई, यांचे अर्धपुतळे ठेवले आहेत. ते सर्व सुंदर आहेत. त्याचप्रमाणें बयाबाईसाहेब घाटगे, व बाजीरावसाहेब घाटगे, ( श्री. सौ. महाराणीसाहेबांचे मातापिते ) यांचे अर्धपुतळेहि त्याच कुसरीचे आहेत. पण या सर्वांपेक्षां फेलिसीचा सर्वांत सुंदर पुतळा म्हणजे ‘ हातांत बंदुक घेतलेला अरब शिकारी ’ याचा होय. तो मुख्य जिन्याच्या कठड्यावर उभा केला आहे. तो कलेच्या दृष्टीनें फारच सुंदर साधला आहे. त्याची ती सडपातळ पण चपल शरीरयष्टि, तीक्ष्ण दृष्टि, धाडशी व बेफिकीर मुद्रा व बंदुक धरण्याची ऐट हीं सर्व वाखाणण्याजोगीं आहेत. हा कारागिर येथें ४।५ वर्षे होता.

यानंतर सर जॉर्ज फँम्टन् नांवाचा एक कारागीर श्रीमंतांनीं कांहीं वर्षांपूर्वीं येथें आणला होता. त्याच्या हातचें एकच काम, पण फारच सुंदर असें करवून ते येथील म्यूझियम् मध्यें ठेवलेलें आहे. रोमशहर स्थापन करणारे महापुरुष रॉम्युलस व रीमा हे लहान असतां त्यांना एका लांडगीनें स्तनपान करवून लहानाचे मोठे केले अशी आख्यायिका आहे, तो प्रसंग या पुतळ्याच्या समूहांत दाखविला आहे. तो फार अप्रतिम आहे.

या शिवाय आर्ल्बट टॅफ्ट नांवाचा एक मूर्तिकार श्रीमंतांनीं आणविला होता, त्याच्याकडून स्वतः महाराजांचा पुतळा तयार करवून घेतला आहे.

यानंतर सन १९१४ सालांत व त्यानंतर पुन्हां सन १९२४ सालांत फणींद्रनाथ बोस या बंगाली कारागिरास महाराजांनीं

आणून देशी कारागिरीस उत्तेजन देण्याचा प्रयत्न केला. त्यानें केलेले लहानमोठे अनेक नमुने राजवाड्यांत ठेवलेले आहेत. श्रीमंतांनीं त्याला सयाजीपदक देऊन त्याचा गौरवहि केला. पण एकंदरीनें पाहतां हिंदुस्थानांतील मूर्तिकारांत अग्रपूजेचा मान महाराष्ट्रीयांनाच द्यावा लागेल. कारण म्हात्रे, फडके, गोखले, तालीम, कोल्हटकर, करमरकर हे सर्व उत्कृष्ट कारागीर महाराष्ट्रीयच आहेत.

यांपैकीं फडके यांनीं केलेला एक पुतळा श्रीमंतांनीं खरेदी करून तो येथील म्युझियममध्यें ठेविला आहे. एक म्हातारा ब्राह्मण हातांत पोथी घेऊन वाचतांना बसल्याबसल्याच डुकली घेत असल्याचा हा पुतळा आहे. म्हाताऱ्याच्या गळयाच्या व अंगाच्या शिरानशिरा त्यांत व्यक्तपणें दाखविल्या असून, पोथी वाचण्याचें कर्तव्य करण्याची इच्छा व वयोऽवस्थानुरूप येणारें निद्राजन्य शैथिल्य यांचा संगम यांत सुंदर रीतीनें दाखविला आहे. याशिवाय रा. तालीम यांनीं बनविलेला 'रस्त्यांतील भिकारी' हा पुतळाहि त्यांनीं खरेदी केला आहे.

या महाराष्ट्रीय मूर्तिकारांतच वरच्या दरज्याच्या कलावानांत श्री. कोल्हटकर यांचा दर्जा लागतो. येथील कलाभवनांतूनच शिकून ते तयार झालेले असल्यानें ते सर्वस्वी 'स्वदेशी' आहेत. त्यांच्याकडून श्री. महाराजांनीं आरंभीं आपले वडील बंधू श्रीमंत आनंदराव गायकवाड व दिवाण व्ही. पी. माधवराव यांचे अर्धपुतळे तयार करवून घेऊन ते दरबारच्या दिवाणखान्यांत फेलिसीच्या पुतळयांच्या जोडीनें बसविले आहेत. ते इतके उत्कृष्ट साधले आहेत कीं, ते कोल्हटकरांनीं केल्याची माहिती असल्याशिवाय कोणास कल्पनाहि होणार नाहीं. याशिवाय त्यांच्या स्टूडिओमध्यें स्वतः दोन दोन तास याप्रमाणें पांच वेळां 'बैठकी' देऊन श्री. महाराजांनीं आपला स्वतःचा भर आकारी पुतळा तयार करविला आहे, तो हल्लीं नवसारी येथील दाबू बोर्डिंगमध्यें उभा केला आहे. त्याचें छायाचित्र देण्याचा मोह आवरत नाहीं. श्री. महाराजांप्रमाणेंच श्रीमंत सौ. महाराणीसाहेबांनींहि कोल्हटकर यांच्याकडून एक सोन्याचा सुमारें दीडशें तोळयांचा सुंदर गणपती तयार करविला आहे. श्री. कोल्हटकर हे सर्व हिंदुस्थानभर प्रसिद्ध आहेत. त्यांचा अमदाबाद येथील लोकमान्य टिळक यांचा पुतळा, लाहोर येथील देशभक्त लाला लजपतराय यांचा पुतळा, सर गंगाराम यांचा पुतळा, बडोद्यां-



मूर्तिकार कोल्हटकरकृत श्री महाराजसाहेबांचा पुतळा.

तील विठ्ठलक्रीडाभुवनांतील शिवाजी महाराजांचा अर्धपुतळा हे सर्व उत्कृष्ट मूर्तिकलेचे नमुने आहेत. ब्राँझ धातूच्या अगर इतर धातूच्या मूर्ति ओतण्याचें कार्य ते स्वतः करितात व चौपाटीवर बसविण्यासाठीं मूर्तिकार फडके यांनीं केलेला लोकमान्यांचा पुतळा लवकरच यांच्या हातून ओतविला जाणार आहे. त्यांचा स्टूडिओ येथेंच आहे.

नुकतेंच येथें एक प्रदर्शन भरलें होतें, त्यांत श्री. कोल्हटकर यांचेच शिष्य रा. चव्हाण यांनीं केलेला एक शाडूचा पुतळा श्री. महाराजांनीं विकत घेतला आहे, त्यांत एक पाथरवट हातांत छिनी घेऊन हातोड्यानें दगड फोडीत आहे, असा देखावा वर्णिला आहे. त्यांची कृती नवीन होतकरू मूर्तिकार या मानानें बरी आहे.

या व्यतिरिक्त येथें वेळोवेळीं श्री. महाराजांच्या आज्ञेनें अनेक प्रदर्शनें भरविलीं जातात, त्यांतून फडके, गोखले वगैरे कारागिरांचीं शाडूचीं, मेणाचीं, चित्रें वगैरे मांडलीं जातात. अशाप्रकारें श्रीमंतांनीं मूर्तिकलेला आपल्या राज्यांत उत्तेजन देऊन आपली सुसंस्कृत अभिरुचि दर्शविली आहे. याशिवाय या कलेच्या अभ्यासकांना व रसिकांना उपयोगी पडणारा संग्रह येथील मोठ्या पदार्थसंग्रहालयांत आहे. हिंदुस्थानांतील मोठ्या पदार्थसंग्रहालयांत बडोद्याचा नंबर पुष्कळच वर लागतो. त्यांत शेंकडो प्रकारच्या कलाकुसरीचे नमुने ठेविले आहेत, त्यांतच प्राचीन ग्रीक व रोमन मूर्तिकारांच्या पुतळ्यांच्या उत्कृष्ट प्रतिकृती येथें शाडूच्या पण लहान आकाराच्या करून ठेविल्या आहेत. त्यांत 'मिलो येथील व्हीनस्', 'व्हीनस् डी मेडिसि' सारखे उत्कृष्ट नमुने ठेविले आहेत. शारीरिक सौंदर्याची अत्युत्कृष्ट कल्पना व निर्मिति यांत ग्रीस देशाच्या तोडीला अजूनहि कोठला देश उतरला नाहीं. अशा ग्रीस देशांतल्या कारागिरीच्या नमुन्यांतहि वरील दोन पुतळे सर्वोत्कृष्ट गणले जातात. लाखो मूर्तिकारांनीं त्यांच्या अवयवांच्या प्रमाणाचा, सौष्ठवाचा, सौंदर्याचा आविर्भावाचा अभ्यास केला आहे, तरी अजून त्या पुतळ्यांचें खरें सौंदर्य त्यांच्या हस्तगत झालें नाहीं. कारण तशा तोडीचे दुसरे पुतळे अजून निर्माण झाले नाहींत. तथापि त्यांच्या खालोखाल असा निजलेल्या ईव्हचा शुभ्र संगमरवराचा भर आकृतीहूनहि थोडा मोठा असा पुतळा 'फेलिसी 'नें तयार करवून येथील पदार्थसंग्रहालयांतच ठेविला आहे, तो अप्रतिम आहे.

या ग्रीस देशांतील कारागिरीच्या नमुन्यांप्रमाणेंच पौरस्त्य कारागिरीचा एक उत्तम नमुना म्हणून जपानांतून आणलेला व येथील ज्युबिली बागेंत बसविलेला कमलासतस्थ बुद्धाचा प्रचंड पुतळा होय. आर्यपद्धतीचें आध्यात्मिक तेज या पुतळ्याच्या चेहऱ्यावर दिसून येतें. एवढा प्रचंड पुतळा कसा ओतला असेल हें आश्चर्य वाटतें. महाराज जपानांत प्रवासास जातेवेळीं तेथून त्यांनीं हा आणवून मोठ्या समारंभानें तो या बागेंत शहराच्या मध्यभागीं बसविला आहे, त्यामुळें तो जातां येतांहि सर्वांच्या अवलोकनांत येऊं शकतो.

या शिवायचा मूर्तिकलेचा एक उत्तम नमुना म्हणजे येथील सार्वजनिक बागेसमोर उभा केलेला श्रीमंत महाराजांचा अश्वारूढ पुतळा होय. हा श्रीमंतांनीं स्वत: करविलेला नसून त्यांच्या उत्तेजनानें तयार झालेल्या त्यांच्या प्रजेनें त्यांच्या विषयींचें आपलें प्रेम व आदर व्यक्त करण्यासाठीं सार्वजनिक वर्गणीनें उभा केलेला आहे. चबुतऱ्याची उंची, त्या मानानें घोड्याची उंची, व त्यानंतर महाराजांचा लष्करी पोषाखांतील पुतळा, या सर्वांचें प्रमाण फार चांगलें साधलें आहे. हा पुतळा डरवेंटवुड नांवाच्या कारागिराकडून तयार करवून सन १९१२ सालीं बसविला आहे. शहरांतील एक प्रमुख स्थानीं बसविल्यामुळें अखिल नगराच्या हितासाठीं निरंतर दक्षतेनें राहणाऱ्या उद्यत पुरुषाप्रमाणें तो उभा असलेला पाहून कलारूपानें प्रजेच्या बुद्धीच्या विकासाविषयीं जागृत असलेल्या या राजपुरुषाचें दर्शन अनेक दृष्टींनीं अन्वर्थक आहे असें भासतें.

यानंतरचा मूर्तिकलोत्तेजनाचा मोठा उपक्रम म्हणजे येथें बांधलें जात असलेले कीर्तिमंदिर हें होय. युरोपांतील मोठमोठाल्या देशांत 'Hall of Fame' असतात, व त्यांतून त्या त्या देशांतील प्राचीन प्रसिद्ध पुरुषांचे पुतळे ठेवण्यांत येतात. त्यामुळें गतविभूतींचें प्रत्यक्ष दर्शन झाल्याचा आनंद व समाधान पुढील पिढीला होतो. इंग्लंडांत लंडन येथील वेस्टमिन्स्टर ॲबे येथील प्रसिद्ध राष्ट्रपुरुषांचा प्रतिमासंग्रह तत्रस्थांना निरंतर स्फूर्तिजनक झालेला आहे. त्याच शहरांत 'मादाम तुसाड' नांवाच्या एका बाईनें एक मेणाच्या चित्रांचा अपूर्व संग्रह स्थापन केला आहे. त्यांत सर्व जगांतील मोठाल्या विभूतींचे भर आकारी पुतळे करून ठेवलेले आहेत. महात्मा गांधी दुसऱ्या गोलमेज परिषदेसाठीं विलायतेस गेले त्यावेळीं त्यांचाहि पुतळा या संग्रहासाठीं करविण्यांत आल्याचें

वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालें होतें. तशाच प्रकारचा संग्रह—अर्थात् येथील राज्याच्या व साधनांच्या मानानें करण्यासाठींच कीर्तिमंदिराची योजना केली असून त्याची इमारत चालू आहे. हें कीर्तिमंदिर केवळ दृश्यदर्शनासाठींच राहणार नसून, त्यांत प्रतिवर्षी उत्तमोत्तम वक्त्यांचीं विद्वत्तायुक्त भाषणें करविण्याचीहि योजना महाराजांनीं केली आहे.

अशाप्रकारें शक्य तितक्या रीतीनें मूर्तिकलेला उत्तेजन देण्याचा प्रयत्न महाराजांनीं सर्व आयुष्यभर केलेला आहे व अजूनहि ते करीत आहेत. तथापि त्यांच्या प्रयत्नांचा आस्वाद घेण्यास जनता तयार झाली पाहिजे तशी होत नाहीं. पुष्कळ वेळां या चित्रसंग्रहांतून जातांना, चालतां चालतां ओझरती दृष्टि त्याकडे फेंकून पुढें जाणारे लोकच अधिक दिसतात. एका दृष्टीनें हें स्वाभाविक आहे. कारण गायनकलेप्रमाणेंच मूर्तिकला काय अथवा चित्रकला काय या सर्व कलांची अभिरुचि संपादन करावी लागते. गोड आवाज व मधुर सूर हे सर्वांना—पशुपक्ष्यांनाहि-प्रिय असतात. पण गायनकला ही फार थोड्यांना हृद्य वाटते; त्याचप्रमाणें सुंदर म्हणजे तारुण्य व सौंदर्य यांनीं युक्त असलेल्या व गोंडस अवयवाच्या एखाद्या तरुणीचें चित्र साधारणत: सर्वांना आवडलें, तरी चित्रकलेच्या दृष्टीनें 'पोथी वाचणाऱ्या व शरीराच्या शिरान्‌शिरा दिसणाऱ्या, मांसाची झोळी लोंबणाऱ्या व हाडेंहि त्वचेनें केवळ आच्छादल्याप्रमाणें दिसणाऱ्या,' फडक्यांच्या पुतळ्यांतहि सौंदर्याची प्रतीति कलाविदाला होऊं शकते, ती केवळ स्वसंपाद्य आहे. व्हॅन डाइक या चित्रकलाकोविदानें असेच उद्गार काढले आहेत. तो म्हणतो,

"A pictorial idea should be a beautiful idea; but beauty here does not mean merely the straight nose, rounded arm or the perfect proportion of the torso. It is that something which strikes home to our emotional and sympathetic nature. Else there is no true art."

कोणत्याहि चित्राची कल्पना सुंदर असलीच पाहिजे. पण येथें सौंदर्य म्हणजे, सरळ नाक, गोंडस खांदा अथवा प्रमाणबद्ध शरीरयष्टि, हेंच नव्हे; आपल्या भावनात्मक व सहृदय अंत:करणाला जाऊन भिडेल असें दृश्य असेल तरच तें सुंदर. तें तसें नसल्यास त्यांत कांहींच कला नाहीं असें म्हणावें लागेल.

सुदैवानें अशा सुंदर कलेचा संग्रह येथें असून तो आणखी वाढू घातला आहे. त्याचा अभ्यास करून आपली सौंदर्याभिरुचि जागृत करून तिला सुसंस्कृत करणें व तद्वारें एक प्रकारच्या निर्मळ व निर्भेळ आनंदाचा आस्वाद घेऊन नित्याच्या शुष्क व रुक्ष जीवनांत रम्यता आणणें, हें सर्वांना साध्य आहे. महाराजांनीं साधनसामग्री तयार केली आहे. तिचा उपयोग करून घेणें ज्याच्या त्याच्या हातीं आहे.

## २. चित्रकला.

चित्रकला ही मूर्तिकलेची बहीणच आहे; व म्हणून मूर्तिकलेला आश्रय देणाऱ्या श्रीमंत महाराजांचें लक्ष चित्रकलेकडेहि जाणें अगदीं स्वाभाविक आहे. विशेषतः पूर्व वयांतील युरोपच्या प्रवासांत तिकडील चित्रमंदिरें अवलोकन केल्यावर त्यांची मूळची अभिरुचि जागृत व्हावी व आपल्या राज्यांतहि या अभिजात कलेला उत्तेजन देण्याची प्रेरणा त्यांना व्हावी हेंहि साहजिक आहे. श्रीमंतांनीं विलायतेंतील सर्व प्रसिद्ध चित्रमंदिरें सूक्ष्मपणानें अवलोकन केलीं होतीं, व त्यांतील चित्रांबद्दलचे आपले मार्मिक अभिप्राय आपल्या पत्रांतून अनेक वेळां त्यांनीं व्यक्त केलेले आहेत. एकीकडे राज्यकारभाराचें सरळ काम करीत असतां दुसरीकडे संस्कृतीच्या खास भागाचा विचारहि त्यांनीं चालू ठेवला होता. राज्यकारभाराचें काम हें व्यावहारिक सरधोपट व सरळ रेषेंतील असतें, तर चित्रकलेच्या वक्र रेषांत सांठविलेल्या सौंदर्याची प्रतीति होण्यास तिकडे मुद्दाम वळून पहावें लागतें. एका सुंदर इंग्रजी कवितेंत म्हटलें आहे कीं,

Straight is the line of duty.
Curved is the line of beauty.
Follow one and then shall see
The other following thee.

' कर्तव्याची मार्गरेषा सरळ असते, तर सौंदर्याची रेषा वक्र असते; पण एकीचा अवलंब केला कीं, दुसरी आपोआप आपल्या मागें येते. ' आपल्या प्रजेची शारीरिक, मानसिक, बौद्धिक, सांस्कृतिक वगैरे सर्व प्रकारची उन्नति घडवून आणणें हा राजाचा सरळ कर्तव्यमार्ग झाला. पण तो आचरीत

असतां सांस्कृतिक कल्याणांत प्रजेला वक्ररेषादर्शित चित्रसौंदर्याचा लाभ करणें हें ओघानेंच प्राप्त होतें. व वस्तुतः संस्कृतीचा इतिहास म्हणजे सौंदर्य-प्रतीतिसाठीं केलेल्या प्रयत्नांचा इतिहासच होय. " The history of civilization is the story of the development of man's conception of what is beautiful and good.'

दुसऱ्या एकानें असें म्हटलें आहे कीं,

All passes, art alone enduring lasts,
The bust outlives the throne; the coin Tiberius.

या जगांतील सर्व वस्तु नष्ट झाल्या तरी कला शिल्लक राहते, राजांचीं सिंहासनें नष्ट झालीं, तरी त्यांचे पुतळे राहतात. राजे गेले तरी त्यांचीं आकृतियुक्त नाणीं राहतात.

या सूक्तिप्रमाणें सनपूर्व ३,००० चीं माहेंजोदरो व हरापा येथील चित्रें, मूर्ति, पुतळे वगैरे अजून अस्तित्वांत असून तीं आतां सांपडल्यानें, त्यांच्या आधारानेंच या कालच्या इतिहासाचा मागोवा घेणें भाग पडत आहे. अजंठ्याची चित्रकला, हींहि सनपूर्व पहिल्या शतकांपासून सनोत्तर सहाव्या शतकापर्यंतचा इतिहास दाखविते. युरोपांतहि तेराव्या शतकांतल्या सिमॅब्यू व गियोतो पासूनची चित्रकला अजून उपलब्ध असल्यानें त्या त्या देशांतील व त्या त्या शतकांतील संस्कृतीची कल्पना आपल्याला येऊं शकते. या सर्व गोष्टींचा विचार करून श्रीमंत महाराजांनीं आपल्या राज्यांतहि चित्रकलेला उत्तेजन देण्याचा उपक्रम केला.

मागील मूर्तिकलेच्या भागांत उल्लेख केलेला इटालिअन उत्कृष्ट मूर्तिकार फेलिसी हा उत्तम चित्रकारहि होता. त्याच्याकडून कांहीं उत्तम तसबिरी काढून घेतल्या गेल्या आहेत. त्यांत लक्ष्मीविलास राजवाड्याच्या मुख्य जिन्यावर लाविलेली एका महारणीची तसबीर फारच सुंदर साधली आहे. चांगले कपडे घातल्यामुळें तिचें मूळचें सौंदर्य फारच खुलून दिसत आहे. ही तसबीर सन १८९७ सालीं काढलेली आहे. परंतु येथील त्या काळचा सर्वोत्कृष्ट चित्रसंग्रह म्हणजे भारतीय चित्रकारांचे मुकुटमणि राजा रविवर्मा यांच्याकडून श्रीमंत महाराजांनीं काढून घेतलेल्या तसबिरींचा होय. त्यासाठीं राजा रविवर्मा यांना येथेंच राजसन्मानानें खास ठेऊन घेण्यांत आलें होतें.

त्यांच्या हातच्या पौराणिक विषयावरील अस्सल तसबिरी एकंदर चौदा आहेत. त्या येणेंप्रमाणें:—

१ श्रीरामचंद्राचा विवाह.
२ श्रीकृष्णाची दृष्ट.
३ गंगा व शंतनु.
४ कारागृहांतून श्रीकृष्णाला वसुदेव घेऊन निघतो.
५ मत्स्यगंधा.
६ विश्वामित्र मेनका.
७ कीचक व सैरंध्री.
८ हरिश्चंद्र तारामतीच्या वधास उद्युक्त झाला आहे.
९ राधा माधव.
१० भरत.
११ कंस व माया.
१२ यतिवेषधारी अर्जुन व सुभद्रा
१३ नलदमयन्ती.
१४ द्रौपदी वस्त्रहरण.

राजा रविवर्म्याच्या हातच्या तसबिरींचा एवढा मोठा संग्रह म्हैसुराशिवाय दुसरीकडे कोठेंहि नाहीं. या पौराणिक चित्रांखेरीज सन १८९० सालीं राज-कुटुंबापैकीं ७ जणांच्या तसबिरी काढल्या आहेत, त्या येणेंप्रमाणें:—

श्री. कै. महाराणी चिमणाबाईसाहेब ( पहिल्या ) यांच्या दोन तसबिरी. श्री. सौ. महाराणी साहेब ( सांप्रतच्या ) यांच्या दोन तसबिरी.

श्री. जयसिंगराव, श्री. युवराज फत्तेसिंगराव व श्री. संपतराव गायकवाड.

या तसबिरींच्या चौकटीसाठीं रु. १,०३७–८–३ चा खर्च केल्याचा दाखला सांपडतो.

पौराणिक विषयांवरील राजा रविवर्म्याच्या सर्व तसबिरींच्या छापील प्रतिकृती सर्वांच्या पहाण्यांत असल्यानें त्यांच्या गुणवर्णनाबद्दल निराळें लिहिण्याची आवश्यकता नाहीं. तथापि नकला कितीहि चांगल्या असल्या, तरी त्यांना अस्सलाची किंमत केव्हांहि येऊं शकत नाहीं. या दृष्टीनें हा संग्रह म्हणजे राष्ट्राचा एक अमूल्य खजिना आहे. त्यांत खेदाची गोष्ट एवढीच आहे कीं, या तसबिरी पुष्कळ कालानें मंद दिसूं लागल्यामुळें त्यांच्या दुरुस्तीचें काम युरोपिअन चित्रकारांकडे सोंपविण्यांत आल्यानें, कित्येक अप्रतिम चित्रांचा बिघाड झालेला आहे. कांहीं चित्रांत रंगांचे नुसते लोंचे दिलेले दिसत आहेत.(?) कांहींच्या तर पार्श्वभूमींतहि दुरुस्ती करणाऱ्यांनीं फेरफार केले आहेत. व त्यामुळें तीं चित्रें विसंगत भासूं लागलीं आहेत.

एतद्देशीय चित्रविषयांशीं समरस होतां न येणाऱ्या परस्थ चित्रकारांकडे दुरुस्तीचें काम देण्यानें कित्येक वेळ अपरिमित नुकसान होतें, त्याचा हा दाखला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

यानंतर महाराजांनीं बडोद्यास कलाभवन स्थापन केल्यानंतर त्यांत चित्र-कलेचा एक वर्ग उघडला, त्यावेळीं रा. बुधवारकर नांवाच्या सद्गृहस्थांना मुद्दाम युरोपांत चित्रकलेचें शिक्षण घेण्यासाठीं पाठवून नंतर त्यांना या शाखेचे मुख्याध्यापक नेमण्यांत आलें. रा. बुधवारकरांचीं कांहीं उत्तम चित्रें व विशेषत: एका वस्त्रपरिधान करीत असलेल्या बाईची एक प्रतिकृति मकर-पुरा राजवाड्यांत ठेविलेली आहे ती फार सुंदर आहे.

अशा रीतीनें काढवून घेतलेलीं चित्रें कांहीं राजवाड्यांत व कांहीं येथील सार्वजनिक बागेंतील श्वेतमंदिरांत ‘ White Pavilion ’ मध्यें ठेविलीं होतीं. सन १९१० सालीं हा चित्रसंग्रह वाढविण्यासाठीं उत्तमोत्तम पाश्चात्य चित्रांचा संग्रह करण्याचें काम महाराजांनीं ‘ स्पिलमन् ’ नांवाच्या सुप्रसिद्ध चित्रकलाकोविदाकडे सोंपविलें. त्याप्रमाणें अनेक पाश्चात्य चित्रांची खरेदी करण्यांत आली. त्यांतील कांहींना हजारों रुपये देण्यांत आले आहेत. अशा रीतीनें हा संग्रह मोठा झाल्यावर तो ठेवण्यासाठीं प्रकाशाची यथानुकूल योजना असलेला एक स्वतंत्र भाग याच बागेंतील मुख्य पदार्थसंग्रहालयाला जोडून नवीन बांधण्यांत आला व त्याचा उद्घाटणसमारंभ ता.२३-३-१९२१ रोजीं करण्यांत आला. या नवीन जागेंत हीं चित्रें व्यवस्थित रीतीनें दरेक चित्रास जशी पार्श्वभूमि व छायाप्रकाशाची सवड हवी तशा सवडीनें गोठ-विण्याचें काम डिब्डिन् या तज्ज्ञाकडे सोंपविण्यांत आलें. त्यांनीं सन १९२० व सन १९२१ सालांत मिळून तें पूर्ण केलें. अगदीं अलीकडे कॅप्टन हाईम नांवाच्या आणखी एका तज्ज्ञाला सन १९३१ मध्यें बोलावून त्यांच्याकडून जीर्ण चित्रांची दुरुस्ती व रंगरोगण करवून घेण्यांत आलें आहे.

हल्लींची वृत्तपत्रें चाळणाऱ्या वाचकांना चित्रकलेवर त्यांतून जंगी वाद चाल-विणाऱ्या फैझी रहमान नांवाच्या चित्रकाराचें नांव चांगलेंच परिचित आहे. या कारागिरांकडून सन १९११ ते १९१५ च्या दरम्यान श्रीमंतांनीं १५ तसबिरी काढवून घेऊन त्यांबद्दल त्यांना एकंदर रु. ८,८०० दिले. या तसबिरींपैकीं ६ राजकुटुंबीयांचीं असून बाकीचीं ९ निरनिराळ्या देखाव्यांचीं आहेत. यांत

भुलभुलावणी, स्वामीनारायणाचें मंदिर, विश्वामित्री नदीवरील कामनाथ महादेवाचें मंदिर, सुरसागर तलावाच्या पश्चिम बाजूचें दृश्य, वगैरे देखावे सुंदर आहेत.

चित्रमंदिरांतील संग्रहाच्या प्रवेशद्वारींच दुसऱ्या मजल्यावर प्रसिद्ध इंग्रज चित्रकार सॉलोमन जे. सॉलोमन यांच्याकडून काढविलेली श्रीमंत महाराजांची एक भव्य तसबीर आहे. तिच्यासाठीं चित्रकारास १,४०० पौंडांची म्हणजे रु. २०,००० ची रक्कम सन १९२६ सालीं देण्यांत आली आहे.

तथापि केवळ पाश्चात्य चित्रांचाच संग्रह महाराजांनीं केला असतां, तर ते महाराजच नव्हत. दरेक सुधारणेंत हिंदुस्थानाहून हल्लीं पुढें गेलेल्या पाश्चात्यांचा आदर्श आपल्यासमोर ठेऊन त्या धोरणानें आपल्या देशाची उन्नति घडवून आणणें हा त्यांच्या आयुष्याचा मूलमंत्र आहे. तदनुसार त्यांनीं पाश्चात्य संग्रहाप्रमाणें भारतीय चित्रकलेचा अतिशय मोठा संग्रह त्याच इमारतींतील तळमजल्यावर ठेवला आहे. त्याच्या विशालत्वासंबंधानें मि. राइस या महाराजांच्या चरित्रकारानें म्हटलें आहे कीं, ‘It contains the best collection of Indian Paintings in the world.’ ‘हा संग्रह सर्व जगांतील प्राच्यचित्रसंग्रहांत श्रेष्ठ आहे.’ यावरून त्याबद्दची कल्पना येईल. यांत जयपुरी, कांग्राव्हॅली, मोगली, गढवाली वगैरे सर्व संप्रदायांच्या चित्रांचा भरणा केलेला आहे.

आतां आपण पाश्चात्य चित्रसंग्रहाचें स्वरूप अवलोकन करूं. त्यासाठीं उत्तम प्रकाश असलेले तीन मोठाले दिवाणखाने तयार केलेले असून त्यांतून हीं चित्रें शतकवार लाविलेलीं आहेत. म्हणजे सतराव्या, अठराव्या व एकोणिसाव्या शतकाच्या अनुक्रमानें तीं लावलेलीं आहेत. आरंभीं आरंभींचीं युरोपांतील चित्रकला ही केवळ धार्मिक विषयालाच वाहिलेली होती. त्याला दोन कारणें होती. एक तर लोकांवर त्या काळीं धार्मिक विचारांचेंच प्राबल्य अधिक होतें व दुसरें त्याकाळीं मोठमोठालीं मंदिरें ( Churches ) अत्यंत श्रीमान् असल्यानें चित्रकारांना मोबदला देणें त्यांनाच शक्य होतें. म्हणून त्यांनीं उत्तम कारागिरांना कांहीं मदत देऊन व कांहीं अंशीं त्यांच्या धार्मिक भावनेचा लाभ घेऊन ख्रिस्तमंदिरांतील भिंतीवर उत्तम चित्रें काढून घेतलीं. या अवस्थेंतील ‘ख्रिस्ताचें क्रूसारोहण’ ( नं. ३ ) हें चित्र आहे. हें ड्यूरर

या सुप्रसिद्ध जर्मन चित्रकाराचें असावें असा समज होता. प्रसिद्ध धर्मसुधारक मार्टिन लूथरचा हा समकालीन असून त्याचा मित्रहि होता. कुरळे पण लांब केस आपल्या कुंचलीनें काढण्यांत त्याचा हातखंडा होता. त्यावरूनच हें चित्र ड्यूररचें असल्याचा समज होता. पण तें एका इटालियन चित्रकाराचें आहे असें आतां ठरलें आहे. तथापि त्या काळीं हॉलंड देशांतील चित्रकारांचा श्रेष्ठ दर्जा मानला जात असे. त्यांपैकीं रोमरस्वाल, हेरिक ड ब्लेस, राइकहार्ट व डाइकमान्स यांची चित्रें येथें आहेत.

यानंतर इटली देशांतील संप्रदायांपैकीं 'बॉनिफेझियो' या प्रसिद्ध चित्रकाराचें चित्र यांत आहे. (नं. ७), याहून महत्त्वाचें चित्र म्हणजे 'टिशिअन'चें 'पीटर मार्टिरचा मृत्यु' हें चित्र आहे. उत्कृष्ट रंगविज्ञात्यांत टिशिअन् या चित्रकाराचा फारच श्रेष्ठ दर्जा मानिला जातो.

यानंतर फ्लेमिश संप्रदायांतील 'रुबेन्स'चें नं. १८ चें चित्र आहे. फ्रान्सचा उत्कृष्ट चित्रकार पुइसीन व निसर्गदृश्य रंगविणारा क्लॉड यांचींहि चित्रें येथें आहेत. त्यानंतरच्या पिढींतील प्रसिद्ध चित्रकार 'फ्रॅगोनार्ड' यांचें चित्र नंबर ८९ मध्यें आहे. स्पेनमधील सर्वोत्कृष्ट चित्रकारांचे नमुने येथें पहाण्यास मिळत नाहींत, तथापि दुय्यम दर्जाचीं कांहीं चित्रें येथें आहेत.

याप्रमाणें युरोपांतील अनेक देशांतील चित्रांचे नमुने थोडे थोडे आहेत. पण मुख्यतः इंग्रज चित्रकारांच्या कृतींची संख्या अर्थातच मोठी आहे. या संप्रदायांतील सुमारें ऐशीं चित्रें या संग्रहांत आहेत. व त्यांत सर जोशुआ रेनॉल्ड्स्, सर टॉमस् लॉरेन्स्, लॉर्ड फ्रेडरिक लायटन, सर जॉन मिले, सर एडवर्ड पॉयंटर या रॉयल ॲकॅडमीच्या अध्यक्षांच्या सुंदर कृती येथें आहेत. त्याचप्रमाणें नेल्सनची हृदयहारिणी लेडी हॅमिल्टन् हिची निरनिराळया प्रकारचीं चित्रें काढण्यासाठीं आपल्या धंद्यावर पांच वर्षें पाणी सोडणारा चित्रकार रॉमने, रेनॉल्डस्‌चा शिष्य हॉपनर, देखाव्यांची उत्कृष्ट चित्रें काढणारे टर्नर व कॉन्स्टेबल, यांचींहि चित्रें यांत आहेत. फ्रिथ या चित्रकारानें पांच चित्रांत मिळून वर्णिलेली एक गोष्ट 'Race for wealth.' 'संपत्तीचा शोध' ही फार मजेदार आहे. अतीशय लाभ होण्यासारखी एक हिऱ्याची खाण आपण शोधून काढली असून, त्यांतून हिरे काढण्यासाठीं एक मोठी कंपनी स्थापन करणार आहों अशा थापा मारून लोकांना भुरळ घालणारा एक

लफंगा एका मोठ्या सभेंत आपल्या कंपनीचीं भडक वर्णनें करीत आहे, अशा प्रकारचें या गोष्टींतील पहिलें चित्र आहे. दुसऱ्या चित्रांत या कोळ्याच्या जाळ्यांत अनेक माशा सांपडत असून त्यांत मध्यम स्थितींतील एक सच्छील कुटुंबाचा धनीहि सांपडला आहे, असा देखावा दाखविला आहे. तिसऱ्यांत हा भ्रमाचा भोंपळा फुटून ती कंपनी म्हणजे एक सोनेरी टोळीची लफंगेगिरी असल्याचें जाहिर झाल्याचें दाखवून त्या कंपनीचे शेअर घेण्यासाठीं आपलें सर्वस्व गमावणाऱ्या त्या सच्छील कुटुंबांतील दरेक व्यक्तीच्या चेहऱ्यावर निराशा व दुःख पसरल्याचा देखावा दाखविला आहे. चौथ्यांत त्या लफंग्याला पकडून न्यायासनासमोर त्याची चौकशी होत असल्याचें दाखविलें आहे व शेवटच्या पांचव्यांत त्याला शिक्षा झालेली असून तुरुंगांत इतर कैद्यांबरोबर व्यायामासाठीं वॉर्डरच्या देखरेखीखालीं तो फेरे घालीत असल्याचें चित्र दाखविलें आहे. या एकंदर चित्रमालिकेंतील चित्रांत, अनेक पात्रांचें समूहदर्शन, त्यांच्या चेहऱ्यावरील भावदर्शन व त्याच त्याच व्यक्तींतील साम्यव्यक्ति हीं सर्व अप्रतिम साधलीं आहेत.

यानंतर जनावरांचे खास चित्रकार लँडसिअर, मॉरिस, ऑर्चर्डसन् व हॅमिल्टन् यांचीं संग्रहांतील चित्रेंहि पहाण्यालायक आहेत. याप्रमाणें चित्र-कारांविषयीं निर्देश केल्यावर या संग्रहांतील कांहीं उत्तम चित्रांचा उल्लेख करूं.

बॉनिफेझियोचें चित्र 'बाल येशु व त्याची माता मेरी' चा विषय इतक्या निरनिराळ्या चित्रकारांनीं इतक्या अप्रतिम रीतीनें चितरला आहे कीं, त्यांतील तरतमभाव ठरविणेंच अत्यंत कठिण आहे. युरोपिअन चित्रकारांतील पहिला चित्रकार सिमॅब्यू (१२४०-१३०२) पासून, व्हॅन आइक, मेमलिंक, माबुझे, पेरूगिनो, विशेषतः सर्वोत्कृष्ट चित्रकार राफेल, फ्रॅन्सिया, बेलिनी, जार्जिओन् इत्यादि अनेक चित्रकारांनीं आपलें बुद्धिसर्वस्व यांत खर्च केलें आहे. त्यांतच बॉनिफेझियोच्या चित्राची गणना करितां येते. मादोन्ना अथवा माता इच्या चेहऱ्यावरील वात्सल्यभाव व बालयेशूच्या चेहऱ्यावरील बुद्धिमत्ता व गांभीर्य हीं वाखाणण्याजोगीं आहेत. धार्मिक चित्रांत गिडो रेनी याचें 'सेंट कॅथेराईन्' हें चित्रहि सुंदर आहे. धर्माकरितां प्राणत्याग करण्याची पाळी त्याकाळीं अनेक साधुसंतांना येत असे, व त्यांपैकीं कांहींना एका मोठ्या चाकाला बांधून गरगर फिरवून मारीत असत. त्यामुळें हें चक्र धर्म-छळाचें चिन्ह मानलें गेल्यामुळें संत कॅथेराइनजवळ तें चक्र दाखविलें आहे.

या चित्रांतील तिच्या चेहऱ्यावरील सात्विक तेज व भक्तिभाव फार उदात्त आहे. रूबेन्सनें काढलेलें 'फ्रेडरिक द् मार्सेलेअर' हें चित्र पोषाख वगैरेच्या बारकाव्याबद्दल व रंगांच्या मिलावटीबद्दल प्रसिद्ध आहे. पुइसिनचें चित्र 'येशूख्रिस्ताचें पादप्रक्षालन करणारी मेरी मॅाडलिन्' हें फार सुंदर आहे. येसूख्रिस्ताची सर्व भिस्त व प्रेम हलक्या लोकांवर असे. तेच साधेभोळे लोक या चित्रांत येशूभोंवती गोळा झालेले आहेत व त्याचा प्रेमानें सत्कार करीत आहेत, व मेरी मॅाडलिन ही त्याचे पाय धुवीत आहे, हा या चित्रांतील एकंदर भक्तीचा सोहळा प्रेक्षणीय आहे. 'एक राजकुटुंब, हें चित्र कोणाचें आहे याचा अजून बरोबर पत्ता लागला नाहीं. पण चित्र फार मोठें ( ८८ इंच ×७१ इंच ) असून राजा राणी व त्यांचीं तीन मुलें इतक्या जणांचा समूह तेथें दाखविला आहे. इंग्लंडचा राजा पहिला चार्ल्स व त्याची राणी हांरिएता मारिया यांचें एक सुंदर चित्र आहे, त्यांत चार्ल्सच्या हट्टी व धोपटमार्गी मूर्तीचा चांगला परिचय होतो. सर पीटर लेली यानें काढलेलें एक चित्र आहे, त्यांत होलो फर्नेस नांवाच्या एका जुलमी राजाचा वध ज्यूडिथ नांवाच्या एका साध्या मुलीनें करून त्याचें डोकें तरवारीनें छाटून तें घेऊन ती जात असल्याचा देखावा वर्णिला आहे. त्यांत केवळ कर्तव्य म्हणून हें कृत्य केल्याची निरभिमान व उदास वृत्ति जूडिथच्या चेहऱ्यावर चांगली प्रतिबिंबित केली आहे.

निसर्गदृश्यांत नॅार्थ या चित्रकारानें काढलेलें 'उन्हाळ्यांतील सरोवर' हें चित्र फार भव्य व सुंदर आहे. तें ( ५४ इंच × ७२ ½ इंच ) आहे. चित्र जवळून पाहतां नुसते रंगांचें गोळे मारल्यासारखे दिसतें. पण लांबून तें इतकें सुंदर दिसतें कीं, त्याकडे एकसारखें पहातच रहावेसें वाटतें. यानंतर 'एंबार्केशन' अथवा नौकारोहण या नांवाचें चित्र शोफर्डस नांवाच्या चित्रकारानें काढलें आहे; तें जरी चांगलें आहे, तरी या विषया-वरील जगत्प्रसिद्ध दोन चित्रांच्या मानानें तें फारच फिकें पडेल. उत्कृष्ट देखावे चितरणारा फ्रेंच चित्रकार क्लॅाड यानें 'शेबाच्या राणीचें नौकारोहण' या नांवाचें अप्रतिम चित्र काढलेलें आहे. त्यांत समुद्राच्या किनाऱ्यावरील प्रचंड इमारती, दूर अंतरावर असलेलें जहाज, आकाशांतील सूर्याच्या प्रका-शाची जलवीचींवर पडलेली रौप्यरेषा, इत्यादि देखावा अवर्णनीय आहे. तें चित्र पाहून त्याला निरंतर स्पर्धा करण्याच्या हेतूनें प्रसिद्ध इंग्रज चित्र-

कार टर्नर यानें ‘ कार्थेज बांधणारा डिडो ’ या नांवाचें चित्र रंगविलें. हेंहि चित्र उत्कृष्ट असलें तरी क्लॉडच्या चित्रापेक्षां तें कमी दर्जाचेंच वाटतें. या दोहीं चित्रापेक्षां शोफर्डसचें चित्र कमी दर्जाचें असलें तरी रम्य आहे. अशा प्रकारें या संग्रहांत निसर्गदृश्यें आहेत. त्याचप्रमाणें जनावरें, फलपुष्पादि वस्तू इत्यादींचींहि अनेक चित्रें आहेत, तीं फार सुंदर आहेत. त्यांची रम्यता स्वतः अवलोकन केल्याशिवाय समजणार नाहीं.

हिंदी चित्रविभागांत सुमारें ४०० चित्रांचा संग्रह आहे. अकबराच्या अमदानींत रामायण व महाभारत यांतील देखाव्यांचा बनविलेला एक अमूल्य संग्रह यांतच आहे. या काळच्या चित्रांत भडक रंग वापरण्याची पद्धति होती. त्यामुळें छायाप्रकाशांचा लपंडाव यांत फारसा पाहण्यास मिळत नाहीं. पुढें जहांगीरच्या वेळेपासून मंद रंगाची प्रथा पडूं लागली. त्यामुळें चित्रकाराच्या कौशल्याला अधिक वांव मिळूं लागला. यानंतर रजपूत संप्रदायांतील रागरागिणींच्या चित्रांचा संग्रह आहे. त्यांत त्यांच्या ध्यानाचे जे श्लोक आहेत त्याबरहुकूम त्यांची वेषभूषा दाखविली आहे, तरी त्यांत सांप्रदायिक बंधन न दिसतां खुल्या कुंचलीनें तीं काढलेलीं दिसतात. यानंतर मोंगल व रजपूत कालांतील अनेक इतिहासप्रसिद्ध व्यक्तींच्या प्रतिकृती क्रमानें येतात. त्यांच्या शेजारी पर्शिया अथवा इराण येथील चित्रकारांनीं काढलेलीं चित्रें लाविलीं आहेत. व त्यानंतर जयपूर, कांग्रा व्हॅली, लखनौ, दिल्ली वगैरे संप्रदायांतील अनेक चित्रें या संग्रहांत ठेविलीं आहेत. तीं सर्व त्या त्या संप्रदायांपैकीं उत्तमोत्तम निवडूनच ठेविलेलीं असल्यामुळें भारतीय चित्रकलेचीं उत्तम निदर्शनें आहेत.

हे दोन निरनिराळे संग्रह पाहिले म्हणजे या दोहोंतील अनेक फरक चटकन लक्षांत येतात. पाश्चात्य चित्रकलेंत ( Perspective ) अथवा यथादर्शन हा गुण आपल्या इकडील चित्रकलेपेक्षां अधिक आहे. एखादा दूरचा देखावा पहात असतां या यथादर्शन–पद्धतीप्रमाणें वस्तुतः त्यांतील वस्तु स्थूलत्वानेंच आपल्याला दिसतील. उदाहरणार्थ दूरच्या झाडाचे नुसते बुंधे व अव्यक्त छायाविस्तार दिसेल व तशींच तीं पाश्चात्य चित्रांत दाखविलेलीं असतील; पण प्राच्य चित्रांतून अशा दूरच्या झाडाचीं बारीक बारीक पानेंहि स्वतंत्रतः रंगविलेलीं दिसतात. या प्रकारांत त्याचें सूक्ष्म चित्रण दिसत असलें तरी यथादर्शन मुळींच दिसत नाहीं. दुसरा फरक अवयवप्रमाणाचा होय. शारीर-

शास्त्राप्रमाणें अवयवाचें प्रमाण दर्शविणें याकडे प्राच्य चित्रकारांचें दुर्लक्षच असतें. त्यामुळें त्यांत कमलाच्या देंठासारखें लांबच लांब व बिन निमुळते हात असतात, तर जाड मांड्याच्या व कटिपश्चाद्भागाच्या प्रमाणानें एकदम फारच बारीक झालेले पाय दिसतात. तसेंच चित्राच्या एकंदर आकाराच्या मानानें पार्श्वभागाची उंची व विस्तार याच्याशीं मनुष्याकृतीचें प्रमाण मुळींच रहात नाहीं. यानंतरचा मोठा फरक चेहऱ्यावरील भावदर्शनाचा होय. रजपूत, व मोंगल चित्रांतील स्त्रीपुरुषांचे चेहरे ठराविक ठशासारखे दिसतात. त्यांत अवयवांचा नाजुकपणा असला तरी निरनिराळ्या मनोविकारांची अभिव्यक्ति फारच कमी असते. वास्तविक रीतीनें भावदर्शन हा चित्रकर्माचा एक गुणविशेष म्हणून प्राचीन काळीं वर्णिलेला आहे. वात्स्यायनाच्या ‘ कामसूत्रा ’ वरील टीकाकार यशोधर यानें आपल्या टीकेंत उत्तम चित्राचे सहा गुण खालीलप्रमाणें वर्णिले आहेतः—रूपभेदाः प्रमाणानि भावलावण्ययोजनम् । सादृश्यं वर्णिका भेदः इति चित्रं षडंगकम् ॥ त्यांत ‘ प्रमाण ’ व ‘भाव ’ हे दोन्ही गुण प्रामुख्यानें वर्णिले आहेत, व अजंठ्यांतील चित्रांत हे दोन्ही फार चांगल्या तऱ्हेनें दिसून येतात. परंतु अजंठ्याच्या शेवटल्या चित्रांनंतर सुमारें सातशें आठशें वर्षे जी महानिद्रा भारतीय चित्रकलेला आली, तिच्यानंतर तिला जागृति आल्यावर हें पूर्वीचें स्मरण नष्ट झालेलें दिसतें. त्याची सांप्रतच्या काळांत पुन्हां आठवण होऊन आतां प्राच्य व पाश्चात्य दोन्ही प्रकारच्या चित्रकलांतील गुणांचें मिश्रण करून नवीन संप्रदाय सुरूं करण्याचा उपक्रम चालूं झाला आहे. तो यशस्वी होईल अशी आशा आहे.

स्वतः महाराजांचें आयुष्यकार्यहि प्राच्यपाश्चात्याच्या संधीवर उभें राहून दोन्हींचा मिलाफ करण्याचेंच आहे. इंग्रज कवि रूडियार्ड किप्लिंगनें जातिदर्पानें अशी घोषणा केली आहे कीं, ‘The East is East and the West is West. And the twain can never meet.’ ‘ पूर्व ती पूर्व व पश्चिम ती पश्चिम. या दोहोंचा संगम कधींहि होणार नाहीं. ’ पण ही घोषणा खोटी पाडण्याचेंच व्रत महाराजांनीं स्वीकारलें आहे, इतकेंच नव्हे, तर अनेक गोष्टींत असा मधुरसंगम त्यांनीं आपल्या राज्यांत प्रत्यक्ष घडवूनहि आणला आहे. तीच दृष्टि चित्रकलेच्या बाबतींत ठेऊन, दोन्ही प्रकारच्या कलांचा संग्रह अभ्यासूंसाठीं त्यांनीं एकत्र केला आहे.

पण इतकेंच करून ते थांबले नाहींत. तर आपल्या लक्ष्मीविलास राजवाड्यांत एक दोन दिवाणखाने प्राचीन प्राच्य पद्धतीच्या चित्रांत त्यांनीं शृंगारून घेतले आहेत. त्यांपैकीं एका दिवाणखान्याला 'वीणामंदिर' अथवा वीणारूम म्हणतात. त्यांत कॅनव्हसवर अजंठ्याच्या लेण्यांतील चित्राप्रमाणें चित्रें काढून ते कॅनव्हस लाकडी चौकटीवर चिकटवून त्या चौकटी दिवाणखान्याच्या चारी भिंतीस बसवून दिल्या आहेत. या दिवाणखान्याचे दरवाजे डेडो वगैरेवर चित्रें आहेत व तशाच प्रकारचीं चित्रें व देखावे असलेलें छतहि तेथें लावलें आहे. हीं चित्रें तेलाच्या रंगांनीं काढलेलीं आहेत. हें सर्व काम बडोद्यांतील तरुण व गुणवान् चित्रकार रा. तवकर यांनीं केलेलें आहे, व तें 'अत्यंत समाधानकारक झालें आहे.' असा अभिप्राय कॅप्टन् हाइम या तज्ज्ञांनीं दिला आहे. या कामासाठीं त्यांना सहा हजार रुपये देण्यांत आले. हे चित्रकार पुढें विशेष प्रसिद्धीला येतील अशी आशा आहे. यांच्याचकडून श्री. युवराज प्रतापसिंहराव यांच्या राहत्या 'प्रतापविलास' या राजवाड्यांत निरनिराळया जनावरांचीं मोठालीं बारा चित्रें भिंतीवर काढून घेण्यांत आलीं आहेत, त्यांचीहि प्रशंसा चांगल्या चित्रकारांकडून झाली आहे. याशिवाय बडोद्याच्या पूर्वींच्या महाराजांचीं चित्रें मंद पडून मलिन झालीं होती व कांहीं ठिकाणीं खपल्या उडून नादुरुस्त झालीं होतीं, तींहि याच चित्रकारांकडून दुरुस्त करवून घेण्यांत आल्यानें आतां तीं सुबक झालीं आहेत.

याप्रमाणें चित्रकलेला उत्तेजन दिलें गेलें, त्यापूर्वी फोटोग्राफीच्या कलेलाहि महाराजांनीं पुष्कळ वर्षांपासून उत्तेजन दिलें आहे. 'विविधकलामंदिर' या नांवाची फोटोग्राफीची संस्था येथें आहे, ती सुप्रसिद्ध आहे. व त्याचें सर्व श्रेय त्यांतील कुशल कारागीर रा. शितूत यांना आहे. रा शितूत हे येथील कलाभवनांतून शिकून तयार झालेले विद्यार्थी होते. सन १९०० सालच्या सुमारास महाराजांनीं कलाभवनास भेट दिली असतां त्यांतील अनेक शाखांत प्रावीण्य संपादन करणारे विद्यार्थी म्हणून ते महाराजांच्या निदर्शनास आल्यावरून महाराजांनीं त्यांना शिक्षकाची नोकरी करण्यापासून परावृत्त करून फोटोग्राफीच्या कलेच्या उन्नतीसाठीं स्वतंत्र संस्था काढण्यास उत्तेजन दिलें. त्याप्रमाणें रा. शितूत यांनीं सांप्रतची संस्था काढली व आजपर्यंत ते त्यांत काम करीत आहेत.

अशाप्रकारें चित्रकलेला महाराजांनीं उत्तेजन दिलेलें आहे. मानवी पर-

परेच्या अगदीं बाल्यावस्थेंतहि चित्रकला मनुष्याला मनोरंजक अशी होत होती व म्हणून पंचवीस तीस हजार वर्षांपूर्वीच्या गुहांतूनहि दगडी भिंतीवरून खडनें जनावरांचीं, माणसांचीं वगैरे चित्रें काढलेलीं पुराणसंशोधनांत दिसून येतात. या कलेचें प्राचीनत्व आपल्याकडेहि मान्य आहे. 'चित्रलक्षण' नांवाच्या एका प्राचीन ग्रंथांत चित्रकलेच्या उत्पत्तीविषयीं एक मजेदार कथा दिली आहे. तींत सांगितलें आहे कीं, फार प्राचीनकाळीं भयजित् नांवाचा एक राजा राज्य करीत होता. त्याच्या राज्यांत सर्व लोक फार सुखी असत. एकदां त्या राजाकडे एक ब्राह्मण मोठ्यानें रडत ओरडत आला व म्हणूं लागला कीं, 'हे राजा तुझ्या राज्यांत कोठें तरी पापाचरण होत असलें पाहिजे; कारण तसें नसतें तर माझा अल्पवयी मुलगा कसा मेला असता? यासाठीं तूं माझ्या मृत मुलाला पुन्हां जिवंत कर.' त्यावरून राजानें यमधर्माकडे तो मुलगा परत मागितला. यमधर्मानें ती मागणी नाकरल्यावरून त्याचें व भयजित राजाचें मोठें युद्ध सुरू झालें. इतक्यांत ब्रम्हदेव तेथें आले व त्यांनीं राजाला सांगितलें कीं, 'राजा, जन्म व मृत्यु हे दरेक प्राण्याच्या कर्मावर अवलंबून असतात. यमधर्माचा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं. तेव्हां तूं त्याच्याशीं उगीच कां युद्ध करतोस? तूं त्या ब्राह्मणाच्या मुलाचें एक चित्र काढ पाहूं.' त्यावरून राजानें चित्र काढलें. नंतर त्यांत ब्रह्मदेवानें प्राण घातले व राजाला सांगितलें, 'या नग्न प्रेतावरहि तूं जय मिळविलास, त्या अर्थीं येथून पुढें तुझें नांव नग्नजित् असें पडेल. तूं या ब्राह्मणपुत्राचें जें चित्र काढलेंस तें तूं केवळ माझ्या प्रसादामुळें काढूं शकलास. जगांतील पहिलें चित्र हेंच आहे. आतां तूं विश्वकर्म्याकडे जा, म्हणजे तो तुला पूर्ण चित्रविद्या व शिल्पविद्या शिकवील.' तेव्हांपासून जगांत चित्रकला अस्तित्वांत आली.

ती कशीहि आलेली असो. पण ती सुसंस्कृत जीवनाचा एक प्रमुख भाग आहे, इतकें निर्विवाद आहे. असें सुसंस्कृत व उच्च जीवन आपल्या प्रजेला प्राप्त करून देण्याची महाराजांची महत्त्वाकांक्षा आहे, व तिच्यासाठींच त्यांनीं इतका खर्च व मेहनत करून साधनें उपलब्ध करून दिलीं आहेत. हिंदुस्थानचे लोकहि अरसिक नाहींत व महाराजांच्या कृपेनें साधनसामग्रीला येथें वाण नाहीं. अशा स्थितींत जर त्या सामग्रीचा लाभ लोकांनीं करून घेतला नाहीं, तर एका प्राचीन सुभाषितकाराप्रमाणें इतकेंच म्हणावें लागेल कीं:—

भ्रमन्वनान्ते नवमंजरीषु न षट्पदो गंधफलीमजिघ्रत्.
सा किं न रम्या न च किं स भोक्ता. बलीयसी केवलमीश्वरेच्छा ॥

रसज्ञ भृंग वनांत गुंजारव करीत फिरतां फिरतां त्यानें एक सुंदर गन्धफली पाहिली, पण तिला न हुंगतांच तो पुढें चालता झाला! काय भ्रमर रसज्ञ नाहीं; कां गन्धफली रम्य नाहीं ? दोन्ही असतांना, भ्रमरानें तिला टाकलें हा दैवयोग म्हणावयाचा ! दुसरें काय ?

## ३. गायनकला

मूर्तिकला व चित्रकला याप्रमाणेंच श्रीमंतांनीं गायनकलेलाहि आपल्या कारकीर्दीच्या आरंभापासून उत्तेजन दिलें आहे. यापूर्वीच्या कारकीर्दीकडे पाहतां श्री. कै. दुसरे सयाजीराव महाराज यांच्या अमदानीपूर्वीं कलावंत लोक सरकारी नोकरींत असल्याचें दिसून येत नाहीं. हे राजे सन १८२० सालीं गादीवर बसले, तेव्हां त्यांनीं असे कांहीं लोक नोकरींत ठेविले. पुढें २ कलावंतिणी, २ पखवाजी, डफवाजंत्रीवाले, कांहीं धाडी गवई, व एक लळिताचा कारखाना, याप्रमाणें आणखी लोक त्यांनीं नोकरींत घेतले. त्यानंतर कै. श्री. गणपतराव महाराजांचे कारकीर्दींत सरोदवाले, सतारिये, सारंगीवाले, दशावतारी कर्नाटकी नाटककार, सारमंडळवाले, भांड, वगैरे लोक या कारखान्यांत ठेवण्यांत आले. त्यानंतर श्री. खंडेराव महाराजांचे अमदानींत गवयांपैकींचे बरेच लोक कमी करण्यांत आले, पण पुन्हां या खात्याचा विस्तार झाला. व त्यासाठीं बक्षिसाच्या रकमाहि मोठमोठ्या खर्च पडल्या. याप्रमाणें स्थिति होती तरी अद्याप पावेतों या खात्यास स्वतंत्र कारखान्याचें स्वरूप आलें नव्हतें. त्यानंतरच्या श्री. मल्हाररावांच्या कारकीर्दींत सर्वत्र अव्यवस्था व अंदाधुंदीच असे.

सांप्रतच्या कारकीर्दींत श्रीमंत सयाजीराव महाराज यांनीं हें खातें प्रथमतः निराळें करून व्यवस्थित केलें, व त्यावर देखरेख ठेवण्याकरितां एक दरोगा नेमला. त्यानंतर तंजावरी नृत्यांगनाचा एक नवीन ताफा नोकरींत ठेवला गेला. पूर्वीं या कारखान्याचे संबंधानें खानगी कचेरींत एक कारकून असून कारखान्यावर देखरेख खानगी कामदार यांची असे. पुढें राजवाडा फौजदार खात्याची स्थापना झाली, तेव्हां खानगी कामदार यांचे प्रत्यक्ष देखरेखीखालीं असलेले लहान लहान कारखाने एकत्र करून राजवाडा फौजदाराच्या ताब्यांत दिले. नंतर श्रीमंतांनीं सन १८९७–९८ सालीं येथील प्रसिद्ध गवई मौलाबक्ष यांचे चिरंजीव अल्लाउद्दीन यांस पाश्चात्य संगीतशास्त्राची माहिती करून घेण्यासाठीं विलायतेस पाठविलें, व तेथून ते परत आल्यावर

हें खातें राजवाडा फौजदार खात्यांतून काढून घेऊन त्यावर त्यांची नेमणूक करून त्यांस कलावंत सुपरिंटेंडंट असा हुद्दा दिला, तेव्हांपासून तीच व्यवस्था चालू आहे.

या कारखान्यांत आजपर्यंत जे गुणीजन प्रसिद्ध झाले त्यांपैकीं कांहीं खालीं दिले आहेत:—

१ मौलाबक्ष—गवई
२ फैझमहंमद—गवई
३ अल्लाउद्दीन मौलाबक्ष—गवई
४ इनायतखा—सतारिये
५ जमालउद्दीनखा—बीनकार
६ नासरखा—पखवाजी
७ गुलाबसिंग—तब्बलजी

चंद्राबाई गाणारीण
छगनजान—गाणारीण

हल्लीं कलावंत खात्यांत एकंदर गुणीजनांची संख्या ४८ आहे व तिची बिल्हेवारी खालील प्रमाणें आहे.

४ ख्याल गाणारे गवई.
२ गाणारणी—ख्याल, ठुंबऱ्या, गज्जल, कवाली वगैरे गाणाऱ्या.
२ हिंदुस्थानी नाचणारणी.
२ तंजावरी नाचणारणी.

या शिवाय हिंदी गायनमंडळ ( Indian Orchestra ) आहे त्यांत खालील गृहस्थ आहेत:—

१ सारंगीवाला
१ जलतरंगवाला
१ सुंदरीवाला
१ सनईवाला
१ दिलरुबावाला
१ सतारिया
१ फिडलवाला
१ हार्मोनियमवाला
१ तबलजी
इतर लोक.

हे हिंदी लोक कॉन्सर्ट म्हणजे एकच चीज सर्व वाद्यांवर एकत्र वाजविण्याचा प्रयोग करतात, तो फार सुंदर वठतो. या गायनमंडळाला बाहेरगांवाहूनहि मागणी येते. हल्लींचे मुख्य गवई फैयाझखा हे हिंदुस्थानांत प्रसिद्ध असून अखिल भारतीय गायनाच्या सामन्यांत परप्रांतांतूनहि त्यांना सुवर्णपदकें मिळालेलीं आहेत. त्याचप्रमाणें गाणारणींपैकीं लक्ष्मीबाई यांचीं ग्रॅमाफोनमध्यें अनेक रेकार्डस् घेतलेलीं आहेत. त्यांवरून त्यांच्या सुरेल व मधुर गायनाची कल्पना येईल.

ज्या वेळेस दरबार भरतो, त्या वेळेस प्रथम थोडा वेळ तंजावरी व हिंदुस्थानी नाच होतो, व मग हिंदुस्थानी गायनाच्या सुस्वर अशा दोन तीन चिजा होतात. अशा रीतीनें पानसुपारी चालू असतां मनोरंजनाचें हें साधन सुरू असतें.

याशिवाय येथील प्रसिद्ध व विस्तीर्ण अशा सार्वजनिक बागेंत दर मंगळवारीं युरोपिअन पद्धतीचा बॅंडचा ताफा जनमनरंजन करीत असतो. त्या वेळीं तेथें पुष्कळ गर्दी होते. या बॅंडवर अनेक युरोपिअन बॅंड मास्तर वेळोवेळीं होऊन गेले. त्यांच्यामुळें पाश्चात्य संगीतपद्यें, निरनिराळ्या देशांचीं राष्ट्रगीतें, वगैरे अत्रत्यांना ऐकावयास मिळतात.

याशिवाय श्रीमंतांची स्वारी येथें असली म्हणजे अनेक वेळां, पाश्चात्य व प्राच्य गायनकोविदांच्या कलेचा लाभ श्रीमंत नगरवासीयांना करून देतात, त्यामुळें प्राच्य व पाश्चात्य गायनांच्या पद्धतीचें तुलनात्मक ज्ञान होऊं शकतें. आरंभीं आरंभीं पाश्चात्य गायन आपल्या कानाला बेसुर व भेसुर असेंच वाटतें. त्यांतील तें मध्येंच किंचाळणें, मध्येंच बारीक आवाज काढणें व विशेषतः आपल्या रागपद्धतींत दरेक रागाला जे स्वर निषिद्ध म्हणून ठरविले आहेत ते त्या रागाच्या धुनेंत आणणें, यांमुळें आपल्याला तें संगीत अप्रिय वाटतें. पण संवयीनें त्यांत एकप्रकारची पद्धति कळूं लागते. विशेषतः विलायती स्वस्त हार्मोनियम पेट्यांनीं इकडील तंतुवाद्यांच्या सुस्वर माधुर्याचा जो बोजवारा उडविला आहे, तो पाहतां त्यापेक्षां पाश्चात्य ऑरगनचे मधुर व घुमणारे स्वर ऐकून अधिक आनंद होतो.

तसा येथील गायनाचा मोठा मोसम म्हणजे होळीचा सण होय. ‘उत्सवप्रियः मनुष्यः’ हें तत्त्व सर्वस्थळीं व सर्वकाळीं अबाधित आहे. त्यामुळें वर्षभर

एकसारखें काम करीत राहणाऱ्याला एखादी अशी संधि पाहिजे कीं, ज्या वेळीं त्याला विश्रांति मिळून करमणूक होईल. या इच्छेनें महाराजांनीं या सणांत गाण्याबजावण्याला पूर्ण मुभा ठेविली आहे. तथापि होळीचें पूर्वीचें बिभित्स स्वरूप हल्लीं अगदीं नाहींसें झालें आहे. स्वातंत्र्य म्हणजे ज्याप्रमाणें उच्छृंखळपणा नव्हे, त्याचप्रमाणें करमणूक म्हणजे अश्लीलता अथवा बीभत्सपणा नव्हे, व हल्लींच्या करमणुकीच्या प्रकारांत असभ्यपणाचा लेशहि नसतो व याचें प्रत्यक्ष प्रत्यंतर हें कीं, अशा प्रसंगांना येथील सभ्य गृहस्थांना सहकुटुंब आमंत्रण देण्यांत येतें, व त्याप्रमाणें ते आले असतां त्यांना केव्हांहि शरमेनें मान खालीं घालावी लागत नाहीं, अथवा पुरुषांना स्त्रिया असल्याबद्दल त्या वेळीं संकोच होत नाहीं. या प्रसंगीं सर्व हिंदुस्थानांतील प्रसिद्ध गुणिजन येथें येतात. गाणारे, तब्बलजी, सतारिये, बीनकार, सरोदवाले, भांड, तमाशेवाले ( मात्र हे लोक सभ्यपणाचें अतिक्रमण केव्हांहि करीत नाहींत ), नर्तक, फिडलवाले, जादूगार, नकलावाले, इत्यादि सर्व प्रकारचे लोक येतात. तथापि या सर्वांची प्रथम परीक्षा घेऊन त्यांतील खरे गुणी असतील, तेवढ्यांनाच श्री. महाराज व दरबारी लोक यांच्यापुढें करामत दाखविण्याची परवानगी देण्यांत येते. ही परीक्षा घेण्यासाठीं एक खास समिति नेमण्यांत येते व ती होळीपौर्णिमेपूर्वीं आठपंधरा दिवस या गुणीजनांची परीक्षा घेऊन लायक इसमांस परवानगी देते. अशांचा कार्यक्रम ८।१० दिवस रोज रात्रीं दोन तास ठेवण्यांत येतो. श्री. महाराजांना सुव्यवस्था व टापटीप यांची इतकी आवड आहे कीं असे समारंभ म्हणजे या दोन्ही गुणांचें आदर्श असतात. बैठकींत बसल्यावर मग तंबोरेवाल्यानें खुंट्या पिळाव्या, तारा तोडाव्या, पट्ट्या बसवाव्या, तब्बलजीनें तबला ठोकावा, गाणाऱ्यानें उगीच हांहूं करावें व अशाच रीतीनें पुढें रंग येण्यासाठीं प्रथम बेरंग करावा, हें श्रीमंतांना बिलकूल आवडत नाहीं. म्हणून अशा प्रसंगीं सुरवातीपूर्वीं तासभर या लोकांनीं राजवाड्यांत हजर होऊन हे पूर्वविधि करावे, व वेळ होऊन महाराजांची स्वारी येतांच, गाणाराचा आवाज, वाद्याचा सूर व तबल्याची साथ हा त्रिवेणी संगम एकदम दिसावा, अशी सक्त व्यवस्था ठेविली जाते. त्यामुळें आरंभापासून अखेरपर्यंत अशा वेळीं चित्त तल्लीन होऊन जातें.

या सणाशिवाय महाराजांनीं महाराष्ट्रीय संगीताला दिलेलें मोठें उत्तेजन

म्हणजे त्यांनीं गंधर्व नाटक मंडळीला दिलेला राजाश्रय होय. बालगंधर्व यांनीं आजपर्यंत आपल्या अपूर्व गुणांवर लक्षावधि रुपये पैदा केले. अनेक राजेरजवाड्यांनीं त्यांना द्रव्य देऊन त्यांची कदर केली, पण श्री. सयाजीराव महाराजांनीं त्यांना आपले म्हटल्यानें त्यांच्या 'खास आश्रयाखालील मंडळी ' हें म्हणण्यांत रा. नारायणरावांना जें भूषण वाटतें, त्याच्या शतांशानेंहि इतर कशाचें त्यांना वाटत नाहीं, हें त्यांनीं स्वतः प्रस्तुत लेखकाजवळ अनेक वेळां बोलून दाखविलें आहे. दरवर्षी गंधर्व मंडळी एक सवा महिना येथें येते, त्यावेळीं होणाऱ्या गायनानंदाचा लाभ मिळण्यासाठीं येथील नागरिक वाट पहात असतात.

या नाटकांच्या प्रसंगींची शिस्तहि फार वाखाणण्यासारखी आहे. फार अपरात्रीपर्यंत नाटकें होत राहिल्यानें विनाकारण जाग्रणें होऊन लोकांचें स्वास्थ्य बिघडतें. म्हणून हे प्रयोग बरोबर रात्रीं ८ वाजतां सुरू होऊन १२ ला बंद करण्यांत येतात. इतक्या अवधीच्या बेतानें जरूर ती छाटा-छाट प्रयोगांत करण्याची अगाऊ सूचना दिलेलीच असते. ८ चा ठोका पडतांच श्रीमंतांचें पाऊल नाटकगृहांत पडतें व ते आपल्या स्थानावर बसतांच पडदा वर जातो. नाटकगृहांत टांचणी पडली तरी ऐकूं जाईल अशी शांतता असल्यानें सर्वांस ऐकूं छान येतें. बरोबर १२ वाजतां प्रयोग संपतांच नटांच्या अभिनय व गान यांच्या नैपुण्याबद्दल यथायोग्य अभिप्रायाचे दोन शब्द मॅनेजर साहेबांजवळ बोलून महाराज नाटकगृहांतून निघतात. अशी सुव्यवस्था कोठेंहि दुसरीकडे पहाण्यांत येत नाहीं.

परंतु केवळ अशा नैमित्तिक प्रसंगांनीं दिल्या जाणाऱ्या उत्तेजनावरच संतुष्ट न राहतां श्रीमंतांनीं येथें गायनवादन शास्त्राचें पद्धतशीर शिक्षण देण्यासाठीं गायनशाळा काढिली आहे. तींत हिंदी गायनमंडळाचे गृहस्थ गायनवादनाच्या दरेक शाखेचें शास्त्रीय व प्रायोगिक शिक्षण देत असतात, व अशा प्रकारें तरुण पिढीच्या गायनाभिरुचीला योग्य अवसर देण्याचें साधन श्रीमंतांनीं करून ठेवलें आहे.

एवढ्यावरहि न थांबता गायनशास्त्राच्या मुळाला हात घालून त्याचें उज्जीवन करण्यासाठीं संगीतनिष्णात श्रीयुत भातखंडे यांच्याकडून श्रीमंतांनीं गायनशास्त्रावर पुस्तकें तयार करविलीं आहेत. श्री. भातखंडे यांनीं हिंदुस्था-

नाच्या सर्व भागांत हिंडून गायनशास्त्रावरील प्राचीन ग्रंथ मिळवून त्यांचें सम्यक् अध्ययन करून हे ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें खालीलप्रमाणें आहेत.

१. संस्कृत लक्षसंगीत. या ग्रंथांत प्रचलित हिंदुस्थानी संगीतांतील रागांची संपूर्ण माहिती देऊन त्याबद्दल चर्चा केली आहे.

२. संस्कृत अभिनवरागमंजिरी.

३. हिंदुस्थानी संगीत पद्धति भाग १–४ हीं पुस्तकें मराठींत असून यांत रागांचें उत्तम विवरण केलें आहे.

४. हिंदुस्थानी संगीत क्रमिक पुस्तकमाला भाग १ ते ४. या पुस्तकांत हिंदुस्थानांतील नामांकित गवैयांच्या उत्कृष्ट चिजा नोटेशनसह निरनिराळ्या रागांत व तालांत दिल्या आहेत. हीं पुस्तकें हिंदुस्थानांतील सर्व भागांतील संगीत पाठशालांतून क्रमिक पुस्तकें म्हणून चालू आहेत.

याशिवायहि इतर अनेक पुस्तकें रा. भातखंडे यांनीं लिहिलीं आहेत.

या शिवाय येथील संगीताचा अखिल भारतीय संगीताशीं संबंध जोडण्याच्या हेतूनें श्रीमंतांनीं सन १९१६ सालीं तारीख २० ते २५ मार्च पर्यंत अखिल भारतीय संगीत परिषद् भरविली होती. त्या प्रसंगीं उदेपूरचे झकरुद्दीन खान, अलवरचे मुश्रफखान, येथील मौलाबक्ष फेझमहंमद् व फैयाझ हुसेन, टोंकचे गुलाम हुसेनखान, जयपूरचे कल्लनखां व अल्लीहुसेनखां, इंदोरचे इमदादखां वगैरे अनेक गुणीजन उपस्थित होते. येथील दिवाण ना. व्ही. पी. माधवराव व इतर अनेक सद्गृहस्थहि हजर होते. सभेच्या अध्यक्षस्थानीं अकबरपूरचे ठाकूर नबाबअल्ली यांची योजना करण्यांत आली होती. स्वतः श्रीमंत महाराज, श्री. सौ. मा. महाराणीसाहेब व राजकुटुंबांतील इतर मंडळींच्या आगमनानें समारंभास मोठी शोभा आली होती. मुंबई इलाख्यांतील सिव्हिल सर्विसपैकींचे गायनप्रेमी मि. क्लेमंट्स यांनीं या परिषदेंत 'हिंदी गायनपद्धतींची सुरावर्त' या विषयावर एक निबंध वाचला होता, व असेच इतर अनेक महत्वाचे निबंध वाचण्यांत आले होते. एकंदरीनें परिषदेचें अधिवेशन मोठ्या उत्साहानें व आनंदानें पार पडलें.

वस्तुतः श्रीमंत महाराजांना पूर्ववयांत गायनवादनासारख्या विषयांची जी गोडी होती ती कालमानाप्रमाणें व वयोमानाप्रमाणें कमी झालेली आहे. व हल्लीं धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, तत्त्वज्ञान, असल्या गहन विषयांचा त्यांचा अभ्यास चालतो हें सृष्टिधर्मानुसार होणारें आहे. तथापि राजाचें कर्तव्य ' प्रजारंजनात् राजा ' या व्याख्येप्रमाणें प्रजारंजन हें असतें; व म्हणून तरुण व कलाप्रिय प्रजेसाठीं अशा विषयांची स्वतःची आवड कमी झाली तरी, त्याचीं साधनें अतंद्रित ठेवण्याची आवश्यकता त्यांना निरंतर भासते. इतकेंच नव्हे, तर सुसंस्कृत कलेचा आदर्श लोकांपुढें न मांडल्यास, त्याच्या अभावीं असंस्कृत बहुजनसमाज मूळच्या देहस्वभावावर जाईल व त्या योगें संस्कृतीची हानि होईल. ही आपत्ति न यावी एतदर्थ आपण स्वतः उत्तमोत्तम कलेचे नमुने लोकांपुढें ठेऊन त्यांकडे त्यांची प्रवृत्ति करावी, हें आपलें कर्तव्य आहे असें जाणून, ते या कलांच्या उन्नतिसाठीं एवढा व्याप सांभाळीत आहेत. ब्रह्मानंद ज्या योग्यांस मिळत असेल तो मिळो, पण विषयानंदाच्या वरच्या द-र्जाचा कलानंद व विद्यानंद तरी प्रयत्नसाध्य व द्रव्यसाध्य खास आहे. त्याप्रमाणें एकाची जबाबदारी लोकांवर व दोहोंची आपल्या स्वतःवर, असा श्रमविभाग श्रीमंतांनीं केला आहे. बृहदारण्यक उपनिषदांत आनंदाच्या वरच्या वरच्या कोटी सांगतांना म्हटलें आहे कीं, सर्व पृथ्वींतील उत्तम वस्तू व सर्व संपत्ति असलेल्या पुरुषाच्या आनंदाला मानुषानंद म्हणून त्या गुणकाच्या श्रेणीनें एकेक आनंद वर चढतां चढतां गंधर्वलोकानंद येतो. याच आनंदाचा सहभागी अर्थातच चित्रकलानंद व मूर्तिकलानंद आहे. तेव्हां अशा रीतीनें, वरच्या दर्जाच्या आनंदाच्या कोटीवर चढविणाऱ्या प्रेमळ व वत्सल राजाबद्दल प्रजेला प्रेम व आदर वाटला तर त्यांत नवल काय ?

---

# श्रीमंत महाराजसाहेबांचें दातृत्व.

( लेखकः—प्रोफेसर चिंतामण विनायक जोशी, एम्. ए. )

श्रीमंतांनीं इतर बाबतींप्रमाणें जुन्या चालत आलेल्या दानधर्मपद्धतीस योग्य नवें वळण लावून दिलें. ' धर्म ' या नांवानें मोडणाऱ्या पण अनाठायीं उपकार करविणाऱ्या आंधळ्या दातृत्वाचा आणि त्या दातृत्वांतून उगवणाऱ्या पोकळ आशिर्वचनांचा त्यांना अगदीं तारुण्यावस्थेपासूनच कंटाळा होता. लोकांच्या भोळ्या समजुतींवर व्यापार करणाऱ्या भिक्षुकांचा, आपला दांभिकपणा भगव्या पांढऱ्या कफन्यांखालीं किंवा लांब दाढीखालीं दडवून भटकणाऱ्या ' साधूं ' चा, लोकांना शिव्याशाप देऊन पैसे उकळणाऱ्या फकिरांचा त्यांस लौकरच वीट आला आणि राजवाड्यांतील स्त्रीजनाकडून नकळत होणाऱ्या लक्षावधि रुपयांच्या उधळपट्टीस आळा घालण्याचा यत्न त्यांनीं अधिकारसूत्रें हातीं येतांच केला.

प्रथम प्रथम महाराजांना या सर्व निरर्थक दानधर्मास डोळे मिटून मंजुरी द्यावी लागे. श्रावणमास दक्षिणा, गोप्रदानें, वरण्या, बहुचराजीचें अनुष्ठान, खिचडी कारखाना, ग्यारमी व भाकरी, दृष्ट काढणें, ओवाळण्या, मुंग्यांस साखर घालणें इत्यादि प्रकारचे निरर्थक खर्च होत असतां, " या खर्चाची अवश्यकता काय आहे ? " असा ते प्रश्न करूं लागले. त्यांची ही अश्रद्धायुक्त साशंक वृत्ति लक्षांत येतांच वाड्यांतील बाया मंडळी व आश्रित वर्ग मोठा गवगवा करीत. इंग्रजी शिकून या तरुण राजानें धर्म बुडविण्यास आरंभ केला आहे; ग्रहांचा कोप ओढवून घेऊन हे राजे आपल्या घराण्यावर अनिष्ट ओढवून घेतील, असे विचार प्रकट होऊं लागले. परंतु त्यांस भीक घालण्याइतके महाराज लेचेपेचे किंवा उलट सत्तेच्या जोरावर चालीरीती उधळून लावण्याइतके सुलतानी वृत्तीचेहि नव्हते. युक्तिवादानें समंजसांचीं मनें वळवून व हट्टाग्रह्यांना मात्र तसेंच सोडून सुधारणा घडवून आणण्याचा त्यांचा बाणा होता.

" आपण आपल्या धर्मवचनांस अनुसरून जीं दानें देतों, " एका राजाज्ञेंत ते म्हणतात, " तीं विचारपूर्वक दिलेलीं आणि ग्राहकांच्या पात्रतेला साजतील अशीं असावीं. दानधर्माला संस्थेचें स्वरूप आलें आहे त्याचें कारण इतकेंच कीं, अनेक आश्रित आपला निर्वाह

दानधर्मावर करण्यासच सवकावले. राजवाड्यांत ठाणें मांडून बसलेले संस्कार वं प्रायश्चित्तें हीं अज्ञान पोटभरूंनीं मासानुमास आपल्याला यथेच्छ चंगळ करण्यास सांपडावी म्हणून घुसडून दिलेलीं आहेत. ”

दुसऱ्या एका राजाज्ञेंत ते म्हणतात, “ दृष्टी काढण्याचा रिवाज बंद करावा. परंतु देवभोळ्या समजुतीमुळेंहि खास प्रसंगीं कोणास दृष्ट काढल्यानें सुख वाटत असल्यास तशी त्याच्या समजुतीस्तव काढण्यास हरकत नाहीं. मात्र होतकरू मुलांना देवभोळ्या समजुतीचा कित्ता होतां होईतों-पर्यंत देऊं नये. ”

सन १९२६ मध्यें पंगुगृहाची स्थापना करीत असतां दानधर्मपद्धती-विषयीं श्रीमंतांनीं जो बिनमोल उपदेश केला, त्यांत त्यांनीं आपल्या अंतः-करणाचा एक कोपरा उघडा करून दाखविला आहे; या भाषणांतील कांहीं विचार येथें उद्धृत केल्यावांचून रहावत नाहीं

“ समाजाच्या जीवनास आंदोलन देणाऱ्या महनीय व्यक्तींच्या शिवाय, व समाजाच्या भिन्न श्रेणींत आपापल्या चकारींतून वाट काढणाऱ्या सामान्य जनांशिवाय, दुसऱ्यावर पूर्णपणें अवलंबून रहाणारा एक पराधीन वर्ग आहे. जन्मजात शारीरिक किंवा मानसिक व्यंग, आजार, अपघातजन्य दौर्बल्य, वार्धक्य या कारणांनीं हे लोक स्वतःचें पोट श्रमांनीं भरण्यास अपात्र होतात. यांना रस्त्यांत मोकाट सोडल्यानें लोकांत रोग पसरतात व सार्वजनिक नीति-मत्ता कमी होते.

“ हिंदु धर्म हा वैयक्तिक आणि असामाजिक आहे असा कित्येकांचा भ्रम दिसतो. तथापि कर्मवादाबरोबरच दानाची श्रेष्ठता हिंदुधर्माच्या शास्त्रांनीं वर्णिली आहे... ”

हिंदु, बौद्ध व इस्लामी धर्मग्रंथांतील दानाच्या श्रेष्ठतेबद्दलचीं अनेक उदाहरणें दर्शवून श्रीमंत म्हणतात,

“ आपल्या सर्व प्रजाजनांच्या हिताची चिंता हें हिंदु राजाचें ध्येय मानिलें आहे. राजा हा मूर्तिमंत दानशौर्य असला पाहिजे. मध्यान्हीं सर्व प्रजेच्या जेवणानंतर भोजन करणें हें राजाचें कर्तव्य समजलें जाई. बडोदें हें धर्मराज्य आहे असें पूर्वीं म्हणत असत. आतां या धर्म शब्दाचा अर्थ करण्यावर ‘आतां

तें धर्मराज्य आहे कीं नाहीं '? या प्रश्नाचें उत्तर अवलंबून राहील. धर्माचा जुना अर्थ आतां उपयोगी पडणार नाहीं. दान करणें म्हणजे काय ? या विषयाचें चिंतन मीं पुष्कळ केलें आहे व स्वाभिमान आणि स्वावलंबन हीं प्रजेंत कायम राहून दान करण्याच्या रीती शोधून काढण्याचा यत्न केला आहे. दान देण्याच्या इच्छेस खोल बुद्धि आणि दीर्घ चिंतन यांचा पाठिंबा असला पाहिजे. बडोदें हें खरोखरीचें धर्मराज्य व्हावें म्हणून आटोकाट तर्कशक्ति आणि सत्ता यांचा उपयोग मीं केला. दातृत्वाची इच्छा दृढ व्हावी हें इष्ट आहे. तथापि धर्मानें नेमून दिलेलीं दानें अनिश्चित व वैयक्तिक असतात. धार्मिक दानांनीं चिरकालीन स्वरूपाचीं सत्कृत्यें क्वचितच झालेलीं आहेत. आर्थिक आपत्ति व दैन्य हीं धार्मिक दानांनीं एकादवेळ दूर झालेलीं आहेत, परंतु दानग्राहकाचें आरोग्य व स्वावलंबन हीं त्यास कायमचीं परत मिळावीं असें झालें नाहीं.

" संघटित व असंघटित दानांत मर्यादारेषा आंखून दिली पाहिजे. एके काळीं बडोद्यांत विवेक न वापरतां दानें दिलीं जात असत. त्यांचा दुरुपयोग फार होत असे. राज्याबाहेरचे लोक येऊन राज्यावर कुरघोडी करीत. आमची सहानुभूति कितीहि विशाळ असली तरी आमचें उत्पन्न बेताचेंच आहे... शिवाय आमच्या दानशील वृत्तीचा लाभ घेणारांत नैतिक अवनति होत असलेली आमच्या नजरेस आली. "

यानंतर ग्यारमी कारखाना व केदारेश्वरची खिचडी हीं बंद केल्याचा उल्लेख करून ते सांगतात...

" काळी परज जातींच्या मुलांमुलींच्या शिक्षणाकरितां छात्रालय काढून त्यांत त्यांच्या खाण्यापिण्याची व कपड्यालत्त्याची तरतूद केली. प्रत्येक प्रांतांत अंत्यजोद्धारासाठीं रकमा दिल्या. गरिबांच्या आजारीपणांतल्या व बाळंतपणांतल्या शुश्रुषेकरितां दवाखाने घातले, शाळा घातल्या आणि अशा प्रकारें जनतेची शारीरिक व नैतिक सुधारणा जेणेकरून होईल असे उपक्रम केले. दानाची ही आधुनिक रीत गरिबांच्या विशेष उपयोगी पडेल अशी आमची खात्री आहे. "

वर उल्लेखिलेले खिचडी व ग्यारमीचे कारखाने अनुक्रमें ब्राह्मण व मुसल-

मान यांस शिधा देण्याचे रमणे असत. खिचडी फक्त दक्षिणी ब्राह्मणांस मिळत असे आणि ती मागणाराला पात्रापात्रतेच्या विचाराशिवाय मिळे. १८९२ सालीं हे कारखाने पद्धतशीर करण्याची योजना श्री. महाराजांचे मनांत घोळूं लागली. खिचडीप्रमाणें मराठे लोकांकरितां भाकरीचा कारखाना होता. या अन्नदानासंबंधीं रा. य. वा. आठल्ये, नायब दिवाण, यांचा अभिप्राय श्रीमंतांनीं विचारिला होता. रा. आठल्यांनीं आपला अभिप्राय देतांना म्हटलें—

" खिचडीचा पूर्वीचा इतिहास पहातां ती संस्था परदेशीय गरीब लोकांकरितांच उत्पन्न केली असें दिसतें......दक्षिणेंतन लोकांना इकडे येऊन रहाण्यास उत्तेजन देणें जरूर होतें...आतां उत्तेजन देण्याचें प्रयोजन नाहीं हें खरें आहे. तथापि ज्या अर्थीं आजपर्यंत कित्येक लोक खिचडीचे आधारावर येऊन राहिले आहेत त्या अर्थीं त्यांचा आधार एकदम काढून टाकणें बरोबर होणार नाहीं. अशा लोकांपैकीं ज्यांना खिचडीशिवाय चरितार्थाचें साधन मिळूं शकण्यासारखें आहे अशा इसमांची खिचडी आजपासूनच बंद झाली पाहिजे. "

दुसरे नायब दिवाण यांनीं अभिप्राय दिला, त्यांत खिचडी हें दक्षिणेंतील लोकांस बडोद्यांत वस्ती करण्याचें आमिष आहे, अशी उपपत्ति नव्हती; परंतु पंगु लोकांशिवाय इतरांचें अन्नदान बंद करण्यास त्यांनीं अनुकूल मत दर्शविलें होतें. अभिप्रायांचा विचार होऊन रमण्यांतील अन्नदान बंद होऊन परवानाचिठ्यांनीं अन्नदानास प्रारंभ झाला. परवाने देण्याचा अधिकार एका कमिटीकडे सोपविण्यांत आला. पंगु लोकांशिवाय अग्निहोत्री, कांहीं देवस्थानें, शाळेंतील मुलगे व मुली यांस परवाने मिळाले. १८९२ सालीं रु. ८६,७६० खिचडीसाठीं मंजूर झाले होते. खिचडी घेणारे लोक सुमारें ४ हजार होते. सरकारी नोकर व असामदार यांच्या कुटुंबांतील माणसें खिचडी घेऊन जात असत. गांवांत टोळभैरवांचा मोठा भरणा खिचडीपायीं झाला होता.

ता. ४ मे १८९३ चे आज्ञापत्रिकेंत जाहीरनामा प्रसिद्ध झाला कीं, यापुढें पुढें वर्णिलेल्या लोकांसच खिचडीभाकरी दिली जाईल. ( १ ) पंगु इसम; ( २ ) ज्या रोग्यांच्या पोषणाची सोय सरकारनें इतरत्र केली नाहीं ते, जसें-रक्तपितीचे रोगी; ( ३ ) निराश्रित विधवा; ( ४ ) निराश्रित मुलें, ( ५ ) संकटग्रस्त लोक जसे आगींत, चोरींत, किंवा सांथींत सर्वस्व नष्ट झालेले.

जाहीरनामा प्रसिद्ध होतांच मोठी खळबळ उडाली. बडोद्यास व महाराष्ट्रांत निषेधपर सभा झाल्या. महाराज व दिवाण यांजकडे अर्जांचीं भेंडोळीं येऊन पडलीं; आणि गायकवाडी अन्नावर पिढ्यान् पिढ्या पोसलेल्या लोकांनीं रेसिडेंटाकडे धांव घेतली. प्रथम प्रथम निषेधदर्शनार्थ लोकांनीं परवाने घेण्याचें नाकारलें, पण हळूंहळूं बायकांनीं परवाने घेण्यास प्रारंभ केला. तेव्हां "पुरुषांचें बंड" हि झालें. पण महाराजांचा निश्चय दृढ होता. त्यांनीं माघार घेतली नाहीं व परवान्यांनींच खिचडी भाकरी मिळणें सुरूं झालें. नंतर हा अन्नदानाचा खर्च दिवसेंदिवस कमी होत चालला. सन १८९३ त रु. ८६,७६० खर्च होता व तो दरबारांतून पडत असे. सन १९११ सालीं हा खर्च खानगीकडे वर्ग करण्यांत आला व फक्त रु. १४,१५६ वर उतरला.

तसेंच श्रीमंतांचे हातून दररोज १६ रुपये गोप्रदानाबद्दल खर्च होत, तेहि १९०४ सालापासून सर्व जातींच्या अनाथ व पंगु लोकांस वांटण्यांत येऊं लागले.

सारांश, दानधर्माची जुनी पद्धत बदलून टाकून श्रीमंतांनीं बहुजनसमाजास उपयोगी पडेल असें वळण दानाच्या ओघास लाविलें. पूर्वीचें दान परलोकीं सद्गति मिळावी या स्वार्थी हेतूनें प्रेरित झालेलें असून त्यांत परोपकाराच्या भावनेपेक्षां स्वहितप्रेम अधिक दिसत असे, हल्लींचें दान परोपकाराच्या भावनेनें प्रेरित झालेलें असतें. आतां कोणत्या प्रकारचें दान महाराजांनीं बंद केलें याचें दिग्दर्शन केल्यावर कोणत्या प्रकारचें सुरूं केलें त्याचें थोडें अवलोकन करूं या.

सन १८९९-१९०० मध्यें भयंकर दुष्काळ गुर्जर देशावर पडला. कित्येक ठिकाणीं पावसाचा थेंबहि पडला नाहीं. त्या वेळीं बडोदें सरकार या नात्यानें गुर्जराधिपांनीं जी मदत केली तिचा उल्लेख करण्याचें हें स्थळ नाहीं; श्री. सयाजीराव महाराज या गृहस्थांनीं त्या समयीं दुष्काळपीडितांस काय साह्य केलें तें आपल्याला पहावयाचें आहे. दुष्काळग्रस्त प्रदेश पहाण्यास श्रीमंतांच्या स्वारीनें दौरा काढिला व तो काढिण्यापूर्वी प्रांतसुभ्यांस सूचना देण्यांत आल्या कीं:—

"श्रीमंतांची स्वारी अमरेळी प्रांतांत दुष्काळ पडल्यानें रयतेची स्थिति पहाण्यास येणार,...कोणत्याहि ठिकाणीं मानपान व समारंभ करण्याकरितां रयतेपैकीं कोणीहि विनाकारण खर्च करूं नये."

तसेंच "अमरेळी प्रान्तांत जे सत्के (ओवाळण्या), नजराणे, अगर पोशाखाबद्दल रोकड रकमा आल्या असतील त्यांचा उपयोग दुष्काळपीडित अपंग व अनाथ मुलें यांजकडेस व्हावा म्हणून श्री. सरकार यांनीं आज्ञा केली आहे."

अमरेली प्रांतांत मिळालेले नजराणे श्रीमंतांनीं वेळचेवेळीं गरिबांस वांटून टाकले. दामनगर व खांबा येथें लोकांस धान्य व रोकड रकमा, तसेंच डुपाणिया व खांबा येथें मुलांस मिठाई वांटण्यांत आली. अमरेळीस एका निराश्रित वृद्धेच्या घरीं एक वर्षाची बेगमी करून दिली. महाराजांची स्वारी पट्टणला असतां कै. मा. जमनाबाई साहेबांचें श्राद्ध झालें. त्यावेळीं सातशें रुपयांचा धर्म त्यांनीं, "बायका व मुलें यांस अनुक्रमें छिदड्या व खादी अगर मांजरपाटाच्या बंड्या" करून देवविण्याकडे केला. खानगी च्यारिटी फंडांतले एक लक्ष रुपये कडी व बडोदें प्रांतांत खर्च झाले व त्यांतला सिंहाचा वांटा (९० हजार) बडोदें प्रांतीं अन्नगृहाचे कामीं खर्ची पडला.

या रुक्ष आंकड्यांपेक्षां श्रीमंतांची हार्दिक कळकळ त्यांनीं दसऱ्याचा सण व स्वतःचा वाढदिवस ज्या तऱ्हेनें पाळला तींत दिसून येते. दसऱ्याच्या स्वारीवर चढण्याच्या आधीं त्यांनीं गोरगरिबांस रोकड रकमा व कपडे यांची खैरात केली आणि प्रजेचा दसरा साजरा झाल्यावर हत्तीवर चढले. या दुष्काळांत श्रीमंतांनीं २,३५,२५० रुपये हातखर्चांतून दान केले.

श्रीमंतांनीं दिलेल्या देणग्यांपैकीं कित्येकांचीं नांवें खालील कोष्टकांत दिलीं आहेत, त्यांवरून त्यांची सहानुभूति किती विशाल आहे आणि धर्म, जात, भिन्नरुचि यांकडे न पाहतां सर्वप्रकारच्या सत्प्रवृत्तींस सढळ हातानें ते कशी मदत करितात तें दिसून येईल.

| सन. | मदत घेणाराचें नांव. | हेतु. | रकम रुपये. |
|---|---|---|---|
| १८७५ | सर रिचर्ड मीड | ब्रिटिश व देशी फौजांस करमणुकीसाठीं | २,००० |
| | ,, | अमदाबाद, जलप्रलय संकटनिवारणार्थ | ३,००० |
| | सेक्रेटरी | अजबखाना, पुणें | ३०० |
| १८७६ | ,, | ,, ,, | ३०० |
| १८७७ | सेक्रेटरी | पशुक्लेशनिवारक मंडळी | २०० |
| १८७८ | सेक्रेटरी | ललितकला प्रदर्शन, पुणें | २०० |
| १८७९ | प्रो. मोनियर विलियम्स | आक्सफर्ड येथें इंडियन इन्स्टिटयूट बांधणें | २,५०० |
| | सेक्रेटरी | ललितकला प्रदर्शन, मद्रास | २०० |
| १८८० | ,, | ललितकला प्रदर्शन, पुणें | २०० |
| | रे. भि. फॉक्स | पुणें लष्करांत मेथॉडिस्ट एपिस्कोपल प्रार्थनामंदिर बांधणें | ९५० |
| | मि. मेलविल् | काबूल वेढ्यांत मयत झालेल्या शिपायांच्या वारसांस देण्याकरितां | १०,००० |
| | सेक्रेटरी | पुणें विश्रामबाग वाड्याचा जीर्णोद्धार | १,५०० |
| १८८१ | सेक्रेटरी | मद्रास व पुणें येथील ललितकला प्रदर्शनें | ४०० |
| १८८२ | सेक्रेटरी | गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटीस महाराजांच्या नांवचें बक्षीस ठेवण्यासाठीं | ५,००० |
| १८८३ | सेक्रेटरी | मद्रास व पुणें येथें ललितकला प्रदर्शनें | ७०० |
| | लेडी सुपीरियरेस् | माजगांव कान्व्हेंट व सेंट एलिझाबेथ विधवाश्रमास मदत | ५०० |
| १८८४ | एजंट ग. ज. बडोदें | बडोद्यास रोमन क्या. प्रार्थनामंदिर बांधणें | १,००० |
| | ,, | मुंबई आंतरराष्ट्रीय प्रदर्शनास मदत | २५,००० |
| १८८५ | ,, | नडीयाद कृषिप्रदर्शन | १,००० |
| | चेअरमन वांद्रा म्युनि. | वांद्रें येथें धर्मार्थ दवाखाना | १,००० |
| | रावब. शंकर पांडुरंग पंडित | पुणें फीमेल हायस्कूलांतील मुलींस छात्रवृत्त्या देण्यासाठीं | ६,००० |
| | ए. ग. जनरल, बडोदें | स्त्रियांच्या आरोग्यासाठीं उभारलेल्या काउंटेस ऑफ डफरीन फंडास | १०,००० |
| १८८५ | गंगाराम भाऊ म्हस्के, पुणें | मराठे, कुणबी, माळी वगैरे लोकांत शिक्षणाचा प्रसार करणें | २,४०० (१९२४ पर्यंत) |
| | सेक्रेटरी | अंजुमान इस्लाम, अमदाबाद | १,००० |
| | आ. गोपाळ चार्लू | बेंगळूर अनाथाश्रम | ३०० |
| | मिसेस शेवंतीबाई, मुंबई | खालच्या कुलाब्यांत शाळा घालण्यास | ४,००० |
| | सेक्रेटरी | दलपतराम डायाभाई स्मारक फंड | १,००० |

| सन. | मदत घेणाराचें नांव. | हेतु. | रकम रुपये. |
|---|---|---|---|
| | सेक्रेटरी | कलकत्ता लिटररी सोसायटी | १,५०० |
| १८८७ | डॉ. जी. डब्ल्यू लैतियर | इंग्लंडांतील ओरिएंटल इंस्टिट्यूटला मदत | ६,००० |
| | ए. ग ज. बडोदें | इम्पीरियल इंस्टिट्यूट लंडन | ५०,००० |
| १८८८ | सेक्रेटरी | काजीसाहेब स्मा. फं. | १,००० |
| | अध्यक्ष | स. ज. मूर स्मारक | ५०० |
| | सेक्रेटरी | क्षात्रधर्म प्रतिपादक सभा, मुंबई | २०० |
| | सेक्रेटरी | ललितकला प्रदर्शन, पुणें | ३०० |
| | अध्यक्ष | वैतरणा संकटनिवारण फंड | १,२०० |
| १८८९ | ए. ग. ज. बडोदें | मुंबई येथें थेराप्यूटिक्सच्या अध्यापकाचा ३ वर्षांचा पगार | ६,००० |
| | ए. ग. सुरत | अग्निसंकटनिवारणार्थ | ५,००० |
| | प्रिन्सिपाल, फर्ग्युसन कॉलेज, पुणें | इमारतीसाठीं | ६,००० |
| | सेक्रेटरी डेक्कन एज्यु. सोसायटी, पुणें | आश्रयदातृत्वाची देणगी | ६,००० |
| | डॉ. रा. गो. भांडारकर | शाळेस मदत | १५० |
| १८९० | भाऊबुवा नागपूरकर, बडोदें | रघुपतिबुवाच्या देवळाचा जीर्णोद्धार | ३०० |
| | रा. रामकृष्णबुवा | गायनसमाज, पुणें | १०० |
| | बाबू प्रसन्नसेन | केशव उद्योग शाळा, कलकत्ता | ३०० |
| | नागेश वि. बापट | मोफत शाळेस मदत | १०० |
| | नवरोजी वाडिया | लॉर्ड रे स्मारक फंड | १,००० |
| | सेक्रेटरी | ललितकला प्रदर्शन, पुणें | १,३६० (१८९६ पर्यंत) |
| १८९६ | शेट शिवजी नथू, मुंबई | घेलाभाई हरिदास एंटरटेनमेंट फंड | ३०० |
| १८९७ | ए. ग. ज. बडोदें. | दुष्काळ निवारण फंडास | ८,००० |
| | मि. पार्सन्स, कलकत्ता | महाराणी व्हिक्टोरिया हीरक उत्सव फंड | २,००० |
| १८९९ | अकाउंटंट जनरल, बडोदें | एलियट स्मारक फंड | ५,००० |
| | ,, | महाराणी जमनाबाई स्मा. फं. | ५,००० |
| १९०० | लेडी जहांगीर | दुष्काळ निवारणार्थ | १,६०० |
| | कुमार रणजितसिंहजी | भेट | ७,००० |
| | रा. ऐयर | रात्रीच्या व्यापारशाळेस | १,१०० |
| १९०१ | रेसिडेंट, बडोदें | म. व्हिक्टोरिया स्मा. फं. | १,००,००० |
| | सेंट्रल हिंदु कॉलेज बनारस | धर्मशिक्षणाकरितां | १,००० |
| | ग्रांट मेडिकल कॉ., मुंबई | विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाकरितां | १,००० |

| सन. | मदत घेणाराचें नांव. | हेतु. | रकम रुपये. |
|---|---|---|---|
| | प्रिन्सिपाल, इंडियन कॉलेज अलीगढ | कॉलेजास जोडून इस्पितळ बांधण्यासाठीं | १,००० |
| | रा. दा. सां. यंदे | ग्रंथप्रसारक मंडळीस मदत | १,२०० |
| १९०२ | प्रिन्सिपाल, ग्रांट मेडिकल कॉलेज, मुंबई | कान व घशाच्या आजारासंबंधीं पुरवणी व्याख्यानें देण्याकरितां | ५,००० |
| | साबाजीराव शिंदे, धारवाड | मराठा विद्यार्थ्यांस मदत | ५०० |
| | जस्टिस बॉडम्, मद्रास | प्राण्यांस होणारें क्रौर्य–निवारक मंडळीच्या प्राणी शुश्रूषागृहास | ५०० |
| | मद्रास येथील संस्था | ( १ ) अंजुमान इस्लाम, ( २ ) मोफत वाचनालय ( ३ ) हिंदु आश्रम, ( ४ ) गरीबांची शाळा, ( ५ ) अंधशाळा, ( ६ ) स्त्रियांची शाळा यांस | ९७५ |
| | जनरल सेक्रेटरी | औद्योगिक प्रदर्शन, अमदाबाद | २,००० |
| १९०३ | लाला श्रीकृष्ण सेक्रेटरी | दिल्ली हिंदु कॉलेजचा बक्षीस समारंभ | २,००० |
| १९०४ | अध्यक्ष | अलेक्झांड्रा नेटिव गर्ल्स इंस्टिट्यूट | २०० |
| | प्रो. धों. के. कर्वे | अनाथ बालिकाश्रम, हिंगणें | ७०० |
| | सर भालचंद्र | पंचांग संशोधन मंडळास | १,००० |
| | सर वि. दा. ठाकरसी | शेतकी प्रदर्शनासाठीं | ५,००० |
| १८९० | सेक्रेटरी | इंडियन न्याशनल असोसिएशन, गुजरात शाखा | ५०० |
| | रा. का. त्र्यं. तेलंग | स्टूडण्ट्स लिटररी आणि साएंटिफिक सोसायटी, मुंबई | ५०० |
| | भा. नगरकर, मुंबई | शिवाजी हायस्कुलास मदत | १०० |
| | सेक्रेटरी | पाटण व व्यारा येथील लायब्रऱ्या | ६५० |
| १८९१ | ए. ग. ज. बडोदें | साद्रा येथें कॉलेज व इस्पितळ यांस | २,००० |
| | सेक्रेटरी | आरोग्यविज्ञान व ज्ञातिशास्त्राच्या आंतरराष्ट्रीय परिषदेस | १,५०० |
| १८९२ | म्युनिसिपल कमिशनर, मुंबई | महारोगी आश्रमास मदत | १०,००० |
| | साठे व भट | महाराष्ट्र वक्तृत्वोत्तेजक मंडळ | ५०० |
| | सेक्रेटरी | सेंट जोसेफ अनाथाश्रम | ८०० ( पूर्वीपासून ) |
| | सेक्रेटरी | मूक विद्यालय, मुंबई | ३०० ( पूर्वीपासून ) |
| | श्री. कृष्णाबाई हरदासी | सज्जनगडास सभामंडप बांधण्यासाठीं | १०० |
| | सेक्रेटरी | राखी समिति, कलकत्ता | २,००० |

| सन. | मदत घेणाराचें नांव. | हेतु. | रकम रुपये. |
|---|---|---|---|
| | सेक्रेटरी | व्हिक्टोरिया स्मारक | ६,९२१ |
| १८९३ | दादाभाई नवरोजी | यांस भेटीदाखल | १५,००० |
| | सेक्रेटरी | ग्रांट मेडिकल कॉलेज | १,००० |
| | सेक्रेटरी | भंडाला व पुणें येथें वैद्यकीय मदत | १,१०० |
| १८९४ | सेक्रेटरी, पुणें नेटिव इन्स्टिटयूशन | इमारतीसाठीं | १,००० |
| १८९५ | ना. फाजलभाई विश्राम | लॉर्ड हॅरिस स्मारक | १,००० |
| | ना. दादाभाई नौरोजी | भेट | १५,००० |
| | सेक्रेटरी | कडप्पा लिटररी असोसिएशन | १,००० |
| | आबाजी वि. काथवटे | डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटी, पुणें | ५,००० |
| १९०४ | सेक्रेटरी | देवसमाज, लाहोर | २५० |
| | अलाहाबाद हिंदु बोर्डर असोसिएशन | इमारत व लायब्ररी बांधण्याकरितां | ४,००० |
| | गो. कृ. गोखले | रानडे स्मारक फंड | १,००० |
| | पं. म. मो. मालवीय | अनाथाश्रमास | ३०० |
| | मिस सोराबजी | पुणें फीमेल हायस्कुलास | १,००० |
| | सेक्रेटरी | उटकमंड इस्पितळ | ५०० |
| | मेयो कॉलेज, अजमीर | फंडास | १०,००० |
| | रा. लालभाई दलपत | जैन कान्फरन्स, अमदाबाद | १,००० |
| | ना. के. अलोनी | मराठी पुस्तकछपाई (लग्नविधि व सोहळे) | १,००० |
| १९०५ | लिंबडीचे कारभारी | मुलांस बक्षिसें | १,५०० |
| | सेक्रेटरी | आल्बर्ट हॉस्पि. कलकत्ता | ५,००० |
| | रेसिडेंट, बडोदें | उत्तर हिंदुस्थानांत धरणीकंपानें नुकसान पावलेल्यांस मदत | ५,००० |
| | सेक्रेटरी | टाटा स्मारक फंड | २,००० |
| | ,, | रॉयल म्यूजियम, मुंबई | ५,००० |
| १९०७ | ना. न्या. चंदावरकर | राष्ट्रीय सामाजिक परिषद | २०० |
| | सर दीनशा पेटिट | सर फिरोजशा मेहता यांचा पुतळा उभारण्यास | १,००० |
| | मे. अब्बास तयबजी | अंजुमाने इस्लामच्या इमारतीसाठीं | २०,००० |
| १९०९ | श्री सयाजी बोर्डिंग पेटलाद | मदत | ५०० |
| | न्या. चंदावरकर | हिंदु स्त्रियांच्या शिक्षणासाठीं | १,००,००० |
| | प्रिन्सिपाल | (१) अजमीर व (२) डॅली कॉलेज, इंदूर यांस मिळून | ७,००० |
| १९१० | सेक्रेटरी | एडवर्ड बादशाह स्मारक | १५,००० |

| सन. | मदत घेणाराचें नांव. | हेतु. | रकम रुपये. |
|---|---|---|---|
| | सेक्रेटरी | मिंटो स्मारक फंड | ४,५०० |
| | ,, | डेरागाजीखान संकट निवारण | ५०० |
| १९१२ | एस्. सी. सेन | भेटी दाखल | ५०० |
| | मि. स्पीलन् | टिटानिक बोटीवरून बुडालेल्या उतारूंच्या कुटुंबांस मदत | ७,५०० |
| | सयद महमद, मद्रास | तुर्कस्थानांतील संकटग्रस्तांस मदत | १,००० |
| | व्ही. पी. माधवराव | बेंगळूर धर्म परिषदेस | ५०० |
| १९१३ | सर भालचंद्र कृष्ण | कार्ले आरोग्यभुवनास मदत | १२,००० |
| | सेक्रेटरी | दिल्लीच्या लेडी हार्डिन्ज स्त्री वैद्य विद्यालयास मदत | १,००,००० |
| | सर जमशेटजी जि., मुंबई | दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांस मदत | ५,५०० |
| | बडोदें जुमामशीद | जीर्णोद्धार | ४,००० |
| १९१५ | मुलींचें कॉलेज, दिल्ली | संस्थेस मदत | २५,००० |
| १९१६ | स्त्रियांकरितां लेडी हार्डिंज इस्पितळ, दिल्ली | | ६२,००० |
| | स्टेट जनरल इस्पितळ, बडोदें | क्ष–किरणाची सामग्री | ३,००० |
| | डॉ. मेयर | सेंट जॉन्स ॲम्ब्युलन्स फंड, मेसापोटेमिया | १,२०० |
| | पंढरपूर अनाथबालकाश्रम | मदत | २५० |
| | पं. म. मो. मालवीय | बनारस हिंदु विद्यापीठास मदत | १,००,००० |
| | कन्यामहाविद्यालय, जलंदर | मदत | १०० |
| | मांगरोळ धर्मशाळा | बांधण्यास | १२,१८६ |
| | सेक्रेटरी | भांडारकर प्राच्य विद्यासंशोधन मंदीर, पुणें | १,००० |
| | मिसेस ब्रूमफील्ड | अमदाबाद येथील महिला परिषदेस | १,००० |
| | | वेगळालीं महायुद्धदानें मिळून | १०,३०० |
| १९१७ | सर दिनशा वाच्छा | दादाभाई स्मारक फंड | ५,००० |
| | बॉम्बे आर्ट सोसायटी | प्रदर्शनास | १०० |
| | | वेगळालीं महायुद्धदानें | २,६७४ |
| | इंडियन क्लब, म्हैसूर | देणगी | ५,००० |
| १९१८ | रा. भातखंडे, मुंबई | अखिल भारतीय संगीत परिषद | १,००० |
| | त्र्यंबकेश्वर संस्कृत पाठशाळा | देणगी | ३०० |
| | नासिक उदोजी बोर्डिंग | विद्यार्थ्यांस मेजवानी | ३०० |
| | नासिक लायब्ररी | मदत | २०० |
| | | सर जॉर्ज बर्डवुड स्मारक | १,३२९ |
| | सर दिनशा वाच्छा | विलिंग्डन स्मारक फंड | २,००० |
| | | महायुद्धाप्रीत्यर्थ देणग्या | ३०० |

| सन. | मदत घेणाराचें नांव. | हेतु. | रकम रुपये. |
|---|---|---|---|
| १९१९ | कर्नल वुड | काठेवाड दुष्काळ संकटनिवारण फंडास | ३,००० |
| | प्रिन्सिपाल | एलफिन्स्टन कॉलेजास देणगी | ३,००० |
| | सेक्रेटरी | पास्चूर चिकित्सालय, कसोली | ५,००० ( एकंदर ) |
| | ,, | शारीरिक खेळांचे व कुस्त्यांचे अखिल भारतीय सामने, पुणें | ३०० |
| १९२० | ,, | पहिली ओरिएंटल कान्फरन्स | १,००० |
| | रोसिडेंट बडोदें | शिशुसंगोपन संघाच्या स्थापनेसाठीं | ५०,००० |
| १९२१ | उदोजी बोर्डिंग, नासिक | इमारतीसाठीं | १२,००० |
| | नेक ना. मुंबई गव्हर्नर | पुणें शनवारवाड्याच्या जीर्णोद्धाराकरितां | ५,००० |
| | प्रो. त्रिवेदी, बडोदें | मसाणी स्मारक फंड | १,१०० |
| | बडोदें हॉस्पिटल | रोग्यांस मेजवानी | १८२ |
| | प्रो. ना. गु. वेलिणकर | हैदराबाद ब्राह्मसमाजास | २,००० |
| | ,, | मुलांस बक्षिसें खाऊ वगैरे वांटण्यासाठीं जागोजाग | २०६ |
| | जनरल स्टोअर्स जरुसलेम | जरुसलेम म्यूझियमकरितां | ३७९ |
| १९२२ | गोशाळा, बेट | गोरक्षण | ६४५ |
| | भांडारकर प्रा. वि. सं. मंदिर, पुणें | महाभारताच्या प्रकाशनाकरितां एकंदर | ५,५०० |
| | माधवराव जाधव, परिंचें | ग्राम पुस्तकमंदिरास | २०० |
| | ना. सर भूपेंद्रनाथ | राजा राममोहन रॉय स्मारक हॉलसाठीं | ५,००० |
| | सेक्रेटरी | कलकत्ता ओरिएंटल परिषद् | १,००० |
| | रोसिडेंट बडोदें | लेडी रीडिंग वुइमेन ऑफ इंडिया फंड | २५,००० |
| | मि. कॅडेल | मराठा युद्धस्मारक | ५,००० |
| | विद्याधिकारी, बडोदें | शाळांत छात्रवृत्त्यांकरितां | १,००,००० |
| | कर्नल वुड | राजकोट इस्पितळास | ३,००० |
| | सर एफ्. ई. वाच्छा | श्री शिवाजी महाराजांच्या पुतळ्याकरितां | ३०,००० |
| १९२३ | देवासचे महाराज (थो. पा.) | शाहू स्मारक फंडास | ६,००० |
| | नेक ना. व्हाइसराय | जपान संकटनिवारण फंड | ५,००० |
| | डॉ. बम्पस, अमेरिका | हार्वर्ड विद्यापीठांतील वैद्यक विद्यार्थ्यांसाठीं कै. राजपुत्र श्री. जयसिंह यांचे नांवें | ७,५०० |
| | कमिशनर, तेहरीगढवाल | बदरीनाथ-केदारनाथ रस्त्यावर सदावर्ते घालण्यासाठीं | २,००० |
| १९२४ | बनारस हिंदु विद्यापीठ | विद्यार्थ्यांस करमणुकीसाठीं | १,००० |
| | ना. लल्लुभाई, मुंबई | सोशल वर्कर्स परिषद् | ५०० |

| सन. | मदत घेणाराचें नांव. | हेतु. | रकम रुपये. |
|---|---|---|---|
| १९२४ | के. टी. पाल, कलकत्ता | हिंदी पहेलवान युरोपांत पाठविण्याच्या फंडास | १,००० |
| | सेक्रेटरी | मद्रास ओरिएंटल परिषद | ५०० |
| | अध्यक्ष | कोचीन जलसंकटनिवारण फंड | ३०० |
| | रा. साबावाला | दक्षिण हिंदुस्थान जलनिवारण फंड | ३,००० |
| | सेक्रेटरी, लखनौ | अ. भा. संगीत परिषद | ५०० |
| | हिं. चे सेनापति | सर प्रतापसिंग स्मा. फंड | ५,००० |
| १९२५ | रा. चिं. वि. वैद्य | पंचांग समितीसाठीं | १०० |
| | | शाळेंतील मुलांस खाऊ | १,०९६ |
| | सेक्रेटरी | अ. भा. संगीत परिषद | ५०० |
| १९२६ | ,, | शाळेंतील मुलांस खाऊस | २७३ |
| | चीफ मेडिकल ऑफिसर बडोदें | इंडियन रेड क्रॉस सोसायटी, बडोदें शाखा | ५,००० |
| | विद्याधिकारी, | ज्योतिष संमेलनास मदत | १०० |
| | सेक्रेटरी, अलाहाबाद | ४ थी ओरिएंटल परिषद | ५०० |
| | प्रो. व्हाइस चान्सेलर | बनारस हिंदु विद्यापीठास | |
| १९२७ | अध्यक्ष | पुस्तकालयाची इमारत बांधण्याकरितां | २,००,००० |
| | | रायगड किल्ला धर्मशाळा | ५०० |
| | सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी, पुणें | ज्ञानप्रकाश छापखान्यास आग लागून झालेलें नुकसान भरपाईचा फंड | ४,००० |
| | सेक्रेटरी | बॉम्बे आर्टस सोसायटी | २०० |
| | ,, | सर लेस्ली विल्सन हॉस्पिटल | १,००० |

यानंतरच्या देणग्यांच्या अधिकृत याद्या अद्याप तयार झाल्या नाहींत. तथापि डॉ. मुंजे यांच्या हस्तें हिंदु महासभेस १२ हजार रुपये व मराठी शब्द कोशास ५ हजार रुपये दोन वर्षांपूर्वी मिळाले. तसेंच थोर विद्वान, उत्कृष्ट कवी, व इतर कलावंत यांस देण्यांत येणारीं वर्षासनें सहासात वर्षांपासून सुरू झालीं आहेत. त्यांची माहिती इतरत्र मिळेलच. वरील यादी रुक्ष असली तरी "ओळींच्या मध्यें" वाचणाराला तींत महाराजांचे अनेक गुण दृष्टीस येतात. देणग्या भरमसाट एकरकमी देऊन फंडगुंडीस उत्तेजन न देतां त्या काळजीपूर्वक व काम पाहून थोडथोड्या भागांनीं देतात. मराठी वाचकांस मनोरंजक वाटणार नाहींत अशा शेंकडों दानांचा उल्लेख वर केला नाहीं.

हा सर्व खर्च श्रीमंतांच्या खासगींतून झालेला आहे. सरकारमार्फत मोठाल्या देणग्या देण्यांत येतात त्या वेगळ्याच.

इतर बाबतींप्रमाणें दानधर्मासहि श्रीमंतांनीं नवीन व योग्य असें वळण लावून इतरांस धडा घालून दिला आहे व हा उपक्रम आणखी दीर्घ काल त्यांच्या हातून चालो अशी इच्छा प्रदर्शित करून हा लेख पुरा करितों.

---

## महाराजांची प्रवासाची आवड.

( लेखकः—प्रो. विश्वनाथ पांडुरंग दांडेकर, एम्. ए. )

फार प्राचीनकाळापासून प्रवासाचें महत्व लोकांना पटलेलें दिसतें. अगदीं रानटी अवस्थेंत मनुष्य असतांना भक्ष्याच्या शोधार्थ त्याला थोडाफार प्रवास करावाच लागे. प्रवासावांचून कोणत्याहि गोष्टीची प्राप्ती त्यावेळीं होणें शक्य नव्हतें. आणि अशा प्रवासांत मिळालेल्या अनुभवाच्या जोरावरच त्याकाळीं ज्ञानप्राप्ती होई. प्रवास करणाऱ्याच्या ठिकाणीं श्री व यश वसतात म्हणून नेहमीं प्रवास करावा, अशा आशयाचीं वचनें जुन्या उपनिषद् व ब्राह्मणादि ग्रंथांत आढळतात. प्रवास केल्यानें अनुभव व ज्ञान या दोहोंची प्राप्ती होते, असें फार पुरातन कालापासून लोक मानीत आले आहेत. किंबहुना प्रवासाखेरीजच्या नुसत्या ज्ञानाला लवमात्र किंमत नाहीं असेंच लोक मानीत. गुरुगृहीं मिळालेलें ज्ञान प्रवासाच्या कसोटीवर घासल्याखेरीज त्याची खरी किंमत कळत नसे. आणि म्हणून तत्कालीं समजल्या जाणाऱ्या पृथ्वीची प्रदक्षिणा करणें हें ब्रह्मचाऱ्याचें अवश्य कर्तव्य समजलें जाई.

देशाटनाचें महत्व अशा रीतीनें सर्व देशांत मानलें जाई. देशाटन म्हणजे शिक्षणाचाच एक भाग होय असें बेकननें म्हटलें आहे. श्रीमंत सरकार सयाजीराव महाराज यांना देखील प्रवासाचें महत्व वाटतें तें एवढ्याचकरितां. त्यांनीं आपल्या एका व्याख्यानांत असें म्हटलें आहे, "Travel in foreign countries is one of the chief sources of knowledge ." आणि त्यांच्या आयुष्याचें विहंगम दृष्टीनें अवलोकन केलें असतां हीच गोष्ट प्रत्ययास येते.

महाराजांनीं अनेक देशांत व अनेक खंडांत प्रवास केला आहे. हिंदुस्थानांत व हिंदुस्थानाच्या बाहेर प्राय: असें एकहि मोठें शहर नाहीं कीं, जें महाराजांनीं

पाहिलें नसेल. महाराज आयुष्यभर प्रवास करीत असल्यामुळें घाईघाईनें आपला प्रवास त्यांना क्वचितच आटपावा लागतो. युरोप खंडासारख्या सुधारलेल्या खंडाचा प्रवास ते पुष्कळ वेळां करीत असल्यामुळें तेथील चालीरीतींचा व विविध सुधारणांचा त्यांना सूक्ष्म व सावकाशपणें अभ्यास करितां येतो. अगदीं एकदांच जगाचा प्रवास करणाऱ्याची स्थिति घाईघाईनें एखादें पदार्थसंग्रहालय पाहणाऱ्या सारखी होते. त्याला नीट बोध कसलाच होऊं शकत नाहीं. महाराजांची स्थिति याच्या अगदीं उलट असल्यामुळें कोणत्याहि देशांतील नवीन गोष्ट त्यांच्या चटकन ध्यानांत भरते. ते त्या गोष्टीविषयीं आपल्या मनांत विचार करितात. आणि आपल्या देशांतील परिस्थितीशीं तुलना करून शक्यतर लगोलग ती गोष्ट आपल्या राज्यांत सुरू करतात. कोठेंहि कांहीं चांगलें पाहिलें कीं, तें आपल्या राज्यांत आणण्याचा मोह त्यांना आवरत नाहीं. जगांत जें जें कांहीं उच्च, न्याय्य व सुंदर असेल तें तें आपल्या देशांत असावें असें महाराजांना वाटतें. त्यांच्या छपन्न वर्षांच्या कारकीर्दीकडे पाहिलें असतांना हीच गोष्ट प्रत्ययास येते. समाज, कायदा, राज्यतंत्र व धर्मतंत्र या बाबतींत त्यांनीं अग्रणी बनून ज्या सुधारणा घडवून आणिल्या त्याचें बव्हंशीं श्रेय त्यांच्या पौर्वात्य व पाश्चिमात्य देशांत झालेल्या प्रवासालाच द्यावें लागेल. याच ठिकाणीं महाराजांनीं केलेल्या मुख्य मुख्य प्रवास-स्थळांची यादी दिल्यास ती अस्थानीं होणार नाहीं.

## हिंदुस्थानांतील प्रवासस्थलें

| | | | | |
|---|---|---|---|---|
| निलगिरी | महाबळेश्वर, | पुणें | नैनिताल | मसुरी |
| सिमला | मरी | काश्मीर | दार्जिलिंग | दिल्ली |
| आग्रा | अलाहाबाद | लखनौ | लाहोर | अजमीर |
| जयपूर | जोधपूर | उदेपूर | ग्वाल्हेर | कानपूर |
| बनारस | कलकत्ता | जगन्नाथ | बंगलोर | तंजावर |
| मदुरा | कोचीन | मद्रास | सीलोन | |

## हिंदुस्थानाबाहेरील प्रवासस्थलें

| | | | | |
|---|---|---|---|---|
| इंग्लंड | फ्रान्स | जर्मनी | बेल्जियम • | स्विटझरलंड |
| इटली | न्यूयॉर्क | फिलाडेल्फिया | सॅनफ्रॅन्सिस्को | कॅनडा |
| सिंगापूर | हांगकांग | कँटन | शांघाय | नागासाकी |
| याकोहामा | कीयोतो | टोकियो | | |

वर दिलेल्या यादीवरून महाराजांच्या ठिकाणीं प्रवासाची आवड किती प्रखर आहे हें सहज कळून येईल. पण आम्हांला जें महत्त्व वाटतें तें या यादींतील फुगीर संख्येचें नसून महाराजांच्या ठिकाणीं असलेल्या सूक्ष्मावलोकन शक्तीचें होय. ही दृष्टि महाराजांच्या ठिकाणीं नसती तर त्यांचा प्रवास लोकोपयोगी ठरला नसता. एका राजाची अशी गोष्ट सांगतात कीं, त्यानें मत्स्याच्या पोटांत बसून साती समुद्रांचें उल्लंघन केलें. तो बाहेर आल्यावर त्याच्या सरदारांनीं त्याला सात समुद्रांत पाहिलेल्या नवलाइविषयीं विचारलें. पण मत्स्याच्या पोटांतील रचनेशिवाय त्याला कांहींच सांगतां आलें नाहीं! ज्यांच्या ठिकाणीं अवलोकन करण्याची शक्ति नसेल त्यांची स्थिति या राजासारखीच व्हावयाची. श्रीमंत सरकार सयाजीराव महाराज यांची अवलोकन करण्याची तऱ्हा इतकी भेदक व सर्वग्राही आहे कीं, कोणत्याहि देशांतील कोणतीहि गोष्ट त्यांच्या दृष्टीच्या टप्प्यांत आल्याखेरीज राहात नाहीं. या अवलोकनाच्या आवडीमुळेंच महाराजांनीं इतका प्रवास केला. अशा अवलोकनानें आपल्या देशांतील लोक व परिस्थिति यांची तुलना ते इतर देशांतील लोक व परिस्थिति यांच्याशीं करूं शकतात; आणि जिथें शक्य असेल तिथें योग्य बदल करून अनुकरण करितात.

अशा प्रवासानें त्यांची प्रकृति चांगली राहून मनहि नेहमीं उल्हासी राहतें. इंग्लंडांतील राजकारणी पुरुष ज्या प्रमाणें पुष्कळ काम केल्यानंतर शरीरांत उत्साह उत्पन्न करण्याकरितां आपापल्या खेडेगांवीं जाऊन राहतात, त्याचप्रमाणें महाराजहि येथील कामाचा डोंगर वाहून झाल्यावर कांहीं काळ थंड देशांत जाऊन राहतात. फरक इतकाच कीं, वर उल्लेखिलेल्या पुरुषांना विश्रांतीच्या वेळीं इतर कांहीं काम नसतें, आणि श्रीमंत महाराजांना कुठेंहि गेलें तरी राज्याचें काम करावेंच लागतें. पण महाराजांच्या ठिकाणीं प्रवासाची आवड इतकी मनापासून आहे कीं, ते अशा प्रकारचा त्रास सोसूनहि प्रवास करतातच करतात. आणि या आवडीचें फळ म्हणूनच कीं काय त्यांना प्रत्येक प्रवासांत कांहीं तरी नवीन शिकायला व लोकांना शिकवायला सांपडतें.

---

## THE MAHARAJA—A SPORT.

( *By Mr. B. M. Rangnekar, B. A., and Mr. V. N. Gokhale, B.A.* )

The mere mention of the name of Sir H. H. Sayajirao Gaekwad brings to mind his manifold and multitudinous activities in regions-political, religious, social, educational and what not. It is his ceaseless efforts in all these branches of civilisation and progress that has brought him a glowing tribute from young and old alike as a pioneer reformer.

His keen love for physical advancement can be traced as far back as the famous Khanderao Gaekwar. The traditional slaying of the buffalo by His Highness with only one stroke on the Dassera day speaks volumes about the vigour that flowed in the veins of the earlier Gaekwars. Thanks to the humanitarian principles and refined out-look on life of the present Maharaja, this rather barbarous way of proving one's physical prowess was given up, and the idea underlying it was made to run along saner currents of modern physical development. Any way, his present love for sports and physical advancement seems to have been a part of the rich legacy bequeathed to him by his ancestors.

The names of his illustrious teachers Mr. Elliot and Raja Sir T. Madhavrao deserve a mention in this connection. He has to a greater degree imbibed his love for sports from these two gentlemen. Along with the intellectual training imparted to the young Maharaja, a desire for strengthening the physique was also inculcated in him, and the Maharaja, though not a first class player, could then wield the willow as well as any good player.

Mr. Sergeant in his life sketch of His Highness observes: "There is no doubt, however, that his insistence of regular exercise has enabled him to carry out the rest of his heavy daily programme in comparatively good health even down to the present day."

Baroda, like other Indian States such as Kolhapur, has long been known for the maintenance of well-known wrestlers.

Though like the late Khanderao Gaekwar, the present Maharaja did never personally jump into the arena to combat with the wrestlers, his interest in the game has all along been very keen. And this was evinced when he recently invited and honoured the world renowned wrestler Gama.

The 'Sathmari' in Baroda can well be regarded as a living memorial of His Highness' accute interest in sports. This 'fêtê' always leaves so abiding an impression on the minds of those visitors to Baroda who are fortunate to witness it, that it cannot be effaced even by the sights of the magnificent Laxmi Vilas and the picturesque Makarpura. The tussel of elephants and of buffaloes, the 'dagdari' and such other events though usual for the Baroda public, have a charm of novelty to outside visitors.

Though not a best crickter himself, he was very particular that the game should be acquired by the Princes. In one of his letters he writes, "I have not myself played the game but I have had it taught to all my sons by professional Parsi crickters." His efforts were amply rewarded. For His Highness's third son Prince Shivajirao showed promising cricketing form when at Oxford. The latter made his mark as a good bat in India too, when he played on the side of the Hindus in the famous Quadrangular Tournaments.

Among athletic sports his chief game has been lawn tennis. He has a wonderful love for the game and his present physical ailment-gout-is alone responsible for his absence at the nets now. It was Baroda that had the honor of holding the first All India Tennis Tournaments, in which the choice players in India and England competed. Maharaja's occasional visits to the Sayaji Vihar Club, though to all outward appearances ceremonial, are with a view to enjoy the game. There he plays billiards in which he is no doubt, proficient.

Riding is a very favourite pastime with the Maharaja. "He has been", so describes Sergeant in his sketch, "a notable rider. The best of horses, says his biographer in



सरदार स्कूलची ड्रील.

Marathi, could not keep up their stamina under His Highness' long and strenuous rides. Twenty miles every day used to be his custom." The royal stables in Baroda have in them some very excellent breeds.

There is in His Highness a keen zest for hunting and shooting. The latter attracted him considerably in his last tour over the European Continent, but unfortunately on account of ill-health he had to give it up. In this connection, his biographer Mr. Sergeant records, "As a hunter His Highness has made his mark. Eleven tigers have fallen to his rifle, and as regards black buck, duck and other lesser game, his reputation as a shot is high." Baroda is not so rich in these hunting preserves as some other Indian States are. Even so, the grounds beyond Makarpura Palace, so dear to Maharaja Khanderao's heart, provide with some very excellent game for the visitors to the State.

Walking has by far a great attraction for him. When in his capital, it is a hobby with him to set out early morning for a brisk walk accompanied by his Aid-de-Camp only, and return to his work in the Palace before the morning's pearly due has disappeared under the cruel influence of the Sun. Mr. Sergeant says, "Even in hilly country such as Mahableshwar and Nilgiris, he would not forego it, and in such walks, his companions used to find it difficult to keep pace with him."

Maharaja Sayajirao's love for various games is reflected in his patronage of the various physical culture institutes in Baroda. Among these the names of Raj Ratna Prof. Manikrao's Vyayam Mandir, Shri Abasaheb Mujumdar's Akhada, the Laxminath Vyayam Shala deserve a mention. Each of these and the various others that are doing this noble work of physical uplift are directly or indirectly being helped by His Highness and his Government. The last, though not the least, that deserves mention is the institute Hind Vijay Gymkhana. Under the patronage of this institute are held every year All India Athletic Sports in which various events of skill and strength are competed by a large number of

athletes, both from the State and outside. Their Highnesses and all the members of the Royal family evince a great interest in these tournaments, and grace them with their presence. At the fourteenth annual function held in December last, His Highness was kind enough to distribute the trophies to the winners. Their Highnesses are both so very keen on the point of physical culture that there stand two special trophies, one in the name of each, for being given away to the best male and female athlete among the competitors at these tournaments. A handsome subvention is given to this institute every year from the State treasury, and it is said that it is His Highnesse's ambition to turn these tournaments into the Olympic Games of India.

May His Highness live long enough to carry out this cherished desire of his, and may he continue to live in the hearts of his subjects and those of the British India as a great patron of physical advancement in India.

—— :0: ——

## श्री महाराज व व्यायामक्षेत्र.

( **लेखक**--श्रीयुत राजरत्न प्रो. **गजानन यशवंत माणिकराव.** )

फार दिवसांचा हेतु होता कीं, श्रीमंत महाराजसाहेब यांची व्यायाम क्षेत्रांतील कामगिरी जनतेपुढें मांडावी. श्रीमंत महाराजसाहेब यांचें कार्यक्षेत्र इतकें विविध आहे कीं, त्यांत त्यांनीं व्यायामक्षेत्रांत केलेले प्रयत्न मुद्दाम लक्षपूर्वक पाहिल्याशिवाय लक्षांत येत नाहींत असें वर वर पाहतां वाटतें. आणि याला कारण एकच व तें हेंच कीं, मनुष्य जितका मोठा व त्याची कार्यक्षेत्रें जितकी अनेक तितकी त्याच्या विशिष्ट कार्यक्षेत्रांची छाननी देखील कठीण. महाराजसाहेब यांच्या कार्यक्षेत्रविविधतेचा पसारा प्रचंड आहे व त्यायोगेंच आजपर्यन्त त्यांच्या अनेक क्षेत्रांतील अनेक कामगिऱ्यांचें अनेक लेखकांनीं अनेक लेखद्वारां अनेक वेळां दिग्दर्शन केलें आहे. तरी आमची अशी खात्री आहे कीं, श्रीमंतांचीं आणखी अनेक कार्यक्षेत्रें जनतेस अजून अज्ञातच आहेत, आणि त्या अज्ञात कार्यक्षेत्रांपैकींच व्यायाम हें एक क्षेत्र आहे. त्या क्षेत्रावर आज थोडाफार प्रकाश पाडावयाचा आहे. सर्चलाइटचा झोत मागाहून टाकतां येईल.

यावर कोणी अशी शंका काढील कीं, आजच अशा प्रकारें प्रकाश पाड-ण्याचें कारण काय ? आणि पाडून पाडावयाचा तो असा थोडा थोडका काय म्हणून ? चांगला सर्चलाइटचा झोतच कां नाहीं पाडीत ?

याचें उत्तर सोपें आहे. या उत्तराच्या पार्श्वभागीं एक आनंददायी योगा-योग आहे. आमच्या मनांत हा लेख लिहिण्याची कल्पना फार दिवसांपासून ठाणें देऊन बसली होती. त्यांत भर काय पडली तर ती थोड्याच दिवसां-पूर्वी श्रीमंतांच्या येत्या वाढदिवसानिमित्त एक गौरवग्रंथ काढावयाची कल्पना उद्भवली, व ही कल्पना घेऊन या ग्रंथाचे चिटणीस आम्हांस भेटले व आमच्या या सुप्त कल्पनेला धक्केवजा आन्दोलन देते झाले. त्यांच्या तांतडीच्या मागणीस तांतडीचा पुरवठा म्हणून हा लेख पुढें करीत आहे एवढेंच.

प्रस्तुत लेखाचें नांव वाचून ' काय हो, या दोन शब्दांचा अर्थाअर्थी संबंध ? ' असा जर एखादा अस्फुट उद्गार एखाद्या अजाण ओठाबाहेर निघाला, तर त्याला चटकन् सांगतां येईल कीं, ' हो बाबा ? व्यायामक्षेत्र व श्रीमंत महाराजसाहेब यांचा अगदीं निकटचा, लहानपणापासून तों तहत आजतागायत संबंध आहे. पहा कसं तें. '

गादीवर बसण्यापूर्वी महाराजांना निसर्गदेवी तर स्वतःच आपल्या मांडीवर आरोग्याचे धडे देत होती. त्या काळास व परिस्थितीस अनुसरून हें दैवाचें लाडकें बालक रानवेलींमध्यें रानवेलींप्रमाणेंच स्वच्छंदानें वाढत होतें. त्या स्वच्छंदीं वातावरणांत अशा तऱ्हेनें १२ एक वर्षें काढल्यावर महाराजांस एकदम उचलून बडोद्यास आणण्यांत आलें. कोठें कवळाणें व कोठें बडोदें ! पण दैव ही चीज कांहीं और आहे. दैवीं दैव खुलावयाचें असलें म्हणजे तें केव्हां कसें खुलेल याचा नेम नाहीं. महाराज गादीवर कसे आले हा इतिहास देखील मोठा मनोरंजक आहे. परंतु आज तो आपला विषय नसल्यानें त्यावर पडदाच राहूं देणें इष्ट. महाराज गादीवर आले ते एकदम रंकाचे राव होऊन आले. या आयुष्यांतील आकस्मिक स्थित्यंतराचे योगें खाणींत पडून राहि-लेल्या या अमूल्य हिऱ्यास पैलू पाडणें जरूर होतें. पैलू पाडावयाचे म्हणून त्यावर घाव घालणें क्रमप्राप्तच ठरलें. अर्थात् गादीवर येतांच महाराजांचे मागें पहिल्यानें ठराविक कार्यक्रमाचें लोढणें लावण्यांत आलें.

कुणाहि श्रीमंत मनुष्यास आणि विशेषतः अशा स्थित्यंतरित लाखों जणांचे पोशिंद्यास असला बांधून टाकणारा कार्यक्रम लोढणेंच वाटावयाचा.

राजनिग्हा नसल्यावर कोणत्या गोष्टीस स्मशानरूप येणार नाहीं? आज या जागेचा स्मशान म्हणूनच उपयोग करण्यांत येतो.

पोहण्याशिवाय महाराजांना फरिगद्का, तलवारीच्या फेकी, निशाणबाजी, कवायत, त्याचप्रमाणें ब्याडमिंगटन, टेनिस, बिलीअर्डस् हेहि शिकविले जात होते. खेळण्यांत महाराजांचे मनःपूर्वक लक्ष असल्यानें ते या सर्वांत चांगले प्रवीण झाले होते.

खेळण्याच्या या विशेष आवडीचा परिणाम अभ्यासाकडे दुर्लक्ष असा मात्र झाला नाहीं. उलट अभ्यासांत आपण पुढें कसे जाऊं इकडे महाराजांचें सदैव लक्ष असे. फार काय, जर एखादे दिवशीं मनाप्रमाणें अभ्यास त्यांच्या त्या ठराविक वेळांत संपू शकला नाहीं तर स्वारी जरा लवकर उठे व उरलासुरला अभ्यास करून ठेवी

मूळ विषयाकडे वळतां असें म्हणावें लागतें कीं, कोणत्याहि गोष्टीची हौस ही कांहीं विलक्षण गोष्ट आहे. आणि म्हणूनच हौसेला मोल नाहीं असें म्हणतात. महाराजांची खेळण्याची हौस अशीच जरी अमोल होती तरी ती त्यांच्या विद्याभ्यासाच्या आड कधींच येवूं शकली नाहीं. नव्हे, या त्यांच्या खेळण्याच्या हौसेच्या योगेंच त्यांचा अभ्यास करण्याचा उत्साह अभंग राहिला खेळण्याची त्यांची ही हौस तारुण्याच्या जोमाबरोबर सारखी वाढतच गेली. खेळ, व्यायाम व मोकळी हवा ही त्रयीच त्यांच्या यशाची गुरुकिल्ली होय.

संवईनें महाराज घोड्यावर बसण्यांत तर इतके पटाइत झाले होते कीं, वाटेल तसा तयार व मस्त घोडा त्यांच्या रपेटीपुढें थकून जाऊंन सरळ येई. ही घोड्यावर बसण्याची त्यांची हौस अगदीं अद्याप कायम आहे. तरूणपणीं तर जेव्हां जेव्हां ते प्रांतोप्रांतीं दौरे काढीत तेव्हां तेव्हां ते घोड्याचाच बहुशः उपयोग करीत. घोडा हा प्राणी त्यांना फार प्रिय आहे.

शिकारीचें तर महाराजांना जवळ जवळ वेडच आहे म्हटलें तरी चालेल. त्यांनीं स्वतः ११ वाघ, अनेक डुक्कर, शेकडों बक व हजारों डक मारले आहेत. ते एक चांगल्यापैकीं निशाणबाज म्हणून प्रसिद्ध आहेत. डबका, धनीआवी व सुंदरपुरा हीं त्यांचीं शिकार करण्याचीं आवडतीं स्थळें होत. याशिवाय मकरपुऱ्याला तर त्यांनीं खास शिकारीसाठीं म्हणून एक स्वतंत्र जंगलच ठेविलें आहे. आतां वयपरत्वें ते स्वतः जरी त्याचा क्वचित उपयोग



व्यायामप्रिय श्री. **महाराजसाहेब** ( सन १९०८ )

करीत असले तरी बडोद्यास येणारी बडीबडी पाहुणे मंडळी मात्र त्याचा यथेच्छ उपयोग करून शिकार करण्यास्तव इतकी सुंदर सोय असल्याचें पाहून आश्चर्यचकित होत्साती परत जातात.

लहानपणीं महाराजांना टेनिसचा विशेष नाद नसे, परंतु पुढें परदेशांत अनेक वेळां जाणेंयेणें होत राहिल्यानें तेथें विशेष प्रचारांत असलेला हा खेळ त्यांनीं मुद्दाम खेळून खेळून सुधारला. जसा देश तसा वेष हें तत्व महाराज पूर्णपणें जाणतात हें यावरून दिसतें.

तरूणपणीं त्यांनीं कांहीं काळ केलेला अगदीं स्वदेशी व्यायाम म्हणजे आखाडा गोडणें हा होय. हा व्यायाम केल्यानें हात व पट हे तर तयार होतातच, परंतु पोटासाठीं याच्या इतका चांगला व्यायाम दुसरा क्वचितच सांपडेल.

आणि हिंदीकलेची परमोच्च पायरी जी बिन्नोट तिचे सुद्धां कांहीं धडे महाराजांनीं घेतले आहेत ही गोष्ट महत्त्वाची आहे. यायोगें स्वसंरक्षण व चापल्य यांबद्दल पूर्ण आत्मविश्वास महाराजांना आला असल्यास नवल नाहीं.

महाराजांनीं क्रिकेटचेंहि थोडें फार ज्ञान करून घेतलें होतें. यांना फिल्डींग अगर बोलिंगपेक्षां ब्याटिंग अधिक आवडे. असें जरी होतें तरी फिल्डिंगच्या वेळीं ते जराहि कुचराई करीत नसत. कां कोण जाणे, पण टेनिसपेक्षांहि या खेळाविषयीं महाराजांना प्रेम कमी.

हल्लींच्या वयांत देखील ते ८–१० तास काम पूर्णपणें उल्हासानें अगदीं न थकतां करतात.

महाराजांचा हल्लींचा आवडता व्यायाम म्हणजे फिरणें. दिवसांतून दोन दोन तास पायीं फिरावयास गेल्याशिवाय त्यांना चैनच पडत नाहीं. फिरावयास निघाले म्हणजे ते सावकाश चालत नाहींत. त्यांची चाल नेहमींच झपझप. त्यांच्याबरोबर चालण्यांत त्यांच्याबरोबर असणारी मंडळी कधींच टिकत नाहींत. चालावयाचें म्हणजे बडोद्यांत असतांच चालावयाचे असें नाहीं. त्यांचा चालण्याचा व्यायाम हा सदैव चालच. महाबळेश्वर, निलगिरी, मसूरी अगर परदेशीय रम्य स्थळीं कोठेंहि तें असोत चालण्याच्या त्यांच्या व्यायामांत कधींहि खळ पडावयाचा नाहीं. फार काय जलपर्यटनांत असतां देखील डेकवर ते आपला चालण्याचा व्यायाम चालू ठेवितात. तेथें नाहीं येत त्यांच्या आड आरामसे पडलेल्या लोकांच्या आरामखुर्च्या, कीं अवास्तव फिरणाऱ्या बाबालोकांच्या बाबागाड्या.

महाराजांची हिंदी व्यायामावरील—विशेषतः दंडबैठकावरील प्रीति अजून या वयांत देखील दिसून येते. ते युरोपमध्यें असले व प्रकृति बरी असली तर सकाळीं थोड्याफार दंडबैठका काढल्याशिवाय ते रहात नाहींत. ही साधीवृत्ति व हिंदविद्याप्रीति या संक्रमण कालांत राजेरजवाडे व श्रीमंत लोक तर बाजूसच राहोत पण बाकीच्यांत तरी किती दिसून येते बरें ?

पण महाराजांचें वैशिष्ट्य येथेंच संपत नाहीं. श्रीमंती व सत्ता यांत प्रारंभींच्या गरीबीनंतर आज साठा अधिक वर्ष लोळलेल्या या एकच एक व्यक्तात आजतागायत सतत निर्व्यसनता वास करीत आहे, ही गोष्ट प्रत्येकानें हृदयफलकावर कोरून ठेवण्यासारखी आहे. इतक्या वेळां सुधारलेल्या पाश्चिमात्य देशांत जाऊन व राहून पेयादिसारख्या सुधारलेल्या व्यसनांत ते आज पावेतों कधींहि सांपडले नाहींत ही गोष्ट खरोखरीच मननीय, अनुकरणीय अतएव आदर्शवत् आहे. चार दिवस तिकडे जाऊन आठ ढंग शिकून येणाऱ्या नामधारी विद्यासंपन्न तरूणांस पाहिलें म्हणजे महाराजांच्या या एकचएक गुणामुळें देखील ते विभूति या पदास लायक ठरतात यांत तिळप्राय संशय नाहीं.

महाराजांस व्यायाम विषयाचें शिक्षण देण्यास अनेक शिक्षक नेमिले होते. प्रत्येकास साधारणतः अगदीं स्वतंत्र विषय देण्यांत आला होता. कांहीं विषयासाठीं दोनदोन तीनतीन शिक्षकहि ठेविले होते. हे सर्व आपआपलें काम मनःपूर्वक करीत.

महाराजांना कुस्ती शिकविण्याचें काम पहिलवान जमाल व समदु हे करीत व महाराजाशीं जोडीदार म्हणून प्रत्यक्ष कुस्ती अशी पहिलवान दुधिया हे करीत. पहिलवान दुधिया हे उंचीनें व शरीरानें महाराजांना जोड म्हणून चांगले शोभत. यांचे व महाराजांचे जोर फार छान होत. या शिवाय महाराजांशीं जोर करणारी जोडी म्हणजे सरदार गणपतराव ढमढेरे व माधवराव गोडबोले हे होत.

कांहीं पेच महाराजांचे विशेष आवडते आहेत. उदाहरणार्थ समोरून लुकान, दोदस्ती, बुठा, झटका, निकाल, उखेड, एक हात काढून रोल, डूब, खालीं आल्यास हात सोडवून निघणें, खालून आंतली टांग मारणें, तरावा लगावणें वगैरे.

कुस्ती पाहण्यांत महाराजांना फार आनंद होत असतो. त्यांच्या समोर ज्या ज्या वेळीं कुस्त्या होतात त्या त्या वेळीं ते त्या मन लावून पाहतात. कोणता पेच कोणत्या पहिलवानानें केला व समोरील पहिलवानानें त्यावर तोड म्हणून कोणता पेच केला, इकडे महाराजांचें बारीक लक्ष असतें, आणि म्हणूनच महाराज हजर असतां कुस्ती एकदम सोडविली न जातां महाराज सांगतील त्या वेळींच तीं सोडविली जाते. आतां कुस्ती सोडवा असें दर्शविणारी महाराजांची खूण म्हणजे तांबडे निशाण होय. गडबडींत एकानें दुसऱ्यास चीत केलेलें महाराजांस आवडत नाहीं. बरोबर चीत करून जिंकणारा गडी जित गड्याच्या चांगला छातीवर बसला म्हणजे महाराजांस कुस्ती झाल्यासारखें वाटतें. कुस्त्या चालू असतां काय काय चाललें आहे हें महाराज विचारतील तेव्हां त्यांस सांगतां यावें म्हणून महाराजांचे मागें एक तज्ज्ञ ठेविलेला असतो. या तज्ज्ञाकडून महाराज स्वतःस काय पाहिजे असेल ती माहिती काढून घेतात. अलीकडे मात्र या तज्ज्ञाऐवजीं खानगीकारभारीच महाराजांचे मागें उभे असतात.

महाराजांचा बालपणींचा कुस्ती करावयाचा आवडता आखाडा म्हणजे कै. खंडेराव महाराज यांनीं जुन्या राजवाड्यांत तिसऱ्या मजल्यावर जो स्वतंत्र व विस्तृत असा आखाडा तयार केला आहे तो. या आखाड्याला जोडूनच एक मोठी गच्ची आहे. स्वच्छ सुंदर हवा, कित्येक मण अत्तर टाकून तयार केलेली अत्युत्तम माती व एकांत, या योगें महाराजांचे या आखाड्यावर एवढें प्रेम. हा आखाडा गोडून तयार ठेवण्याचें काम हरका जेठी, गजराय व भगीरथ या मंडळीकडे असे. मधून मधून महाराज पण हा आखाडा गोडात.

महाराजांस फरिगदक्याचें शिक्षण उस्ताद कमालखां उर्फ कम्माजी यांनीं दिलें. त्यांना शेरधज हा पवित्रा दाखविण्यांत आला होता. महाराज तमाचा कमर, शीर, धीर व आनी हे हात तर मारीतच, परंतु वाहेरा हा त्यांच्या हातावर विशेष चढला होता.

याच कमालखांनीं महाराजांची बिनोट या कलेशीं ओळख करून दिली. ही कला अत्यंत दुर्लभ अशी असतां या कलेंत प्रवेश करून घेतला हें महाराजांस अत्यंत भूषणावह आहे.

आपल शरीर चांगलें घाटदार व्हावें अशी महाराजांची फार इच्छा असे व तसें व्हावें म्हणून जोडी, समतोला, करेला व हत्ते यांचा उपयोग करीत.

यांचें शिक्षण त्यांना हरका जेठी हनुमान व गजराय यांनीं दिलें. महाराजांची जोडी, समतोला, व करेला यांचीं वजनें अनुक्रमें चौदा, साडेअठरा व साडे वीस शेर अशीं आहेत. त्यांची ही जोडी सुराईदार आहे. हीं उपकरणें त्यांनीं सध्यां फ्रेंच बंगल्यांत ठेवून दिलीं असून दुसरी चांगली जोडी व समतोला लक्ष्मीविलासमध्यें मुद्दाम ठेविला आहे. ही जोडी व समतोला संखेड्यास तयार करविले असून त्यावर सोन्याची सुबक नक्षी आहे. यांचीं वजनें अनुक्रमें साडेसहा व सहा शेर अशीं आहेत. ज्या अर्थीं या वस्तू खास जवळ ठेविल्या आहेत त्या अर्थीं यांचा ते उपयोग करीत असले पाहिजेत. नुसती शोभा म्हणून कांहीं त्यांना राजवाड्यांत स्थान मिळालें नाहीं खास. अलीकडच्या शोधाप्रमाणें जोडी ही फार वजनाची नसावी असें आहे. व म्हणून महाराजांनीं अशा मध्यम वजनाची जोडी व समतोला संग्रहीं बाळगिला आहे.

अंग लवचीक होऊन त्यांत चापल्य यावें व कुस्तीच्या पकडीहि चांगल्या साधाव्या म्हणून महाराजांनीं मलखांब शिकून घेतला. हा त्यांस हरका जेठी यांनीं शिकविला.

उस्ताद रहीम मिया व कासम मिया या उभयतांनीं महाराजांस घोड्यावर बसण्यास शिकविलें. उस्ताद रहीम मिया वारल्यानंतर उस्ताद कासम मिया यांना ठेवण्यांत आलें. या कासम मियावर महाराजांचा खास मेहरनजर असे. महाराजांनीं त्यांना छत्री व मशाल यांचा मान दिला होता.

सार्जन्ट ग्रिप्स यांनीं महाराजांस कवायत व निशाणबाजी शिकविली. निशाणबाजीची गोडी यांना येथेंच लागली व पुढें ते चांगल्याचपैकीं नेम घेऊं लागले. कर्नल सार्जन्ट गुइन यांनीं महाराजांना तलवारीच्या फेकी शिकविल्या.

सरदार मोरिनस यांनीं महाराजांना बिलिअर्ड्स शिकविलें. हा खेळ महाराज आजसुद्धां फार आवडीनें खेळतात. मोरिनसांवरील आपलें प्रेम व्यक्त करण्यासाठीं महाराजांनीं त्यांना सरदार ही बहुमानाची पदवी दिली होती. तीन एक वर्षांपूर्वीं सरदार मोरिनस वारले.

महाराजांनीं याप्रमाणें अनेक खेळांत प्रवेश करून घेऊन त्या प्रत्येकांत चांगलीच प्रगति करून घेण्याचा कसोशीनें यत्न केला आहे. या सर्व खेळांची त्यांना आवड व म्हणून ते त्यांत इतके रंगूं शकले. महाराजांनीं आतां नुकतेंच ठरविलें आहे कीं, आपण आजपर्यंत उपयोगांत आणलेलीं व्यायामाचीं

उपकरणें व शस्त्रास्त्रें यांचा एक सुंदर शिलेखाना तयार करावा. महाराजांजवळील हीं शस्त्रास्त्रें खरोखरच फार सुंदर आहेत. तीं निरनिराळ्या तऱ्हेचीं व निरनिराळ्या देशचीं आहेत. त्यांची जातपात व नांवनिशी बनवायाची कामगिरी कर्नल परबसाहेब यांनीं एका कमीटीकडे सोंपविली आहे.

व्यायामाच्या बाबतींत जशा महाराजांच्या आवडीनिवडी दिसतात तशा खाण्याच्या बाबतींत कांहीं विशेष दिसत नाहींत. तरी पण तेवढ्यांतल्या तेवढ्यांत आवडनिवड करावयाचीच झाल्यास असें म्हणतां येईल कीं, सकाळच्या प्रहरीं त्यांना जिलबी खाणें आवडत असे. याशिवाय तूप गुळ घातलेला बाजरीच्या भाकरीचा मलिदा त्यांना फार आवडे. पाक, शाळू, काकड्या या वस्तूंवर त्यांचें जादा प्रेम आहे. उंधिया खाण्यांत त्यांना नेहमीं मौज वाटते. थोडक्यांत त्यांना खाण्याचे सर्वच पदार्थ आवडतात.

मालीशीची महाराजांना पहिल्यापासून आवड दिसते. पूर्वी हुजऱ्यांकडून ते मालीश करवून घेत. ही मालीश तेलाउटण्यांची असे. बदाम चांगले पिसून त्यापासून हीं तेलें व उटणीं काढण्यांत येत. शरीराची कांती वाढावयास व शरीराची चामडी नरम रहावयासहि मालीश फार योग्य.

पुढें महाराजांनीं लष्करीखान बलूच नांवाच्या मनुष्यास पाश्चिमात्य देशांत नेलें व तेथें त्यास याच विषयाचें शिक्षण घ्यावयास लावून तरबेज करून आणलें. हल्लीं ते याच इसमाकडून मालीश करवून घेतात. बलूच यांनीं मिळविलेली ही विद्या येथील स्टेट–जनरल–हास्पीटलमधील परिचारकांना त्यांनीं शिकवावी म्हणून त्यांना सांगण्यांत आलें आहे, व त्याप्रमाणें महाराज येथें नसले म्हणजे ते हें काम करीत असतात.

थोडक्यांत महाराज स्वतःच्या शरीराची मनापासून काळजी घेत आले आहेत व हल्लींहि घेत आहेत यांत संशय नाहीं. आम्हीं म्हणतों याचा प्रत्यक्ष पुरावा आम्हीं येथें आमच्या हातीं आलेल्या दोन फोटोद्वारें देतों. हे फोटो पाहतांच आम्हीं आतांपर्यंत वर जीं जीं विधानें केलीं आहेत तीं किती साधार आहेत हें तेव्हांच पटेल. हें हातचें कांकण पाहण्यास दुसरा आरसा तो कशास पाहिजे ? ‘शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्’ हें तत्त्व महाराजांनीं स्वतःच्या आचरणानें सिद्ध करून दाखविलें आहे.

येथपयन्त आपण महाराज ही व्यक्ति व व्यक्ति या दृष्टीनें त्यांनीं स्वत: व्यायाम शास्त्रांत काय काय व कसें कसें शिकून घेतलें हें पाहिलें. आतां महाराजांचे आसमंतात सदैव वावरणारी व त्यांच्याच प्रत्यक्ष छायेखालीं वाढलेली त्यांची कांहीं कौटुंबिक मंडळी यांसाठीं महाराजांनीं काय काय केलें तें पाहूं या.

## श्रीमंत सौ. मा. महाराणीसाहेब.

महाराजसाहेबांच्या अर्धांगी म्हणूनच केवळ म्हणावयाचें असें नसून महाराणी साहेबांचा व्यायामाबद्दलच अर्धाअधिक उत्साह श्रीमंत महाराजसाहेबांच्याच सहवासाचें फल आहे यांत शंका नाहीं. व्यायामाची जन्मतःच महाराणीसाहेबांची आवड या चिरसहवासामुळें चिरस्थायी झाली.

मातोश्री महाराणीसाहेब सकाळीं ५-३० वाजतां उठतात. ६-३० ते ७ पर्यन्त न चुकतां नियमितपणें त्या मुल्लर पद्धतीचा व्यायाम घेतात.हा व्यायाम उत्तम रीतीनें करतात. पुढें बरोबर सव्वा तास त्या फिरावयास जातात. या एवढ्या वेळांत त्या ४ मैल व २ फर्लांग इतकें अंतर कापतात. फिरावयास जाण्याची त्यांची आवड महाराजसाहेबांच्या आवडीपेक्षांहि थोडी फार अधिकच आहे म्हटलें तरी चालेल. फिरणें हा त्यांचा नित्यनैमित्तिक कार्यक्रम आहे. तो पार पाडल्याशिवाय त्या कधींहि रहात नाहींत. फिरून आल्यानंतर स्नान, देवपूजा, वगैरे आटोपून १०-३० ते १ टपाल पाहणें, वर्तमानपत्रें वाचणें, व आल्यागेल्यास मुलाखत देणें वगैरे कार्यक्रम त्या उरकतात. त्यानंतर जेवण. जेवणाच्या बाबतींत त्यांच्या आवडी विशेष आहेत. त्या दिवसांतून अलीकडे एकच वेळ जेवतात, परंतु जें जेवतात तें उत्तमपैकीं पौष्टिक असेंच जेवतात. त्यांना एकटेंदुकटें जेवणें आवडत नाहीं. जेवतांना त्यांना मंडळी लागतात. जेवणाचा कार्यक्रम पार पडल्यानंतर थोडा वेळ वामकुक्षी व त्यानंतर पत्रव्यवहार अगर वाचन. या गोष्टी पांच वाजे-पर्यंत चालतात. पांच वाजले कीं, तडक त्या टेनिस कोर्टवर जातात. टेनिस हा त्यांचा प्रिय व्यायाम आहे. करमणूकची करमणूक व व्यायामची व्यायाम अशी त्यांची टेनिसची व्याख्या आहे. त्यांच्याबरोबर टेनिस खेळावयास आलेली मंडळी थेटपर्यंत त्यांच्याबरोबर खेळण्यांत टिकूं शकत नाहींत. राजरत्न जनरल नानासाहेब शिंदेसारखे खेळाडू देखील महाराणी-साहेबांबरोबर खेळतांना थकतात व विश्रांतीसाठीं एखादुसऱ्या सेट

नंतर बसतात. परंतु मातोश्री महाराणीसाहेबांचें तसें नाहीं. एकदां त्या कोर्टवर उभ्या राहिल्या कीं, अंधारामुळें चेन्डु दिसेनासा झाला म्हणजे कोर्टावरून परत फिरतात. एकसारखे चार सेट्स खेळल्याशिवाय तर त्या कधीं थांबतच नाहींत. अशा रीतीनें सारखा खेळ खेळल्यानें त्यांच्या डोक्यावरील पदराचा भाग इतका ओला चिंब होतो कीं, त्या तो पिळून काढतात. त्यांच्या पायमोज्यांची देखील हीच स्थिति होतें. खेळल्याबरोबर त्या कधींहि कांहींहि खात नाहींत. परंतु दुसऱ्यांनीं विश्रांति घेतली असल्यानें त्यांना मात्र त्या आग्रह करकरून खाऊं घालतात. कारण त्या म्हणतात "असें असें जर तुम्हीं आज खाल्लें नाहींत तर उद्यां खेळावयास कसचे येणार?" खेळावरील त्यांचे हे एकनिष्ठ प्रेम खेळाडू म्हणविणारांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

इंग्लंडमध्यें त्या असल्या म्हणजे गोल्फ हा खेळ त्या दोन दोन तास खेळतात. त्या म्हणतात या खेळाच्यायोगें फिरण्याचें काम अनायासेंच होतें.

आणखी एक गोष्ट त्यांच्यांत आहे. त्यांना स्थूल शरीर मुळीं आवडत नाहीं. स्वतःचें शरीर जर त्यांना थोडें प्रमाणाबाहेर जात आहेसें वाटलें तर त्या लगेंच त्यास प्रमाणांत आणावयाच्या प्रयत्नास लागतात. यासाठीं त्या ताबडतोब विशिष्ट तऱ्हेचे व्यायाम घ्यावयास सुरवात करतात.

साधारणतः नेहमींच त्या हातापायाचे व पोटाचे व्यायाम करतात. त्याचप्रमाणें शरीराची निरनिराळ्या प्रकारची मालीशी करवून घेतात. साध्यांतला साधा मालिशीचा प्रकार का जो साध्या लाटण्यानेंहि करतां येतो तो त्या मोठ्या आवडीनें करतात. मालीशी शास्त्रोक्त करवून घेतां यावी म्हणून त्यांनीं आपल्या बायांना मुद्दाम आमचेकडे पाठवून हें शिक्षण देवविलें आहे.

महाराणीसाहेबांना घोड्यावर बसण्याची आवड आहे. लहानपणीं तर त्या घोड्यावर बऱ्याच बसल्या. अलीकडेहि त्या क्वचित् बसतात, परंतु फारशा नाहीं. व्यायामाच्या दृष्टीनें हल्लीं त्या इलेक्ट्रिक घोड्याचा उपयोग करतात.

महाराणीसाहेबांना शिकारीचाहि नाद बराच होता. त्यांचा नेम चांगला आहे. शिकारीसाठीं रानावनांतून फिरण्यास त्यांना फार आवडे. या नादांत त्या भूक, तहान, ऊन, वगैरे सर्व विसरून जात. इतक्या त्या त्यांत गर्क होत. आजकाल मात्र त्या यासाठीं बाहेर पडत नाहींत.

पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाहि व्यायामाची अवश्यकता आहे या तत्त्वाच्या महाराणीसाहेब फार भोक्त्या आहेत. १९२६ सालीं जेव्हां कन्याआरोग्य मंदिराचे खेळ त्यांच्या अध्यक्षतेखालीं झाले त्यावेळीं त्यांनीं उद्गार काढले कीं, आमच्यावेळीं ही व्यायाम पद्धती निघाली नव्हती नाहीं तर मी जरूर हिचा फायदा करून घेतला असता. हल्लींच्या मुलीबाळींनीं, मग त्या गुजराथी असोत, वा दक्षिणी असोत, वा इतर कुणीहि असोत, सर्वांनीं या व्यायाम पद्धतीचें अवलंबन करून आपली प्रकृति उत्तम करून घेतली पाहिजे; कारण आजच्या मुली याच उद्यांच्या माता आहेत. यांचींच मुलें पुढें राष्ट्रकार्यकर्ती व्हावयाची आहेत तेव्हां या भावी मातांनीं आपलीं शरीरें आतांच सुदृढ करून ठेवणें अवश्य आहे. स्त्रियांनीं व्यायाम घेणें यांत कांहींहि पाप नाहीं. उलट न घेणें हेंच पाप आहे; कारण निसर्गानें व्यायाम हा स्त्रीपुरुष या उभयतांसाठा खुला ठेविला आहे. मग स्त्रियांनीं त्यापासून पराङ्मुख कां व्हावें ? " किती सत्य आहेत हे उद्गार ?

## श्री. युवराज प्रतापसिंह.

श्रीमंत महाराजपौत्र राजे प्रतापसिंह यांच्यांत त्यांचे वडील श्रीमंत कै. युवराज फत्तेसिंहराव यांची पोलोची अनावर हौस पूर्णांशानें उतरली आहे. यांनीं आपली पोलोटीम दिल्लीस नेऊन तेथें अखिल भारतीय पोलो चँपियनशिप मिळविली आहे. क्रिकेट व टेनिस यांचाहि यांना विलक्षण नाद आहे. या तिन्हींहि खेळांत ते सदैव उत्साहानें भाग घेतात. पोलो हा खेळ मर्दांचा आहे व तो मी सतत खेळत राहणार असा त्यांचा बाणा आहे शिकारीबद्दल देखील त्यांना मनस्वी प्रेम आहे.

हिंदी व्यायामापैकीं यांनीं दंडबैठका, जोडी, फरिगदका, वगैरेचें शिक्षण कसरत इन्स्पेक्टर श्रीयुत बळवंतराव निंबाळकर यांचे जवळ घेतलें. यांच्या या खेळाडू वृत्तीमुळें यांनीं आपली शरीरप्रकृति चांगली सुदृढ बनविली आहे.

आपले आप्तेष्ट, सरदार दरकदार, व मानकरी यांना महाराजांचें सदैव हेंच सांगणें असतें कीं, " बाबानों, शरीरें सुदृढ करा. अंगांत जोम वाढवा. उगाच बसून ऐदी बनूं नका. " या लोकांना खेळांबद्दल आपलेपणा वाटावा व देशी खेळांना विशेष उत्तेजन मिळावें म्हणून महाराजांनीं पूर्वींपासून आट्यापाट्या वगैरेचे सामने राजमहालांत देखील करविले आहेत. श्रीमंत कै. युवराज फत्तेसिंहराव यांचे वेळीं फत्तेसिंह टीम विरुद्ध नजरपागा टीम यांच्यांतील सामना

मोठा चुरशीचा व प्रेक्षणीय झाला होता. श्रीमंत महाराजसाहेबांना त्या साम-न्याची अजून आठवण आहे.

या आप्तेष्टांदिकांस व्यायामाची गोडी लागावी व यांची भावी प्रजा सुदृढ व सतेज निपजावी एतदर्थ खास सरदार मानकरी यांचेकरितांच एक कुस्त्यांचा दंगल मोतीबागेजवळ ठेवण्यांत आला होता. या दंगलांत सरदार-मानकऱ्यांनीं मोठ्या अहमहमिकेनें भाग पण घेतला होता. परंतु हा दंगल एकच वर्ष भरला. या एकाच दंगलाचा परिणाम असा झाला कीं, दंगल कमेटीचे सभासद यांना देखील या कुस्त्यांत भाग घ्यावा लागला व त्याप्रमाणें तो त्यांनीं घेतलाहि.

विषयाच्या पुढील प्रश्नाकडे वळण्यापूर्वी बडोदें राज्याच्या व्यायामी पूर्वे-तिहासाकडे जरा नजर टाकूं या.

बडोदें राज्यांतील मल्लविद्येचा इतिहास १८१९ सालापासूनचा आहे. त्यावेळीं या राज्यांत ६ पहिलवान होते. पुढें कै. श्रीमंत दुसरे सयाजीराव महाराज यांना कुस्तीचा जरा विशेष शोक असल्यानें त्यांनीं ठिकठिकाणांहून अनेक पहिलवान बोलावून आणून आपल्या पदरीं ठेविले. त्यांच्या कारकीर्दींत पहि-लवानांची संख्या १२१ पर्यंत गेली व तत्प्रीत्यर्थ खर्च सालीना रु. ७३,५०० पर्यंत वाढला. पुढें श्रीमंत गणपतराव महाराज यांना त्या गोष्टीची तशी आवड नसल्यानें त्यांच्या कारकीर्दींत हा खर्च निम्मेपेक्षांहि कमी करण्यांत आला.

पुढें आले श्रीमंत खंडेराव महाराज. खंडेराव महाराज म्हणजे मल्लविद्येचें जागतें बोलतें दैवतच. त्यांनीं हिंदुस्थानांतील सव नामांकित शहरांतून फन्न्हु-न्नरी व या कलेंतील निष्णात लोकांस हजारों रुपये खर्च करून आणून लाखों रुपये खर्च करून त्यांस आपल्या पदरीं ठेवून घेतले. या नांमाकित पहिलवानांपैकीं विशेष नामांकित पहिलवान म्हणजे—

१. सैय्यद अबदुल कादरसाहेब बिन्नोटी,
२. रामचंद्र जेठी,
३. भगीरथ जेठी,
४. अलीया,
५. शहाजादा,
६. जमाल,
७ अबा जेठी,
८. रमजी,
९. हनमा जेठी,
१०. कनका जेठी,
११. नरसा जेठी,

वगैरे होत. या अशा विशारदांपैकीं कांहींना तर खंडेराव महाराजांनीं गांवच्या

गांवें इनाम दिलीं आहेत, व तीं आज त्यांचे वंशज आनंदानें उपभोगीत आहेत. यांचे कारकीर्दींत पहिलवानांची संख्या १,००० होती व त्यांचेसाठीं होणारा सालीना खर्च रु. २,५४,६७० पर्यन्त गेला होता.

यांच्या पश्चात श्रीमंत मल्हारराव महाराज यांनीं हा आंकडा बराच खालीं उतरविला. तरी पण या कारकीर्दींत देखील पहिलवानांचे १२ आखाडे होते व त्यांसाठीं होणारा सालीना खर्च रु. ७०,००० वर होताच.

याप्रमाणें कै. श्रीमंत दुसरे सयाजीराव महाराज, खंडेराव महाराज, व मल्हारराव महाराज यांनीं व्यायामविद्येस उर्जितावस्था आणावयाचा खरो-खर मनापासून प्रयत्न केला. त्यांची दृष्टि कुस्तीची कला व पहिलवान पेशा यांवरच विशेषेंकरून खिळून राहिली. या पलीकडे ती गेली नाहीं. या कलेंत मात्र या तिघांनींहि जवळ जवळ आपल्या कर्तबगारीची शर्थ केली असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं.

हल्लींच्या महाराजांनीं ही दृष्टि अतिशय व्यापक अशी केली आहे. त्यांनीं ती पहिलवान व कुस्ती यांवरच स्थिर होऊं दिली नाहीं. वरील तिन्ही महा-राजांचा व्यायामकलेंतील शोक साधारणतः स्वतः पुरताच होता म्हटला तरी चालेल. प्रस्तुतच्या महाराजांना हा शोक आपण पहिलवान, व कुस्ती येथवरच न थांबवितां बदलत्या काळाकडे व प्रजाहिताकडे लक्ष देवून त्याचा परीघ विस्तृत–भारतीय केला असें मोठ्या अभिमानानें म्हणावें लागेल. त्यांच्या या अशा करण्यानें कदाचित् सकृत् दर्शनीं पहिलवान खात्याकडे त्यांचें दुर्लक्ष झाल्यासारखें दिसेल. परंतु जेथें दृष्टि सार्वजनिक झाली तेथें एका व्यक्तीच्या अगर वर्गाच्या महत्त्वाला थोडाफार कमीपणा आल्यासारखें वाटलें, तर तें सर्वस्वी अनिष्ट असें कसें म्हणतां येईल? उलट यांत अधिकांच्या हिताचा समावेश झाला असल्यानें हच इष्ट झालें असें कबूल करावें लागेल.

वरील प्रमाणें फक्त पहिलवानांवरच होणारा हा अवाढव्य खर्च आटोक्यांत आणण्यासाठीं प्रथमतः महाराजांनीं खालील प्रमाणें उपाय योजिलेः—

१. मैयत झालेल्या पहिवानांच्या जागा भरण्याचें बंद केलें;
२. कित्येकांस फौजखात्यांत लायक नोकरीवर ठेवून घेतले;
३. कित्येकांस पेन्शन दिलें;
४. कित्येकांस ग्रॅच्युइटी दिली.

त्यामुळें आज या क्षणाला सरकारी पहिलवान फक्त १२ उरले आहेत. १८१९ सालांतील पहिलवानांच्या संख्येपेक्षां ही संख्या निदान दुप्पट तर आहे ! ही संख्या एवढी कमी होण्याचें आणखी एक कारण आहे. महाराजांना मध्यम प्रतीचे पहिलवान आवडत नाहींत; अशांना ते खिरापती पहिलवान म्हणतात. चांगला देखणा व भरदार पहिलवान महाराजांच्या नजरेंत तेव्हांच भरतो. दुर्गा नांवाचा असाच एक देखणा व भरदार पहिलवान होता; त्यावर महाराजांची विशेष प्रीति असे.

या सरकारी पहिलवानांसाठीं खालीलप्रमाणें चार सरकारी आखाडे आहेत. ( १-२ ) वज्रमुष्टीचे दोन; यांत दोन्ही प्रकारच्या कुस्त्या कराव्या लागतात. ( ३ ) पंजाबी पहिलवानांचा एक. व ( ४ ) पटेगिरीचा एक.

हल्लीं सरकारी दंगल तीन होत असतात. एक होळीचा, दुसरा दसऱ्याचा, व तिसरा नाताळचा. याशिवाय राजघराण्यांत लग्नकार्य किंवा व्हाइसरायासारखे माननीय पाहुणे आल्यास जादा दंगल होतात. या दंगलांत बाहेरगांवचे पहिलवान मोठ्या उत्साहानें भाग घेतात. याबद्दल त्यांना त्यांच्या लायकीप्रमाणें पारितोषकें देखील देण्यांत येतात. हे दंगल पाहण्यासाठीं दूरदूरचे लोक येतात. या दिवशीं अगगडांत तुफान गर्दी असते. लोकजागृतीच्या दृष्टीनें हें कार्य खरोखरीच कांहीं लहान नाहीं.

नियमितपणा व शिस्त यांची कन्या जी सुव्यवस्था ती महाराजांची अतिशय लाडकी आहे. प्रत्येक गोष्ट सुव्यवस्थित असावी अशी जणुं त्यांना खोडच लागली आहे. आणि म्हणूनच त्यांना बारिकसारिक बाबतींत देखील नियम लागतात. तेव्हां पहिलवान व कुस्त्या या मोठ्या गोष्टी यांस अपवाद कशा असूं शकतील ? त्यांनीं "पहिलवान लोक व त्यांच्या कुस्त्यांसंबंधीं नियम" या नांवाचें एक पुस्तक मार्च १९१८ मध्यें तयार करविलें आहे. हे केलेले नियम अनेक दृष्टींनीं उपयुक्त आहेत. त्यांच्यांतील विशेष हा कीं, पूर्वीं चुरशीमुळें म्हणा अगर इतर कोणत्याहि कारणानें म्हणा, पहिलवान लोक एकमेकांवर ताण करावयासाठीं आपल्या समोरच्या गड्याच्या शरीरास कायमची दुखापत होईल अशा तऱ्हेचे पेच करीत. ते पेच या नियमांच्या योगें कमी करण्यांत आले.

हे कमी करण्यांत आलेले पेच म्हणजे १ खप्पा अगर गळखोडा बांधणें,

२ दोन पायांची स्वारी बांधणें, ३ हात पाठीवर चढाविणें, ४ पाय जाग्यावर चढाविणें, ५ कसोटा मारणें, ६ मोतीचूर करणें, आणि ७ नमाज बंद करणें.

त्याचप्रमाणें कांहीं नेस्त्यादेखील बंद केल्या व त्या म्हणजे १ नाकावर पुठी मारणें, २ चावणें, ३ केस धरणें, ४ डोळ्यांत बोटें घालणें, ५ तोंडांत बोटें घालून गालफडे फाडणें, ६ पाय मुरगळणें, ७ बरगड्यावर ढोपरानें मारणें, ८ एक बोट तोडणें, या होत.

शिवाय या कुस्त्यांच्या नियमांना एक टीप घालण्यांत आली आहे; ती ही कीं, शरीरास कोणतेंहि कायमचें व्यंग उत्पन्न होईल असे कोणतेहि डाव अगर नेस्त्या करूं नयेत. याप्रमाणें नियम करून कस्तीच्या प्रकारांतील क्रूरता व रानटी अंश काढून टाकून तिला निरुपद्रवी करण्याचा प्रयत्न केला आहे, हें लक्षांत घेण्याजोगें आहे.

याशिवाय फरिगदका व बाना यांचेहि नियम राजरत्न जनरल नानासाहेब शिंदे यांचे करवीं महाराजांनीं १९१२–१३ सालांतच करवून ठेविले आहेत.

पहिलवानखात्याची अशी व्यवस्था करून महाराजांनीं त्यांत वांचविलेला पैसा सार्वजनिक हितास्तव वापरण्याचें ठरवून तो सर्व पैसा प्रजेची शारीरिक स्थिति सुधारण्याकडे त्यांनीं लाविला आहे.

शरीर व मन यांचा अन्योन्य संबंध महाराजांचे नजरेपुढें सदैव असल्यानें त्यांनीं मानसिक शिक्षणाबरोबर शारीरिक शिक्षणाचीहि सांगड घातली आहे.

कै. हरगोविंददास कांटावाला हे विद्याधिकारी होते त्यावेळेसच महाराजांनीं त्यांना एक योजना तयार करावयास सांगितली होती. ती योजना प्राथमिक शाळा व माध्यमिक शाळा यांसाठींच विशेषतः होती. या योजनेच्या वेळींच पहिलवान खात्यांतील कांहीं पहिलवान कांहीं शाळांतून कसरत मास्तर म्हणून ठेवावयास सुरवात झाली. यानंतर प्राथमिक शाळांतून मुलांच्या कुस्तीप्रमाणें त्यांच्याकडून शारीरिक कसरत करून घेण्यासाठीं आखाडेहि ठेवावयाचें ठरलें. याप्रमाणें सत्वर सुरवात होवून आज या आखाड्यांच्या शिक्षकांवर इन्स्पेक्टर म्हणून श्रीयुत निंबाळकर हे आहेत.

माध्यामिक शाळा म्हणजे हायस्कूल्स यांमध्येंहि कसरत मास्तर ठेवण्यांत आले आहेत. हे कसरत मास्तर ज्या मुलांना कसरत करावयाची इच्छा

असेल त्या मुलांना एक तास शारीरिक शिक्षण देतात. या शिक्षणांत साधारणतः खालील विषयांचा समावेश होतो. मलखांब, जोडी, कुस्ती, कवायत, शिडी, लांब उडी, उंच उडी, घोडा, घसरपट्टी, सिंगल बार, डबल बार, वगैरे.

हें शिक्षण अद्याप सक्तीचें झालें नसल्यानें याचा व्हावा तसा फायदा अद्याप लोकांना होत नाहीं. कांहीं लोकांच्या अशा भ्रामक कल्पना आहेत कीं, शारीरिक शिक्षणाच्या योगें मुलांचीं हाडें खराब होतात. शिवाय पायाच्या शिरा खराब होऊन माणसें पौरुषहीन होतात या असल्या खुळ्या कल्पनांच्या योगें कांहीं मुलांच्या आईबापांनीं तर डॉक्टरांकडून आपलीं मुलें कसरत करावयास नालायक असल्याबद्दल सर्टिफिकिटें मिळवून तीं मास्तरांकडे पाठवून आपल्या चिरंजीवांची या शारीरिक शिक्षणांतून सुटका करून घेतली! इतकें जेथें अज्ञान पसरलें आहे तेथें "माई! बापा!" करून कोण दाद देणार? मूल रडत आहे, हातपाय झाडीत आहे, अगदीं हट्टास पेटलें आहे कीं नाहीं दूध प्यावयाचें म्हणून, तरी देखील आई त्याचे हातपाय पकडून, जबरदस्तीनें तोंड उघडून त्याला दूध पाजतेच ना? त्याचप्रमाणें प्रजेचीहि ही असली नावड व भ्याडवृत्ति यांकडे दुर्लक्ष करून तिच्या गळीं व्यायामरूपी दूध बळजबरीनें कां होईना पण उतरविलें पाहिजे, हेंच खरें.

हायस्कूलसमधून शारीरिक शिक्षणाचा प्रसार जरी अशा रीतीनें जवळ जवळ हास्यास्पद स्वरूपांत होत असल्याचें वाटत असलें तरी मुलांच्यांत खेळण्याची जी नैसर्गिक आवड, ती त्यांस कांहीं स्वस्थ बसूं देत नाहीं. देशी खेळांकडे या मुलांचें मुख्यतः केवळ त्यांच्या आईबापांच्या अज्ञानामुळें दुर्लक्ष होत असलें तरी क्रिकेटसारख्या खेळांत मात्र हीं मुलें पूर्ण रंगलेलीं दिसतात खरी; व आश्चर्य हें कीं, हेच आईबाप मुलांच्या या करण्यास जराहि विरोध करीत नाहींत. असो. मुलांचा इंटर-हायस्कूल-म्याचेसमधील उत्साह प्रेक्षणीय असतो. साधारणतः कोणतीहि क्रिकेट म्याच असो, हीं मुलें आपलीं तेथें हजर. मग त्यांना नाहीं रहात वेळेचें, कीं भुकेचें, कीं तहानेचें, कीं उन्हाचें भान.

याशिवाय प्राथमिक शिक्षण घेणारीं व हायस्कुलसमध्यें जाणारीं मुलें हीं हिंदविजय जिमखान्याच्या पटांगणावर सामन्याचे वेळीं अनेकविध खेळांतून हंसत खेळत भाग घेत असलेलीं पाहून ही शारीरिक शिक्षणाची कडू किनाइन

गोळी श्रीमंतांच्या अव्याहत परिश्रमांच्यायोगें जनतेस आतां शर्करावगुंठित वाटूं लागली असून तिची परिणामीं हितकर फळेंहि तिच्या दृष्टिकक्षेंत येऊं लागलीं आहेतसें दिसतें. आतां ही गोळी लवकरच जनता आनंदानें नियमितपणें घ्यावयास लागेल असें मानावयास जागा आहे. तेव्हां याचें सर्व श्रेय कोणास बरें ? महाराजसाहेबांसच होय.

प्राथमिक शिक्षण व माध्यमिक शिक्षण यांत जसा पाहिजे तसा शारीरिक शिक्षणाचा प्रसार झाला नाहीं तद्वतच उच्च शिक्षणांतहि तो झाला नाहीं, असेंच म्हणणें भाग पडतें. तरीपण दगडापेक्षां वीट मऊ या न्यायानें बडोदा कॉलेजमध्यें बडोदा कॉलेज ट्रेनिंग कोरची चळवळ यशस्वी तऱ्हेनें चाललेली पाहून कुणासहि समाधानच वाटेल. हे यु. टी. सी. चें शिक्षण महाराजांनींच कॉलेजमध्यें सुरू करावयास लावलें. या शिक्षणाचा परिणाम इष्ट असाच होत आहे. यायोगें विद्यार्थ्यांना अनायासें लष्करी शिक्षण मिळून त्यांच्या अंगीं शिस्त व तडफ या गोष्टी बाणतात. हें शिक्षण कॉलेजमधील वाटेल त्या वर्गाच्या विद्यार्थ्यास घेतां येतें. प्रतिवर्षी या कोरमध्यें १००, १२५ विद्यार्थी असतात. या शिक्षणाचें श्रेय क्याप्टन प्रो. आपटे, लेफ्टनंट प्रो. वाडिया व मुकर्जी यांना आहे.

या यु. टी. सी. चा लाभ घेऊन त्यांत तरबेज झालेल्या श्रीयुत अमृत विठ्ठल वैद्य, या विद्यार्थ्यास सार्जन्टचा हुद्दा देवून त्या हुद्यावर त्यानें चांगलें काम केल्याबद्दल एक सुवर्णपदकहि त्यास देण्यांत आलें आहे. या कामीं विद्यार्थ्यांचा उत्साह कसा वाढेल इकडे प्रोफेसर मजकुरांचें नीट लक्ष असल्याचेंच यावरून दिसतें. हा सार्जन्टचा हुद्दा व सुवर्णपदक मिळविणारे श्रीयुत वैद्य हे एकटेच आहेत हें लक्षांत घेण्यासारखें आहे. हे वैद्य जुम्मादादा व्यायाम मंदिरांतील विद्यार्थी आहेत.

सक्तीच्या शारीरिक शिक्षणाचा एक प्रयोग हल्लीं कॉलेजमध्यें करून पहात आहेत. ही सक्ति प्रिव्हियसच्या विद्यार्थ्यांवर सध्यां करण्यांत आली असून हा प्रयोग यशस्वी होतांच बाकीच्या वर्गांतील विद्यार्थ्यांचाहि यांत समावेश होणार आहे. यांत क्यालिसथेनिस, जोडी, मलखांब, लाठी, वगैरे अनेक गोष्टींचा समावेश करण्यांत आला असल्याचें समजतें. यांत प्रो. आपटे हे उत्साहानें भाग घेत आहेत व इतर वर्गांतील विद्यार्थ्यांस सध्यांपुरतें

कांहीं विषयांचें शिक्षण द्यावयास लावून त्यांच्यांतहि या बाबतींचा उत्साह ओतण्याचा स्तुत्य प्रयत्न करीत आहेत. या प्रयोगास कोण यश चिंतणार नाहीं ?

शाळांतून शारीरिक शिक्षणाचा फैलाव व्हावा व तो देखील एकांगी नसावा म्हणून वाय. एम्. सी. चें शिक्षण घेण्यास येथून श्रीयुत नरवणे व नातु या पदवीधरांना पाठवून त्यांना निरनिराळ्या शाळांतून शिक्षक म्हणून ठेवून त्या पद्धतीचा इष्टानिष्ट परिणाम अजमावून पाहण्याचा प्रयोग देखील श्रीमंतांनीं चालविला आहे. साखर खा–मग ती देशी खा, कीं विदेशी खा–ती सदा गोडच लागावयाची. त्याचप्रमाणें व्यायाम घ्या, मग तो भारतीय पद्धतीचा का घ्याना, तो हवामानाप्रमाणें थोड्याबहुत प्रमाणांत का होईना पण फायदेशीर हा व्हावयाचाच. आणि या दृष्टीनें श्रीमंतांचा प्रयत्न स्तुत्य आहे. श्रीयुत नरवणे हे वारले आहेत. श्रीयुत नातु हे हायस्कूलमध्यें व श्रीयुत उपाध्याय हे कॉलेजमध्यें काम करतात.

याशिवाय कॉलेजचे विद्यार्थी हे हिंदविजय जिमखान्यांत अतिशय हौसेनें भाग घेतात हें नमूद करणें जरूर वाटतें.

बडोदा कॉलेज क्रिकेटच्या खेळाबद्दल आज बरींच वर्षें विख्यात आहे. रँडल कप, इंटर कॉलेजिएट शील्ड, धी महाराजा कप वगैरे अनेक चांगल्या बाक्षिसांसाठीं कॉलेज चुरशीचे सामने खेळलें आहे व त्यांत अनेक वेळां विजयीहि झालें आहे.

कॉलेजसाठीं टेनिस कोर्टें देखील चांगलीं आहेत. या कोर्टांवर विद्यार्थ्यांच्या उड्या असतात. खेळण्यास्तव नंबर लावण्यासाठीं आपआपसांत क्षणिक वादळें पण अनेक वेळां उद्भवतात. या खेळाबद्दल विद्यार्थ्यांना विशेष प्रेम दिसतें.

या शिवाय मुलींसाठीं म्हणून देखील कॉलेजमध्यें ब्याडमिंगटन, व्होली बॉल, पिंगपांग वगैरे अनेक खेळ ठेविले आहेत. मुलांच्या प्रमाणेंच मुली त्यांत मनापासून भाग घेतात

याशिवाय इंडियन गेम्स म्हणून निराळाच विभाग काढण्यांत आला आहे. त्यांतहि विद्यार्थी वर्ग थोडा बहुत भाग घेतो. या विभागांत खो-खो, आट्यापाट्या वगैरे हिंदी खेळ ठेविले असून हिंदी व्यायामाचीं उपकरणें ठेविलीं आहेत.

या शिवाय कॉलेजमध्यें हॉकी व फुटबॉल हे खेळ खेळण्याची सोय केली आहे. विद्यार्थी वर्ग त्यांतहि बऱ्यापैकीं भाग घेत असतो.

टेनिस खेळण्यास्तव कालेजचे विद्यार्थी व विद्यार्थिनीच हपापलेल्या असतात असें नव्हे. प्रोफेसर देखील तितकेच उत्सुक असून तितक्याच चुरशीनें या खेळांत भाग घेतात. यंदाच्या ज्युबिली प्रसंगीं तर प्रिन्सिपाल व प्रोफेसर यांनीं १०० यार्ड धांवण्याच्या शर्यतींत देखील भाग घेतला होता. अशा दृष्टीनें पाहतां कॉलेजचें वातावरण आनंदी व खेळकर आहे.

येथील 'ट्रेनिंग कॉलेज फार मेन' मध्यें व्यायामाची सोय केली आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. अशी सोय स्त्रीशिक्षण शाळेंत ट्रेनिंग कॉलेज फार वुइमेनमध्यें पूर्वीं होती. त्यावेळीं तेथें स्विडिश ड्रिल वगैरे शिकविली जात असे.

शाळा, कॉलेज यांमधून अशा रीतीनें शिक्षणाचा जरी शिरकाव झाल्यासारखा दिसत असला तरी शहरांतून ठिकठिकाणीं व्यायामशाळा स्थापून त्यांत सकाळीं व संध्याकाळीं, विद्यार्थीवर्गास मनमुराद शारीरिक शिक्षण घेतां यावें एवढ्यासाठीं महाराजांनीं व्यायामशाळांना ग्रँट देण्याचें ठरविलें, आणि त्याप्रमाणें मंत्रीमंडळाकडून हुकूमहि काढविले. असें करण्यांत महाराजांचा हेतु हाच कीं, जरी शाळा कॉलेजमधून शारीरिक शिक्षणाची सोय केली गेली आहे तरी शाळा कॉलेज भरण्याच्या वेळाच अशा कांहीं चमत्कारिक आहेत कीं, जरी विद्यार्थ्यांनीं त्याचा फायदा घेण्याचें ठरविलें किंवा त्यांना तसा फायदा घेण्यास भाग पाडलें तरी त्यांना त्यापासून पाहिजे तसा फायदा होईल कीं नाहीं शंकाच. कारण जेवून ११, ११-३० ला शाळेंत अगरे कॉलेजमध्यें जावयाचें व संध्याकाळीं थकून भागून ५ ला परत यावयाचें. हा सबंध ११ ते ५ चा वेळच मुळीं व्यायामांस सोइस्कर व इष्ट असा नाहीं. आणि यामुळेंच कदाचित शाळा कॉलेजमधून व्यायामाचें शिक्षण सक्तीचें करावयास महाराज अद्याप कांकूं करीत असतील. तें तसें असलें तर योग्यच आहे. एवढेंमात्र खरें कीं, कोणत्या तरी कारणानें शारीरिक शिक्षण हें सक्तीचें होऊं शकत नाहीं. शारीरिक शिक्षण आपल्या प्रजेंत फैलावें, त्याची गोडी आपल्या प्रजेस लागावी, त्याचीं मधुर फळें आपल्या प्रजेनें चाखावीं व आपली प्रजा सुदृढ, सतेज, आणि उत्साही असावी ही श्रीमंतांच्या अंतर्यामींची

कळकळीची इच्छा या मंत्री मंडळाचे हुकुमाचे द्वारें दिसून येते याबद्दल लवमात्र संशय नाहीं.

ता. ७. ९. १९२७ रोजीं मंत्रीमंडळानें नं. १४१. २११, व २७८ अनुक्रमें ता. २९. १०. २०, १६. ४. २५, व १५. ५. २६ चे दिवाण हुकुम एकत्र करून खालील प्रमाणें गोष्टी करावयाचें ठरविलें.

१. कोणत्याहि व्यायाम शाळेंत शिकविणारा शिक्षक नियमित काम करीत असला तर त्याला दरमहा २० रुपये मदत द्यावी.

२. व्यायामाच्या उपकरणांकरितां निम्मा खर्च प्रत्येक व्यायामशाळेस द्यावा, परंतु ही रकम रुपये ५० पेक्षां अधिक असूं नये.

३. व्यायामशाळा बांधण्यास्तव जितकी रकम खर्च झाली असेल त्याच्या निम्मी रकम मदत म्हणून द्यावी, परंतु ही रकम रुपये ५०० पेक्षां अधिक नसावी.

४. व्यायाम शाळेंत उजविल्या जाणाऱ्या उत्सवाप्रीत्यर्थ अगर तीतर्फे देण्यांत येणाऱ्या बक्षिसांखातर वार्षिक मदत रुपये २५ पर्यन्त करावी.

५. पोहण्यास्तव हौद बांधण्याकरितां रुपये ५०० पर्यंत मदत करावी.

ही जी अशा रीतीनें मदत द्यावयाची ठरली, तीसाठीं द्रव्यनिधी वर निर्दिष्ट केलेल्या तीन दिवाणहुकुमा अन्वयें साठविण्यांत आला होता. नं. १ च्या दिवाणहुकुमाद्वारें रु. ३,००० कायमनिधी म्हणून काढून ठेवण्यांत आले होते. नं. २ च्या दिवाणहुकुमाद्वारें बाललग्नप्रतिबंधक निबंधान्वयें जमा झालेल्या दंडाची रकम बाजूला काढून ठेवण्यांत आली होती. नं. ३ च्या दिवाणहुकुमान्वयें रु. २,५०० अनियमित मुदतीकरितां काढून ठेवण्यांत आले होते.

व्यायामशाळांना याशिवाय विद्याखातें देखील मदत करीत असतें. या खात्यानें व्यायामशाळांचे वर्ग १ ला, वर्ग २ रा, व वर्ग ३ रा असे तीन वर्ग कल्पून त्या प्रत्येकीस अनुक्रमें मासिक रु. १०, ८, व ५ याप्रमाणें द्यावे म्हणून ठरविलें आहे. इमारत बांधली असेल तर २५० चे दोन हप्ते म्हणजेच रुपये ५०० द्यावे असेंहि ठरविलें आहे.

प्रांत-पंचायतीनें देखील व्यायामशाळांचे असेच तीन वर्ग कल्पिले आहेत. व त्यांस अनुक्रमें १५, १० व ५ याप्रमाणें मासिक मदत करावीं असें धोरण

निश्चित केलें आहे. या शिवाय इमारत बांधली असल्यास वर्गाप्रमाणें रु. ५२५, ३५० व १७५ या प्रमाणें प्रांतपंचायत मदत करते. तसेंच बडोद्याच्या सुधराईकडून कांहीं आखाड्यांना ग्रँट मिळत आहे, त्याबद्दल आम्हीं त्यांचें अभिनंदन करतों.

याप्रमाणें मदत मिळत असलेल्या संस्थांची त्रोटक माहिती परिशिष्ट नं. १ मध्यें दिली आहे. आणखी अशाच व्यायामशाळा या योगानें निघून लोक व्यायाम करते होवोत, असाच या मदतीचा अर्थ आहे. महाराज याप्रमाणें आपणांकडून या बाबतींत खरोखरच मनापासून प्रयत्न करीत आहेत. परंतु लोकसंख्येच्या मानानें पाहतां या कामीं व्हावें तितकें द्रव्य खर्च होत नाहीं व कामाची विभागणीहि जशी व्हावयास पाहिजे तशी होत नाहीं. यामुळें महाराजांच्या इच्छेची पूर्ति व्हावयाचा दिवस विनाकारण लांब जात आहे.

वरीलप्रमाणें पैशाचा प्रवाह जरी गंगेप्रमाणें अव्याहत अभंग वहात नसला तरी प्रजाजनांचें कल्याण या भावनेचा प्रवाह श्रीमंतांच्या विशाल हृदयांत अभंग व अथांगपणें अव्याहत वहात आहे याबद्दल शंकाच नको. राज्यांतील मुल हुशार, नरतरीत, स्वावलंबी, सहनशील, प्रामाणिक, तैलबुद्धीची, धीट, स्वदेशाभिमानी आणि उत्तम नागरीक व्हावींत एतदर्थ हरप्रयत्न श्रीमंत सतत करीत आहेत. शाळा कॉलेज, व्यायाम शाळा या एवढ्यांवरच श्रीमंत थांबले नाहींत. आपल्या राज्याचे भावी आधारस्तंभ जीं हीं आजचीं मुलें त्यांच्यांत वरील गुणांचा वाढता विकास होण्यासाठीं त्यांनीं आपल्या येथें स्काउटिंग सुरू केलं आहे. या स्काउटिंगच्या संस्थेची नीट व्यवस्था लागावी म्हणून तिची जोड त्यांनीं शाळाखात्याशीं घालून दिली आहे.

या स्काउटिंगचा उद्देश फक्त कवायती वगैरेंत मुलगा तरबेज करावयाचा इतकेंच नसून, त्याला ' क्यांप ' जीवन, स्काउटच्या युक्त्या, सिग्नलींग, घोड्यावर बसणें, आकस्मिक समयीं मदतीचें काम, आग विझविण्याचें काम, पोहणें, गलबतें हांकणें, निरनिराळ्या प्रकारचे हिमतीचे खेळ खेळून त्याच्यांत अष्टपैलूपणा आणणें हा आहे. याशिवाय तेथें त्याला आरोग्याबद्दल खास स्वतंत्र शिक्षण दिलें जातें.

या संस्थेंत या राज्यांतल्या शाळेंत जाणाऱ्या वयाच्या मुलास दाखल करण्यांत येतें. यांत ज्या तुकड्या आहेत त्यांतील पहिल्या तुकडीचें ' हिज

हायनेस दी महाराजा गायकवार्स ओन बॉय स्काउटस ' असें थाटांत नांव आहे. हें नांव सर्वांसच अतिशय प्रिय असून त्या ट्रुपमध्यें दाखल होण्याचा प्रत्येकाचा प्रयत्न असतो. या तुकडीला सरकारांतून युनिफार्म मिळतो.

याप्रमाणें बायस्काउट ऑरग्यानिझेशन काढून त्याच्याकरितां निरनिराळे अंमलदार नेमण्यांत आले आहेत. स्काउटिंगवर आज पावेतों एकंदर रु. २,००,००० वर खर्च झाले आहेत. हल्लींचे स्काउट कमिशनर श्रीयुत भानुप्रसाद दवे हे असून त्यांना दोन असिस्टंट देण्यांत आले आहेत.

अशा रीतीनें आपल्या राज्याचे भावी आधारस्तंभ मजबूत व्हावेत म्हणून महाराजांचे ज्याप्रमाणें प्रयत्न आहेत त्याचप्रमाणें ज्यांच्या हातांत प्रत्यक्ष सत्ता देऊन प्रजेचें हित साधण्याची ज्यांच्यावर जबाबदारी टाकण्यांत आली आहे असा जो आपला अधिकारी वर्ग हा देखील आरोग्यवान, बलवान, बुद्धिमान व तरतरीत रहावा यास्तव श्रीसयाजीविहारक्लब या संस्थेसारखी संस्था देखील श्रीमंतांनीं स्वप्रोत्साहनानें चालू ठेविली आहे. या क्लबमध्यें अधिकारी सायंकाळीं टेनिस वगैरेसारखे खेळ खेळून व्यायाम घेऊन आपली शरीरप्रकृति चांगली ठेवण्याचा प्रयत्न करतात. यांच्या या खेळांचे सामने देखील अनेकवार होत असल्यानें त्यांचा खेळण्याचा उत्साह अद्यापपर्यंत वाढतच राहिला आहे. तेवढ्यांतल्या तेवढ्यांत करमणूक म्हणून क्लबमध्यें पत्ते, केरम, बिलीअर्डस वगैरेसारखे खेळहि ठेविले आहेत. याचेंच अनुकरण प्रांतोप्रांतीं व मोठमोठ्या गांवीं केलेलें आढळतें.

याशिवाय या वर्गास मर्दानी खेळांची विस्मृति होऊं नये म्हणून या वर्गास घोड्यावर बसतां येणें हें फार्जियाद केलें आहे. यांत महाराजांनीं आप्तेष्ट, सरदार-दरकदार, मानकरी यांना देखील गोंविलें आहे. वास्तविक हल्लींचा काळ लढाईवर चढाई करून जाण्याचा नाहीं, तर हें युग मोटारींत बसून आरामसें फिरण्याचें आहे. तेव्हां या लोकांनीं अगदींच सुस्त बनूं नये व प्रकृतिस्वास्थ्य बिघडवून घेऊं नये एवढ्याच भावनेनें हा विषय त्यांनीं याप्रमाणें सक्तीचा केला आहे.

या गोष्टींस आणखी पुष्टि मिळावी म्हणून महाराजांनीं सुभ्याच्या पायरीच्या अंमलदारास दरबारप्रसंगीं तलवार बाळगणें हें देखील सक्तीचें केलें

आहे. यावरून महाराजांची दृष्टि शारीरिक शिक्षणाच्या बाबतींत किती खोलवर पोहोंचली आहे हें दिसतें.

महाराजांना नेहमीं वाटतें कीं, आपल्या सान्निध्यांत असणारा इसम देखणा, हुशार, तरतरीत, व सर्वांत तरबेज असा असावा. मनुष्य नोकरींत घेतांनाच महाराज याकडे बारकाईनें लक्ष देतात. साधारण अंमलदाराविषयीं जर एवढी चिकित्सा, तर त्यांच्या ए. डी. सी. विषयीं तर ही अधिकच असणार. कारण तो त्यांचा शरीरसंरक्षक म्हणून अगदीं नजीक चोविस तास राहणार. शरीरसंरक्षक नुसताच देखणा व तरतरीत असून उपयोगी नाहीं. तो प्रसंगीं दुसऱ्याचें संरक्षण करूं शकेल असा पाहिजे. पूर्वीं या शरीरसंरक्षकाची निवड मानकरी वर्गांतून होत असे, परंतु आतां ती लष्करी अंमलदारांमधून होते.

सार्वजनिक हिताच्या दृष्टीनेंहि महाराजांनीं चांगलाच विचार केला आहेसें दिसतें. जनतेंत या विषयाची गोडी उत्पन्न व्हावी एतदर्थ आरोग्यप्रदर्शनें भरविणें हें त्यास आवश्यक वाटतें. व त्याप्रमाणें निरनिराळया ठिकाणीं निरनिराळया वेळीं ते तीं भरवितात. कांहीं उद्घाटनसमारंभ लोकांच्या उत्साहवर्धनास्तव ते स्वतः करतात. प्रदर्शनांपैकीं मोठीं प्रदर्शनें म्हणजे सन १९१५ व १९२१ या सालीं भरलेलीं होत.

या विषयाचा नीट विचारविनिमय होऊन शेवटीं अधिक फैलाव कसा करतां येईल ह निश्चित करण्यासाठीं महाराजांनीं निरनिराळया समित्या नेमून या बाबतींतील आपले प्रयत्न अहर्निश चालूच ठेविले आहेत.

प्रथमतः १९१० सालीं या राज्यांत सत्त्वविचारक समिती नेमिली गेली. तिचा उद्देश हाच कीं, मुलांमुलींच्यांत जीवनसत्त्व हल्लीं किती प्रमाणांत आहे तें पाहाणें व त्यांचीं दुर्बल झालेलीं शरीरें कोणत्या उपायांच्या योगें नीट करतां येतील हें ठरविणें. त्यावेळीं समितीच्या बैठका होऊन त्यांत शास्त्रीय पद्धतीनें शिक्षण देण्याकरितां युरोपमधून या विषयाचा एक तज्ज्ञ आणावा म्हणून ठरलें. परंतु पुढें लगेंच महायुद्धाचा वणवा पेटल्यानें अशा तऱ्हेचा तज्ज्ञ कोणी इकडे येऊं शकला नाहीं.

त्यानंतर १९२० सालीं दुसरी एक समिती प्रिन्सिपाल क्लार्क यांच्या अध्यक्षतेखालीं नेमण्यांत आली. या समितीचें काम शाळेंत शिक्षण घेणाऱ्या

मुलांमुलींचीं शरीरें सुधारण्यास काय केलें पाहिजे हें पाहाण्याचें होतें. या समितीनें आपल्या अहवालांत कांहीं सूचना केल्या होत्या व समितीच्या एक सभासद मिस म्याकडोनल्ड यांनीं त्याप्रमाणें एक पुस्तक लिहून तें मुलांमुलींच्या उपयोगाखातर शाळांतून चालविण्याबद्दल शिफारस केली होती. या सर्वांचें पुढें काय झालें तें निश्चित सांगतां येत नाहीं.

आतां नुकतीच आणखी एक शारीरिक समिति नेमली गेली होती. तिच्या पुढें खालीलप्रमाणें विषय विचारार्थ ठेवण्यांत आले होते:—

१. ज्या व्यायामशाळांतून शिक्षक दिले गेले आहेत व ज्यांतून दिले गेले नाहींत त्या व्यायामशाळांतील कामाचें धोरण कसें असावें.

२. शाळांतून दिल्या जाणाऱ्या व्यायामविषयक शिक्षणास वेळ कोणती असावी.

३. व्यायाम शिक्षकांचे पगार व त्यांच्या श्रेणी कशा असाव्यात.

४. व्यायाम शिक्षकाचें शिक्षण कोठें व कशा पद्धतीनें व्हावें.

या समितीचा अहवाल लवकरच बाहेर पडणार आहे.

प्रजाजनांचें आरोग्य या विषयाचा महाराजांनीं पूर्णपणें अभ्यास केल्यासारखें दिसतें. त्यांनीं प्रजाजनांचें आरोग्य कायम कसें रहावें व तें कसें सुधारावें एवढ्याच गोष्टींचा विचार केला नाहीं. व्यायाम करून आरोग्य कायम ठेवावें व व्यायाम करून तें सुधारावें हें बरोबर. परंतु व्यायाम करण्यालायकच शरीर नसलें, तें रोगानें जर्जर झालें असलें, व व्यायाम हा त्यावर उपाय नसला तर काय करावयाचें याची देखील महाराजांनीं तरतूद करून ठेविली आहे. रोगी लोकांना रोगमुक्त करण्यासाठीं त्यांनीं राज्यांतून सर्व ठिकाणीं लहान मोठीं रुग्णालयें स्थापून रोगपीडितांस हंसतमुख केलें आहे. बडोद्याच्या स्टेट जनरल हॉस्पिटलमध्यें तर बडोदें राज्यांतीलच लोक येऊन बरे होऊन जात नाहींत तर प्रथम मुंबई इलाख्यांतील मोठमोठे दवाखाने व डॉक्टर अनुभवून मग येथें येऊन दुवा देऊन जाणारे अनेक लोक आहेत. ही प्रजाजनांची काळजी अतुल आहे.

महाराजांच्या विचाराची पायरी याच्याहि पुढें गेली आहे. रोग झाल्यानंतर त्यावर उपाय योजणें हें तर ठीक आहे, परंतु तो मुळीं होऊंच न देण्यास्तव

उपाययोजना केली तर ? आणि महाराजांनीं असे रोगप्रतिबंधक खास इलाज योजिले आहेत व जे योजिले आहेत ते देखील अगदीं नाविन्यपूर्ण.

पूर्वीं बडोद्यास शिमग्याचे सणांत शेंकडों तमासगीर लोक आपआपले तमाशे घेऊन येत असत. या तमाशांची रीतसर हजेरी असे. या हजेरीनंतर जुन्या-राजवाड्यांत फौजदार या तमाशांची वांटणी करीत. यांत देखील मानपान असे. वाटेल त्यानें वाटेल तितके तमाशे करावे असें नाहीं. सर्व सरदार दरक-दारांचे दिवस नक्की होत. कोणाकडे पांच दिवस, तर कोणाकडे दहा दिवस, तर कोणाकडे त्याहून अधिक, याप्रमाणें चुरशीनें हा बीभत्सोत्सव चाले. सरकारवाड्यांत अर्थात् हा गोंधळ अधिक काळ व कदाचित अधिक प्रमाणांत चाले. हे प्रकार पाहण्यास लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटत. त्यांत मग गरीब श्रीमंत हा भेद रहात नसे. हा पैशाचा अपव्यय व आरोग्याचा खून महाराज साहेबांनीं एकदम थांबविला. अशा रीतीनें होळीची दिवाळी करण्याचा महाराजांचा प्रयत्न पाहून कुणास कृतज्ञता वाटणार नाहीं ?

ज्याप्रमाणें महाराजांनीं तमाशे बंद केले त्याचप्रमाणें बालविवाहापासून उत्पन्न होणारे अनर्थ पाहून त्यांवरहि घाव घातला. याप्रमाणें हीं मुलामुलींचीं कोवळया वयांत होणारीं लग्नें बंद करून दरिद्री आईबापांची वाढ व पाप्याच्या पितरांचें जनन थांबविलें आहे. एवढें करून त्यांनीं तर भावी पिढीचे शतशः धन्यवाद मिळविले आहेत. ही विघातक गोष्ट मुळांतूनच काढून टाकण्यांत महाराजांनीं खरोखर अत्यंत दूरदृष्टि दाखविली आहे; परंतु ही त्यांनीं केलेली गोष्ट समजून तिचा फायदा करून घेणें न घेणें हें शेवटीं प्रजाजनांचेच हातीं राहतें. याला महाराज किंवा दुसरें कोण काय करणार ?

याप्रमाणें प्रजाजनांच्या शारीरिक उन्नत्यर्थ सर्व बाजूंनीं प्रयत्न करीत असतां श्रीमंत महाराजसाहेब यांचें लक्ष स्त्रीवर्गाच्या अवनत शरीरयष्टीकडे गेलें नसतें तरच आश्चर्य. मातांची सुदृढता हीच राष्ट्राची संपन्नता, या तत्त्वाचे महाराजसाहेब पुरस्कर्ते आहेत. राष्ट्राची खरी सूत्रधार माताच आहे घरीं राहून ती जी कामगिरी बजावीत असते त्याची संपूर्ण जाणीव राष्ट्रपुढाऱ्यांना असते; कारण त्यांच्या स्वतःच्या अभ्युदयी जीवनाचें सारसर्वस्व त्यांची माताच असते ही गोष्ट ते कधींहि विसरूं शकत नाहींत. महाराजांच्या जीवनांतील सर्व आश्चर्यदायी परिवर्तनांची गुरुकिल्ली देखील पडद्याआड राहूनच श्रीमंत महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं फिरविली आहे, हें महाराजांच्या दृष्टीआड

नाहीं. आणि म्हणूनच महाराज व मातोश्री सौ. महाराणीसाहेब हे उभयतां स्त्रियांच्या शारीरिक व मानसिक विकासाकडे कळकळीनें पहात असतात.

प्रतिवर्षी उजविण्यांत येणारा 'बेबी वुइक' हें याचेंच उदाहरण आहे. आयांनीं स्वतः कसें रहावें व आपल्या चिमुकल्यांचें कसें संगोपन करावें व तद्द्वारें उभयतां माता व बालक यांनीं कसें आरोग्यसंपन्न व्हावें हें शिकविणें हाच या बेबी वुइकचा उद्देश होय. यांत सुदृढ बालकांना बक्षिसें देण्यांत येवून त्यांच्या सुदृढ आयांना त्या उभयतांनीं सदैव असें सुदृढ रहावें म्हणून प्रोत्साहन देण्यांत येत यांत आयांना स्वतःच्या प्रकृतीची व आपल्या अर्भकाच्या प्रकृतीची कशा रीतीनें काळजी घ्यावी ह नाना तऱ्हेच्या आकर्षक उपायांनीं दाखविण्यांत येतें. या बेबी वुइककडे सर्व स्त्रीसमाजाचें औत्सुक्यपूर्ण लक्ष असतें.

दुसरी एक महत्त्वाची संस्था म्हणजे 'श्री महाराणी चिमणाबाई म्याटरनिटी लीग.' ही संस्था गरीब बायांच्या बाळंतपणाच्या वेळीं त्यांना पैसा व कपडे देऊन त्यांचें शारीरिक सौख्य संभाळीत असतें. याशिवाय स्वच्छता व आरोग्य यांचा अन्योन्य संबंध अशिक्षित स्त्रियांचे मनावर ठसविण्यासाठीं व्याख्यानें वगैरे देवविते. आणि गल्लोगल्लीं स्वच्छता ठवविण्याकरितां दर आठवड्यास फिरतीवर निघत असते.

तिसरी खास स्त्रियांचेसाठीं म्हणून काढलेली संस्था म्हणजे श्रीमहाराणी विहार क्लब ही होय. श्रीसयाजी विहार क्लबची ही सख्खी बहीण. या विहार क्लबमध्यें घरंदाज स्त्रियांच्या आरोग्याकडे सयाजी विहार क्लबप्रमाणेंच जवळजवळ लक्ष दिलें जातें.

श्री महाराणी क्लबप्रमाणेंच परंतु सर्वसाधारण स्त्रियांना देखील ज्यांत मनमोकळेपणानें भाग घेतां येईल अशी भगिनीसमाज नांवाचीहि संस्था आहे. स्त्रीवर्ग या संस्थेंत बराच उत्साहानें भाग घेत असतो. प्रदर्शनांत वगैरे सर्व जाहीर कार्यक्रमांत व चळवळींत या संस्थेचा नेहमीं पुढाकार असतो. चांगल्याचांगल्या वक्त्यांचीं व्याख्यानें ठेवून स्त्रीवर्गाच्या शारीरिक व मानसिक उन्नतीस्तव ही संस्था खास प्रयत्न करीत असते. मधून मधून उपवन संमेलन देखील भरवून ही स्त्रीवर्गांत नवचैतन्य व नाविन्य उत्पन्न करीत असते. या असल्या कार्यक्रमाचेयोगें स्त्रियांना मोकळया हवेवर मन-

मोकळेपणानें वागण्याची सुंदर संधि मिळते व म्हणून स्त्रीवर्ग याचा लाभ फार आनंदानें घेतो. रोजच्या एकच एक ठराविक दिनक्रमांत असा उत्साह-दायी फरक अवश्य असतो.

मुलींना खास व्यायामाची गोडी लावण्याचें काम तीनचार संस्था करीत आहेत. त्यांपैकीं विशेष प्राधान्य देतां येईल अशी कै. शंकरराव माधवराव दिघे व त्यांच्या धर्मपत्नी श्रीमती मनोरमाबाई दिघे यांनीं स्थापिलेली कन्या-आरोग्यमंदिर ही संस्था होय. हींत मुलींना उपयुक्त असे नाना तऱ्हेचे व्यायाम व मनोरंजक खेळ शिकविण्यांत येतात. ही संस्था १९१५ त स्थापन झाली. श्रीमंत मा. सौ. महाराणीसाहेबादि राजघराण्यांतील सर्व मंडळी या संस्थेवर सदैव लोभ ठेवीत आली आहेत. लेडी इरविन व लेडी विलिंगडन यांनीं देखील या संस्थेचीं कामें पाहिलीं असून त्यांबद्दल अत्यंत संतोष व्यक्त केला आहे. या संस्थेंत लाठी, लेझीम, जोडी, आसनें, फारिगद्गा, भाला, हाता-पायाचे व्यायाम, जांबिया वगैरे अनेक स्वसंरक्षक व शरीरारोग्यवर्धक खेळ शिकविण्यांत येतात. हे सर्व शिकण्यासाठीं महाराणी गर्ल्स हायस्कूलच्या वसतिगृहांतील सर्व मुली जातात. याशिवाय या संस्थेंत बौद्धिक शिक्षणहि देण्यांत येतें. संस्थेच्या चिटणीस सौ. वसुमती धारकर बी. ए. या आहेत.

आर्य कन्या महाविद्यालय ही संस्था देखील कन्या आरोग्य मंदिराचे धर्तीवरच कामें करून व हिंदुस्थानांत दौरे काढून शारीरिक शिक्षणाचा प्रसार ठिकठिकाणीं करीत आहे. या संस्थेचें चालकत्व पंडित मास्टर आत्मारामजी व त्यांचे पुत्र पंडित आनंदप्रियजी व शांतिप्रियजी यांचेकडे आहे. या दोन्ही संस्था शारीरिक शिक्षणाचें काम जुम्मादादा व्यायाम मंदिर या संस्थेच्या सल्याप्रमाणें करीत आहेत.

याशिवाय बॉय स्कॉउटची जशी चळवळ आहे तशी मुलींसाठीं पण गर्ल गाइडची आहे. हिचा उद्देश व ध्येय एकच असल्यानें मुलांचे व मुलींचें दोघांचेंहि कल्याण साधण्यांत श्रीमंताचें मन कसें सदैव गुंतलेलें आहे, हें यावरून पहावयास सांपडतें.

उंची पोळ शिवाजी मंडळ—स्त्री शाखा ही संस्था उंचा पोळ शिवाजी मंडळ यांनीं काढली असून त्यांत मुलींना व्यायाम व खेळ हे शिकविण्याची सोय केली आहे. याची व्यवस्था व देखरेख श्रीमती सौ. रमाबाई किनी यांचेकडे आहे.

मुलींच्या शारीरिक उन्नत्यर्थ महाराणी गर्ल्स हायस्कूलमध्यें सुद्धां नाना-तऱ्हेची कवायत, टेनिस, ब्याडमिंगटन, व्हाली बॉल, खो–खो, आट्यापाट्या वगैरे अनेक विदेशी व देशी खेळ शिकविण्यांत येतात व या सर्वांत मुली फारच आनंदानें भाग घेतात.

याशिवाय हिंदविजय जिमखाना तर खास स्त्रियांसाठीं प्रतिवर्षी टुर्नामेन्ट्स भरवीत असतो व राजदंपति यांत मोठ्या आनंदानें मदत करीत असते. या त्यांच्या प्रोत्साहनाच्या योगें या टुर्नामेन्ट्समध्यें भाग घेणाऱ्या स्त्रियांची संख्या प्रतिवर्षी वाढतच आहे. अशा रीतीनें या जिमखान्यांत खास स्त्रियांसाठीं त्यांचा मनमोकळेपणा वाढावा व खेळाबद्दलची त्यांची आवड तीव्रतर व्हावी म्हणून मुद्दाम स्वतंत्र विभाग पाडण्याचें सर्व श्रेय श्रीमंतांनाच आहे हें विसरतां कामा नये.

स्त्रियांचें शरीरारोग्यासाठीं दुसऱ्या कोणत्या ठिकाणीं एवढी काळजी घेण्यात येते ?

श्रीमंत महाराजसाहेब यांनीं स्वतः व्यायामाबद्दल दाखविलेली आवड, तीच आवड राजघराण्यांत उत्पन्न करण्यांत त्यांनीं दाखविलेली काळजी, तिचाच आप्तेष्ट, सरदार, दरकदार, मानकरी यांमध्यें त्यांनीं केलेला शिरकाव, तिचींच प्रजाजनांचे ठायीं छाप बसविण्यासाठीं त्यांचे प्रयत्न, तिचेंच स्त्रियांचे ठायीं बीज रुजविण्याची त्यांची उत्सुकता या गोष्टी पाहिल्या म्हणजे महाराजांचा परप्रांतीं पडलेला प्रभाव व प्रजाजनांची त्यांचे ठायीं असलेली प्रेमपूर्ण भक्ति यांचा बोध होतो. याच्याहि पुढची अजून एक पायरी सांगावयाची राहिली आहे व ती ही कीं, श्रीमंत महाराजसाहेब यांनीं या बाबतींत केलेले हे अने-कविध प्रयत्न जरी इतक्याच गोष्टींवरून स्तुत्य असले तरी, या सर्व प्रयत्नांचे मागें त्यांनीं कधींहि दृष्टीआड न केलेली अशी त्यांची जी भारतीय दृष्टि आहे ती या सर्वांना कळस म्हणून शोभण्याजोगी आहे. कोणतेंहि कार्य अंगीकृत करतांना त्यांची ही दूरदृष्टि लक्षपूर्वक पाहणाराच्या तेव्हांच लक्षांत येते. जी कांहीं गोष्ट करावयाची ती अखिल भारतदेशास भूषणभूत होईल अशा रीतीनें करण्यांत त्यांना एक प्रकारचा सात्त्विक आनंद होत असतो, असें त्यांच्या अनेकविध नाविन्यपूर्ण सुधारणांकडे पाहिलें असतां खात्रीपूर्वक वाटावयास लागतें. या आनंदाची लयलूट त्यांनीं आजपर्यंत अनेक गोष्टी-

द्वारां करून घेतली आहे. तेव्हां या एकाच बाबतींत ते तशी करावयास कसें विसरतील ?

मरहूम महाराणी व्हिक्टोरिया यांचे कारकीर्दीत युरोपमध्यें एक अतिशय मोठें प्रदर्शन भरलें होतें. त्या प्रदर्शनाचे प्रसंगीं श्रीमंत महाराजसाहेब यांनीं आपले पटेगिरी गुल्लुमिया यांचे आखाड्यांतील चतुर खेळाडू पाठविले होते. या लोकांचे तेथें झालेले खेळ पाहून महाराणी व्हिक्टोरिया अत्यंत खूष झाल्या व सहा महिने या मंडळीस तेथें मुद्दाम ठेवून घेतलें. ही मंडळी परत आल्यावर त्यांना पुन्हां एका प्रसंगीं खास बोलावून घेऊन श्रीमंत महाराजसाहेबांनीं अशीं चांगली माणसें स्वतःच्या पदरीं ठेवून घेण्यांत जी गुणग्राहकता दाखविली तीबद्दल त्यांचें कौतुक केलें.

पट्टेगिरीचा आखाडा व युरोपांत सुवर्णपदकें मिळविणारी नशीबदार मंडळी यांची नांवें खालीलप्रमाणें:—

१. जमादार सैदुमिया. २. बबेराव नांदलेकर. ३. माधवराव नांदलेकर.

४. अल्लामिया. ५. लालमिया अकबर. ६. नथुराव खडद्दे.

जमादार सैदुमिया तर आज एक स्वतंत्र आखाडा चालवून आपल्या अनुभवाचा व विद्येचा प्रसार करीत आहेत.

१९२५ सालीं प्यारिस शहरीं ऑलेम्पिक गेम्स झाले. तेथें हिंदुस्थानांतील उत्तमोत्तम खेळाडू पाठवावयाचे होते व त्या उत्तमोत्तम खेळाडूंची निवड करण्यासाठीं दिल्ली येथें ऑल इंडिया ऑलेम्पिक कमेटी मार्फत लॉर्ड रीडिंग, त्यावेळचे व्हाइसराय, यांचे अध्यक्षतेखालीं ता. ८–१२–२४ रोजीं खेळ व्हावयाचे होते. या ऑल इंडिया बेस्टमध्यें आपल्या बडोद्याचे कांहीं बेस्ट दाखवावे अशा हेतूनें श्रीमंत महाराजसाहेबांनीं जुम्मादादा व्यायाम मंदिरांतून १७ विद्यार्थी रु. १,००० खर्च करून पाठविले. तेथें या विद्यार्थ्यांच्या कामाचा काय प्रभाव पडला हें त्यावेळच्या वर्तमानपत्रांतील खालील उताऱ्यावरून नजरेस येईल:—

"Between the programme a team from Baroda State gave a fine display of Lathi Drill, which was very artistic and was exhibited with great skill."

The Baroda State wrestlers consisting of a troop of young boys gave a very clever exhibition of stick and sword play as well as of indigenous physical activities. They formed a great attraction there at the Delhi meet."

—*The Indian Daily Mail.*

"During the progress of the field events a team of 15 stalwart Indian athlets from the famous Baroda Akhada put on a demonstration of indigenous physical activities that added greatly to the general success of the sports. That India has made a notable contribution to the cause of physical education by evolving a series of beautifully co-ordinated exercises, based largely on religious practices and radically different from anything in the West, is a fact not generally known. The European spectators were particularly impressed by the novel display of Lathi, Lakdi, Firang, Malkhamb and Lezim."

A. S. NOEHREN. M. D.

*Secretary, All Indian Olympic Crmmittee.*

शेवटच्या दिवशीं ज्या वेळीं मार्चपास्ट झाला. त्यावेळीं ही गायकवाड टीम भगवा झेंडा घेऊन सर्वांत अघाडीस होती. व्हाइसराय, लेडी रीडिंग यांचे समवेत महाराजसाहेब व सर मनुभाईहि हजर होते. अघाडीस असलेली ही गायकवाड टीम भगव्या झेंड्यासह लष्करी शिस्तींत जात असतां जेव्हां तिचे व्हाइसरायांना नमन होतांच तिनें महाराजांना प्रणाम केला त्यावेळीं व्हाइसरायांनीं जवळ बसलेल्या महाराजांकडे हंसत पहात म्हटलें कीं, तुमची ही टीम हिंदुस्थानास खरोखर भूषणभूत आहे.

सन १९२७ मध्यें मुंबईस जेव्हां स्काउटसूची जांबुरी भरली त्यावेळीं बडोद्याची व नवसारीची मिळून ५४ स्काउट मंडळी स्टेट खर्चानें पाठविण्यांत आली. या जांबुरींत बडोदा स्काउट्सनीं चांगलें नांव काढलें होतें. आणि म्हणूनच जेव्हां सन १९२९ मध्यें स्काउट्सची आल वर्ल्ड जांबुरी इंग्लंडमध्यें भरली त्यावेळीं तेथें जाणाऱ्या सर्व स्काउट्सना निम्मे खर्च देऊन

पाठविण्याचें बडोदा दरबारनें ठरविलें असतांहि गेलेल्या १० स्काउट्सनीं तेथें पाडलेली चांगली छाप पाहून श्रीमंतांनीं या सर्वांचा सर्व खर्च मंजूर केला.

श्री. नंदनाथ केदारनाथ दीक्षित विद्याधिकारी असतां महाराजांनीं हिंदविजय जिमखान्यास प्रतिवर्षी रु. १,००० ग्रँट म्हणून देण्याचें ठरविलें. पुढें तीन वर्षांनीं श्रीयुत भाटेसाहेब यांचे कारकीर्दींत ही ग्रँट रु. २,००० केली व आतां त्यांनीं या जिमखान्यास अखिल भारतीय स्वरूप दिलें आहे. महाराजांचा या बाबतींतील उत्साह व त्यांच्या डोळ्यापुढें सदैव असलेली ही भारतीय दृष्टि या वर दिलेल्यापैकीं केवळ एकाच गोष्टीवरून देखील पटण्यासारख्या आहेत.

शिवाय महाराजांची अखिल भारतीय दृष्टि त्यांनीं आमच्याकडून करवून घेतलेल्या आरोग्यमंदिर या योजनेनेंहि विशद होते. महाराजांनीं ही योजना तयार करावयास सांगून बराच काळ झाला. ती अमलांत येण्यास मध्यंतरीं काय अडचणी आल्या यांची आम्हांस कल्पना नाहीं. परंतु ती महाराज अद्याप विसरले नसावेत खास.

महाराजांचे आज्ञेनुसार कप्तान बस्तीसिंह चौहान, बी. ए. व श्रीयुत शंकर मोरो रानडे, बी. ए. यांनीं सन १८९२ मध्यें पदातिव्यायाम म्हणजे पायदळ पलटणीची कवायत नांवाचें पुस्तक लिहिलें. या पुस्तकाचे योगें कवायतीचे हुकमी शब्द मराठी मिश्र संस्कृतांत तयार झाले.

काळ बदलत गेला व महाराजांचा ओघहि पुढें पुढेंच धांवत गेला. मध्यें जेव्हां कुस्त्यांचा दंगल महाराजांचे आज्ञेनुसार महाराजा थिएटर मध्यें भरला त्या वेळीं तेथें जुम्मादादा व्यायाम मंदिराची लाठीहि ठेवण्यांत आली होती. लाठी संपतांच महाराजांनीं संस्थेस एक सुवर्ण पदक देऊन आम्हांस बोलावून सांगितलें कीं, मला तुमचे हे हिंदी हुकूम फार आवडले. ते लहान, आटोपशीर असून फारच जोरदार आहेत. कवायत देखील या अशाच हिंदी हुकमांत व्हावयास पाहिजे, नाहीं ? तुम्ही ते आम्हाला करून दाखवा. महाराजांच्या या आज्ञेनुसार आम्हीं कवायतीचे हिंदी हुकूम तयार केले असून राष्ट्रीय सभेनें त्यांची अमलबजावणी देखील अखिल भारतवर्षांत केली आहे. हे बोल तयार होण्याचें सारें श्रेय महाराज व त्यांची भारतीय दृष्टि यांसच आहे. हिंदी बोल हिंदुस्थानां-

तील कोणत्याहि भागांत सहजगत्या समजले जातात व एकराष्ट्रीयत्वाची भावना जनहृदयावर ते सारखी अधिकाधिक खोल रुतवीत राहतात. या एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेचा खुंट अशा रीतीनें भक्कम करावयाचा प्रयत्न करण्यांत महाराजांनीं स्वतः आपण जगाच्या पुढें अनेक वर्षें आहोंत असें दर्शविलें आहे व तें सर्वमान्यच आहे. राष्ट्रनेते राष्ट्रीय भावना सदैव उराशीं बाळगीत असल्यानें ते आपोआपच अशा रीतीनें जगाच्या पुढें असलेले दिसतात, यांत नवल तें काय ?

जेव्हां जेव्हां संधि आली तेव्हां तेव्हां महाराजांनीं मल्लविद्येचा गौरव केला आहे.

सन १९०४ मध्यें जेव्हां स्यांडो हिंदुस्थानांत आले त्या वेळीं त्यांस खास बडोद्यास बोलावून त्यांच्या बडोदा कॉलेजमधील ४५ मिनिटांच्या व्याख्यानासाठीं ४,५०० रुपये खर्च करणारे आपलेच महाराज होत.

यंदा देखील जगविख्यात पहिलवान गामा यांस त्यांच्या २१ पहिलवानांसह मोठ्या इतमामानें बडोद्यास ठेवून घेऊन लार्ड विलिंग्डनांसमोर त्यांची ७ पहिलवानांसमवेत कुस्ती करविणारे आपलेच महाराज होत.

याच गामाजींचे राजवाड्यांत सर्व बड्याबड्या लोकांना एकविण्यासाठीं व त्यापासून बोध घेण्यासाठीं भाषण करविणारे आपलेच महाराज होत.

याच महाराजांचें तालमींत तयार झालेल्या प्रजाजनांनीं गुणीजनांचा गौरव कसा करावा यांचें उदाहरण या गामाजींची जंगी मिरवणूक काढून त्यांचा जाहीर रीतीनें मोठा सन्मान करून सोडवून दाखविलें.

व्यायामाचा गौरव करावयाची महाराजांची हौस एका छोट्या उदाहरणानें मोठ्या प्रमाणांत पटण्यासारखी आहे. व्यायामक्षेत्रांत आम्हीं जी कांहीं यथाशक्ति सेवा बजाविली आहे ती पाहून श्रीमंतांनीं आमचा उत्साह वाढविण्यासाठीं आम्हांस राजरत्न पदवीचा बहुमान देऊन सर्व प्रजाजनांस त्या क्षेत्रांत काम करावयासाठीं जणुं आमंत्रणच दिलें आहे.

थोडक्यांत महाराजांनीं स्वतः बालपणीं व तरुणपणीं नियमितपणें सर्व प्रकारचे देशीविदेशी व्यायाम करून आपलें स्वतःचें शरीर सुंदर, डौलदार व सतेज करून घेतलें व म्हणून आज या वयांत देखील

ते सदैव उत्साहभरित असतात. सतत काम करणें त्यांना आवडतें, व म्हणूनच ते सारखे काम करीत असतात. ते म्हणतातच कीं, "एका कामाची कांहीं काळ पावेतों मुद्दाम ठेवलेली विस्मृति म्हणजेच विश्रांति. आणिक विश्रांति ती काय असावयाची." अशी विश्रांति घेतल्यानंतर त्यांना दुसरें काम नव उत्साहानें हातीं घ्यावयास कांहींच अडचण पडत नाहीं. या योगें सर्वसाधारणपणें जी विश्रांति म्हणून समजली जाते ती त्यांना आजपावेतों कशी ती मिळालीच नाहीं म्हटलें तरी चालेल व म्हणूनच त्यांनीं एकदां थट्टेनें उद्गार काढले होते कीं, मला जर माझें आयुष्य पुन्हां पहिल्यापासून सुरू करावयास मिळालें तर पहिल्यानें मी विश्रांतीचा काळ आधीं नक्की करून तो बाजूला काढून ठेवीन व त्याचा अवश्य पूर्णोपभोग घेईन. अशा या विलक्षण विचारसरणीमुळेंच महाराजांना स्वस्थ असे बसलेले पाहिलेले कुणाच्याच आठवणींत नाहीं. ही कार्यक्षमता अंगीं येण्यास नियमित व्यायाम हीच गुरुकिल्ली अशी महाराजांची भावना आहे व हे त्यांनीं प्रत्यक्ष स्वतःच्या उदाहरणानें सिद्ध करून दाखविलें आहे.

स्वतःच्या अनुभवाचा फायदा त्यांनीं आपल्या राजकुटुंबीय मंडळास कसा दिला आहे हें आपण श्रीमंत सौ. मा. महाराणीसाहेब वगैरेंच्या व्यायामाच्या आघाडीवरून पाहिलेंच आहे.

महाराजांचे हे झालेले प्रयत्न त्यांचें नांव अमर करावयास खास पुरेसे आहेत. परंतु असें जरी आहे तरी त्यांची इच्छा हे प्रयत्न येथेंच थांबवावयाची नसून ते असेच पुढें चालू ठेवावयाचे अशी असल्यानें त्यांच्या या सतत चालू असलेल्या कार्याची गति अधिक व्हावी व त्यांचें हें कार्य अधिक चिरस्थायी व्हावें याच प्रामाणिक हेतूनें आम्हीं जातां जातां येथें थोड्या फार सूचना करण्याची परवानगी घेतों.

आम्हीं या सूचना तीन बाबतींत करूं इच्छितों. एक पहिवान, दुसरी विद्याखातें, व तिसरी सार्वजनिक हित.

पहिलवान खात्यांत महाराजांनीं किती व कशा सुधारणा केल्या हें आपण मागें पाहिलेंच आहे. परंतु यांत आणखी कांहीं सुधारणांची भर पडणें अवश्य आहे असें आम्हांस स्वानुभवावरून वाटतें. महत्त्वाच्या खालीं देत आहों.

गेल्या चार वर्षांपासून पहिलवानांचें तिमाही वजन व माप घेण्यांत येतें ही गोष्ट चांगली आहे; परंतु ज्या उद्देशानें हें असें करण्यांत येतें तो उद्देश मात्र अद्याप पार पडत नाहीं. पहिलवानांच्या मोजमापांत जर कांहीं फरक पडला तर त्याची जबाबदारी त्या पहिलवानावर आहे अशी त्या पहिलवानास जाणीव पाहिजे. पण ही जाणीव त्यास केव्हां होईल ? तर जेव्हां त्यास एखाद्या जबाबदार अमलदारापुढें या बाबतींत जाब देण्याकरितां उभें करण्यांत येईल तेव्हां. नुसतीं मापें घेऊन हा उद्देश पार पडत नाहीं. आपल्या शरीरांत अधिक फरक पडतांच आपणांस कोणी विचारता आहे व जर आपणांस त्यास नीट खुलासा देतां आला नाहीं तर आपणांस कांहीं शिक्षा होण्याचा संभव आहे, हा काळजी त्यास पाहिजे व ही काळजी जर त्याच्यांत उत्पन्न झाली तरच या मोजमापांचा उपयोग.

कुस्त्यांचे नियम झाले आहेत पण त्यास आज पंधरा वर्षें होऊन गेलीं आहेत. आतां त्यांत सुधारणा होणें अवश्य आहे.

सर्व साधारण जो नियम आहे कीं, जिंकणाऱ्या पहिलवानानें जित पहिलवानाचे छातीवर बसलें पाहिजे, तो सर्व पेचांचे बाबतींत लागू होणें शक्य नाहीं. कांहीं पेच असे आहेत कीं, त्यांत छातीवर बसतांच येणें शक्य नाहीं. अशा पेचांचीं नांवें नियमांत मुद्दाम नमूद केलीं पाहिजेत.

शरीरास कायमची दुखापत करणारा असा कोणताहि पेच अगर नेस्ती करूं नये असें ठरवून कुस्तींतील क्रूरता व रानटी अंश काढून टाकून त्यांस आधुनिक वळण देण्याचा स्तुत्य प्रयत्न महाराजांनीं केला आहे, ही गोष्ट खरी; परंतु यांत एक गोष्ट थोडी दृष्टीआड झाल्यासारखी दिसते. व ती ही कीं, बडोद्याखेरीज इतर कोठेंहि हें असें अद्याप झालेलें नाहीं. हे पेच अद्याप बाकी सर्व ठिकाणीं चालू आहेत. याचा परिणाम असा होतो कीं, येथील पहिलवान बाहेर गेला कीं, तो तेथें कुचकामाचा ठरतो. असें होतां कामा नये. शिवाय कुस्ती व नेस्ती यासारख्या पूर्णत्वास पोहोंचलेल्या कलांस यायोगें कलंक येतो. प्रोफेसरानें पाहिजे असल्यास आपल्या वर्गात विद्यार्थ्यांस अमुक एक कठीण प्रकारचें गणित घालूं नये; परंतु ते गणित सोडविण्याची रीत मात्र आपल्या विद्यार्थ्यांस अवश्य शिकवून ठेवावी, कारण विश्वविद्यालयांत असल्या प्रकारचें गणित येणारच नाहीं असें कशावरून ?

ignore. The evils that have grown up in the centralising of population in the great industrial cities constitute, in my judgment, a serious menace to the future of those races ............There is the eternal conflict between capital and labour which is becoming more acute as time goes on. Nor can one visit the great commercial centres of the West without feeling that the air is surcharged with the miasmic spirit of greed. Everywhere the love of display, and the sordid worship of material wealth and power, has poisoned the minds of the people against the claims of the simple, homely life, which the Indian, in his love for the things of the spirit, has cultivated since history began. It may be the mission of India, clinging fast to the philosophic simplicity of her ethical code, to solve the problems which have baffled the best minds of the West—to build up a sound economic policy along modern scientific lines, and at the same time preserve the simplicity, the dignity, the ethical and spiritual fervour of her people. I can conceive no loftier mission for India than this: to teach Philosophy to the West and learn its Science ; impart purity of life to Europe and attain to her loftier political ideal; inculcate spirituality to the American mind and imbibe the business ways of its merchants".

## दुर्दमनीय आशावाद

देशाची सांप्रतची असहाय्य व दीनवाणी स्थिति पाहून कित्येक लोक निगशेनें ग्रस्त होतात. पौर्वात्यांनीं यापूर्वीं वैभव भोगलें तें भोगलें, यापुढें त्यांची धडगत नाहीं; पाश्चात्यांना निसर्गाची अनुकूलता आहे: युरोपच्या हवेमध्येंच मनुष्यांत तेज, उत्साह उत्पन्न करण्याचा गुण आहे: हिंदुस्थानची हवा मनुष्याला निस्तेज व

निरुत्साह करणारी आहे; अर्थात् जीवनकलहामध्यें पाश्चात्यांपुढें पौर्वात्यांचा टिकाव लागण्याची आशा नाहीं, अशा प्रकारची विचारसरणी सदरील लोकांची असते. श्री. सयाजीरावमहाराज यांना ही विचारसरणी बिलकूल मान्य नाहीं. या बाबतींतले त्यांचे शब्द प्रत्येक हिंदवासीयानें आपल्या हृत्पटलावर खोदून ठेवण्यासारखे आहेत. पुढील उतारा थोडा लांब आहे, परंतु तो महत्त्वाचा असल्यामुळें येथें देणें अस्थानीं होणार नाहीं. महाराजसाहेब म्हणतात, " जीवनकलहांत आमचा टिकाव लागेल किंवा नाहीं याविषयीं पुष्कळांना शंका वाटते. युरोपियन लोकांनीं, अमुक जाती निसर्गतःच कमी दर्जाच्या आहेत, किंवा भौतिक, विशेषतः हवामानाच्या परिस्थितीचा मनुष्यसमाजाच्या भवितव्यावर हटकून परिणाम होतो, अशा प्रकारच्या ज्या कल्पना काढलेल्या आहेत त्यांचा हे शंकित लोक आश्रय करितात. भौतिकशास्त्रविषयक गैरसमजावर आधारलेला हा एक नवीन दैववादच होय. कर्मवादाच्या प्रमादयुक्त समजुतीवर पूर्वीचा दैववाद आधारलेला होता, त्याच्या जागीं हा नवा दैववाद आला एवढाच फरक. या दैववादाला वर डोकें काढूं देतां कामा नये. जेथें तें वर येईल तेथें तें ठेचलें पाहिजे. वरील कल्पना जर खऱ्या असल्या तर आम्हां हिंदी लोकांनीं मानवी संस्कृतीच्या इतिहासांत जी कामगिरी करून दाखविली ती कामगिरी करून दाखविणें शक्यच झालें नसतें. ज्या लोकांचा या उग्र जीवनकलहांत टिकाव लागणें शक्य नाहीं असें कित्येक म्हणतात, त्याच लोकांनीं त्याच हवामानामध्यें धर्म, तत्त्वज्ञान, भौतिकशास्त्र, वास्तुशास्त्र व वाङ्मय यांच्यामध्यें जी प्रगति केली होती तिच्यावर दुसऱ्या कोणत्याहि तत्कालिन राष्ट्राला ताण करतां आली नाहीं. त्याचप्रमाणें त्यांनीं ऐहिक व्यवसायांमध्यें म्हणजे कलाकौशल्य, उद्योगधंदे, कृषिकर्म, युद्धशास्त्र व राज्यव्यवहारशास्त्र यांच्यामध्यें तशीच अघाडी मारली होती. त्यांच्यांत केवळ कवि, तत्त्ववेत्ते, पंडित व शास्त्रज्ञच झाले असें नाहीं तर इतिहासामध्यें कर्तबगार म्हणून नांवाजलेले मुत्सद्दी व लोकनायकहि होऊन गेले. याची साक्ष प्राचीन काळांतील चंद्रगुप्त व अशोक, विक्रमादित्य आणि सेनराजे व गुप्तराजे, तदनंतर मोंगल बादशाहीमधील महान् सेनानायक व मुत्सद्दी, आणि अर्वाचीन काळांतील शिवाजीमहाराज व मराठीराज्यांतले इतर रणधुरंधर व राजकारणधुरंधर व महाराज रणजितसिंग यांच्या उदाहरणांवरून पटण्यासारखी आहे. आजमितीस युरोपनें आपलें श्रेष्ठत्व प्रस्थापित केलें आहे हें खरें आहे. परंतु हा निसर्गाचा सनातन व अपरिवर्तनीय नियम आहे असें म्हणतां येईल काय ? इतिहासावरून वरील नकली शास्त्रीय विधानें शाबीद होतात काय ?

उलटपक्षीं असेंच दिसून येतें कीं, गेल्या तीनशें वर्षांच्या काळांतच म्हणजे बेकन-प्रभृति विद्वानांनीं निसर्गाच्या नियमांचा शोध करण्याची सशास्त्र पद्धति शोधून काढल्यापासून पाश्चात्य राष्ट्रांना अल्पश्रमांत पुष्कळ धनोत्पादन करणें व मानवी जीवितांचा बुद्धिवादाच्या दृष्टीनें विचार करणें शक्य झालें, आणि त्यामुळें जगाच्या इतर भागांपुढें युरोपला आघाडी मारतां आली. युरोपला जें श्रेष्ठत्व प्राप्त झालें आहे तें तेथल्या हवेमुळें नव्हे, कीं दुसऱ्या कांहीं नैसर्गिक कारणांमुळें नव्हे, किंवा आमच्या स्वाभाविक हीनतेमुळें नव्हे, तर राजकीय, सामाजिक व आर्थिक जीवनाची विशेष सशास्त्र व्यवस्था केल्यामुळेंच होय. "

( Many seem to doubt whether we can servive in the struggle. They take refuge in European theories of racial inferiority or inexorable physical forces, especially the influenc of climate. This is the substitution of a new fatalism based on a misconception of Science for the old which was based on a misconception of *karma,* and should be combated at every turn. If these theories were true, our race would never have played any part in the history of civilisation. Yet the same people under the same climatic influences reached heights in religion, philosophy, science, architecture and literature which no contemporary nation surpassed. They were equally successful in material pursuits, in arts and industries, agriculture, war and administration. They produced not only poets, philosophers, scholars and scientists, but administrators and leaders among the most able in history, and this is true from the ancient days of Chandra Gupta and Asoka, Vikramaditya and Senas and Guptas, down through the Moghuls and their great generals and administrators to the recent times of Shivaji, the leaders of the Maratha Confedaracy and Ranjit Singh. The superiority of Europe is a

fact of the present day; but is it really an eternal and unalterable law of Nature? Does history bear out these pseudo-scientific generalisations? On the contrary it is during the last 300 years only, since indeed men like Bacon discovered a sound method of enquiry into the laws of Nature which enabled western nations to economise effort and rationalise life, that Europe has taken the lead over other parts of the world. The superiority is not due to climate or physical causes or to our inbred inferiority, but to a more scientific organisation of political, social and economic life.)

## स्वतंत्रता, समता व बंधुता

स्वतंत्रतेचे गोडवे गाणारे लोक पुष्कळ आढळतात. पुष्कळांना स्वतंत्रता फक्त स्वतःसाठींच पाहिजे असते. किंबहुना स्वतंत्रता या शब्दाचा अर्थ स्वतःपेक्षां दुर्बलांवर सत्ता गाजविण्याची मुभा असाच ते लोक करीत असतात. आपल्या देशावर दुसऱ्या देशांतील लोकांचें वर्चस्व नसलें म्हणजे झालें, मग श्रीमंतांनीं गरिबांना, बलवंतांनीं दुर्बलांना, वरिष्ठानें कनिष्ठांना कसेंहि वागविलें तरी हरकत नाहीं. अशी महाराजसाहेबांची स्वतंत्रता शब्दाची आकुंचित व्याख्या नाहीं. स्वतंत्रतेला समता व बंधुता या तत्त्वांची जोड दिली पाहिजे असें त्यांचें मत आहे. (We have our 'ancient regime' of custom and prejudice to overcome: let us meet them by a new Liberty, Equality, and Fraternity; a liberty of action, equality of opportunity and fraternity of a great national ideal.) राजकीय बाबतींत स्वातंत्र्याची घोषणा करावयाची, परंतु सामाजिक बाबतींत व्यक्तिस्वातंत्र्य ठेवावयाचें नाहीं; सर्वांना आत्मोन्नतीसाठीं समान संधि द्यावयाची नाहीं व बंधुतेला थारा द्यावयाचा नाहीं ही जी आकुंचित वृत्ति आहे ती राष्ट्रीयत्वाच्या उच्च ध्येयाला विघातक आहे; त्या जागीं स्वतंत्रता समता व बंधुता या त्रयीची

स्थापना झाली पाहिजे, असें श्री. महाराजसाहेबांचें मत असल्याचें त्यांच्या वरील उद्गारावरून स्पष्टपणें दिसून येतें.

प्रजाजनांनीं नेहमीं राज्यकर्त्यांच्या ओंजळीनेंच पाणी प्यालें पाहिजे, आपल्या सोयीसुखाकरितां त्यांच्यावरच अवलंबून राहिलें पाहिजे ही कल्पना आमच्या महाराजांना पसंत नाहीं. आपली कार्यक्षमता वाढविण्याठीं ज्या सवलती पाहिजेत त्या राज्यकर्त्यांपाशीं मागण्याचा लोकांना हक्क आहे. तशा सवलती त्यांना न देणें म्हणजे त्यांच्या हक्काची चोरी करणें व निसर्गाचा अपराध करणेंच होय. (The people have a right to demand full facilities to develop their capacities. To deny them those facilities is a sort of robbery and offence against nature.). राजकर्ते जरी स्वदेशी असले व लोकांत हिंडणारे फिरणारे व मिळून मिसळून वागणारे असले तरी लोकांच्या खऱ्या अडचणींची त्यांना फारच थोडी माहिती असते. म्हणून त्यांनीं लोकांना स्थानिक स्वराज्याचे पूर्ण हक्क दिले पाहिजेत. (The great thing to be remembered is, that though of the people and moving amongst them, rulers after all, owing to their position and environment, know very little of the hardships of the people ruled, and it is therefore their duty to give them the right of Local Government to the fullest degree.).

## राष्ट्र म्हणजे बहुजनसमाज

'राष्ट्र', 'देश' या शब्दांचा उपयोग करतांना वक्त्याच्या किंवा लेखकाच्या दृष्टीसमोर कोणता वर्ग आहे हें लक्षांत आणणें फार महत्वाचें आहे. बहुतेक लेखक व वक्ते सदरील शब्दांचा उपयोग करतांना मूठभर संखेचे वर्गच आपल्या दृष्टीसमोर ठेवीत असतात, आणि राष्ट्रहित, देशहित म्हणजे त्या विशिष्ट अल्पसंख्यांक वर्गाचें हित असाच त्यांच्या म्हणण्याचा आशय असतो. राष्ट्राची प्रगति म्हणजे कोणत्याहि मूठभर लोकांची प्रगति नव्हे, किंवा राष्ट्राचें हित म्हणजे कोणत्याहि अल्पसंख्य

वर्गाचें हित नव्हे, हें केव्हांहि विसरतां कामा नये. बहुजनसमाज हा केव्हांहि अज्ञच असावयाचा व असला पाहिजे आणि त्याचा उपयोग वरिष्ठवर्गाचें वैभव वाढविण्या-साठींच झाला पाहिजे, असें गृहित धरूनच राष्ट्रप्रगति व देशहित यांचा जो विचार केला जातो तो आमच्या महाराजसाहेबांना मान्य नाहीं. कलकत्ता येथें १९०६ सालीं भरलेल्या राष्ट्रीय औद्योगिक परिषदेच्या कामाला सुरुवात करून देतांना श्री. महाराजसाहेबांनीं स्पष्ट सांगितलें कीं, जें राष्ट्र गरीब वर्गाचा तिरस्कार करतें, त्यांना स्वाभिमान बाळगण्यास जागा ठेवीत नाहीं व आपला सामाजिक दर्जा वाढविण्याची संधि देत नाहीं, तें आपलें घर वाळूच्या पायावर बांधतें असें म्हणा-वयास हरकत नाहीं. राष्ट्राची खरी संपत्ति म्हणजे त्यांतील बहुजनसमाजाची लायकी हीच होय. ( The nation that despises its humblest classes, that provides for them no oapportunity to rise in the social scale and in self-esteem, is building its house upon the sand. The wealth of a nation is the quality of its manhood. ) बहुजनसमाजाच्या हिताकडे दुर्लक्ष केल्यामुळें मोठमोठीं प्राचीन राष्ट्रें धुळीला मिळालीं, त्याबद्दलचींहि महाराजांनीं या वेळीं उदाहरणें दिलीं. इजिप्त देश नैसर्गिक साधनसंपत्तीनें संपन्न असतां त्याच्या राज्यकर्त्यांनीं मानवीजीविताची किंमत ठेविली नाहीं, श्रमजीवीवर्गाच्या हिताची काळजी घेतली नाहीं, त्या कारणानें तो देश वैभव-शिखरावरून खालीं पडला व त्याला राजकीय दास्य प्राप्त झालें. ग्रीस देशांत तत्त्वज्ञान विपुल होतें, परंतु ग्रीक लोकांनीं व्यापारधंद्यांत लक्ष्य घालणें हें कमी-पणाचें लेखून तीं कामें गुलामांकडे सोंपविलीं व त्यामुळें शेवटीं देशाचा ऱ्हास झाला. म्हणून बहुजनसमाजाला सुशिक्षित करून त्याच्यांत स्वाभिमानाची जागृति करणें व त्याचा सामाजिक दर्जा वाढविणें हें राष्ट्रप्रगतीची इमारत भक्कम पायावर उभारली जाण्यास आवश्यक आहे. ( No permanently sound and stable development can occur unless we take pains to educate the masses of our people to a sense of their paramount importance and dignity in the social structure.). कनिष्ट मानलेल्या वर्गातील लोकांत जागृति करून त्यांना शिक्षण देणें हें वरिष्ठ वर्गातल्या व सुशिक्षित लोकांचें कर्तव्य आहे. जे

असहाय आहेत त्यांना स्वतःच्या पायांवर उभें राहाण्यास साहाय्य केलें पाहिजे. मात्र असें साहाय्य करतांना आपण त्यांच्यावर हे उपकार करीत आहों किंवा तीं म्हणजे पोरें असून आपण त्यांचे आईबाप आहों, अशी भावना असतां कामा नये. हा दानधर्माचा प्रश्न नाहीं. सहकार्याचीच सध्यांच्या काळांत अत्यंत आवश्यकता आहे. (I conceive it to be the prime duty of the enlightened and well-to-do amongst us to arouse, to stimulate, and to educate the lower classes. We should help them to help themselves. But ever let us beware of paternalism; not charity but co-operation is the crying need of the hour. ) शेतकरी व कामकरी हे वर्ग देशांत धनोत्पादन करतात. या वर्गांच्या सुखस्वास्थ्यावरच देशाचा उत्कर्ष अवलंबून आहे. सुशिक्षित लोकांनीं या वर्गांच्या सुधारणेकडे लक्ष देणें हें त्यांचें कर्तव्य आहे, हें श्री. महाराजसाहेबांनीं १९०९ सालीं बडोदा कॉलेजच्या बक्षिस-समारंभाच्या वेळीं विद्यार्थ्यांना उद्देशून केलेल्या भाषणांत सांगितलें.महाराज म्हणालेः— "Foremost among our present needs is an improvement in the condition of the masses—of the millions of cultivators and labourers who live in villages and towns. Some of the young students that I see before me may decide perhaps to settle down in the country as farmers, to adopt improved methods of agriculture, to start co-operative credit societies, and to introduce in villages something of the civilisation of the age. Your example will leaven the cultivating clases, will introduce among them improved ideas of health and sanitation, and will help them to take an interest in the management of their own village concerns."

वरील विवेचन व अवतरणें यांच्यावरून आमच्या• महाराजसाहेबांचा देशाभिमान जसा जाज्वल्य आहे तसाच तो सबुद्ध व व्यापक आहे, उदारमतवादानें

युक्त आहे, हीनदीन देशबांधवांच्या कळकळीनें ओतप्रोत भरलेला आहे, सारांश, महाराजांचा देशाभिमान देशांतील सर्व सुशिक्षित, सत्ताधारी व संपन्नवर्गांना आदर्शभूत आहे, हें स्पष्ट दिसून येईल. महाराजसाहेबांनीं वेगवेगळ्या प्रसंगीं केलेल्या भाषणांत जे विचार व्यक्त केले आहेत ते स्वतःच्या कार्यक्षेत्रांत कृतीमध्यें उतरण्याचा यथाशक्ति प्रयत्न करून ते विचार त्यांच्या ओंठीं असलेलेच विचार नसून त्यांच्या पोटीं असलेले व कृतींत उतरलेले तळमळीचे विचार आहेत याची प्रत्यक्ष साक्ष पटविली आहे, हें विशेष होय.

# "THE MAHARAJA'S LOVE OF BUDDHA'S TEACHINGS."

( By Dr. A. L. Nair. )

दुल्लभो पुरिसो जञ्ञा, न सो सब्बत्थ जायति.

It is with feelings of admiration, great appreciation and devotion to His Highness that I tender my sincere homage and gratefulness to His Highness on his witnessing the 71st Birth-day. A ruler of a State and in fact a model and all-progressive State has so many and varied calls on his powers of body and mind that in his sincerity of purpose and generous and keen desire to do good to his subjects, he has scarcely any time left to devote to his health and personal comforts. It is with the heartfelt blessings and devoted love of his subjects that a ruler lives long, and this fact is most eloquently proved in the case of His Highness. It is on this auspicious occasion that I take the opportunity of expressing my own sentiment and appreciative gratefulness for the service that His Highness has first rendered to the cause of Bhagawan Buddha on this side of India. I propose, therefore, to do it by emphasising on the great love that the Maharaja entertains towards my Bhagawan.

When I recall to my mind the past history of Buddhism, I feel sad and disappointed to see how the Bhagawan Buddha, who, for the first time, taught loving service and self-sacrifice at the alter of suffering humanity and entire creation of life as the end-all and be-all of religion, should have been entirely neglected and forgotten in the land of His birth where He first began the work of conveying a message of hope and inspiration

to the suffering and ignorant masses of India, to all those "who had ears to listen." He then extended His sphere of self-less activity through his devoted Bhikkhus outside India and in the then known world. He reduced all speculation in religion to practical love and piety, irrespective of any considerations of caste, creed or sex, touchable or untouchable. On the broadest principles of universal love, brotherhood and Ahimsa, Bhagawan Buddha effected a tremendous revolution in the political, social, moral and religious aims and ideals, and it was due to Him and His methods of teaching that Art was first applied to religion and religious purposes. It is the happiest signs of the times that Modern India has been showing renewed and appreciative interest in the Bhagawan Buddha and His times and teachings. But my admiration for His Highness is still further intensified by the fact that long before this renaissance of Buddhism in India, His Highness had taken great interest in Bhagawan Buddha, and showed the greatest love for him. His Highness had on many occasions been gracious to come to my place, and always evinced great reverence for Him in talks with me. His Highness really desired that Bhagawan Buddha's teachings should be studied in India and His ideals of self-conquest, Ahimsa and humanitarian and altruistic work on the basis of Universal Brotherhood should be widely known and given prominence to. Out of great love His Highness has installed in the Jubilee Garden of Baroda a big bronze statue of Bhagawan Buddha, and arranged lectures on Buddha and Buddhism in the year 1910; and Prof. Dharmanand Kosambi delivered 5 lectures in Marathi. His Highness introduced Pali as a second

language in the Baroda College first and then in the High School, and for the first time appointed the late Prof. C. V. Rajvade, who was entrusted with the work of translating into Marathi three volumes of the Dighanikaya in the Shree Sayaji Sahityamala and instituted scholarships for Pali studies in the Fergusson and the Baroda Colleges. His Highness assimilated many of the Buddhistic principles, like removing untouchability, giving equal status to all castes, and gave them practical shape in his State. His Highness expressed a desire to translate Pali Books into Marathi and edit Pali texts in the Devanagari characters, and to this effect His Highness spoke to me, when I had the privilege of meeting His Highness in 1931. His Highness has in fact instructed Mr. Yande to give first preference for the publication of pali books in Translation form as the best means of educating the pubic in the life and teachings of Bhagawan Buddha. His Highness' proof of Bhagawan's love is further given when His Highness kindly consented to open the Anand Vihara in Bombay on the occasion of the 2,555th Birth-day of the Bhagawan solemnised by the Buddha Society. On this occasion His Highness in his speech paid an eloquent tribute to Bhagawan Buddha's teachings. "His doctrines," remarked His Highness, "have been the consolation in life and death to untold millions, softening wild and savage races, by tender words of loving kindness, raising the despairing to higher things and sharing the blessed-ness of the Noble Aryan Middle Path." By His Highness' pronouncement, the Buddha Society has been greatly assured and helped, and I, as the President of that Society and an humble and devoted servant of the Bhagawan, am filled with emotion of

gratefulness. It is my sincere and earnest prayer to my Bhagawan on this 71st Birth-day of His Highness that the Maharaja should enjoy good health and long life, and like King Bimbisara of Magadha or Emperor Aṣoka, in times past should serve the cause of knowledge and enlightenment for the betterment of humanity on the lines of the Bhagawan Buddha, for whom His Highness entertains such great love and reverence.

---

## SHRI SAYAJI RAO III AS A RULER.

( By An Admirer. )

Of the great galaxy of princes whose names adorn the pages of Indian history, the name of Sayaji Rao III of Baroda will ever occupy a very prominent place. It is the fortune of very few princes to rule their State and people for half a century. But there is hardly an instance in the history of this glorious land of a prince having ruled and ruled nobly and well for more than 50 years. Some names are remembered for glorious deeds in arms, for wonderful feats of daring, for their great victories on the battle-fields. Others are remembered for their meteoric careers tinged with the rainbow coloured hues of romance. Men like Nepolean and Cæser move on this globe with the strides of a giant and make the whole world tremble. Men like Richard leading the flower of English chivalry or Rana Pratap leading the flower of Rajput chivlary strike the imagination and hold it spellbound.

But if war has its resplendant glories, peace has its glories too. But their shades and nuances are softer and more subdued. If the war-lord carries death and destruction in his train, prosperity and happiness move in the wake of the Goddess of peace. It is easy to bring desolation and destruction, sorrow and suffering in the land, but it is more difficult to construct and maintain, bring happiness and peace to the doors of millions of people. Naturally it is very difficult to find instances in history of monarchs who have devoted their time and energy for the good of their people. We have to think of an Akbar or an Asoka when we are thinking of Sayaji Rao III of Baroda. But times and circumstances differ in every case. Asoka had to establish his supreme rule over a large portion of India before he could put in practice his monumental reforms. Akbar had to conquer and subdue the Rajput princes and turn them into his friends before introducing his many-sided reforms in his empire. The case of His Highness Sayaji Rao III is entirely different and in many respects unique.

The beginning of the year 1875 saw the storm clouds gathering on the horizon of Baroda. The administration of His Highness Malhar Rao was in the most chaotic condition. The rich and the poor, the noblemen and peasants, all were getting weary and restless in the general misrule that prevailed. Soon the storm broke, and Maharaja Malhar Rao was deposed, and on the crest of the storm-wave came Shri Sayaji Rao from the modest village of Kavlana who soon restored calm to the troubled waters of the State. For more than 50 years he is at the helm of the affairs of the State, and not once has he

faltered, not once has he slept at his post. Those who have carefully studied the history of His Highness' reign will agree with me in holding that his clear-sighted judgment, cool and steady nerves and untiring patience and great love for his people have guided the ship of the State clear of the danger which would have overwhelmed a smaller man.

The colour of the ground is within the red earth;
The tang and odour of the primal things;
The rectitude and the patience of the rocks;
The grandness of the wind that shakes the corn;
The courage of the bird that dares the sea;
The pity of the snow that hides the scars;
The loving kindness of the wayside wall;
The tolerance and equity of light;
Giving as freely to the shrinking weed;
As to the great oak flaring to the wind;
One fair ideal led our chieftain on;
For ever more he burned to do his deed;
With the fine stroke and gesture of a king;
He built the rail pile as he built the State;
Pouring his splendid strength through every blow.

Thus spoke the poet of Abraham Lincoln the great President of America. Thus we might speak of Sayaji Rao III of Baroda, of his great rectitude, of his unfailing patience under the most adverse of circumstances, of his great courage in the face of difficulties and calamities, of his winning modesty, of his sweet tolerance which disarms all opposition, of his splendid strength of character which has purified the vitiated atmosphere of Baroda. Ever

since the days of his youth he has striven hard, scorned delights, and lived laborious days to realise noble ideals.

While proposing the toast of His Highness Shahu Chhatrapati of Kolhapur, His Highness the Maharaja Saheb himself laid down the test of a good ruler. He said, " By what sign shall we know that a ruler has deserved well of his people and of his country ? Surely by the efforts for the improvement of the people committed to his care and guidance viz, his deeds. No amount of fine flowery speeches, sweet words or sweeter promises can be of any use if there are no sincere efforts to improve the people, if the actual deeds are not forthcoming. I would draw attention to the emphasis laid on the last clause- " Of the people committed to his care and guidance." The ruler has to look upon his exalted position as a position of sacred trust. He must discharge his duties to the best of his ability and power, and his aim in life should be the improvement of his people. Again a ruler must so train and befit himself as to be able to guide the destinies of his people committed to his care. "

Let us consider the rule of His Highness the Maharaja Saheb in the light of these thoughts. The well-known motto of His Highness' family जीन घर, जीन तक्त typifies the soldier who rides forth to carve out a fortune for himself. The saddle is his home and his throne also. Ever since the founding of the Gaekwad dynasty in Gujrat, their fortunes were never steady. There was a constant ebb and flow, a series of plots and counterplots to secure power and position in Gujarat. In the great struggle for supremacy of power in India, the land knew

not what peace and good government meant. The main goal of a sovereign was to secure the maximum amount of power and pleasure for himself and his dependants. But when peace settled on the land and strong government emerged out of the frightful suffering and chaos, new principles obtained recognition. So for the first time in the annals of the Baroda history the fundamental principle that the object of good government was the securing of the happiness of all the subjects alike came to be accepted when His Highness ascended the *gadi*.

It will easily be seen how herculean a task this was when we consider the condition of the people and the State in 1875. The State exchequer was nearly empty. Public order and tranquility had to be restored. Wrongs done to thousands of individuals – rich and poor – had to be redressed. Confidence in the good intentions of Government had to be created. For that, police force had to be organised and placed on a proper footing. The courts of justice had to be established. The people had to be educated. Medical relief had to be provided for them. Works of public utility had to be undertaken, and finally peasantry had to be saved from the crushing burden of land taxation and from the levy of obnoxious taxes. Above all personal extravagent expenditure had to be checked. All this and more His Highness has been able to achieve in the fullness of time and by the grace of God. In the brilliant record of these noble achievements of Shri Sayaji Rao III as ruler, we will find the heroic mould of Shri Sayaji Rao the superman.

We are informed by Raja Sir T. Madhavrao that nature had endowed His Highness with more than average intelligence, that his abilities were good but not brilliant and that his activity, and intelligence were combined with modesty, dignity and self-possession; and that his disposition was frank and affectionate and that he was most industrious. This is his pen picture of the Maharaja when he was hardly 14. And what do we see to-day? A philosopher king who is not an idle dreamer of dreams, but an idealist, who is determined to mould the lives of his subjects, on lines chalked out by him, whose endeavour is to obtain the highest type of life for the greatest possible number of his fellow countrymen, whose interest in the cultural advance and economic progress of his people is unbounded, whose views on men and affairs are characterised by freedom from personal or racial bias. He is discharging the responsible duties of his high and exalted office with an intellingence and conscientiousness which are beyond all praise. Years ago speaking of His Highness the Maharaja Saheb the Marquis of Dufferein said, "India is blessed with one of those wise, highminded and conscientious rulers whose life is a great blessing to their people."

What then is the secret of this unique and remarkable success. The first and formost fact that one notices in the career of His Highness the Maharaja Saheb is the tremendous amount of work that he put in during the first decade of his reign. The foundations of his education were well and truly laid, and in those early days he acquired such a love for books and thirst for knowledge that ever to this day have remained unquenched. He has studied the histories of the great nations of the past, and poured over

their brilliant and solid achievements with thoughtful consideration. He was fascinated with the grand and soul-inspiring spectacle of the rise and fall of great Empires, and has grasped the essential truth that hand of God is working in all this awe-inspiring drama of human pomp and circumstance.

" Old order changeth giving place to new, And God fulfills himself in many ways." Gibbon's "Decline and Down-fall of the Roman Empire"; Motley's "Rise of the Dutch Republic;" Bossuet's " Histoire de l'universe;" Guizot's " Histoire de la civilization de l'Europe; " Macaulay's " History of England " always proved the solace of his leisure hour. The biographies of great men have always spurred him on greater and greater endeavour, and have helped him to make his own life sublime. The philosophies of all climes and all ages have helped him to get at the correct perspective of life which is life serious and life beautiful. If any one has understood the full significance of this life, this speck, this halting place between two eternities, it is His Highness the Maharaja Saheb. Fully conscious of the evanescence of life, fully conscious of the great responsibilities of life, he has preached and practised the doctrine of work, work, work. 'Be up and doing, Oh Bharat!', that is the message of Shri Krishna. His Highness the Maharaja Saheb has throughout his long life shown to his people and to the people in India the true meaning and significance of a strenuous life devoted to the improvement and happiness of his people.

Another distinguishing characteristic of His Highness the Maharaja Saheb is that although he is intensely practi-

cal he is a great idealist. He has throughout his long and glorious reign striven hard to realise his high ideals. Undaunted by failures, undeterred by opposition, this great lover of freedom and humanity, this man of the people who so lived near the people and drew his highest inspiration from them, whose highest ambition is to serve his people, has gone on from more to more till to-day we find him in the vanguard of progressive India. As young man he dreamt dreams, as an old man it has been vouchsafed to him to see visions of India reborn in all her glory. The heights may be dizzy, and the ideals the most elusive; ye the fire and enthusiasm of the youth are still there coupled with the ripe and mellow wisdom of age. He still refuses to be satisfied with what he has achieved but presses steadily onwards for securing better things for posterity. To quote the inspiring words of His Highness the Maharaja Saheb himself, "We must always do better, we must always aim high, very high." To him not failure but low ambition is a crime.

'All my energies,' says he, 'are devoted to free and enrich my people-to improve the machinery of the administration.' The freedom that he has sought is the freedom from the tyranny of the caste, is the freedom from the deadening and soul-crushing weight of worn out forms and creeds and social restrictions. It is a freedom from a slavish mentality. He is the great protagonist, the accepted champion of individual freedom in thought and action.

His Highness the Maharaja Saheb has introduced social and political reforms in his State as a necessary corollary of these high ideals. He has stretched forth

his strong hands to those who are weak and feel weary in the struggle. His Highness naturally expects his subjects to give a fitting response to his magnificent efforts. He is fully aware that the prosperity and progress of a State or community depend entirely on the complete concordance of its ruler, the officials and the subjects. As a ruler he has endeavoured to the best of his abilities and power to guide the destinies of the people committed to his care on the right lines. If the people have faltered and wistfully looked back, if the officers have failed to understand the true meaning and significance of the momentous steps that His Highness has taken, His Highness has felt keenly disappointed but he has never given up his "youthful optimism and courage." The streams of his vitalizing thought and inspiration continue to flow and fertilize the rich soil in spite of the rocks of prejudice and the dark and barren caverns of ignorance.

Broad and lofty idealism, deep earnestness, infinite patience, sincere and abiding love for his people, have characterised the path of progress that His Highness the Maharaja Saheb has followed in obedience to the commands of the "Stern daughter of the voice of God." He has never sought for cheap popularity. He has never been a victim of weak sentimentality. He has never allowed physical pain or private sorrow to interfere or come in the way of his duty.

> The path of duty is the way to glory;
> He that walks it only thirsting
> For the right and learns to deaden
> Love of self before his journey closes;

He shall find the stubborn thistle bursting
Into glossy purples, which outredden,
All voluptuous garden roses;

+ + + +

He that ever following her commands;
On with toil of heart and knees and hands;
Through the long gorge to the far light has won;
His path upward and prevailed;
Shall find the toppling crags of duty sealed
Are close upon the shining table lands
To which our God himself is sun and moon.

His Highness has travelled far and wide. The simplicity of his habits and character has enabled him to throw off the shackles of the pomp and circumstance which usually surround an Indian Prince. He moves about freely, and thus comes into more intimate contact with men of other nationalities and cultures. This intimate contact with men and manners of other countries, this personal experience has given him a breadth of mind and an elasticity and vigour of imagination which are truly remarkable. Those who have had the good fortune of going with him on these foreign travels have always remarked one singular fact and, that is that in all his wanderings his heart was ever with his people, his thoughts ever turned towards his country and his State. His eagar mind was ever receptive of new ideas, and his constant endeavonr has been to translate his new ideas into practice. With that end in view he has deputed hundreds of young officers to Europe and America. His one desire being that there should be

intelligent cooperation between his officers and subjects, whenever he undertook any step for the good and improvement of his people.

I need not mention here the thousand and one reforms that he has successfully introduced in the State. They only show what His Highness has done for the moral, material and cultural progress of his people. The great point to remember is his great love for his people and country and his earnest and unfailing interest in their progress and his patient ungrudging, steady and continuous endeavours to secure progress and prosperity to his people.

"Greatness," to quote his own words, "is fundamentally of character; sincerity and unselfishness, far-seeing wisdom and untiring energy are its qualities. With these the great man stands unbroken and undaunted in misfortunes. Health and wealth are the twin opportunities to unceasing service." How very true is this of Shri Sayaji Rao III the great ruler of Baroda! "We cannot look upon a great man" says Carlyle "without gaining something by him. He is the living light-fountain which it is good and pleasant to be near; the light which enlightens, which has enlightened the darkness of the world and this not as a kindled lamp only but rather as a natural luminary shining by the gift of heaven, a flowing light fountain of nature, original in sight of manhood and heroic nobleness in whose radiance all souls feel that it is well with them."

By his overflowing and abiding love for his people, by his unceasing high endeavours in the interests of his

country and people, by his ceaseless efforts to make his State an ideal State, a Dharma Raj, where men and women, the high and the low, the rich and the poor can live and move in perfect freedom and equality, where every individual can find ample opportunities for self-development and self-expression to enable him to rise to his full stature, by all this and more, His Highness the Maharaja Saheb has endeared himself not only to his subjects but to all thinking men and women of India. He has set a noble example for future generations to follow. He has lighted a torch which will illumine the length and breadth of the whole of India.

It is the rare good fortune of Baroda that at its supreme hour of need it found a ruler the like of whom it is difficult to find in the whole of India. Three score years and ten is the allotted span of human life. His Highness the Maharaja Saheb has passed the 70th mile stone full of vigour and energy in his memorable race of life. Let us pay our humble tribute of love and affection, of loyalty and homage to this great Karmayogin-this noble Rajarshi-and pray earnestly to the Giver of all good that He may grant him long life, peace and happiness.

# श्रीसयाजीराव महाराज यांची युरोपांतील दिनचर्या

## ( लेखकः--एक परिचित )

श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या प्रत्यक्ष परिचयामध्यें येणें हें एक मोठें भाग्यच होय. तशा प्रकारची संधि मिळाल्यामुळें महाराजांच्या थोरपणाची लेखकाच्या ग्रहण शक्त्यनुसार त्यास अंधुक कल्पना आली. महाराजाचा थोरपणा बव्हंगी व अत्यंत विस्तृत असल्यामुळें त्याचें यथासांग वर्णन करणें ह्या छोटेखानी लेखाच्या अटोक्याच्या बाहेरचें आहे. ह्या लेखामध्यें महाराजांच्या युरोपमधील दिनचर्येची त्रोटक कल्पना वाचकांस करून देण्याचा आमचा विचार आहे.

प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें महाराजांना अनिच्छेनें युरोपमध्यें कांहीं काळ राहावें लागतें. तेथें ते कशा रीतीनें कालक्रमण करीत असतील ह्या संबंधीं बऱ्याच भ्रामक कल्पना इतस्ततः पसरलेल्या केव्हां केव्हां ऐकण्यांत येतात. आरामाच्या सर्व साधनांनीं युक्त, सुखोपभोगांनीं परिप्लुत अशा त्या नंदनवनासारख्या देशांमध्यें महाराज आपला काळ आराम आणि शांतीमध्यें घालवीत असतील अशी कल्पना रूढ असणें अगदीं अस्वाभाविक नाहीं. परंतु अशी मान्यता ठेवणें म्हणजे वस्तुस्थितीचा ढळढळीत विपर्यास करण्यासारखें आहे, हें अनुभवांतीं कळतें.

प्रस्तुत लेखारंभीं महाराजांच्या अनेक सद्गुणांपैकीं एका मोठ्या गुणाचा उल्लेख करणें जरूरीचें आहे. तो गुण म्हणजे त्यांची तीव्र कुतूहलबुद्धि हा होय. ते केव्हांहि अल्पसंतोषी नसतात. त्याचप्रमाणें ते केव्हांहि सर्वज्ञत्वाचा किंवा बहुश्रुतपणाचा अभिमान बाळगत नाहींत. ज्ञानार्जनाची व माहिती मिळविण्याची त्यांची हाव फार मोठी आहे. निरनिराळ्या देशांतील धार्मिक, सामाजिक, नैतिक, आर्थिक इत्यादि बाबतींचें सूक्ष्म परीक्षण करून, निरनिराळ्या संस्कृतींचें पृथक्करण करून, त्यांच्या उन्नति—अवनतीचें तुलनात्मक पद्धतीनें अध्ययन करून त्यांतून हंसक्षीर न्यायानें चांगलें असेल तेवढें ग्राह्य करण्याची त्यांची प्रवृत्ति अगदीं अनुपम आहे. चांगले व अनुकरणीय असेल—मग ते वाटेल त्या देशामधील,

धर्मामधील किंवा कुठल्याहि मनुष्यामधील असो, तें ग्रहण करावयाचें व त्याचा उपयोग लोकांची प्रगति साधण्याकरितां करावयाचा ह्या तीव्र मनीषेनें प्रेरित झालेली विभूति म्हणजे श्रीमंत सयाजी महाराज असें स्थूलमानानें म्हटलें तर तें वस्तुस्थितिनिदर्शक होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या प्रकारच्या उत्कट भावनांनीं युक्त अशा कोणत्याहि स्वाभिमानी व स्वदेशहितेच्छू मनुष्यास देशपरदेशाटन करण्याची तीव्र इच्छा असणें अगदीं स्वाभाविक आहे. महाराजांचें परदेशाटन ह्या पैकींच होय. पाश्चात्यदेश, कालचक्राच्या अनुरोधानें व आधिभौतिक शास्त्रीय प्रगतीच्या साहाय्यानें भूतलावर सर्व स्वर्गीय सुखसाधनें उत्पन्न करूं शकले आहेत, तेव्हां त्यांचा प्रत्यक्ष परिचय करून त्यांच्यापासून शिकण्यासारखें असेल त्याचा उपयोग आपल्या स्थितीस अनुरूप असा योग्य त्या फेरफारानें करून घेतां यावा हा या देशाटनाचा मुख्य हेतु होय. एवढी प्रस्तावना करून आतां आपण आपल्या विषयाकडे वळूं.

सुरवातीस बोटीवरील प्रवासाचें अवलोकन करूं. महाराजांचा वाचनव्यासंग फार मोठा आहे. प्रवासाच्या सुरवातीस ते आपल्या आवडत्या विषयांवरील नवीन प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें बरोबर घेववतात. प्रातर्विधि, स्नान वगैरे आटोपल्यावर ते नियमितपणें डेकवर एक तासभर फिरतात. नंतर डेकवर शुद्ध हवेमध्यें खुर्चीवर ते वाचीत बसतात. त्यांचें कुठलेंहि वाचन म्हणजे मनाची एकाग्रता करून पुस्तकांतील विषयाशीं तल्लीन होऊन केलें जातें. शिवाय ते भरभर वाचीत असतात. लागलगट वाचून पुस्तक संपलें कीं, त्यावर वाचन संपल्याची तारीख व स्थळ स्वहस्तानें ते लिहून ठेवतात. कोणाकडून भेट म्हणून पुस्तक आलें असल्यास ते वाचून झाल्यावर स्वतः त्याचें पद्धतशीर परीक्षण ते लिहितात व तें लेखकास पत्रद्वारें लिहून कळवितात. हीं परीक्षणें अत्यंत मार्मिक, सूक्ष्म व गुणदोषांचें यथायोग्य आविष्करण करणारीं असल्यामुळें अत्यंत मार्गदर्शक व सूचक होतात. वाचन, फिरणें व डेकवर इतर कांहीं खेळ असतील तर त्यांत भाग घेणें, ह्या शिवाय संस्थानच्या कामासंबंधीं कागदपत्र असल्यास त्यांचा निकाल करण्यामध्येंहि त्यांचा काळ जातो. त्या शिवाय बोटीवर असलेल्या मंडळींच्या ओळखी करून त्यांच्याशीं संभाषण करून विचार-

विनिमय करण्याची महाराजांची शैली अगदीं अप्रतिम आहे. अगदीं लहानापासून ते थेट थोर दर्जाच्या प्रवाशांबरोबर ते अगदीं साध्यापणानें व निर्मल अंतःकरणानें गोष्टी करितात. एकादा विद्यार्थी, व्यापारी, सहल करणारा प्रवासी अथवा एकाद्या मोठ्या प्रांताचा गव्हर्नर ह्या सर्वांशीं ते अगदीं एकाच प्रकारच्या प्रेमळ अंतःकरणानें बोलतात व ज्याच्या त्याच्याशीं त्याच्या धंद्याव्यवसायासंबंधीं इतक्या पूर्ण माहितीनें बोलतात कीं बोलणाराच्या मनावर महाराजांना स्वतःच्या व्यवसायासंबंधीं इतकी निकट व परिपूर्ण माहिती असल्याबद्दल अचंबा वाटल्याशिवाय राहत नाहीं आणि आपण कोणातरी मोठ्या विभूतीसमोर उभे आहों अशी त्यास खात्री पटते. महाराजांचें शोधक प्रश्नास्त्र सुरू झालें कीं, त्यास जबाब देतां देतां ज्यांची त्रेधा झाली नाहीं अशी माणसें थोडीं. बोटीवर त्यांच्या प्रश्नास्त्रामध्यें एक वेळ सांपडलेला लेचापेचा मनुष्य तोंड चुकवून दूरदूरच राहत असलेला दिसतो. महाराज मात्र जी पृच्छा करितात ती केवळ जिज्ञासाबुद्धीनें आणि स्वतःस माहिती होण्याकरितां करीत असतात. बोटीवरील प्रवास संपण्याच्यापूर्वीं बोटीवरील बहुतेक सर्व प्रवाशांशीं ते बोलून चुकतात. अशा प्रकारें भेटलेला मनुष्य पुढें कितीहि वर्षांनंतर जरी भेटला तरी ते त्याला बरोबर ओळखतात इतकी त्यांची स्मरणशक्ति चांगली आहे.

युरोपमध्यें महाराजांचें वास्तव्य एके ठिकाणीं फार दिवस होत नाहीं. एके ठिकाणीं सतत फार दिवस राहण्यापेक्षां त्यांना निरनिराळ्या ठिकाणीं फिरण्याची फार हौस वाटते. नवीन ठिकाणीं गेल्यावर तेथील पाहण्यालायक सर्व स्थळें, संस्था वगैरेंचे ते काळजीपूर्वक निरीक्षण करितात. त्यांच्या बरोबर माणसें अगदीं जरूर तेवढींच असतात. एक डॉक्टर, एक सेक्रेटरी, व त्याचा मदतनीस व एक व्हॅले ( कपडे लत्ते करणारा ) या प्रमाणें चार माणसांपेक्षां अधिक संख्या बहुधा असत नाहीं. जितकीं अनवश्यक माणसें जास्त तितका निष्कारण त्रास जास्त असें अनुभवान्तीं त्यांना कळून चुकलें आहे. अवश्य तेवढींच माणसें असलीं म्हणजे त्यांना भरपूर काम मिळून ज्याच्या त्याच्यावर जबाबदारी पडल्यामुळें कामहि चांगलें होतें. नाहीं तर पुष्कळ लोक असले म्हणजे हा करील, तो करील असें म्हणत सर्वांचेंच कामाकडे दुर्लक्ष

होण्याचा संभव असतो. पॅरिसमध्यें महाराजांच्या मालकीचें निवासस्थान ( ६ अॅव्हेन्यू व्हॅंडीक, पार्क मांसू ) आहे त्यांत त्यांचा मुक्काम असतो. इंग्लंडमध्यें प्रसिद्ध आंग्लकवि लॉर्ड टेनिसन यांच्या प्रथम मालकीचें व जेथें त्यांनीं त्यांच्या स्वतःच्या कविता रचिल्या असे सुप्रसिद्ध आल्डवर्थ नांवाचें लंडनहून ४० मैल दूर असलेलें एकांत निवासस्थानहि महाराजांच्या मालकीचें आहे. तेथें ते मुक्काम ठेवित नाहींत, परंतु केव्हां केव्हां कित्येक तास शांत चित्तानें वनश्रीची शोभा पाहात, पक्ष्यांचें गुंजारव ऐकत आनंदामध्यें काढतात. एरव्हीं दरेक ठिकाणीं त्यांचा मुक्काम ज्या त्या ठिकाणच्या पहिल्या प्रतीच्या उत्तम हॉटेलामध्यें होतो. हॉटेलामध्यें स्वतःकरितां एक स्वीट ऑफ रूम्स ठेवतात व एक अमलदार त्याच हॉटेलमध्यें राहतो. त्या शिवायचे लोक जवळ पासच्या दुसऱ्या हॉटेलमध्यें राहतात. सवडीप्रमाणें संस्थानचें काम करण्याकरितां ऑफिसरूम महाराज राहतात त्या हॉटेलमध्यें किंवा इतर अमलदार राहतात त्या ठिकाणीं ठेवण्यांत येते, व महाराज त्या ठिकाणीं ठरीव वेळीं काम करितात. राहण्यासंबंधाची एवढी माहिती देऊन आतां त्यांच्या दिन-चर्येकडे वळूं.

तिकडील ऋतुमानाप्रमाणें बहुतेक सकाळीं आठ वाजतां उठून साडे-आठपर्यंत त्यांचें मुखमार्जन वगैरे आटोपतें. नंतर अर्धातास श्मश्रू करीत असतांना जवळ असणारा अमलदार त्यांना दररोजचीं दैनिकें वाचून दाखवितो. म्हणजे श्मश्रू करण्याचा वेळ फुकट न जातां त्या वेळीं वर्तमानपत्रें वाचण्याचें काम संपून जातें. नंतर स्नान, न्याहारी वगैरे आटोपून स्वारी सव्वादहाचे सुमारास रोजच्या ठराविक फिरावयास जाण्याच्या व्यायामाकरितां बाहेर पडते. बरोबर एक अमलदार असतो. एक तास शुद्ध हवेमध्यें योग्य रीतीनें श्वासोच्छास करीत व दृष्टीबिंदू विवक्षित कोनामध्यें ठेऊन शास्त्रीय पद्धतीनें महाराज हा चालण्याचा व्यायाम घेतात. बरोबर घड्याळ पाहून चालणें सुरू करावयाचें व एक तास झाला कीं, चालणें बंद करितात. ह्या चालण्यास ते “ Religion ” म्हणजे धर्म समजतात व तें पुरें झालें म्हणजे एक कर्तव्य संपलें असें म्हणतात. शुद्ध हवेमध्यें हिंडणें, फिरणें व शुद्ध

हवेचें सेवन करणें महाराजांना फार आवडतें. मोटारमध्यें बसल्यावर बरोबरचा अमलदार मोटरच्या खिडकीचें काचेचें तावदान उघडण्यास विसरला तर महाराज लगेच त्याला " शुद्ध हवा आंत येऊं द्या, खिडकीची कांच उघडा " असें सांगतात. फिरून आल्यानंतर संस्थानचे जे कागदपत्र आले असतील त्यांतील शिल्लक असतील त्यांचें चीफ ऑफिसर बरोबर वाचन करून त्यासंबंधीं हुकूम देण्याचें काम लंच ( दुपारचे जेवण्याचे वेळे ) पर्यंत ते करितात. सर्व कागद अंतरपत्रासह ते अत्यंत काळजीपूर्वक व चिकित्सक बुद्धीनें वाचतात, व दरेक खेपेस ठराविक नमुने किंवा इतर कागदपत्र लिखाणपद्धतीमध्यें कामाचे सोयीकरिता कांहीं सुधारणा करणें शक्य आहे किंवा कसें ह्या हेतूनें पाहतात. त्यांच्या चिकित्सक व निरीक्षक बुद्धीस नेहमीं कांहींना कांहीं तरी इतरांस न सुचणारे विचार सुचतात व त्यांच्याकडून सूचना व सुधारणांचें काम अव्याहत चालूच असतें. दोष दिसतील त्यांच्याकडे कानाडोळा न करिता ते दाखवून समंजसपणें ते दूर करण्याचे उपाय सुचवितात व चांगलें काम दिसल्यास त्याची वाखाणणी करून काम करणारास प्रोत्साहन देतात. ह्यामुळें गुणावगुणाचा योग्य परामर्श घेतला जात असल्यामुळें गुणांस उत्तेजन मिळतें व कामगारांमधील शैथिल्यास किंवा अक्षमतेस आळा बसतो.

काम करण्याच्या वेळचे महाराज हे एरव्हीं गप्पागोष्टी करण्याच्या वेळच्या महाराजांपेक्षा फार निराळे असतात. मी राजा आहें व राजाचें पवित्र कर्तव्य करण्यासाठीं मी ह्या वेळीं बसतों आहें अशी उच्चतम भावना ठेऊन गांभीर्ययुक्त मुद्रेनें, मनाची एकाग्रता करून ते कामास सुरुवात करितात. त्या वेळीं फालतु भाषण किंवा इतर कसल्याहि गोष्टीचा उल्लेख केला जात नाहीं. कागद काळजीपूर्वक वाचावयाचे, जवळच्या अमलदाराशीं त्यासंबंधीं जरूर पडल्यास वाटाघाट करावयाची व तर्कशक्तीस व कार्यकारणवादास पटेल अशा प्रकारें आपल्या स्वतःच्या मनाची खात्री झाल्यावर आपणांस योग्य तो न्यायास अनुसरून निकाल द्यावयाचा ही त्यांची पद्धति आहे. कोणीहि वादविवाद केल्यास त्यास चूपचाप न करितां शांतपणानें त्याची सर्व हकीकत ऐकून घेतात व नंतर न्यायनीतीस अनुसरून ते निकाल करितात. कोणीहि स्नेही, आप्त स्वकीय किंवा जिव्हा-

ल्याच माणसांस चांगलें वाटावें, किंवा त्यांस राग येऊं नये अशा हेतूनें प्रेरित होऊन ते कोणतेंहि काम करीत नाहींत. सदसद्विवेक बुद्धीस पटेल व जें खरें व न्याय्य असें त्यांना वाटेल तेंच ते करितात. मग त्यामुळें कोणी राजी होवो किंवा नाखुश होवो, त्याची ते बिलकूल पर्वा करीत नाहींत. त्यांच्या ह्या न्याय्य बुद्धिची एवढी विलक्षण छाप पडलेली आहे कीं, त्यांना सरकारी कामासंबंधीं कितीहि जीवश्च कंठश्च मनुष्य जरी असला तरी "ब्र" बोलूं शकत नाहीं. प्रस्तुत लेखकास महाराजांनीं खालील शब्दांमध्यें एकवेळ सहज बोलतां बोलतां सांगितलें होतें कीं:—"राजधर्म अत्यंत कठीण आहे. त्यांत स्वार्थत्याग फार करावा लागतो, व मनहि अत्यंत बळकट ठेवावें लागतें. मन मजबूत न ठेविलें तर राजाच्या हातून प्रजेस न्याय मिळावयाचा नाहीं. जर राजा कमकुवत मनाचा असेल तर तो राजपुत्राचें, राणीचें, इतर आप्तस्वकीयांचें व स्नेह्या-सोबत्याचें सरकारी कामामध्यें ऐकत बसेल व त्यांच्या सांगण्याप्रमाणें करीत राहील व तसें झालें म्हणजे कामांचा निकाल न्यायाच्या तत्त्वांवर न होतां वशिल्याप्रमाणें होत जाऊन लोकांस त्रास होईल. म्हणून राजानें स्वतःच सत्यान्वेषण करून आपल्या बुद्धिस पटेल व सत्य वाटेल तेंच केलें पाहिजे. त्याचप्रमाणें अमका लाडका किंवा आवडता व अमका अप्रिय किंवा नावडता असेंहि न मानतां उत्तम काम करणारे गुणी व कार्यक्षम असतील त्यांच्या कामाची बुज करून त्यांना कार्य करण्यास संधि देत गेलें पाहिजे."

केवढे हे उदात्त विचार! पण हे फक्त विचारांमध्येंच नसून श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या कृतीमध्यें उतरले आहेत व त्याप्रमाणें ते तपस्वी जीवन घालवीत आहेत. काम ते अत्यंत पद्धतशीर करतात. महाराज चांगल्या आनंदामध्यें असले तर अमुक कामें रुजू करून निकाल खुशीमध्यें करून घ्यावयाचा व रागामध्यें असले म्हणजे अमुक कामें रोषामध्यें करून घ्यावयाचीं अशा प्रकारच्या कित्येक काम रुजु करणाऱ्यांच्या प्रवृत्तीस अवसर मिळूं नये, म्हणून रुजू होणाऱ्या कामाची खातेवार व महत्त्ववार एक यादी त्यांच्यापुढें रुजू करण्यांत येते व नंतर त्या यादीवरून ते अमुक नंबरचें काम रुजू करा असें स्वतः सांगतात. व तें काम त्यांच्यापुढें मांडलें जातें. ह्याप्रमाणें कामाचा निकाल केला जातो. लंच दोन

वाजतां झाल्यावर महाराज आराम बहुधा कधीं घेत नाहींत. नवीन प्रसिद्ध होणारीं, इतरांस रुक्ष वाटतील अशीं समाजशास्त्र, तत्वज्ञान, नीतिशास्त्र, राजकारण व राजशासन इत्यादि विषयांवरील गहन पुस्तकें ते नियमितपणानें वाचतात. लंच, डिनर, चहा इत्यादि वेळीं मोठमोठे नामांकित ग्रंथकार, मुत्सद्दी, धंदेवाईक, खेळाडू, शास्त्रज्ञ वगैरे ज्या त्या देशांतील तज्ज्ञ मंडळींना ते पाचारण करितात व त्या वेळीं त्यांच्याशीं निरनिराळ्या प्रश्नांसंबंधी चर्चा करून माहिती मिळवितात, त्यांत कांहीं उपयुक्त माहिती मिळाल्यास तिचा उपयोग बडोदें राज्यामध्यें कसा करून घेतां येईल ह्या विवंचनेमध्यें ते असतात, व योग्य त्या मार्गाचें संशोधन करूं लागतात. तिसरा प्रहरपर्यंतची अशा प्रकारची दिनचर्या झाल्यावर नंतर महाराज ज्या त्या ठिकाणच्या कांहीं उपयुक्त संस्था किंवा स्थळें पाहण्यास जातात, व त्यांचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यांतून आपणांस कांहीं घेण्यासारखें आहे किंवा काय हें पाहत असतात. रस्त्यानें जातां जातां एकादें सुंदर शिशुक्रीडांगण पाहिलें कीं तेथें उभे राहून त्यासंबंधीं सर्व माहिती मिळवावयाची व बडोदें राज्यांत तशा प्रकारची क्रीडांगणें कशा रीतीनें करतां येतील त्यासंबंधीं विचार करून पुढची सर्व तजवीज करण्यासंबंधीं हुकूम काढावयाचे. एखाद्या तिकडील म्युनिसिपालिटीनें हलक्या स्थितींतील लोकांकरितां घरें बांधून दिलीं असतील तर तीं घरें पाहण्यास जावयाचें व त्यांचे प्लॅन्स, अंदाज वगैरे मागवून आपल्या देशाच्या स्थितीस अनुसरून योग्य ते फेरफार करून तशा प्रकारची योजना बडोदें राज्यांत दाखल करावयाची, असें नेहमीं कांहींना कांहींतरी ते करीत असतात. नंतर सायंकाळीं एक तास पुनः नियमानें फिरावयास जातात. नंतर सायंकाळचें जेवण व त्यानंतर पुनः रात्रीं वाचीत नाहीं बसले तर सवडीप्रमाणें एकादे वेळीं नाटकगृहामध्यें किंवा चलच्चित्रपट—मंदिरामध्यें दोन तास करमणुकीमध्यें घालवून रात्रीं सव्वा अकरा वाजतां ते निद्रावश होतात. नाटकगृह किंवा चलच्चित्रपटमंदिरामध्यें देखील ते नटांचा अभिनय, गायनपद्धति, मंदीररचना, इत्यादींचें सूक्ष्म निरीक्षण व आपल्या बडोद्यामध्यें त्या पद्धतीवर कांहीं करतां येईल किंवा काय ह्याचा विचार करीत असतात. अशाच प्रकारें एका नाटकगृहामध्यें एक नाटक पाहत असतांना प्रस्तुत लेखकांस महाराजांनीं

बडोदें येथील न्यायमंदीरमधील मोठ्या हॉलचा नाटकगृहासारखा उपयोग करितां येईल किंवा कसें त्यासंबंधीं योजना रुजू करण्यास बडोद्याच्या बांधकाम खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यास हुकूम लिहिण्यास सांगितलें होतें.

वरील त्रोटक दिनचर्येची जी हकीकत दिली आहे, त्यावरून महाराज हे अहर्निश प्रजेची सुधारणा कशा रीतीनें साधतां येईल त्याचे उपाय योजून ते अमलांत आणण्यामध्यें कसे निमग्न असतात, व त्यांचा सर्वकाळ त्यामध्येंच कसा जातो हें सहज दिसून येईल.

" स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः " ही कविकालीदासोक्ति श्रीमंत सयाजीराव महाराज ह्यांच्या बाबतींत अगदीं यथार्थ आहे यांत शंका नाहीं.

---

## श्री. महाराजांचें अस्पृश्योद्धारक कार्य

### ( लेखकः—श्रीयुत विठ्ठल रामजी शिंदे बी. ए. )

श्रीमंत महाराज सर सयाजीराव गायकवाड ह्यांच्या ७१ व्या वाढदिवसाचा अत्यंत शुभप्रसंग ( ता. मार्च १७ इ. सन १९३३ ) जवळ येत चालला आहे. तन्निमित्त त्यांच्या चरित्राचा व कार्याचा एक ग्रंथ तयार करून त्यांना नम्रता-पूर्वक अर्पण करण्याचा विचार त्यांच्या चहात्यांनीं केला आहे, ही गोष्ट जितकी आनंददायक आहे, तितकीच सूचक आहे. मीहि महाराजांचा एक अत्यंत नम्र चहाताच नव्हे तर त्यांच्याकडून उपकृत झालेला मनुष्य असल्यामुळें, सदर ग्रंथकर्त्यांनीं मला वरील विषयावर एक लेख ह्या पुस्तकांत घालण्यासाठीं लिहिण्याची विनंति केली, ह्याबद्दल मी त्यांचा मोठा आभारी आहें. परंतु ह्या कामासाठीं मला अवधी मात्र फार थोडा मिळाला आहे. माझा व महाराजांचा जरी चिर परिचय आहे, व वरील विषय म्हणजे माझ्या सार्वजनिक सेवेचा एक मुख्य भाग आहे, तरी महाराजांनीं या विषयांत जे अफाट व उदार प्रयत्न व्यक्तिशः व आपल्या विद्वान अधिकाऱ्यांकडून आपल्या दीर्घ कारकीर्दींत चालविले आहेत, त्यांचें संपूर्ण आणि उठावदार शब्दचित्र तयार करण्यासाठीं जरूर ती सामुग्री तूर्त माझ्याजवळ नाहीं, व ती मिळवून हें माझें आवडतें कार्य करण्यास आतांच अवसरहि मिळणार नाहीं.

महाराजांनीं जें प्रत्यक्ष कार्य केलें आहे, त्याची नुसती तारीखवार जंत्री तयार करून त्यांत महाराजांना ह्या कठीण पण राष्ट्रीय पुण्यसेवेंत जी महनीय सिद्धि मिळाली आहे, तिचें कार्यकारणदर्शी पर्यालोचन केलें तरी ही कृती मोठी रंजक व प्रेरक होईल यांत शंका नाहीं. पण ही कृती ह्या विषयाचा केवळ बाह्य अथवा अभिधात्मक भाग ठरेल. महाराजांच्या अंतरंगांत अवगाहन करून त्यांना ह्या पुण्यकार्याची लहानपणीं व तरुणपणीं प्रेरणा केव्हां व कशी कशी झाली, ह्या अपूर्व विषयाकडे त्यांच्या विविधकार्यप्रचुर जीवनांत त्यांचें मन कसकसें आकृष्ट झालें, व ह्या राष्ट्रीय पापनिष्कृतीचा यज्ञ करीत असतांना त्यांच्या मनाला आशानिराशा, हर्षामर्श व धन्यता कशी वाटत गेली वगैरे अनुभवांचें शब्दचित्र वठविण्याची संधी ज्या कोणा सुदैवी चित्रकाराला मिळेल तो धन्य !

श्रीमंत सयाजीराव महाराजांचें कार्य विस्तृत व दूरगामी आहे. केवळ राज्यकर्ते या नात्यानें एक वटहुकूम काढून त्यांना अस्पृश्यतेचें कार्य करतां आलें असतें. लोकमताचा पाठिंबा नसतांना असलीं समाजसुधारणेचीं कामें केवळ हुकूमाच्या जोरावर करणें जवळजवळ अशक्य, निदान दुर्घट तरी असतें. पण जपानचे बादशहा व तुर्कस्थानचे सर्वाधिकारी केमालपाशा यांनीं कांहीं झटपट सुधारणा केवळ दंडनीतीच्याद्वारें करून दाखविल्या आहेत; परंतु या महाराजांना असें एकादें डोळें दिपविणारे दिव्य दाखवावयाचें नसून, एका बाजूनें हळूहळू लोकमत बनवून दुसऱ्या बाजूनें अस्पृश्योद्धाराचा कायमचा पाया घालावयाचा होता, म्हणून त्यांनीं प्रस्तुत विलंबाचा पण टिकाऊ मार्ग पत्करिला. या विवेचनावरून महाराज हे एक अस्पृश्यतानिवारकच नसून अस्पृश्योद्धारकहि आहेत, हें भावी इतिहास भावी पिढयांना गंभीर रवानें गर्जून सांगेल, याची खात्री पटते.

भारतीय अस्पृश्यता ही एक भारतीय स्वतंत्र संस्थाच आहे. बौद्ध, जैन, शीख, लिंगायत, वैष्णव वगैरे धर्मपंथांनीं व इतर साधुसंतांनीं प्राचीन व मध्यकालीन अस्पृश्यांच्या आत्मिक उद्धारासाठीं थोडेबहुत प्रयत्न केले आहेत. पण

ते सर्व बहुतेक वैयक्तिक स्वरुपाचे होते. सामुदायिक अस्पृश्यता मूळांतच नष्ट करून आधुनिक अर्थानें निवारणाचें व त्यापुढचें भौतिक उद्धाराचें काम ह्या पंथांनीं किंवा कोणा संतांनीं केलेलें इतिहासांत नमूद नाहीं. ह्या बाबतींतील चालू प्रयत्न म्हणजे आधुनिक युगाचेंच एक विशिष्ट लक्षण आहे, असें म्हटल्यास तज्ज्ञांकडून विरोध होईल असें वाटत नाहीं. पाश्चात्यांची संस्कृति ह्या पुराणप्रिय देशांत अमल गाजवूं लागल्यानंतर गेल्या म्हणजे इ. स. १९ व्या शतकाच्या मध्यापासून अशा प्रयत्नास सुरुवात झाली. केवळ कालानुक्रमाप्रमाणें पाहिल्यास भारतीय अस्पृश्योद्धारकांमध्यें श्रीमंत सयाजी-राव महाराज गायकवाडांचा नंबर तिसरा लागतो. पहिल्या अस्पृश्योद्धारकाचा मान म. जोतीबा फुले ह्यांना, दुसरा मान बंगाल्यांतील ब्राह्म समाजाचे प्रसिद्ध परोपकारी गृहस्थ बाबु शशिपाद बानर्जी यांना, आणि तिसरा मान आमचे लेखनायक गुर्जराधिपति श्रीमंत महाराजाकडे जात आहे. फुले यांचे प्रयत्न इ. स. १८५२ सालीं, बानर्जींचें प्रयत्न १८६५ सालीं, आणि महाराजांचे प्रयत्न १८८३ सालीं म्हणजे त्यांना राज्याचे अधिकार मिळाल्याबरोबर दुसऱ्या तिसऱ्याच वर्षापासून सुरू झाले. पहिले फुले व्यक्तिशः गरीब व जातिशः मागासलेल्या वर्गांतले; दुसरे बानर्जी व्यक्तिशः संपन्न व जातिशः उच्च वर्णांतले होते, व तिसरे महाराज सर्वतोपरी थोर स्थितींतले आहेत. पहिल्या दोन व्यक्ती दिवंगत झाल्या, तिसरे आमच्या सुदैवानें अद्यापि धडधाकट व पूर्णपणें कार्यक्षम स्थितींत आहेत. ह्यामुळें कार्याच्या प्रमाणाच्या व सिद्धीच्या दृष्टीनें पाहतांना वरील दोघांपेक्षां महाराजांचें काम इतकें विस्तीर्ण व परिणामकारी झालें आहे कीं, ह्या तिघांच्या कार्याची तुलना करणेंच व्यर्थ आहे, इतकेंच नव्हे अगदीं आजकाल ह्या भरतखंडांत जी अस्पृश्यतानिवारणार्थ चळवळ अखिल देशभर फोंफावत आहे, व जिचीं पाळेंमुळें खालीं खोल शिरत आहेत त्या चळवळीची धुराहि महाराजांनीं सतत आपल्या खांद्यावर घेऊन अगदीं अग्रगण्य पुढाऱ्यांतलि आपलें प्रमुख स्थान कायम राखलें आहे. ह्या दृष्टीनें पाहतां महाराज म्हणजे नुसते एका मोठ्या संस्थानाचे सर्वाधिकारी अधिपति म्हणूनच नव्हे तर अखिल भारतांतील लोकमताचे नेते, समाजसुधारक, आणि राजकारणकुशल मुत्सद्दी.

इतकेंच नव्हे तर आपल्या दोस्त इंग्रज सरकारांनाहि पदोपदीं धडे शिकविणारे अनुभवी सत्ताधारी म्हणून जगापुढें झळकत आहेत.

इ. स. १९१८ सालीं आमच्या भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळीची मुंबईस एक खास अखिल भारतीय अस्पृश्यतानिवारक परिषद भरली. तिचे अध्यक्ष श्रीमंत महाराजच होते. त्यांचें अध्यक्षीय भाषण झालें, तें ह्या विषयावरील एक महत्वाचें वाङ्मय झालें आहे. त्यांचें भाषण आटपल्यावर त्यांचे दिवाण मनुभाई मेथा ह्यांनीं बडोदे संस्थानानें अस्पृश्यांसाठीं तेव्हांपर्यंत काय काय केलें ह्याच्या संक्षिप्त माहितीचा एक खर्डा माझ्या हातीं दिला. त्यांत म्हटलें होतें कीं, श्री. महाराजांनीं इ. स. १८८२ सालींच ही सुधारणा आपल्या राज्यांत सुरू करून लवकरच निरनिराळ्या भागांत १८ शाळा ह्या अंत्यज लोकांसाठीं उघडल्या. शाळांची ही संख्या वाढत १८९६ सालीं २० झाली. सन १८८२ सालीं ह्या कामास हात घालतांना महाराजांचें वय अवघें २० वर्षांचेंहि नव्हतें. दुसऱ्या कोणत्या संस्थानिकांचें लक्ष इतक्या कोंवळ्या वयांत ह्या हतभागी लोकांच्या दीन स्थितीकडे गेलें असेल बरें ? प्रत्यक्ष ब्रिटिश इलाख्यांतून तरी ह्यांच्या शिक्षणांची सोय अशा कळकळीनें व इतक्या प्रगतीनें झाली आहे काय ? इतर संस्थानांतून जी थोडींबहुत अशीं अपूर्व कृत्यें होतात त्यांचें श्रेय एखाद्या प्रागतिक दिवाणाकडेच असतें. पण ह्या महाराजांची गोष्ट तशी नाहीं. ह्यांनीं वरील परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांत सांगितलें, " मला ह्या कामीं अनेक अडचणींशीं झगडावें लागलें. कितीहि पगाराचें आमीष दाखविलें तरी कित्येक वर्षें हिंदू शिक्षकच मिळेनात, मुसलमानांकडून व नंतर आर्यसमाजिष्टांकडून हें काम करून घ्यावें लागलें. "

ह्या अत्यंत कठिण सुधारणेंत महाराजांनीं अपूर्व यश संपादन केल्याबद्दल सन १९२१ सालीं परोपकारी सभा नांवाच्या एका संस्थेनें महाराजांना **पतितपावन** अशी पदवी दिली. त्यावेळीं उत्तरादाखल केलेल्या भाषणांत महाराज म्हणाले, " ह्या पदवीला मी पात्र आहें, असें मला तरी वाटत नाहीं. उलट माझ्यावर ह्या पदवीमुळें एक अवघड जबाबदारी लादली जात आहे.

ह्या क्षेत्रांत मी एकटाच खपत आहें, असें नसून इतर जे कोणी आहेत, त्यांच्या कडेहि हा मान जातो. राज्याच्या काळजीमुळें व परिस्थितीमुळें ह्या कामीं मला जितकें करावयाचें होतें तितकें माझें हातून घडलें नाहीं. माझे अधिकारी मला जें सांगतात त्यावर मला अवलंबून राहावें लागतें; आणि ते जें करतात त्यावरच तृप्त राहावें लागतें. मानवी प्रयत्नाला मर्यादा असतात. विशेषत. हिंदुस्थानांतील राजे लोकांना, ते सर्वाधिकारी असूनहि, ह्या मर्यादा अधिकच भोंवतात ! " अशा अस्पष्ट उद्गारांवरून अवघ्या १९ वर्षांच्या तरुण महाराजांना ह्या नवीन सुधारणेची मेढ रोवितांना अधिकाऱ्यांकडून व लोकांकडून पाठिंबा किती मिळाला व अडथळे किती आले, ह्याची अंधुक कल्पना वाचकांनींच करावी. महाराजांनीं विद्वान् व प्रागतिक अधिकारी वेळोवळीं हाताशीं धरलें खरें. पण महात्मा गांधीसारख्या वृद्ध देवमाणसाला ज्या गुजराथ देशानें थोड्याच वर्षांपूर्वीं अस्पृश्यांच्या बाबतींत जुमानलें नाहीं, त्या देशांतील लोकमत ५० वर्षांपूर्वीं ह्या अनुभवी तरुण राजाला अगदीं सतावून सोडल्याशिवाय राहिलें असेल हें संभवत नाहीं. कांहींहि असो. ह्या सत्कार्याची मेढ तर ह्या खंबीर पुरुषानें पहिल्या धडाक्यासरशीं जी रोविली तिचा विस्तार पुढें कसा झाला तें आतां पाहूं.

बडोदें संस्थानाच्या सन १९३१ सालच्या खानेसुमारीच्या अहवालांत अस्पृश्यांची संख्या खालीलप्रमाणें दिली आहे:—

| अ. अंक | जात. | लोकसंख्या. |
|---|---|---|
| १ | भंगी | ३१,०१८ |
| २ | बुरुड व वांसफोडा | ४७८ |
| ३ | चांभार | ४२,८०२ |
| ४ | गरोडा | ७,७९६ |
| ५ | होलार | ५४ |
| ६ | महार | . ५७२ |
| ७ | मांग | ३७ |
| ८ | नाड्या | ६२२ |

| अ. अंक. | जात. | लोकसंख्या. |
|---|---|---|
| ९ | शेणवा | ९,६४३ |
| १० | थोरी | ५६ |
| ११ | तुरी | १,७११ |
| १२ | वांकर व धेड | १०७,९८८ |
| | एकूण | २०२,७७७ |

एवढी मोठी अस्पृश्यांची संख्या राज्याच्या दूरदूरच्या भागांत पसरलेली पाहून महाराजांच्या मनांत त्यांच्याविषयीं कळवळा आला असेल यांत काय नवल ? या लोकांसाठीं महाराजांनीं शाळा काढल्या व सन १८९१-९२ सालीं बडोदें, अमरेली, पाटण आणि नवसरी येथें वसतिगृहें काढून त्यांच्या जेवणाखाणाची व राहण्याची सोय केली. त्यांना कपडेलत्ते, पाट्यापेन्सिली व पुस्तकें पुरविण्याचा उपक्रमहि महाराजांनीं सुरू केला. मुंबई सरकारनें पुण्यास एक वसतिगृह उघडलें तें ह्यानंतर ३० वर्षांनीं म्हणजे सन १९२२ सालीं ! वरील चार वसतिगृहांमुळें अंत्यजवर्गांना उत्तेजन मिळून पुढील ५।६ सालांत शाळांतून शिकणाऱ्या मुलांची संख्या दुपटीनें वाढली. ह्याकाळीं दरवर्षीं अंत्यजांची एक दोन विद्यार्थी गुजराती ६ व्या यत्तेच्या परीक्षेला बसत असत.

ह्यानंतर कित्येक वर्षें ह्या प्रयोगाला दुष्काळ आणि प्लेगचीं मोठीं विघ्नें आलीं. ह्या कंगाल लोकांना हातांवर पोट भरायचें असतें. त्यामुळें मुलांना शाळेंत पाठवायला त्राण उरेना. ह्यांत हिंदु अधिकाऱ्यांच्या सहानुभूतीच्या अभावाचीहि भर पडली. अस्पृश्य विद्यार्थ्यांना शिक्षणाची गोडी लागत नाहीं अशी हूल उठविण्यांत आली. शेवटीं हीं वसतिगृहें बंद ठेवावीं लागलीं. तरी पण श्री. महाराजांनीं खर्चांत बचत न करितां, बडोदें भागांत रु. ४० च्या व इतर भागांत रु. २५ च्या शिष्यवृत्त्या ठेवल्या. व कसेंहि करून इ. स. १९०० सालापासून पुढें कांहीं वर्षें शाळांतून ह्या विद्यार्थ्यांची संख्या सरासरीनें १,००० पासून १,५०० राहील असें केलें.

इ. स. १९०३ सालच्या सप्टेंबर अखेर मी ऑक्सफर्ड विद्यालयांतील धर्मशिक्षण संपवून स्वदेशीं आलों. महाराजसाहेबांनीं मला लगेच भेटीला बोलावलें,

आणि बडोदें शहरांतील अंत्यजांच्या त्या वेळीं चार शाळा बऱ्या चालल्या होत्या, त्या तपासून मला काय वाटतें तें समक्ष कळविण्याची आज्ञा केली. ह्या शाळांतून शिकून पास झालेलीं मुलें कामाच्या अभावीं रिकामीं हिंडतात, त्यांना कांहीं योग्य नोकऱ्या देण्याची व्यवस्था होईल काय असें मी महाराजांना विचारलें. पण तें त्या काळीं गुजराथसारख्या प्रांतांत शक्य नव्हतें. मात्र अशा मुलांना अधिक शिष्यवृत्त्या देऊन वरिष्ठ शिक्षणाकडे पाठविण्याचें महाराजांनीं कबूल केलें. एकंदरींत ह्या थोर पुरुषाच्या अंतःकरणांत ह्या हतभागी लोकांचा ध्यास सतत लागला होता, हें माझ्या ध्यानांत तेव्हांच येऊन चुकलें. इतकेंच नव्हे तर ह्या महत्त्वाच्या विषयासंबंधीं माझ्या स्वतःच्या विचाराला नवीन प्रोत्साहन मिळून, ब्राह्मसमाजाच्या अखिल भारतांतील माझ्या प्रचार कार्याबरोबर ह्या लोकांची निरनिराळ्या प्रांतांतील स्थिति स्वतः डोळ्यांनीं निरखून अजमावण्याची मलाहि प्रेरणा झाली.

इ. स. १९०४ च्या डिसेंबर महिन्याच्या अखेरीस मुंबईस राष्ट्रीय परिषदेचें अधिवेशन झालें. त्याच वेळीं मुंबईंत भरलेल्या सामाजिक परिषदेचें अध्यक्षस्थान श्री. महाराजसाहेबांनीं मंडित केलें. तेव्हांच अखिल भारतीय एकेश्वरी परिषदहि आम्ही मुंबईंत भरविली होती. प्रांतोप्रांतींचे पुढारी जमले होते म्हणून ह्या संधीचा फायदा घेऊन मुंबई प्रार्थनासमाजाच्या रात्रींच्या शाळांचा बक्षिस समारंभ आम्हीं केला व त्याचें अध्यक्षस्थानहि महाराजांनीं स्वीकारलें. इतकेंच नव्हे तर ह्या समारंभाचे शेवटीं रात्रीं आमच्या राममोहन आश्रमांत सर्व जातींचें मोठें सहभोजन झालें, त्याचे अध्यक्षहि महाराजच होते. त्या बक्षिस समारंभांत चांभार जातीच्या ज्या एका लहान मुलानें धिटाईनें भाषण केलें व ज्याचें महाराजांनीं आपल्या भाषणांत प्रेमानें अभिनंदन केलें तोच मुलगा रा. शिवरकर हल्लीं डॉ. आंबेडकरांचा सेक्रेटरी होऊन त्यांच्या स्वजातीच्या उन्नतीचे कार्यांत मदत करीत आहे ! स्वतः डॉ. आंबेडकरांना तर महाराजांचा फारच मोठा आश्रय होता. ते बडोदे कॉलेजांतून बी. ए. झाल्यावर त्यांना बडोदें संस्थानच्या धारासभेंत सभासद नेमलें. नंतर लवकरच पुढील शिक्षणासाठीं बरींच वर्षें पुष्कळ खर्च करून त्यांना अमेरिकेंत

ठेविलें होतें. तेथून पी. एच. डी होऊन आल्यावर कांहीं दिवस बडोद्यांत डॉ. आंबेडकरांनीं नोकरीहि केली आहे.

वरील सामाजिक परिषदेचा महाराष्ट्रावर व विशेषत: पुण्यांतील कार्यकारी पुढाऱ्यांवर जसा शुभ परिणाम झाला तसाच महाराजांच्या उत्साहशक्तीवरहि झालेला दिसतो. लगेच दोन तीन वर्षांत पुणें मुंबई येथें सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटी, सोशल सर्व्हीस लीग, सेवासदन, डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया सारख्या अखिल हिंदुस्थानच्या राष्ट्रीय जीवनांवर परिणाम करणाऱ्या संस्थांचा उद्भव झाला. ह्याच सुमारास महाराजांनीं आपल्या राज्यांत सक्तीच्या मोफत शिक्षणाचा कायदा पास करून, राष्ट्रीय शिक्षणाचा धडा इतर लहानमोठ्या संस्थानासच नव्हे तर प्रत्यक्ष इंग्रज सरकारासहि घालून दिला ! बडोद्याच्या इतिहासांत हें साल सोन्याच्या अक्षरांनीं लिहिलें जाईल. बडोद्यास सक्तीच्या शिक्षणाचें प्रस्थान मांडल्याबरोबर उसळीसरशी अंत्यज शाळांची संख्या १८ ची २४७ आणि विद्यार्थ्यांची संख्या २,००० ची ९,२६९ झाली ! बंद केलेल्या वसतिगृहांची पुन: गरज भासू लागली.आणि एकंदर ह्या वाढलेल्या वाचकांकरितां एका तरबेज आणि वाहून घेतलेल्या कार्यवाहकाची खास निवड करावी लागली. आणि लवकरच अंत्यजांच्या सुदैवानें पंडित आत्माराम हे ह्या कार्यास लाभले. १९०७–८ च्या सुमारास बडोद्यास हल्लीं असलेले, व अखिल भारतांत नमुनेदार झालेलें अंत्यज विद्यार्थी–वसतिगृह उघडण्यांत येऊन, पंडितजींना त्या गृहाचे सुपरिंटेंडंट व बडोदें राज्यांतील अंत्यज शिक्षणाचे इन्स्पेक्टर नेमण्यांत आलें.

ह्यापूर्वी एक दोन वर्षें मुंबईस आमच्या डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया ह्या संस्थेची स्थापना ता. १८ आक्टोबर १९०६ रोजीं झाली, व प्रांतोप्रांतीं तिच्या शाखा निघूं लागल्या. दरवर्षीं जेथें जेथें कॉंग्रेसचीं अधिवेशनें होत तेथें अखिल भारतीय अस्पृश्यता निवारक परिषदेचींहि अधिवेशनें होऊं लागलीं. सुरतेच्या कॉंग्रेसच्या वेळीं सन १९०७ सालीं असेंच एक अधिवेशन भरविलें होतें. महाराजांचें लक्ष्य आपल्याच राज्यांतील अस्पृश्यांकडे लागलें होतें असें नसून ते अखिल भारताचे एक अग्रगण्य पुढारी असल्यामुळें

ते आमच्या ह्या मिशनची प्रगति मन लावून निरखीत होते. म्हणून ह्याच सुमारास त्यांनीं मला बडोद्यास बोलावलें. बडोद्याचे न्यायमंदीराच्या भव्य दिवाणखान्यांत एक जंगी दरबारवजा जाहीर सभा बोलावून स्वतःच्या अध्यक्षत्वाखालीं त्यांनीं माझें अपृश्योद्धार ह्या विषयावर एक व्याख्यान करविलें. हेंच व्याख्यान मला पुढें लिहून काढण्यास सांगून तें स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचाहि खर्च दिला. बहिष्कृत भारत ह्या नांवानें तें प्रसिद्ध झाल्यावर त्याच्या एक हजार प्रती बडोदे दरबारानें विकत घेऊन वाटल्या! ह्याचप्रमाणें पंडित सातवळेकर ह्यांनीं केलेल्या " स्पर्शास्पर्श' ह्या पुस्तकालाहि महाराजांची मोठी मदत झाली आहे. अर्थात् ह्या सर्व गोष्टींचा परिणाम बडोद्यांतील कार्यावरहि होऊन लवकरच पंडित आत्माराम यांच्या देखरेखीखालीं कार्यास मोठा जोर आला.

इ. स. १९०९ सालीं महाराजांचा मुक्काम पुणें मुंबईकडे झाला, त्यावेळीं सप्टेंबर महिन्यांत आमच्या डिप्रेस्ड क्लासेस मिशनच्या पुणें शाखेच्या शाळांच्या बक्षिस समारंभाचे आणि मुंबईंतील टाउनहॉलमध्यें ता. १८ आक्टोबर रोजीं भरलेल्या आमच्या मिशनच्या भ्रातृ-संस्थेच्या वाढदिवस समारंभाचे महाराजच अध्यक्ष झाले. ह्या दोन्ही ठिकाणीं अनुक्रमें १,००० रु. व २,००० रु. चीं देणगी देऊन महाराज मिशनचे आश्रयदाते झाले. श्री. दमाजीराव गाईकवाड स्कॉलरशिप फंड नांवानें अद्यापि ह्या फंडाच्या व्याजांतून आमच्या शाळांतील विद्यार्थ्यांना नियमित रीतीनें शिष्यवृत्त्या दिल्या जात आहेत. शिवाय आमच्या वसतिगृहांतील रा. भटकर नावाचा एक महार विद्यार्थी मॅट्रिक परिक्षेंत पास झाल्यावर त्याला कॉलेजांतील पुढील शिक्षणासाठीं दरमहा रु. २५ स्कॉलरशिप दिली. पुण्यांतील बक्षिस समारंभाचे वेळीं, पुणें शहर व लष्कर येथें राहणाऱ्या निरनिराळ्या अस्पृश्य वर्गांतील लोकांनीं आपसांत वर्गणी करून, महाराजांच्या अस्पृश्योद्धार कार्यांचा जाहीर गौरव करण्यासाठीं एक मानपत्र अर्पण केलें. त्या वेळीं महाराजांच्या दर्शनासाठीं लहानथोर स्त्रीपुरुषांची अलोट गर्दी जमली होती. निरनिराळ्या अस्पृश्यवर्गीय स्त्रियांनीं जुन्या रिवाजाप्रमाणें आरती

करून महाराजांना मोठ्या प्रेमानें ओवाळिलें. महाराजांनीहि परत भेट म्हणून आरतींत पांच पांच सोन्याच्या मोहरा ठेवून आपली गोड समयज्ञता प्रकट केली. तो एकंदर देखावा अत्यंत हृदयस्पर्शी झाला.

हा समारंभ आटपून महाराज साहेब परत बडोद्यास गेल्यावर लगेच पुणें येथील महार समाजाचे प्रमुख पुढारी रा. शिवराम जानबा कांबळे व रा. श्रीपतराव थोरात ह्या दोघांना महाराजांनीं बडोद्यास खास आमंत्रण देऊन नेलें व त्यांच्याशीं विचारविनिमय करून त्यांचा योग्य सत्कार केला, व त्यांना उघड रीतीनें राजमहालांत आमंत्रण करून, आपल्या टेबलावर सहभोजन केलें !

ह्यापुढें नऊ वर्षांनीं सन १९१८ सालीं मुंबई येथें आमच्या मिशनची अखिल भारतीय अस्पृश्यतानिवारक परिषद झाली, तिचे अध्यक्ष होऊन महाराजांनीं ह्या राष्ट्रकार्यास पुन: नवीन चैतन्य दिलें.

अंत्यज वर्गाच्या विद्यार्थ्यांकरितां नुसत्या शाळा आणि वसतिगृहें स्थापून महाराज स्वस्थ बसले नाहींत. बडोदा येथील वसतिगृह ही एक अखिल भारतांत नमुनेदार संस्था आहे हें वर सांगितलेंच आहे. हा प्राचीन गुरुकुलाच्या धर्तीवर एक पुण्याश्रम आहे. पंडित आत्माराम या आश्रमांतच राहात असतात. त्यांच्या मुलांनाहि वडिलांचेंच समाजसेवेचें वळण लागलें आहे. येथें विद्यार्थ्यांच्या ( मुलांची वेगळी व मुलींची वेगळी ) भोजनाची, स्नानाची, अभ्यासाची व व्यायामाची अगदी उच्चवर्णीयांप्रमाणेंच उत्तम सोय केलेली आहे. गुजराथेंतील अंत्यज सर्व आपापली धार्मिक गृहकृत्यें आपल्या जातींतल्याच पुरोहिताकडून करून घेतात. ह्यांना गरोडा म्हणतात. ह्या गरोड्यांकडून धर्मकृत्यें योग्य रीतीनें व्हावीत म्हणून त्यांच्यासाठीं एक संस्कृतशाळा काढण्यांत आली. आणि तींत २५ गरोडा विद्यार्थ्यांना दरमहा रु. ८ च्या स्कॉलरशिपा देऊन तयार करण्यांत आलें. वसतिगृहांतील सर्व विद्यार्थ्यांना वेदमंत्रासह नित्याची उपासना करण्यास शिकविण्यांत येतें. शिवाय त्यांची दोन बालवीर पथकें आधुनिक पद्धतीनें तयार करण्यांत आलीं आहेत. एकंदरींत हा आश्रम पाहणाऱ्यांवर फार उदात्त परिणाम होतो. ह्या देशांतील व बाहेरील पुष्कळ प्रसिद्ध पुरुषांनीं हा

वर जी इ. स. १८८३ पासून १९३२ अखेर शाळांच्या व विद्यार्थ्यांच्या संख्येंत एकंदरींत प्रगति दाखविली आहे तिच्यांत मधून मधून चढ उतार दिसत आहे. बडोदें राज्यांतील अत्यंजांची एकंदर लोकसंख्या वर दर्शविल्याप्रमाणें २,०२,७७७ आहे. त्या पैकीं आज तागायत प्राथमिक शाळांत शिकणारीं एकंदर मुलांची संख्या २०,९०३ आहे.

गेल्या वर्षापासून अस्पृश्यांकरितां स्वतंत्र निराळ्या शाळा नसाव्यात अशी विद्याखात्यानें आपल्या धोरणांत दुरुस्ती केल्याचें समजतें. ही दुरुस्ती होऊन अस्पृश्यांच्या स्वतंत्र ११० शाळा गेल्या वर्षांत कमी केल्या गेल्या. तरी गेल्या वर्षीं मुलांच्या संख्येंत २,५१५ वाढच झाली आहे. ती खरी व टिकाऊ असल्यास ही दुरुस्ती वावगी नाहीं.

कलाभुवन, ट्रेनिंग कॉलेज, हायस्कुलें, व कॉलेज ह्यांतून अस्पृश्यांना शिकण्यास सररास मोकळीक होऊन बरींच वर्षे झालीं आहेत, तरी पण पदवीधरांची संख्या १२ हून जास्त आढळत नाहीं. पण संबंध मुंबई इलाख्यांत तरी आज सर्व अस्पृश्य वर्गांच्या पदवीधरांची संख्या ६ वर कोठें गेली आहे? अशा स्थितींत बडोद्यासच नांव कोण ठेवूं शकेल? हल्लीं हायस्कुलांत १५०, कलाभुवनांत १५, ट्रेनिंग कॉलेजांत १७ मुलें शिकत आहेत. दुय्यम शिक्षणार्थ एकंदर ३६ स्कॉलरशिपा आहेत. बडोदें राज्यांत सर्व अस्पृश्य विद्यार्थ्यांना शिक्षण मोफतच मिळतें.

पहिलीं १०–१२ वर्षें अस्पृश्य वर्गांना शिकविण्याला हिंदु शिक्षकच मिळत नसत. कितीहि पगार घेऊन एखादा हिंदु मिळाला तरी तो टिकून राहत नसे. म्हणून अशा शाळांत मुसलमान शिक्षकावर काम भागवावें लागे असें स्वतः महाराज साहेबानांच एका संमेलनांत उघड सांगावें लागलें. पण आतां ही स्थिति पालटून हल्लीं १६६ अंत्यज वर्गांचेच शिक्षक विद्याखात्यांत अध्यापनाचें पवित्र काम करीत आहेत. ही गोष्ट खरोखर महाराजांना भूषणावह आहे.

इ. स. १९३२ सालीं बडोदें राज्यांतील २४ खेड्यांत २४ निरनिराळ्या सहकारी पतपेढ्या ३६० अस्पृश्यवर्गीय सभासदांच्या फायद्यासाठीं काम करीत

होत्या, अशी मला माहिती मिळालेली आठवते. त्यांस दरमहा ८४ आणे व्याजानें थकलेल्या कर्जफेडीसाठीं, शेतकीची आउतें घेण्यासाठीं, व हातमाग खरेदी करण्यासाठीं रकमा कर्जाऊ देण्यांत आल्या.

बडोदें, अमरेली, पाटण, नवसारी येथील चार बोर्डींगांतील सर्व मुलींना शिवणकाम, कशीदा व स्वयंपाक शिकविण्यांत येतो. इ. स. १९१९ सालीं ह्या बोर्डींगांतील १७ वर्षांच्या एका अनाथ मुलीचा विवाह एका उच्च वर्णीयाशीं करून देण्यांत आला, तेव्हां दरबाराकडून रु. ३० ह्या वधूला स्त्रीधन म्हणून देण्यांत आलें.

बडोदें राज्यांतील सर्व दवाखानें, कोर्टें, इतर सरकारी कचेऱ्या, व ग्रंथालयें सर्व अस्पृश्यांना सर्वदा मोकळ्या झाल्या आहेत. धारासभेंतून अस्पृश्य प्रतिनिधींची मधून मधून नेमणूक होते. मुलखी खात्यांत एक पदवीधर व किती तरी कारकून राजरोस सर्वांबरोबर बसून कामें करीत आहेत.

हल्लीं दुमदुमत असलेल्या मंदीर प्रवेशाच्या दंगलींत ह्या पतितपावन महाराजांनीं आघाडी मारून सरशी मिळविली आहे. हल्लींची मंदिर—प्रवेशाची चळवळ सुरू होण्यापूर्वींच त्यांनीं आपलें खंडेरावचें मंदिर अस्पृश्यास खुलें केलें होतें, आणि गेल्या आक्टोबर महिन्यांत तर सर्व हिंदु धर्मीयांस जातगोत मनांत न आणतां सरकारी देवळांतून प्रवेश करूं द्यावा, व तसें करण्यास खाजगी देवळांच्या मालकांची मनें वळवावी; कारण परमेश्वर सर्वांवर सारखेंच प्रेम करितो, अशा आशयाचा श्री. महाराज साहेबांनीं लोझानहून तारेनें हुकूम पाठविला. याविरुद्ध कांहींनी चळवळ चालविली असली तरी तिला मुळींच जोर नाहीं. ब्रिटिश हिंदुस्थानांतून सध्यां चालू असलेल्या मंदिरप्रवेशाच्या चळवळीस तेथील सनातनी मंडळी जोरानें विरोध करीत आहेत. पण तितका तीव्र विरोध बडोद्यास नाहीं असें समजतें. सत्कार्य म्हटलें म्हणजे त्यांत विघ्नेंहि यावयाचींच पण त्यामुळें घाबरून न जातां, संकटें हीं कार्यसिद्धीचीं मापेंच होत अशी मनांत खूणगांठ बांधून, समाजधुरीणांनी आपलें लोकशिक्ष-

णाचें व लोकोन्नतीचें कार्य सतत करीत राहिलें पाहिजे. महाराजांनीं असें केलें, व म्हणूनच आज त्यांना अस्पृश्योद्धाराच्या या पुण्य कार्यांत अपूर्व यश मिळवितां आलें.

असो; 'परगुणपरमाणून् पर्वतीकृत्य नित्यं । निज हृदि विकसंतः सन्ति सन्तः कियन्तः ॥' या कोटींतील या महान् संतास दीर्घायु व पूर्ण आरोग्य लाभो, आणि त्यांच्याकडून अस्पृश्यांचा कायमचा उद्धार होवो अशी परमेश्वराजवळ नम्रतापूर्वक मागणी करून, मी हा अल्पलेख पुरा करितें.

---

# HIS HIGHNESS THE MAHARAJA SIR SAYAJIRAO GAEKWAR AS CO-OPERATOR

*( By Mr. G. K. Devadhar, M. A., C I.E.. President, Servants of India Society, Poona ; and ex-President, Provincial Co-operative Institute, Bombay)*

My friends have very kindly asked me to contribute an article on "Co-operation" to the big volume called the "श्रीसयाजीगौरवग्रंथ" to be presented to His Highness the Maharaja Sir Sayajirao Gaekwar of Baroda, on the auspicious occasion of the 71st Birthday of His Highness, which is going to be celebrated with great pomp and ceremony in Baroda this week and thus to associate myself with it.

Want of adequate time has very seriously prevented me from doing justice to the subject, considering the importance of both the subject-matter of the article and of the occasion that has called it forth; but in writing it now at this late day, I am acting on two principles viz. 'better late than never' and 'something is better than nothing'.

In view of the special circumstances, I have decided. as far as possible, to confine my observations on this subject to the progress of the co-operative movement in the Baroda State, with special reference to the part played by the government of His Highness the Maharajasaheb in the early days of this century, when very few people in India knew anything about co-operation and the urgent need for its introduction in this poor and vast country to improve the chaotic economic condition of the agriculturists and the masses to which Baroda was no exception; and even to-day according to Mr. N. R. Sarkar of Calcutta "*agriculturists all over India are at present immersed in debt.*" They have to bear on their shoulders a very heavy and crushing burden of indebtedness which to-day amounts to a colossal figure, somewhere in the neighbourhood of nine hundred (900 crores) of rupees. The average indebtedness for agriculturists scattered in various provinces in India per head ranges between Rs. 31

and Rs. 92; and the average indebtedness per acre of cultivated land ranges today between Rs. 14 and Rs. 63.

It goes without saying that in working out any scheme of economic reconstruction of Rural India, co-operative movement in its double aspect of "*Co-operation and Credit*" is expected, as in European countries, to function very prominently as a solvent factor; and it must be very clearly enunciated that in the modern world no progress is possible of achievement without education, co-operation, and organization; and without these attributes of modern civilization any people would have to remain in a primitive stage.

Of late, due to many causes, justifiable and unjustifiable, the co-operative movement in India has come in for a great deal of unsympathetic and in some cases even uninformed criticism, both in official and in non-official quarters. There are among these critics not a few who presume to know much about the conditions of success, but really speaking their criticism betrays want of intimate knowledge of the conditions under which the Indian co-operators had to do their work in the past and have still to continue to do so in the ultimate faith, that co-operation coupled with organized credit was the only lever to lift the masses up from the slough of despond and to pave the way for the gradual redemption of their chronic indebtedness.

All those who sit in judgement on the alleged failure of the co-operative effort in India during the last 25 years or more do not, to my mind, take into account the environments of agriculturists in this land, their daily increasing burdens, and their utter helplessness against the world conditions which are changing rapidly and with which they have no power or weapons to fight. It is a strange irony of fate that even the mightiest of nations have not escaped the on-slaught of economic disturbances that have engulfed the world and convulsed it. It is but natural that the poor Indian peasant should be hopelessly crushed under these, for a time, but that does not mean that co-operation has proved its impotence.

The critics might as well ask "Is the Co-operative House in India to-day in order" and "Is its foundation quite

sound ?" The answer to these two questions may be attempted in the light of experiences, as narrated by E. N. Bennett, M.A., in his book styled "Problems of Village Life (1348 to 1913 A.D.) in its chapter on " Co-operation and Credit."

" In Germany alone there are 1,700 co-operative credit banks. A number of agriculturists combine to form a bank and the security demanded for a loan to any member is two-fold. The borrower must be a man of trustworthy character and his enterprise must be of such a sound character that there is a good prospect of his success and his ability to repay the loan. It may be thought that such abstract security as this is unfitted to form the basis of a business undertaking: but any fears on this score are completely dissipated by facts of experience. The banks have proved a signal success, a reasonable return on the small capital involved is secured, and a defaulter is a very rare phenomenon.

" There is surely no valid " A priori " argument against the benefits of these banks amongst ourselves. If sound character is found to be the best possible security on the Continent it can safely be relied on in England. It would be humiliating to suppose that farmers and peasants in other countries can be trusted while our fellow-citizens cannot. Nor, indeed, can this suspicion hold the field for a moment in view of what has actually taken place in Ireland, where co-operative credit banks are working with excellent results; in view, too, of the indubitable integrity of our English small-holders proved by experience of the Commissioners and County Councils. Small as the progress of co-operative credit in Great Britain is up to the date of writing, the record of the 45 societies already established in England and Wales is encouraging. But when one reflects that in Servia there were, in 1906, including local branches, no less than 750 of these banks, our natural backwardness in this useful and almost essential enterprize is certainly remarkable. We can only hope that the efforts of our Board of Agriculture will be successful in undermining the general reluctance on the part of our rural population to accept the principle of personal credit and unlimited liability".

My purpose in giving this long extract from a book relating to experiences gathered in countries outside India, is to indicate indirectly that co-operation which is a common need requires common ground and common essentials to succeed. To the extent to which such common ground and essentials have been secured, success has been attained, and where many assumptions were wrongly made, it would be no wonder if the superstructure had shown in same places weaknesses inherently due to wrong assumptions. This is but natural, in my opinion, if it is to be a strong building that must be based upon the foundation of a strong character, integrity, and profitable industry. These are matters for education. If these elements were lacking in the laying down of the foundation, sooner it is done the better, even though late, without entering any further into the examination as who was responsible for this neglect of securing them for the ultimate strength, soundness, and success of the co-operative movement. Those basic principles alone have made for its phenominal success in some other parts of the world.

That India needs—and needs very badly—the true spirit of co-operation, that the Indian ryot is hopelessly poor but honest, and that no alternative to co-operative effort for the class of people for whom it is meant has yet been tried are propositions that could not be ordinarily doubted and disputed. Again, it might be asked, has the present success of the movement justified the faith and the early expectations with which work was undertaken in British India and Indian India and should the results be not commensurate with the energy and money put forth so far in that field, to what extent change in the policy would be justifiable ? These are some of the questions to which attention has to be directed and an answer attempted.

It is in the light of these views that I propose very briefly and hurriedly to judge, in my humble way, of the success of this movement in Baroda State which had in His Highness the Maharaja Saheb, the pioneer to inspire and to inaugurate it in 1904-05 at almost the same time when this measure was first forged in the Imperial Legislative Council of the Viceroy

in Calcutta in 1904, for the first time as a great measure of public beneficence for which the name of Lord Curzon would go down to posterity as a great Rural Reconstructor. Almost simultaneously with the passing of this Act of 1904 the same or similar measure was introduced by the Maharaja of Baroda for the benefit of his subjects ; inasmuch as the early promotion of the economic welfare of the agricultural class therein had engaged the serious attention of this great ruler who was gifted with a clear vision which enabled him to see as far back as 1905, the usefulness and potentiality of this new world-wide movement.

In common with the rest of India, the early beginnings of the movement in Baroda State had the same kind of origin, the drawbacks, and the difficulties. The introduction of this movement has been the result of the far sighted agricultural policy of His Highness which is reflected in some of the useful measures for agrarian relief and improvement in the State and the general desire to bring about their social and moral uplift by many enactments, resulting in social and educational reform very appreciably in their general advance.

Before referring to the figures showing gradual development of this movement, I would allude to the two later attempts made to improve and amend the Co-operative Law in the State. In 1914 the Act was amended on the lines of the amendment of the Act in British India in 1912; and later on it underwent a further modification by which were secured better classification of the co-operative societies, creation of provident funds, and attachment of members' property before award by the revenue process and enlargement of the powers of the Registrar.

The progress of work has not been very much varied and rapid, judging from the figures of the last three years from 1929 to 1931 ending December. During this period the number of societies has risen from 1045 to 1063, excluding the 22 societies which were removed from the register. These 1,063 societies consist of a fairly wide range of usefulness, such as 1 co-operative Institute, 3 Central Banks, 3 Union Banks or Banking Unions, 1 Supervising Union, 871 agricul-

tural societies, and 184 non-agricultural societies. Moreover among the 871 agricultural societies, 727 are credit societies, 28 thrift societies, 40 consolidation of small-holdings societies, 29 cotton sales societies, 12 milch cattle societies, 3 cattle-breeding societies, 4 seed-supply societies, 1 water works society, 4 power pump societies, 2 fodder societies, and 3 other types of societies. Further, among the 184 non-agricultural societies, there are 8 thrift societies, 5 store societies, 16 students store societies, 5 housing societies, and 1 mutual aid society.

It is encouraging to note from the various figures in regard to increase in (1) working capital, (2) membership, (3) decrease in overdue per centage, that the movement in Baroda State seems to be progressing well, in common with the rest of India. As regards the confidence of the public, it is clearly reflected in its financial position today, in so far as it was able to attract a good deal of deposits, inspite of the financial troubles through which the country had to pass. As in many important matters of administrative progress, the State does not lag behind in co-operative growth and its advance does not compare unfavourably with other Indian States of its size and status. A few figures might bear comparison.

In Travancore, with its 5·1 millions of population there are 35·5 societies per 100,000 (one lac) of the inhabitants; while in Baroda, with its 2·4 millions of population there are 43·6 societies per 100,000 of the population. This is so far as the proportion of societies is concerned. Now so far as the proportion of the total membership in primary societies to inhabitants is concerned, in Travancore there are 43 members of primary societies per 1,000 of population, whereas there are 15·5 members in primary societies per 1,000 of inhabitants in Baroda State. As regards the average per head of the working capital, it is the same as in British India, viz., 50 annas per head of the population in Baroda State, though in Bombay Presidency below which at least it must not go, it is 102 annas per head of the population which is exceeded in a major province, like Punjab alone, where it is 122 annas per head of the population; while in Travancore it is only 22 annas per head of the

population-very poor indeed—while the average for the Indian India is 34 annas. As regards the rates of interest on borrowings and lendings in Baroda State by its Central Banks they are lowest with the exception of Cochin, but much lower than in Travancore. In Baroda State the rate of interest on borrowings by the Central Banks ranges between $4\frac{1}{2}$ per cent and 6 per cent and on lendings by the same financing institutions between 7 per cent and $7\frac{1}{2}$ per cent, while in Travancore the former ranges between 5 per cent and $6\frac{1}{2}$ per cent and the latter between 8 per cent and $8\frac{1}{2}$ per cent; whereas for similar purposes the rates in Cochin on borrowings are between $2\frac{1}{4}$ per cent and 4 per cent and on lendings between 6 per cent and $7\frac{1}{2}$ per cent. It is interesting to observe that these rates vary so materially between the two contiguous States of Cochin and Travancore, where conditions are almost similar and as President of the Travancore Cooperative Enquiry Committee it would be very necessary and interesting for me to go into these matters fully. The rate of dividend allowed by the three Banks in Baroda State is 8 per cent while it is 9 per cent in other States and $6\frac{1}{4}$ per cent in Cochin. So far as agricultural societies in Baroda State are concerned, their rate of interest on borrowings and lendings is lower than in almost the whole of the British and Indian India. On borrowings by the agricultural societies, it ranges between 6 and 8, while the average in Bombay Presidency is $6\frac{1}{4}$ per cent. On lendings by these agricultural primary societies in Baroda State it is uniformly $9\frac{3}{8}$ per cent, whereas in British India it varies from 8 to $15\frac{5}{8}$ per cent. In some major provinces, it is $9\frac{3}{8}$ per cent; but in Travancore it is $10\frac{1}{2}$ per cent and in Cochin it is $10\frac{15}{16}$ per cent.

Another interesting feature of these agricultural societies in Baroda State is the very large volume of goods sold by them to their members. These amount in value to the substantial figure of Rs. 7,72,316, which is by far the biggest bulk in any of the Indian States and even bigger in rest of the Bombay Presidency under the British, where the goods sold by the agricultural societies to their members amount to Rs. 7,05,893 only. Among other Indian States, it is by far the

greatest. Mysore did this business only to the tune of Rs. 55,283; Hydrabad (Deccan) only of the value of Rs. 88; Bhopal of the value of Rs. 154; and Travancore of the value of Rs. 11,486. But under this head Punjab stands first with sales amounting to Rs. 23,61,007 and Bengal with Rs. 9,30,045 is the second best, but not so in proportion to population. Similar figures with regard to the working of non-agricultural societies present interesting results for comparison. While in 1931 the total of 173 non-agricultural societies having limited and unlimited liability and started for the provision of credit and organization of purchase for and sales to members of goods required by them, carried on such transctions which amounted to Rs. 57,552 in Baroda State. Similar societies working with identical aims numbered 327 in 1931 in Travancore and their total transactions amounted to Rs. 2,44,153, showing a preference on the part of the educated members of the community for supplying their own needs on a co-operative basis.

Those who express their dissatisfaction with the so called one sided growth of the movement as a whole, have to bear in mind that it has yet much leeway to make up by covering the ground which is yet traversed by the operations of the money lenders—not all unsympathetic and unpopular. The co-operative credit movement might have so far covered one-tenth of the field, and nine-tenths of the ground yet remains to be brought under the operations of a wide-spread co-operative machinery of manifold character. Even in Baroda State to-day almost 90 per cent. of the capital needed by the farmers comes from non-co-operative sources and in the rest of Bombay Presidency the proportion of the co-operative capital supplied to the agriculturists is in no way higher but somewhat lower. Moreover, there is another very important direction in which some improvement should soon be effected and that is the still further lowering of the rate of interest, paid by the agriculturists and others similarly situated, though it is to-day nearly 50 per cent. less than the prevailing rate in the money market for others of their class, who negotiate for credits in the open market.

The greatest need of the hour in the co-operative field in India is the rapid and many sided development of the non-credit activity. It is readily admitted on all hands that the growth of the movement up-till now is but one-sided; but that is no wonder considering the needs of the people and difficulties in the way of supplying them. The operations under this head, viz. non-credit are not quite so simple like credit dealings. They are complicated and complex. The bulk of the business done in the sphere of non-credit activity is necessarily very much larger than even the great bulk of business done under the category of credit transactions. It is self-evident. If one were to judge from one's own personal dealings, one would easily find that under the category of credit one has, speaking broadly, fewer needs and less occasions to borrow; but under the category of purchase of one's provisions and articles of one's daily use, one has more occasions to deal in goods than in credit, and consequently the profits earned by others on one's purchases and sales are far in excess of the amount of interest charges, paid by one on occasional supplies of credit. This is a matter which ordinarily strikes only a few. Many people do not realize that to be a share-holder of a store by purchasing a share of Rs. 10 (ten) only is not half as helpful as the loyalty of their purchases as regular customers. This business insight in a co-operator is yet to dawn on his horizon.

Throughout the whole of India, there is hardly a province or State which yet could boast of marked advance in this special line of non-credit development. Baroda is no exception to this. But one would like to see that a State so much advanced in many respects and free from shackles could show something more tangible in the line. In my opinion that would not be possible unless the Government of His Highness the Maharaja makes up its mind in this direction, as it has done in many others, to strike a new line. In this connection the remarks of the Baroda Banking Enquiry Committee in its report, issued in 1930, on page 90 and in paragrpph 130 are very pertinent. The Committee observes as follows:—" There is a wide field for the beneficial application of the co-operative principle beyond the problems of credit. But no non-credit

society should be organized without proper investigation and without the guarantee of proper management and skilled control. On an examination of the non-credit movement, we find that not very substantial results have been achieved.

" Most of these societies are nearly on paper as they have not commenced working. Out of the 19 cotton sale societies only 5 have been functioning. The consolidation work is progressing very slowly. There is nothing like a re-distribution of the whole area of village-lands as in the Punjab One power-pump society has been working well. The milch cattle societies are technically credit societies. The cattle breeding societies are all dormant. Out of the 5 milk supply societies one has been working. The village water-works society is doing excellent work. The fodder and grain-storage societies are hopeless. One better living society has been working but it is rent with factions. The institute is doing good work; but its resources are limited. It will be observed from this brief sketch that great care is required in the organization of such societies. "

This is not inapplicable to other parts of India. To improve this sorry state of affairs—a change of vision or policy is peremptorily required. In India, judging from the history and growth of several movements, we need not be so much influenced by the arid truism that till things grow from the bottom and go up to the top, no good work and lasting results are likely to flow forth. If this standard or test were applied to other departments of public activity in India, there would be many barren fields of public activity if there had been no initiative or effort forthcoming from the top towards the bottom. If it be really desired to see greater net-work of genuine non-credit activity, the only remedy in my opinion, in a contry like India, without fear of contradiction, is that Government themselves should put special emphasis on this aspect of the co-operative activity by concentrating their resources on non-credit work and by asking the departmental officers to undertake to work up such institutions in close association with the non-official public element in a responsible way, as was done with regard to credit organization, in the

earlier stages of the movement. Moreover, speaking broadly, the same thing has been done in the past in agricultural and industrial fields by Government and now that the enlightened self-interest of the investing public is impelling the enterprizing section among them to take up these branches of activity, or to copy them. This is only an indication of what could be done. I am conscious of the thousand and one objections that might be raised to this change in policy. If I be wrong, I would like to be told why the intelligent section among the public has not come forth to undertake it, unless it be left for being inferred from their absence that the required qualities of patience, technical skill, integrity, and industry are not to be depended upon to the fullest extent yet on the part of the public. Even assuming that it were so, it is the duty of those who are not merely content with criticism, but want a decided advance along this line, to take up vigorously the organization of work in this direction, preceded by a suitable propaganda. Let not fear of failure keep them back from their duty. Failures are the glory of workers. But why should fear of failure overpower honest and efficient and well-informed workers before anything is done. I agree with Mr. R. R. Pawar, the Registrar of Co-operative Societies in Baroda, who is very keen on asking the Co-operative Banks that have been lukewarm and have lacked a proper spirit of enterprize, out of an unduly over-powering sense of caution, to undertake and finance the non-credit work. In his last report he observes and very rightly that, " It is to be hoped that in the interest of co-operative movement and in the interest of expanding their own field of work, these banks will not hesitate to carry out the non-credit activities within the area of their operations,"

Work of a very limited character along such or similar lines of non-credit nature, though carried on a very small scale to-day in different provinces of India, has achieved some valuable results generally through the agency of 10,530 non-agricultural societies, out of the total number of 106,166 co-operative institutions in India in 1930-31. If the non-credit needs of the vast agricultural population of India were to be co-operatively organised and met, the economic gains that

would accrue to that section of the population in the country every year would be enormous and far in excess of the net profits earned by them only through their agricultural societies, during one year amounting to Rs. 1,37,91,447. These were results from the operations of their agricultural societies alone which numbered 93,773, during the same year; whereas the total profits earned during the same period by agricultural and non-agricultural societies amounted to Rs. 1,96,35,419. In this connection, Dr. Clouston's observations on this problem in his book called the " Review of Agricultural Operations in India " would be found very interesting and instructive.

" The good work done by the Cotton Sale Societies in Bombay, the Irrigation and Milk Sale societies in Bengal, the Co-operative Seed societies and Dairy societies in C. P., and the societies for the consolidation of holdings, clearance of silt in canals, and the sale of farm produce in the Punjab encourage one to hope that given the necessary organising staff, co-operation will play, in course of time, as great a part in assuring the cultivator of the full return of his labour, as it has in providing him with cheap capital. " This is the ray of hope and one would like to see this blighted land brightened with co-operative light and lustre.

I am quite alive to the apathy and indifference of the people concerned and I am surprised about women, when the Registrar says that "ladies of well-to-do families do not show any inclination for this work." In villages small matters absorb the thoughts and actions of the village folk and big things have not yet made a strong appeal to them and the observations of Mr. R. R. Pawar, the Registrar, are very suggestive of the difficulties in the way. But progress is always slow going as it does along the lines of a diagonal, when there are opposing forces. Mr. Pawar says " there is a peculiar spirit of indifference and even defiance. The old mode of life is changed or at least is fast changing. The elders in the villages have no control over the village population. The younger generation is at war with older one. The different castes and communities are restive for something or other. Thus, the whole village life is in a state

त्यास जबाब केव्हां कोणी कसे द्यावे, इत्यादि गोष्टींची भरपूर तजवीज आज आपणांस झालेली दिसते, त्याचा पहिला उगम माझ्या मतें बराचसा या उकिडवे प्रकरणानें झालेला आहे. उकिडवे तर गर्वानें इतका फुगून गेला होता कीं, बडोद्यांतून आतां आपणांस भली मोठी रक्कम मिळणार, अशी त्यास खात्री वाटत होती. परंतु वरील निकालानंतर उकिडव्याचें पुनः कोठें नांवसुद्धां ऐकूं आलें नाहीं. मला मात्र तीं उकिडव्याची छापील चोपडी वाचून मनुष्यस्वभाव कळण्यास मोठी मदत झाली. ऐतिहासिक घडामोडींत सुद्धां अनेक खटपटी व तर्कटी लोक उगाच दंगा उसळून देतात आणि आपले महत्त्व वाढवितात, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

अशा या मागच्या आठवणी कालानुक्रमानें देऊं लागल्यास त्यांचा पार येणार नाहीं. सबब तो क्रम सोडून जेणेंकरून महाराजांचें एकंदर जीवितसाफल्य अपरिचितांच्या नजरेस येईल असेच कित्येक प्रसंग व व्यक्ती यांचा आतां निर्देश करितों.

### ६ पहिले सहायक,–पेस्तनजी दोराबजी.

महाराजांच्या आरंभींच्या कारकीर्दींत त्याजवर कोणाच्या शिकवणीचा काय परिणाम झाला हें सांगणें कठीण आहे. एवढें खरें कीं, अमुक एका विशिष्ट इसमाची छाप त्यांचेवर बसली असें कधीं झालेंच नाहीं. तथापि त्यांतल्यात्यांत पाहूं गेलें असतां त्यांचे इंग्रज शिक्षक ईलियट साहेब व खानगीकारभारी पेस्तनजी खंडाळेवाला यांचीं नांवें थोडींबहुत दाखवितां येतील. बादशहा, व्हॉइसराय, गव्हर्नर इत्यादिकांच्या भेटीचे प्रसंग महाराजांस वारंवार येत. तसेंच सार्वजनिक दरबार किंवा समारंभ होत. अशा ठिकाणीं महाराजांचें कोठेंहि उणें दिसूं नये म्हणून नानातऱ्हेच्या सावधगिरीच्या व वर्तनाच्या सूचना ईलियटसाहेब महाराजांस अगाऊ देऊन ठेवीत. राजवाड्यांची बांधणी, आंतील सामानाची नयनमनोहर मांडणी, तसेंच बागा, घोडे, भोजनें इत्यादिकांची पाश्चात्य धर्तीची व्यवस्था यथायोग्य करण्यांत पेस्तनजी खंडाळेवाला यांचा उपयोग महाराजांस चांगला झाला. स्वतः ते विद्वान्, सज्जन, पापभीरु व कनवाळु अंतःकरणाचे असून महाराजांचे सुखास ते प्राणापलीकडे जपत. हे मूळचे एंजिनिअर होते. नाशिक जिल्ह्यांतील कवळा-

ण्याचा वाडा त्यांनीं बांधला. त्यावरून महाराजांना त्यांची कर्तबगारी दिसून आली. आणि पार्शी खानगी कारभारी नसावा अशी कुटुंबांतील वडील मंडळीची इच्छा असतांहि महाराजांनीं त्यांसच खानगी कारभारी नेमिलें. हा कारभार त्यांनीं पुढें बारा पंधरा वर्षें पाहिला. तेवढ्या अवधींत राजवाड्यांतील राहाणी-संबंधानें त्यांनीं प्रचंड क्रांति घडवून आणिली. मेजावरचीं भोजनें, चहापार्टी, संमलनें, खेळ व इतर व्यवसाय जे आखीव कार्यक्रमानें होत असलेले आज आपणांस दिसतात, व ज्यांत व्यवस्था, टापटीप, नियमितपणा इत्यादींची प्रचीति पदोपदीं येते, त्याची पहिली उभारणी पेस्तनजींच्या हातची आहे.

पेस्तनजीस मराठी भाषा व मोडी चांगलें येत असल्यामुळें खानगीच्या कामास त्यांना अडचण अशी कधींच भासली नाहीं. त्यांजवर महाराजाचा मोठा विश्वास होता. परंतु मनुष्य स्वभावाची परीक्षाच करण्याची वेळ आली तर महाराज त्यांस म्हणत, " पेस्तनजी, लबाड लोक गोड बोलून तुम्हांस फसवतील बरं कां ? सावध रहा. " आणि असे प्रकारहि घडल्याशिवाय राहिले नाहींत. बडोद्यास एकदां कोणी एक साधु आले. नानाप्रकारचे चमत्कार करून व भूत—भविष्य वगैरे सांगून त्यांनीं पुष्कळांचीं मनें आकर्षून घेतलीं. पेस्तनजीं-नाही त्यांचा अनुभव आला, आणि त्यांनीं महाराजांस सुचविलें. "आपण एकदां यांची भेट अवश्य घ्या; व आपणांसहि असा अनुभव येतो किंवा नाहीं, तें पहा. " त्यावरून महाराज म्हणाले, " मी त्यांची गांठ घेईन, परंतु तुमच्याप्रमाणें माझा विश्वास त्यांच्यावर बसेल किंवा नाहीं हें सांगता येत नाहीं. " नंतर मध्यें चार दिवस गेले आणि पेस्तनजीच महाराजांकडे येऊन सांगू लागले, " कायहो भोंदू गृहस्थ हा ! काल त्यानें अमक्याचे येथून दहा हजारांचा डल्ला मारून शहरांतून पोबारा केला." महाराज म्हणाले, " कां, मी तुम्हांला प्रथमच सावध रहाण्यास सांगितलें होतें ?" पेस्तनजी पुढें सेवानिवृत्त होऊन पुष्कळ वर्षें जगले. महाराजांचा त्यांचेवरील लोभ अखेरपर्यंत अविच्छिन्न कायम होता.

### ७. पूर्वायुष्यांतील ममती व अवचितराव.

वयोमान, प्रकृति, परिस्थिति वगैरे कारणांनीं मनुष्याच्या वृत्तींत व व्यवसा-यांत नेहमींच फरक होत जातो. परंतु मोठ्या व प्रमुख व्यक्तींच्या ठिकाणीं हे

फरक कोणत्या कारणानें कसे पडत गेले; हें सूक्ष्म निरीक्षणानें नमूद करणें, हा एक मानसशास्त्राचा मनोरंजक भाग गणला जाईल. महाराजांना मी प्रथम पाहिलें, तेव्हां त्यांचें वय २५ वर्षांचें होतें. तेव्हांपासून त्यांची वृत्ति दर दहा पंधरा वर्षांनीं कसकशी पालटत गेली, हें सहज लक्षांत येतें. डबक्यास सालोसाल होणारी डुकराची व चित्याची शिकार, सोनगडच्या रानांतील तापी तीरावरच्या शिकारी, कोजागरीस किंवा दिवाळींत चालणारे सोंगठयांचे खेळाचा गोंगाट, उमरठच्या वाळवंटावर किंवा मकरपुऱ्यास होणारे आटयापाटयांचे डाव, होळीच्या रंगांतील बंबाची खेचाखेंच व स्नानें, हुडर्यांचे शेतांतील उपहार, महाबळेश्वर वगैरे ठिकाणचीं वनभोजनें इत्यादि व्यवसाय एकामागून एक आठवले म्हणजे मनाची स्थिति चमत्कारिक होते. महाराजांचे सभोंवार वावरणारा मानकरी मंडळींचा, आप्तेष्टांचा व नोकरचाकरांचा घोळका त्यावेळीं केवढा असे त्याची कल्पना केल्यास त्यावेळच्या मानानें आजच्या स्थितींत किती फरक झाला आहे हें लक्षांत येईल. आटयापाटयांच्या खेळांत एका बाजूस महाराज व दुसऱ्या बाजूस उखाजीराव काकासाहेब यांनीं भिडू वांटून घ्यावयाचे आणि अखेरपर्यंत मोठया चुरसीनें खेळ चालावयाचा. मुलें लहान असतां होळीच्या वगैरे निमित्तानें कांहीं वर्षे सोंगें आणून करमणूक करण्याचा व्यवसाय सालोसाल चालू होता. त्यांत सर्व लहान मोठे लोक निरनिराळीं सोंगे घेत; आणि कित्येक सोंगें तर अत्यंत बेमालूम होत. असे हे बाह्य व्यवसाय कितीहि झाले तरी सदैव आनंदी व मोठी करमणूक करणारी व्यक्ति म्हणजे अवचितराव होत. त्यांस चिडविल्याशिवाय महाराजांस क्षणभर चैन पडावयाचें नाहीं; आणि एकदां अवचितराव चिडले व अक्राळविक्राळ तांडव व आरडाओरड करूं लागले, म्हणजे महाराजांचे हंसे अगदीं अनावर होत असे. तसें हास्य अलीकडे कोणास पाहावयालासुद्धां मिळायचें नाहीं. कशाही स्थितींत करमणूक करणारा प्राणी म्हणजे अवचितराव. हंसायला उशीर नाहीं, कळवळ्यानें डोळ्यांस अश्रू येण्यास उशीर नाहीं. कीं रागाच्या आवेशांत आतां हे काय करतात याची धास्ती वाटल्याशिवाय राहयची नाहीं. बायकामुलें लहानमोठे अधिकारी कोणी असोत. अवचितराव सर्वांशीं अत्यंत समरस होत, आणि सर्वांचें त्यांजवर प्रेम

असे. अवचितराव गेले तेव्हां बडोद्यांतला एक आनंदी पुरुष मावळला असेंच सर्वांस वाटलें. ते एक जिवंत आठवणींचा कायमचा झराच होते.

## ८. सुखाचा उच्च बिंदु.

चित्तवृत्ति पूर्णपणें ताब्यांत ठेवण्याचें कसब महाराजांइतकें बहुधा दुसऱ्या कोणास कधीं साधणार नाहीं. त्यांच्या अंतःकरणांत काय चाललें आहे, याची दाद ते कोणास सुद्धां लागूं देत नाहींत. त्यांस हंसविण्याचा प्रयत्न करून मी मी म्हणणारांनीं हात टेकले आहेत. प्रकृति खालावत चाललेली, कौटुंबिक निराशा व राज्याची काळजी इत्यादि कारणांनीं अलीकडे तर त्यांची वृत्ति पूर्वींच्या मानानें विशेषच उदास दिसते. त्यामुळें पूर्वींची त्यांची मनोवृत्ति किती आनंदी होती याची कोणास कल्पनाही नसेल. मला एक प्रसंग त्यांच्या अत्यंत आनंदी वृत्तीचा चांगला आठवतो. स. १९०० सालची गोष्ट. फेब्रुवारी महिन्यांत राजकन्या इंदिराराजे यांचा वाढ दिवस होता. आदल्या वर्षीं श्री. फत्तेसिंहराव मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण होऊन त्यांच्या सन्मानार्थ आनंदोत्सव कैक दिवस चालू होते. दुसरे दोघे राजपुत्र जयसिंहराव व शिवाजीराव दोघेही अत्यंत चलाख बुद्धीचे, बारा व दहा वर्षांचे सर्व बडोद्यास कौतुकास्पद वाटत होते. या त्रिवर्ग राजपुत्रांस पुढील अभ्यासासाठीं इंग्लंडास नेण्याचा विचार चालू होता. या सालीं पॅरिस येथें जंगी प्रदर्शन भरावयाचें असून तें पाहण्याची संधि वायां घालवूं नये असें महाराजांस वाटत होतें. आठ वर्षांची हसतमुख राजकन्या इंदिरा राजे, आपल्या मुग्ध बाललीलांनीं सर्वांचीं अंतःकरणें वेधणारी होती. त्यांचे धाकटे बंधू धैर्यशीलराव सात वर्षांचे दुर्दमनीय खेळाडू वृत्तीचे महाराजांचे पंचम अपत्य असून इंदिराराजांचा तो वाढदिवस प्रत्येकास आपलाच आहे असें वाटत होतें. खुद्द महाराजांचें वय ३७ वर्षांच्या ऐन उमेदीचें; राज्य कारभारांतील पहिल्या अडचणींचें निरसन होऊन सर्वत्र त्यांची छाप उत्कृष्ट बसलेली, असा तो दिवस पुष्कळ अर्थांनीं महाराजांच्या आयुष्यांतील परमोच्च सुखबिंदूचा होता. सायंकाळीं श्रीमंतांची स्वारी या सर्व पांच अपत्यांसह चार घोडयांचे रथांत बसून शहरांतून फिरून आली. त्याप्रसंगीं मी त्यांचे बरोबर बगींत होतों,

महाराजांचे मुखावर आनंदाचे भरतें आलेलें स्पष्ट दिसत होतें, आणि त्यांस साजेसेंच मुलांच्या लीलांचे व पुढील आशेचे विनोद व संवाद गाडींत चालू होते. बोलण्याचे ओघांत राजा दशरथ व त्याचे मुलगे यांच्या कथांची उजळणी झाली. सायंकाळीं साताचे सुमारास स्वारी विश्वामित्रीपुलावरून कमिटीबागेत गेली. तेथें बगी उभी करून महाराज व मी सुमारें मैलभर पायीं चाललों आणि पुन: बगींत बसून स्वारी राजवाड्यांत परत आली. तो हृदयंगम देखावा माझे मनांत अद्यापि वावरत आहे. पुढील परिपोष त्यावेळीं कालोदधींत गडप होता, तो आतां आपल्यास अवगत आहेच. संसार हा असा आहे.

अल्पवयी मुलांची संगत महाराजांना अतिशय आवडते. स्वत:चीं मुलें, नातवंडें अल्पवयी असतां ते त्यांचे किती तरी लाड करितात. पुष्कळदां त्यांचें किती कौतुक करूं असें त्यांस होऊन जातें. त्यांजबरोबर खेळणें, त्यांस बरोबर फिरविणें, दुकानांत नेऊन त्यांस त्यांचे आवडीचे खेळ किंवा खाऊ विकत घेऊन देणें, हा महाराजांचा नेहमींचाच करमणुकीचा एक प्रकार आहे. त्यांनीं मुद्दाम अनेकवार मुलांमुलींचीं संमेलनें भरवून त्यांस बक्षिसें वाटलीं आहेत. राजपुत्र लहान असतां हे प्रकार वारंवार घडत. एकदां युरोपांत महाराजांनीं चार पांचशें निरनिराळ्या जातींचे भले मोठे खेळ खरेदी करून बडोद्यास पाठविले, आणि परत आल्यावर आप्तेष्टांचीं व इतर पुष्कळशीं लहान मुलें जमवून त्यांस ते खेळ आपल्या हातानें वाटले. महाराजांना अत्यंत आनंद कशांत वाटत असेल तर तो मुलांच्या संगतीतच होय.

### ९. प्रक्षुब्ध वृत्तीची एक आठवण.

वर्षानुवर्ष महाराजांची चित्तवृत्ति क्षुब्ध झालेली असाहि एक प्रसंग मला आठवतो. लॉर्ड कर्झन यांनीं यूरोपच्या प्रवासाविरुद्ध हिंदी संस्थानिकांस जाहीर फर्मान काढलें त्या योगानें महाराजांचें मन विशेष संतप्त होऊन गेलें. इकडे इंग्रज सरकार संस्थानिकांस सांगतात कीं, तुम्ही आपली सुधारणा करा, आणि अशा सुधारणेचें मुख्य साधन जें प्रवास, त्यास दुसरीकडून आडकाठी घालतात. या बद्दल महाराजांना विशेष चीड आली. कर्झन साहेबांची कारकीर्द चालू असे-

पर्यंत हा एक मुख्य विषय महाराजांचे मनांत जागृत असे. त्या मुदतींत उभयतांमध्यें निरनिराळ्या प्रश्नांवर व संस्थानिकांच्या हक्कांवर जे खलिते गेले आले, ते कधींकाळीं बाहेर येतील तर अलीकडच्या अंतस्थ इतिहासावर पुष्कळ नवीन प्रकाश पडेल. महाराजांनीं त्या फर्मानाचा जोरानें निषेध करून ते मागें घेण्यास लाविलें; आणि अशा रीतीनें कर्झन साहेबांच्या अरेरावीवर जी मात केली, तिच्या स्मरणानें महाराजांच्या संबंधानें पुष्कळ इंग्रज अधिकाऱ्यांचा जळफळाट होतो. खरें पाहातां, हा सर्वच बनाव केवळ दोन जबरदस्त व्यक्तींच्या स्वभाववैशिष्ट्यामुळें उत्पन्न झाला. त्यावरून सार्वभौम इंग्रज सरकाराबद्दल महाराजांचा आदर यत्किंचितूही कमी झाला नाहीं.

## १०. उद्योग हाच जीवनाचा हेतु.

या जगांत लहानापासून थोरांपर्यंत स्वार्थ परिपूर्ण भरलेला आहे. त्यांतून ज्याचे हातीं दुसऱ्याचें बरें वाईट करण्याची पूर्ण सत्ता असते, त्याचे जवळ मतलबी व खटपटी लोकांचा घोळका जमल्याशिवाय राहत नाहीं. प्रत्येक असामी कोणत्याना कोणत्या उपायानें महाराजांचें मन प्रसन्न करून अगर त्यांजवर आपली थोडी बहुत छाप बसवून स्वार्थ साधण्यास टपलेला असतो. ही मानवी वृत्ति यथायोग्य ओळखून सर्वांना न्यायानें व समान भावनेनें वागविण्याची कठिण शैली जर कोणास चांगली साधली असेल तर ती या महाराजांसच होय. मल्हाररावांचे कारकीर्दींत लोकांच्या खटपटी वृत्तीस केवळ ऊत आला होता, तो या महाराजांनीं अल्पावकाशांत नाहींसा केला. संबंध येणाऱ्या मंडळींच्या मनांतील कावा अचूक ओळखावा असा महाराजांनींच. आणि त्यांत आश्चर्य हें कीं, ज्याचा अंतस्थ हेतु असा हुडकून काढावयाचा असेल, त्यास महाराजांच्या मनांतील संशय कधींही कळून येणार नाहीं. उलट त्यास आपलें कसब चालविण्यास भरपूर संधि मिळावी; परंतु योग्य प्रसंग येतांच त्यास असा फटकारा लगावतील, कीं त्याची आठवण त्या इसमास जन्मभर राहावी. एका गृहस्थास महाराजांनीं प्रोबेशनर म्हणून नोकरींत घेतलें आणि कांहीं तरी सटर फटर काम त्यास सांगितलें. त्यामुळें तो गृहस्थ अत्यंत नाराज झाला. त्यास वाटलें, आपली योग्यता मोठी असतां लगोलग महाराजांनीं आपणास मोठें काम

द्यावें. हें महाराजांस समक्ष भेट घेऊन कळविण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला; आणि भेटीची आतुरता ठेऊन ते वारंवार वाड्यांत जाऊं लागले. असें महिना पंधरा दिवस चालल्यावर एके दिवशीं स्वारी बाहेर जाण्यासाठीं जिना उतरून खालीं आली असतां या गृहस्थांनीं पुढें होऊन मुजरा केला. त्याप्रसंगीं महाराजांनीं त्यांची अशी कांहीं कानउघाडणी सर्वांदेखत केली कीं, त्यांस व जवळच्यांस मोठें अवघड वाटलें. महाराज म्हणाले, 'अहो, माझ्या भेटीसाठीं वाड्यांत येऊन इतके दिवस जो काळ तुम्ही व्यर्थ घालविला, तो तुम्हास दिलेल्या कामास लावून तुम्ही आपले वरीष्ठाचा योग्य अभिप्राय मिळविला असता तर माझ्या मनांत तुमची लायकी जास्त चांगली भरली असती. परत जा, उद्योग करून लायकी पैदा करा, आणि मग तुमचें काम रीतसर रुजू होऊं द्या, म्हणजे मी काय करणें तें करीन. नुसत्या अशा भेटी पासून तुम्हांस कांहीं फायदा होणार नाहीं.' अशा रीतीनें महाराजांनीं सर्वांस उद्योगास लावून त्यांच्या ठिकाणीं कर्तव्याची जाणीव उत्पन्न केली आहे. यामुळें खटपटी लोकांचे मतलब आपोआप नाहींसे झाले. स्वतः दिवसभर कामांत राबून दुसऱ्यांसही ते राबवूं लागले.

खटपटी लोकांच्या कारवाईनें जगांतील व्यवहार कसे बिकट होतात आणि त्यामुळें प्रसंगीं राज्यनाशासारख्या आपत्ती राष्ट्रावर कशा कोसळतात, याची पूर्ण जाणीव महाराजांस झाल्यामुळें; ते पुष्कळसे एकांतप्रिय होऊन उद्योगांत निमग्न राहूं लागले. पुष्कळसे लोक स्वार्थासाठीं श्रीमंतास चिकटूं पाहतात, पैशाचा मतलब नसेल तर कोणी कोणास ढुंकून विचारणार नाहीं, हा अनुभव येऊन जवळ वावरणारा नोकराचाकरांचा आरंभींचा घोळका त्यांनीं सर्व मोडून काढिला, आणि कामाचा लकडा स्वतः होऊन लावून घेतला. त्यामुळें काम हेंच त्यांचें जीवन होऊन बसलें आहे. श्रीमंत फत्तेसिंगरावांच्या शेवटच्या आजारांत अखेर-पर्यंत महाराज सारखे काम पाहत होते. शेवटच्या दोन तीन दिवसांत निराशा वाटूं लागली तरी महाराजांनीं तळमजल्यावर काम करीत बसावें, आणि दर पंधरा मिनिटांनीं किंवा अर्ध्या तासानें तिसऱ्या मजल्यावर जाऊन प्रकृति पहावी.

असा क्रम चालू असतां एक गृहस्थ महाराजांस म्हणाले, " धन्य आहे आपल्या या धैर्याची व उद्योगाची, कीं अशा स्थितींत आपण आपलें मन ताब्यांत ठेवून नेहमींचीं कामें सुरळीत चालवितां ! " महाराजांनीं उत्तर केलें, ' अहो, हा उद्योग पाठीवर आहे म्हणूनच मी जगूं शकतों. उद्योग नसेल तर मनुष्यानें जगायचें तरी कसें ? '

## ११. महाराजांचें ग्रंथकर्तृत्व व अप्रतिम वक्तृत्वाचे कांहीं प्रसंग.

नुकतेंच महाराजांनीं कोल्हापुरच्या संमेलनाचें अध्यक्षपद स्वीकारिलें. त्या वेळीं त्यांच्या साहित्यसेवेचें विवेचन करितांना एका विद्वान् गृहस्थांनीं, असें लिहिलें होतें कीं, ' सीझरपासून सुलतान पर्यंत ' या एका पुस्तका पलीकडे महाराजांचे हातून ग्रंथनिष्पत्ति झालेली नाहीं. हें विधान वस्तुस्थितीशीं विरुद्ध आहे. पुस्तकरूपानें वाचकांचे हातीं ग्रंथसंभार पडेल तेवढीच एखाद्या व्यक्तीची वाङ्मयसेवा मानल्यास अनवस्था प्रसंग येईल. आजन्मांत लहानशा पन्नास कवनांचें ग्रे कवीनें जें भांडवल निर्माण केलें, त्याची बरोबरी छापी कागदांच्या ढिगाऱ्यांना कधींही येणार नाहीं. हें तत्त्व ध्यानांत घेतल्यास खुद्द साहित्य विषयांतही महाराजांची कामगिरी अत्यंत उच्च दर्जाची गणावी लागेल. महाराजांचा सर्व राज्यकारभार कायद्याबरहुकूम व्यवस्थित लेखांनीं व नियमांनीं चाललेला आहे, हें महशूर आहेच. त्यांच्या पन्नास वर्षांच्या कालावधींत खुद्द महाराजांचे हातून इंग्रजी, मराठी व गुजराती मिळून निदान पन्नाससाठ हजार अखेरचे हुकूम बाहेर पडले असें म्हणतां येईल. सर्वच हुकूम एका आकाराचे नाहींत. कित्येक दहावीस पानांचे लांबलचक तर कित्येक चारदोन शब्दांचे लहान आहेत. हे सर्व हुजूरहुकूम म्हणजे एक अत्युच्च प्रकारचें प्रचंड वाङ्मय मुद्दाम विचारपूर्वक निर्माण केलेलें आहें. वर्तमानपत्री जागा भरून काढण्याच्या मासल्याचें नव्हे. त्यांतला प्रत्येक शब्द जेथल्यातेथें योजून प्रत्येक हुकमाचा एकंदर कारभारावर काय परिणाम होईल, याचा दूरवर विचार करून आणि सर्वत्र सारखी नजर पुरवून खोंचदार वृत्तीच्या भावनेनें हें वाङ्मय निष्पन्न झालें आहे. एवढे हुजूर हुकूम दृष्टीपुढें ठेविले तरी त्याची राष्ट्रीय वाङ्मयांत उच्च प्रकारची भर पडेल,

अशा लायकीचे ते आहेत; आणि लाख पन्नास हजार इसमांनीं तरी ते वाचले गेले आहेत, हें लक्षांत घेतल्यास त्यांचा परिणामही तसाच व्यापक झाला आहे यांत संशय नाहीं. बाहेरचे उत्कृष्ट ग्रंथ तरी कितीसे वाचले जातात ! शिवाय महाराजांचा खासगी पत्रव्यवहार व भाषणसंग्रह यांचा आणखी एक विस्तार आहे तो वेगळाच. या सर्व लेखनांत परकी शब्द काढून स्वभाषा वृद्धिंगत करण्याचा प्रयत्न कसोसीनें केलेला आहे.

पण हें सर्व वाङ्मय आगाऊ विचारानें मुद्दाम बनविलें असें म्हणतां येईल. परंतु केवळ प्रसंगाच्या स्फूर्तीनें म्हणजे आगाऊ तयारी न करतां सहजगत्या आत्यंतिक कळकळीनें जे विचार महाराजांचे मुखांतून व्यक्त झाले, त्यांत तर त्यांचें अंतःकरण पूर्णपणें ओतलेलें दिसेल. मात्र असें वाङ्मय कायमचें टिकूं शकलें नाहीं. व्हाइसरायांचे पाहुणचारांत ठराविक पद्धतीचीं आगाऊ तयार केलेलीं भाषणें वाचलीं जातात, त्यापेक्षां सहजगत्या ओघानें बाहेर येणारे अंतःकरणाचे उद्गार किती मोलवान असतील हें गेल्या (म्ह. स. १९३२ सालच्या) डिसेंबर ता. १३ तारखेस व्हाइसरायांच्या मेजवानीचे वेळीं झालेल्या महाराजांचे भाषणावरून लक्षांत येईल. अशीं प्रसंगाच्या ओघानें झालेलीं महाराजांचीं कित्येक भाषणें, किती परिणामकारक झालीं, हें मीं पुष्कळदां पाहिलें आहे. स. १९०१ सालीं स्वारी नैनीतालहून परत येत असतां अलीगड येथें युनिव्हर्सिटीकडून त्यांचा सन्मान झाला. पानसुपारी झाल्यावर श्रीमंतांनीं एक तास पावेतों इंग्रजींत भाषण केलें. त्यांत हिंदु मुसलमान या उभय समाजांस त्यांनीं जो उपदेश केला, तो अत्यंत हितावह होता. उभय धर्मांच्या उच्च भावनांचें सारच त्या भाषणांत ओतलें गेलें. उभयतांनीं आपल्या या पतित मायभूमीची मनोभावें सेवा करून तिला भूतलावरील राष्ट्रांत उच्च पद मिळवून देण्याचा झटून प्रयत्न करावा, हा त्या भाषणाचा मतलब ध्यानांत आणल्यास हल्लींच्या अनिष्ट स्थितीचें महाराजांस आगाऊ स्वप्नच पडलें होतें कीं काय, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं.

असे आणखीही कित्येक प्रसंग मला आठवतात. दहा पांच वर्षांपूर्वीची गोष्ट असावी. बडोद्यांतील क्लबाकडून महाराजांस रात्रीं मेजवानी झाली. त्याप्रसंगीं

प्रकृतीचें अस्वास्थ्य असतांही त्यांनीं पन्नास वर्षांपूर्वीचें बडोदें व आजचें बडोदें य संबंधानें सुमारें एक तास पावेतों भाषण करून युरोपच्या प्रवासाचे व पूर्वीच्या बडोद्याच्या स्थितीचे स्वतःचे अनुभव वर्णन केले, ते अद्यापि कित्येकांच्या अंतःकरणांत अगदीं ताजे असतील. बडोद्याकरितां महाराजांनीं काय केलें, याचें उत्कृष्ट चित्र त्या भाषणांत उमटलें होतें. त्या दिवशींच्या भोजनांत अनेक गोष्टींची पुष्कळच कमतरता होती, पण ती महाराजांच्या त्या भाषणानें पार नाहींशी झाली.

## १२. हंसस्वरूपस्वामी.

पण याच मासल्याचा आणखी एक प्रसंग मला आठवतो. तो तर बडोद्याचे इतिहासांत कायमपणें टिकण्यासारखा आहे. ' हंसस्वरूप स्वामी ' या नांवाचे एक विद्वान संन्यासी वीस पंचवीस वर्षांपूर्वीं बडोद्यांत आले होते. ते येण्यापूर्वीं थोडे दिवस आर्यसमाजी साधु नित्यानंद व विश्वेश्वरानंद हे बडोद्यास येऊन त्यांचीं तेथें प्रगतिपर भाषणें होऊन गेलीं होतीं. मागाहून हंसस्वरूप आले. त्यांची विद्वत्ता जरी नित्यानंदाचे मानानें बेताचीच होती, तरी त्यांचा आवाज महासागरासारखा प्रचंड व प्रशान्त, वाणी रसवती, इंग्रजी, हिंदी व संस्कृत भाषांवर अप्रतिम प्रभुत्व, इत्यादि कारणांनीं त्यांचीं भाषणें शहरांत फार गर्जून गेलीं. आपला सनातन धर्म फार थोर आहे, तो पाश्चात्य सुधारणेनें उगाच विकृति होत आहे, सबब ही नवीन सुधारणा आपण अगदीं दूर ठेविली पाहिजे, अशा धर्तीचीं अनेक भाषणें लाखो श्रोत्यांच्या समुदायापुढें होऊन पाश्चात्य ज्ञानाविरुद्ध स्वामींनीं लोकांचे मनावर जबरदस्त ठसा उत्पन्न केला. त्यांचीं व्याख्यानें उघड्या मैदानावर सायंकाळीं सहा वाजतां सुरू होऊन आठ साडे आठ वाजतां संपत[१]. स्वामींची हीं दहा व्याख्यानें म्हणजे पर्यायानें महाराजांच्या उपक्रमास एक प्रकारचें आव्हानच होतें. कारण महाराज पाश्चात्य सुधारणेचा पुरस्कार करणारे, जुन्यांत चांगलें असेल तें टिकवून त्यांत नवीन भर घालणारे असल्यामुळें, त्यांच्या या वृत्तीस स्वामींच्या व्याख्यानांनीं बरेंच विरजण पाडलें. ही गोष्ट महाराजांच्या अंतःकरणांत उतरली. उलट महा-

---

१ हीं दहा व्याख्यानें दामोदर सांवळाराम यंदे यांनीं त्याच वेळीं छापून प्रसिद्ध केलीं आहेत.

राजांकडे शिफारशी आल्या कीं, 'आपण हीं व्याख्यानें मुद्दाम ऐका.' तें मान्य करून महाराजांनीं त्या स्वामींचीं चारपांच व्याख्यानें लक्ष्मीविलासच्या आरसेमहालांत करविलीं; आणि त्यांस शहरांतलि सर्व सुबुद्ध गृहस्थांस आमंत्रणें केलीं. हीं व्याख्यानें रात्रीं नऊपासून साडेदहापावेतों चालत. फळा वगैरेच्या साह्यानें स्वामींनीं सनातन धर्माची अत्यंत मोठी महती विशद करून सांगितली. व्याख्यान प्रसंगीं आरसेमहाल व सभोंवतालचीं दालनें गच्च भरून जात असत. एकदोन व्याख्यानांतच महाराजांस कळून चुकलें कीं, स्वामींची विद्वत्ता व वाचन अगदीं बेताचें आहे. केवळ वक्तृत्वाच्या ओघावर ठरीव पद्धतीच्या व्याख्यानांनीं ते श्रोत्यांस तल्लीन करतात. त्यांचें विवेचन एकदेशीय असून समाजास भुरळ पाडणारें आहे. पांच दिवस महाराजांनीं स्वामींस मनमुराद बोलूं दिलें. कीं, मागाहून यांस आपलें कांहीं बोलायचें राहून गेलें अशी सबब राहूं नये. शेवटच्या दिवशीं स्वामींनीं उपसंहार करून दहाचे सुमारास आपलें भाषण संपविलें. तेव्हां यावर आतां महाराज स्वतः कांहीं बोलतील अशी कोणाची अपेक्षा नव्हती. परंतु महाराजांनीं श्रोत्यांस सूचना केली कीं, कोणास कांहीं बोलणें असल्यास बोलावें. परंतु दुसरे कोणी बोलनात. तेव्हां तेच स्वतः बसल्या जागेवरून बोलूं लागले. त्यांत स्वामींच्या प्रत्येक मुद्यास प्रत्युत्तर देऊन तो त्यांनीं सप्रमाण विचारसरणीनें खोडून काढला. आपला सनातन धर्म मूलतः थोर आहे, पण त्यास अनेक कारणांनीं वैगुण्य आलें आहे, तें आपण पाश्चात्य ज्ञानानें नाहींसें करून पुनः आपल्या धर्माचें उच्च पद स्थापन केलें पाहिजे, अशा आशयाचें प्रतिपादन केलें. तें इतकें सुंदर व विचारशक्तीस पटणारें झालें कीं, रात्रीं बारा वाजून गेले याचें कोणास भानसुद्धां राहिलें नाहीं. स्वामींनीं एक महिन्याच्या उद्योगांत उत्पन्न केलेला परिणाम महाराजांनीं सहज खोडून काढिला. महाराजांचें भाषण इंग्रजींत झालें. पूर्वी सूचना नसल्यामुळें तें कोणी लिहून घेतलें नाहीं, याबद्दल आम्हां पुष्कळांस मागाहून मोठा खेद वाटला. व्याख्यानाचे प्रसंगास मी बहुधा कागद पेन्सिल घेऊन बसत असे. पण त्यादिवशीं स्वामींचेंच व्याख्यान चालावयाचें असून महाराज बोलतील असा संभव नसल्यामुळें माझ्याजवळ तयारी नव्हती. आपलें भाषण कोणी लिहून घेतलें नाहीं याबद्दल महा-

राजांसहि मागाहून वाईट वाटलें. येणेप्रमाणें त्या दिवशींचा तो अपूर्व रंग त्याच ठिकाणीं विराम पावला. विद्वत्तेची ही सर्व कमाई महाराजांनीं सतत परिश्रमानें व अभ्यासानें पैदा केलेली आहे. भाण्डारकराचीं संस्कृत पुस्तकें, मराठी कवींच्या नानाविध कृती, शुद्धलेखन, व्याकरण, मुख्य मुख्य शास्त्रांचीं मूलतत्वें इत्यादि विषयांचा अभ्यास त्यांनीं निश्चयाच्या परिश्रमानें प्रौढपणीं केलेला आहे. टाकीचे घाव सोसून त्यांनीं देवकळा प्राप्त करून घेतली आहे. मुंबईंत आमांशानें आजारी असतांना अज्ञान दासानें केलेला तानाजी मालुसऱ्याचा पोवाडा त्यांनीं चार सहा तासांच्या एका बैठकींत मजकडून वाचवून व समजून घेतला. त्यांचा एकंदर अभ्यास अत्यंत व्यापक व बहुविध आहे, ही गोष्ट त्यांनीं वाचलेल्या पुस्तकांतील खुणांवरून सहज व्यक्त होते. इंग्रजी भाषेचा व वक्तृत्वाचा अभ्यासही त्यांनीं पद्धतशीर केलेला आहे.

## १३. सुंदर इमारतींचा शोक.

महाराजांचा एक आवडता व्यवसाय ठळकपणें दाखवितां येईल. तो इमारतींचा शोक हा होय. सुंदर इमारतींची त्यांना मनापासून आवड आहे. स्वत: अनेक सूचना देऊन निरनिराळ्या इमारतींचे नकाशे त्यांनीं तयार करविले. ते तयार झाल्यावर जाणत्या मंडळींशीं त्यांची चर्चा करणें, खर्चाची मंजुरी देऊन कामें सुरू झाल्यावर तीं स्वत: वारंवार जाऊन पहाणें, हा श्रीमंत महाराजांना एक मोठा हव्यास असून अशा बांधकामांच्या परीक्षणांत त्यांचे तासांचे तास सहज निघून जातात. आणि भूक तहानसुद्धां तें विसरतात. बडोदें शहराची हल्लींची रचना अशा कैक वर्षांच्या श्रमानें व निदिध्यासानें सर्वथा नवीन सिद्ध झाली आहे. लहानशी पोलिस चौकी किंवा पांचपन्नास मुलांची खेडयांतील लहानशी शाळा बांधावयाची असली तरी ती थोडक्यांत नयनमनोहर कशी करतां येईल यांत महाराजांचें अंत:करण मग्न झालेलें असतें.

## १४. बावन वर्षांच्या कारकीर्दींतील दिवाण.

महाराजाचा जन्म ता. ११-३-१८६३ रोजीं होऊन वयाचीं बारा वर्षें झाल्यावर ता. २७-५-१८७५ रोजीं दत्तविधानपूर्वक त्यांस बडोद्याची गादी

मिळाली; पण राज्यकारभाराचे अधिकार मिळण्यास अवकाश होता. सहा वर्षें विद्याभ्यास होऊन तयारी झाल्यावर त्यांस परिस्थितीची ओळख पटली आणि मालकाची जबाबदारी शिरावर घेण्याचें साहस त्यांनीं केलें. इंग्रज सरकारनें ता. २८–१२–१८८१ रोजीं राज्याचे संपूर्ण अधिकार त्यांचे स्वाधीन केले. तेव्हां हीं राज्यसूत्रें आज बावन वर्षें ते वर्धमान करामतीनें अविच्छिन्न चालवीत आहेत. व्हिक्टोरिया राणी किंवा औरंगजेब बादशहा, अशीं अपवादात्मक उदाहरणें सोडलीं, तर आपल्या एतद्देशीय राज्यकर्त्यांत कारकीर्दीच्या काळांत या महाराजांचा क्रम फार वर लागेल. अलीकडील मराठे राजवंशांत यांच्याइतकें दीर्घायुष्य फार थोडयास लाभलेलें आढळेल. सातारकर छत्रपती किंवा त्यांचे पेशवे बहुतेक अल्पायुषीच झाले.

बावन वर्षांच्या या अवधींत महाराजांचे बारा दिवाण झाले. म्हणजे सरासरीनें चार पांच वर्षांनीं दिवाण बदलावा असा त्यांचा क्रम दिसतो. निरनिराळ्या खात्यांचे मुख्याधिकारीहि अशाच क्रमानें बदलत असल्याचें दिसून येतें. तथापि, स्वतःच सर्व कामें उरकण्याची धमक महाराजांनीं बाळगिल्यामुळें त्यांच्या दिवाणांस विशेष महत्व असें कधीं आलेंच नाहीं. पुष्कळसे राज्यकर्ते दिवाणांवर सर्व कारभार सोंपून आपण बरेचसे निश्चिंत व स्वस्थ राहतात, तसा प्रकार यांनीं कधीं केला नाहीं. राज्यकारभाराव्यतिरिक्त दुसरा आवडीचा किंवा कालक्रमणेचा विषय त्यांनीं कधीं स्वीकारला नाहीं. दिवाण म्हणून एक इसम संस्थानिकांकडून मुक्रर करून घेण्याचा प्रघात इंग्रजी अंमदानींत ठरला गेला, त्यास अनुसरून बडोद्यांत दिवाणाचें महत्व राहिलें इतकेंच. बाकी दिवाणांचे अधिकार कारणपरत्वें दुसऱ्यांसही देण्यांत येतात.

बावन वर्षांच्या या दीर्घकालाकडे विहंगम दृष्टीनें नजर फेकली, तर महाराजांची पहिली शिकाऊ वृत्ति स. १८९५ त मणिभाई जसभाई यांच्या अखेरीस संपली असें म्हणतां येईल. तदुत्तरच बडोद्याची व एकंदर राज्याची मुख्य सुधारणा झाली आहे. स: १८९५ पासून सुमारें स. १९२० पावेतोंची पंचवीस वर्षें अत्यंत कष्टाळुपणांत गेलीं. राजपुत्र जयसिंहरावांचे लग्नांत त्यांस

प्रथम संधिवाताचा विकार सुरू झाला, तो प्रथम कित्येक वर्षें हलका राहून उत्तरोत्तर त्यांस फार इजा देत आहे. सावधगिरीनें बागून औषधोपचारांची हेळसांड ते करीत नाहींत, म्हणूनच त्यांचे हातून अद्यापि श्रम घडत आहेत. पण याचा अर्थ असा नाहीं कीं, त्यांनीं आतां निवृत्ति संपादिली आहे. देहानें कोठेंही असले, तरी त्यांचें मन बडोद्यापासून बिलकूल दुरावलेलें नाहीं. त्यांचें मन सदैव कोणत्या ना कोणत्या राज्यकारणाच्या विचारांतच मग्न असतें.

दिवाण किंवा इतर अधिकारी सेवानिवृत्त झाले, तरी ते त्यांजवरील आपला लोभ कमी करीत नाहींत. सर टी. माधवराव निवृत्त होऊन मद्रासेस गेल्यावर अनेकवार महाराजांनीं त्यांजकडे जाऊन त्यांची भेट घेतली आहे. एकदां मला श्रीमंतांनीं नीलगिरीच्या वाटेंतून सर टी. माधवरावांचे समाचारास पाठविलें होतें. काजी शहाबुद्दीन, लक्ष्मण जगन्नाथ, मणिभाई, केरसास्पजी इत्यादिकांच्या भेटी मागाहून महाराजांनीं अनेकवार घेतल्या आहेत. सर्व दिवाणांत दक्षणी दोनच झाले, ते लक्ष्मण जगन्नाथ वैद्य व धामणस्कर हे होत. श्रीनिवास राघवायंगार, व रोमेशचंद्र दत्त यांचीं नांवें विद्वत्तेच्या संबंधानें विशेष गणलीं जातील.

### १५. अनेकांच्या आठवणी हाच जिवंत इतिहास.

महाराजांचा पूर्वायुःक्रम कसा होता, याची हल्लींच्या पिढीस थोडी बहुत कल्पना व्हावी म्हणून मी बऱ्याचशा आठवणी पूर्वकालच्याच येथें दिल्या आहेत. आठवणच करूं लागल्यास चाळीस बेचाळीस वर्षांचा काळ नजरेपुढें येऊन अनेक विषयांची गर्दी उभी राहते. त्यांतून आरंभींच्या कित्येक गोष्टींचा परिणाम माझे निर्विकार मनावर जितका झाला, तसा पुढें पुढें परिस्थितीशीं समरस होत असतां पुढील गोष्टींचा परिणाम टिकाऊ स्वरूपाचा झाला नाहीं. म्हणून मी पहिल्या पहिल्या आठवणीच विशेषतः येथें नमूद केल्या आहेत. त्या योगानें लोकस्मृतींत निद्रा पावलेल्या कित्येक प्रकरणांस पुनः एकवार थोडीशीं जागृति प्राप्त होईल; आणि कदाचित् त्यामुळें खुद्द महाराजांनांही आपल्या पूर्वायुःक्रमाची थोडीशीं उजळणी घडून क्षणभर मनास आराम वाटला तर वाटेल. लिहूं लागलें म्हणजे गतकालीन गोष्टी आठवत जातात. खुद्द महाराज

किंवा महाराणी यांजपेक्षां राजपुत्रांच्याच आठवणींनीं माझें मन भरलेलें आहे. त्यांतच ओघाओघानें राजस्त्रिया जमनाबाई, राधाबाई वगैरेंच्या गायकवाड घराण्यांतील नानाविध व्यक्तींच्या आणि सरदार व अधिकारी वर्गाच्या स्मृती माझे मनावर बिंबलेल्या असून त्यांचा बडोद्याच्या इतिहासास थोडा बहुत उपयोगही होईल असें मला वाटतें. श्रीमंतांचे यूरोपचे प्रवास, नीलगिरी, गुलमर्ग, नैनीताल, मसूरी इत्यादि ठिकाणचे अनुभव व सर्वांहून कांहीं तरी शिकण्याचे किंवा गमतीचे प्रसंग उद्भवले ते आतां मनश्चक्षूं पुढें उभे राहतात. परंतु ते सर्व लिहून काढण्यास आज तरी मला बिलकूल सवड नाहीं. श्रीमंत सयाजीराव महाराजा एवढा जगाचा प्रवास करून अनुभव घेतलेली विद्यमान व्यक्ति आज आपणांस या देशांत दुसरी आढळणार नाहीं. मनुष्यस्वभावाची पारख, व्यवहारदक्षता, मानवी व्यवहारासंबंधानें सावधगिरी, या गुणांचा एकत्रित संचय म्हणजेच महाराजांचे एकंदर जीवन होय असें मला वाटतें. अशा दृष्टीनें या राष्ट्रपुरुषाच्या जीवनाची परिगणना जितक्या निरनिराळ्या लेखकांकडून होईल, तितकी ती आपल्या राष्ट्रास आजकाल हवीच आहे; कारण महाराजांचें जीवनवृत्त म्हणजेच आपल्या राष्ट्राचा पाऊण शतकाचा ठळक व मूर्तिमंत इतिहास होय.

---

# आठवणी

— २ —

( ले.—श्री. आनंदराव वामनराव पवार—मानकरी )

( १ ) ज्याला आज महात्मागांधींमुळें मोठें महत्त्व प्राप्त झालें आहे, तो जातिभेद निवारणाचा प्रश्न श्रीमंतांनीं माझ्या आठवणीप्रमाणें सन १८८६ मध्येंच म्हणजे चार तपापूर्वींच हातीं घेतला होता. सार्वजनिक भोजनप्रसंगीं तरी जातिभेद पाळूं नयेत असा महाराजांचा कटाक्ष, परंतु तेवढी सुधारणाहि त्यांनीं थोडें लोकांना पुढें नेऊन व थोडें आपण लोकांच्याबरोबर मागें राहून युक्तियुक्तिनें करून घेतली. प्रजेची सुधारणा व प्रजेचें अनुरंजन हीं दुधारी तलवारीसारखीं असतात. तीं दोन्हीं महाराजांना साधलीं हेंच विशेष. जुन्यांना बिचकूं न देतां व नव्यांना बिथरूं न देतां त्यांनीं ज्या क्रमानें पंक्तींतला जातिभेद दूर केला तो असाः—राजवाडयांत ताटपाटांच्या पंक्ती असत त्याऐवजीं खुर्चीमेजांचे खाने सुरू केले. उपाहार असेल तर तोही त्याच पद्धतीचा. अशाप्रसंगीं एकाच दिवाणखान्यांत किंवा शामियान्यांत जातीवार बिछायती किंवा गट ठेवीत. पुढें बिछायत एकच पण मेजें वेगवेगळीं ठेवीत. मेजांतले अंतर कापीत कापीत पुढें शाकाहारी व मांसाहारी एवढीच वेगळेपणाची मर्यादा ठरविली; व सर्व शाकाहारी हिंदु एकत्र व सर्व मांसाहारी हिंदु एकत्र केले. नंतर पार्शी, मुसलमान वगैरे परधर्मीयही हळूहळूं सामील केले. अशा क्रमानें भोजनांतला जातिभेद महाराजांनीं लोपवून टाकला. ह्या क्रमांतलें एकेक पाऊल टाकतांना महाराजांनीं व्यर्थ घाई केली नाहीं, किंवा रेंगाळून मागें राहणाऱ्या शंकेखोरांना काडीचें शासनही केलें नाहीं, हें आजच्या सुधारकांनीं लक्षांत घेण्यासारखें आहे.

× × × ×

( २ ) बालविवाह अत्यंत अनिष्ट असें अजूनही ब्रिटिश मुलखांत सभा भरवून नटराजन्सारख्यांना लोकांच्या गळीं उतरवावें लागतें. पण १८८६ सालीं उमराठ मुक्कामीं महाराजांशीं माझें जें संभाषण झालें, त्यांत बालविवाहाची

अनिष्टता इतक्या स्पष्टपणें महाराजांनीं माझ्यापुढें मांडली कीं, ती तर मी विसरलों नाहींच; पण महाराजांचें त्या वयांतलें दूरदर्षित्व आठवून अजूनही मी चकित होत असतों.

× × × ×

( ३ ) उमराठचीच गोष्ट निघाली म्हणून सांगतों. उमरेठला समुद्राच्या कांठीं आटापाटया खेळणें महाराजांना फार आवडे. सर्व देशी खेळ ते खेळत व खेळून ते आपला वचक सामनेवाल्यावर बसवीत. सामान्य खेळांतही वचक पाडणारे बालश्रीमंत सर्व हिंदुस्थानच्या राजकारणाच्या खेळांतही वचक पाडतील असें भविष्य तेव्हां कुणीं केलें असतें काय ? आटयापाटयाप्रमाणेंच Long Jump ( लांब उडी टाकणें ) त्यांना आवडत असे आणि आजही ते इतरांच्यापेक्षां अधिक ' लांब उडी ' मारीत आहेत, हें प्रत्येकाला बसल्याजागीं दिसतेंच आहे.

× × × ×

( ४ ) साध्या चालण्यांतही महाराज इतके सुरेख व इतक्या चपळतेनें चालतात कीं, मीं अजून कोणी तसा चालणारा पाहिला नाहीं. त्यांच्याबरोबर चालणारा कुणीही हडेलहप्पी गडी असू द्या, तो थकून जातो, पण महाराज थकत नाहींत. हा त्यांच्या चालण्याचा मोठा विशेष आहे.

× × × ×

( ५ ) लष्करी खेळांतील त्यांचें प्राविण्य न सांगतांही कळण्यासारखें आहे. कारण बोलूनचालून ते मूर्तिमंत राजेच आहेत. परंतु शिकार करण्याचें कसब सर्वांनाच सारखें असतें असा नियम नाहीं. महाराजांचें मृगयाकौशल्य प्रत्यक्ष पाहण्याचा योग मला जोधपुर मुक्कामीं आला. शिकार रानडुकरांची होती. शिकारी लोकांच्या दोन तुकडया करण्यांत आल्या होत्या. महाराजांच्याच तुकडींत मी होतों. त्यावेळची महाराजांची धीटाई, घोडयावरची मांड, घोडयाची दौड, भाल्याची फेंक वगैरे गोष्टी सांगेन तर मोठें वनविहारपर्वच होईल. मुद्याची गोष्ट इतकीच कीं, त्याप्रसंगीं दुसऱ्या सबंध तुकडीनें तीन डुक्कर मारले तर आमच्या तुकडीपैकीं एकटया महाराजांनीं सात डुक्कर मारले आणि तेही अवघ्या

एका तासांत ! हे आंकडे कुणाच्याही नजरेंत भरतील, पण त्यावेळची महाराजांची मृगयाविहारी मूर्ति माझ्या डोळ्यांत भरली आहे ती कधींही ढळत नाहीं.

× × × ×

( ६ ) मी महाराजांना एकदां विचारलें कीं, आमच्यासारखे अशिक्षित लोक खाशांच्या कामासाठीं ठेवल्यानें खाशांना तकलीफ होत नसेल कां ? महाराज म्हणाले ' ही तुमची चूक आहे. हुद्याचीं कामें करणें केवळ शिक्षणावर अवलंबून नाहीं. शहाणपणावर अवलंबून आहे. बुद्धीचा उपयोग करील तो कुणाच्याही उपयोगीं पडेल.'

× × × ×

( ७ ) खरशेटजी नांवाचे पारशी गृहस्थ बगीखाना कामदाराच्या हुद्यावर होते. तिथें त्यांच्या हांतून कांहीं अक्षम्य चूक झाल्यामुळें ते तात्काळ बडतर्फच व्हायचे; पण तूर्त त्यांची हत्तीखान्यावर बदली करून, एकंदर प्रकरणाची नीट चौकशी करण्याबद्दल महाराजांनीं हुकूम दिला. म्हणजे खरशेटजींचें प्रमादशीलत्व महाराजांच्या नजरेंत ठळकपणें आलें होतें तरी देखील, खरशेटजींनीं हत्तीखान्यांत काम करीत असतांना तिथल्या हत्तींच्या चौकटयांत मोठी नामी सुधारणा करून दाखविली, व ती महाराजांना फार पसंत पडून तिच्याबद्दल महाराजांनीं खरशेटजींना तात्काळ मोठी शाबासकी दिली. खरशेटजींच्या अपराधाचें निराकरण अजून झालें नव्हतें, तरी पूर्वग्रहदुषित न होतां महाराजांनीं मोठया मनानें शेटजींच्या हुषारीबद्दल गुणग्राहकता ताबडतोब दाखविली.

सामान्य सत्ताधीशांच्या वर्तनाहून हें वर्तन मला वेगळें वाटल्यावरून मीं महाराजांना खासगीरीतीनें विचारलें कीं, ज्या इसमानें नोकरींतून बडतर्फ होण्या इतका अपराध केल्याचा आरोप आहे, त्यालाच महाराजांनीं शाबासकी कशी दिली ? महाराज म्हणाले, ' कां देऊं नये, बुवा ? एकादा आरोप असला तर माणसांत इतर गुण नसतातच असें कुठें आहे ? आणि जशी चूक म्हटली कीं शिक्षा आलीच, तसें गुण म्हटला कीं शाबासकी आलीच पाहिजे. जन्मभर आरोप उगाळीत बसल्यानें आपलेच हात नाहीं कां काळे व्हायचे ?'

× × × ×

( ८ ) राजाला मित्र नसतात असें म्हणतात. पण एक विद्याव्यासंगासारखा मित्र राजानें जोडल्यावर इतर पार्थिव मित्रांची मातब्बरी काय ? ' मित्रं प्रीतिरसायनं नयनोः ' इत्यादि श्लोकांतील मित्राचें वर्णन महाराजांच्या वाचनादिक व्यवसायांना तंतोतंत लागू पडतें. ह्या उद्योगांत महाराज इतके रमून गेलेले मी पाहिले आहेत कीं, त्यांना आपण त्यादिवशीं काय काय पदार्थ जेवलों याचेंही मुळींच स्मरण नसे ! साहजिकच आहे. बुद्धिदेवीच्या मंदिरांत अन्नकोटाची सिद्धता होत असतांना पोटोबाच्या पावशेराची मोजदाद कोण करतो ?

× × × ×

( ९ ) महाराजांचें स्वतःचें वाचन तर पुष्कळ असतेंच, पण आमच्यासारख्या नोकरांनींही पुष्कळ वाचन ठेवावें असें त्यांचें म्हणणें असतें. ' अमुक वाचा, तमुक वाचा ' असें ते आम्हांला वेळोवेळीं प्रत्यक्ष मार्गहि दाखवीत. एकदां मीं महाराजांना म्हटलें कीं, ' आपण हे उत्कृष्ट ग्रंथ आम्हांला वाचावयास सांगता, पण त्याचा उपयोग काय ? हे ग्रंथ वाचून आमच्यासारख्यांच्या हांतून कांहीं काम होईल असें मला नाहीं वाटत. ' त्यावर महाराज म्हणाले ' माझ्या हांतून काय होणार आहे ? असें प्रत्येकाला म्हणतां येईल, व प्रत्येकजण तसें म्हणूं लागला व खरोखरच स्वस्थ बसला, तर जगांत कोणतेंच महत्कार्य होणार नाहीं. तुम्हींच कांहीं कार्य हातीं घेतलेंत तर विशिष्ट मुदतीनंतर तुम्हांला सर्व साहाय्य करूं लागतील व तुमचें अंगीकृत कार्य सिद्धीसही जाईल. शिवाय, आम्ही वाचन ठेवा म्हणतों तें जगांत काय चाललें आहे तें समजावें, व शक्य तर जगाच्या प्रगतीला तुमचा हातभार लागावा, निदान अडथळा तरी होऊं नये एवढयासाठीं म्हणतों. जग काय करतें आहे, कुठें चाललें आहे, हें जो समजून घेत नाहीं, त्याला आम्ही एक गुन्हेगार तरी समजतों किंवा माणूस तरी म्हणत नाहीं. '

× × × ×

( १० ) बडोदें राज्यांत सोनगड—व्यार्‍याकडे धानका नांवाचे रानटी लोक राहतात. हे लोक इतके रानटी आहेत कीं, आपल्यासारख्या सुवेषधारी माणसांस पाहतांच ते लांब पळून जातात. त्यांच्याकरितां महाराजांनीं शाळा उघड-

वून त्यांना माणसांत आणण्याचा प्रयत्न सुरू केला होता. त्यावेळीं महाराजांना मीं विचारलें कीं, हे लोक शिकून शहाणे झाले व आपले हक्क मागू लागले म्हणजे जड जाईल. त्यापेक्षां यांना शिक्षणच न दिलेलें बरें नाहीं कां ? महाराज म्हणाले, ' प्रजेला राजानें शिक्षण न देणें म्हणजे एका पवित्र कर्तव्यास चुकणें होय, आणि त्यांतून प्रजेनें हक्क मागूं नयेत म्हणून तिला अशिक्षित ठेवणें ही तर भयंकर चूक आहे. '—प्रजानां विनया धानात् रक्षणात् भरणात् अपि । स पिता, पितर: तासां केवलं जन्महेतव: ।। हा कालिदासाचा श्लोक मीं पुष्कळदां ऐकला होता. पण प्रजेचें रक्षण व भरणपोषण यांच्या आधीं प्रजेचें शिक्षण राजकर्तव्यांत कालिदासानें कां मोजलें तें मला ह्याच वेळीं समजलें.

× × × ×

( ११ ) गुजराथेंत नागर व पाटीदार ह्या दोन जाती बऱ्याच सुधारलेल्या आहेत. गोरव्याचे एक पाटीदार तरुण गृहस्थ उच्च शिक्षणाकरतां विलायतेस जात होते, निघण्यापूर्वीं ह्या गृहस्थांनीं महाराजांची भेट घेतली व आपला उद्देश कळविला. महाराजांनीं विचारलें, ' तुम्ही तिथून काय काय शिकून याल ? ' ते गृहस्थ म्हणाले, ' माझ्या विषयांत प्राविण्य मिळवून पदवी घेऊन येईन. ' महाराज म्हणाले, ' पदवी आणाल, थोडीफार फॅशनही आणाल हो, त्याचें काय मोठें ? मला वाटतें ह्याच्यापेक्षां तुम्ही अधिक कांहींतरी आणलें पाहिजे. सांगूं काय आणाल तें ? तिथल्या एकंदर व्यवहारापासून आपल्या देशाला, समाजाला व व्यक्तिमात्राला काय काय शिकण्यासारखं तुम्हांला वाटेल तें आणा. त्याची फार जरूर आहे. पदवी आणून तुम्ही इथल्या लोकांना लुटणारच ना ? त्यापेक्षां तिथल्या लोकांचें शहाणपण इथल्या लोकांत आणण्याचा प्रयत्न करणेंच सुशिक्षितांना जास्त शोभेल. '

× × × ×

( १२ ) राजाच काय पण कुणीही पैसेवाला इसम बक्षिस द्यायचें म्हटल्यावर खोल जाऊन चौकशी करून बक्षिसाच्या स्वरूपांत फेरबदल करीत नाहीं. त्याला वाटतें आपल्या उदारतेला त्यायोगें कमीपणा येईल. बक्षिस घेणाऱ्याचें अधिकांत अधिक हित कशाप्रकारें होईल याचा विचार करून बक्षिसाचें

स्वरूप ठरविणारा यजमान कुणालाही अधिक उपकारक वाटेल. त्या दृष्टीनें पुढील लहानशा गोष्टीला थोडेंसें महत्त्व आहे.

एकदां महाराज पायीं फिरावयाला निघाले असतां, बरोबरच्या हुजऱ्यांपैकीं एकजण महाराजांच्या पुढें धांवत जाऊन चांगल्या स्वच्छ रस्त्यावरचे बारीक-सारीक खडे दूर फेंकून महाराजांची वाट अधिक स्वच्छ करूं लागला. तें पाहून आमच्यापैकीं कुणीसा म्हणाला कीं, 'हा काय असा वेड्यासारखं करतो आहे ?' महाराजांनीं हे शब्द ऐकले व ते म्हणाले, 'तो वेडा नाहीं. तो आपल्या गरीबीचें एक नमुनेदार प्रदर्शन करतो आहे. पगार पुरत नसेल म्हणून तो हें असें करतो आहे.' त्याला कांहीं तरी मिळालें पाहिजे अशी महाराजांची खात्री झालेली मला दिसली, म्हणून 'त्याला काय बक्षिस द्यायचें ?' असें मी महाराजांना विचारलें. महाराज म्हणाले 'असल्या लोकांना एकदम रक्कम देऊन उपयोगी नाहीं. ती मुलाबाळांच्या क्वचितच कामी येते. तर याच्या पगाराची थोडीशी वाढ करून देऊं म्हणजे याची काळजी कमी होईल. पगार वगैरे-संबंधीं माहिती मागवून आम्हांला कळवा.' ती माहिती मागवितां त्या इसमाला सात रुपये पगार असल्याचें कळलें. प्रपंचही मोठा होता. महाराजांनीं त्याचा पगार दिढीनें वाढवून दिला. त्यानें त्याच्या मुलाबाळांचें कल्याण झालेलें मी प्रत्यक्ष पाहिलें.

\+ \+ \+ \+

( १३ ) 'थेंबें थेंबें तळें सांचें' अशी आपल्यांत म्हण आहेच, पण इंग्रजांत 'थेंबें थेंबें महासमुद्र होई' ( Little drops of water....make the mighty ocean. ) असें सुभाषित आहे. त्याच्यावरून थेंबांचें म्हणजे लहान-सहान गोष्टींचें केवढें महत्त्व आहे हें जास्त स्पष्ट होतें. छोटयाशा बाबतींत लक्ष घालून खर्च कमी करणें राजेपणाला शोभत नाहीं, अशी आपल्याकडे पुष्कळांची समजूत आहे. पण बदलत्या काळांत पूर्वयुगीन समजुतींना नाइलाजानें दुखवावें लागतें. मूठमातीही द्यावी लागते. असा त्याच पुष्कळ लोकांचा अनुभव आहे म्हणून बरें. महाराजांच्या ह्या छोटेखानी जपणुकीचे कांहीं स्वानुभव देतों:—

( १ ) बडोदे शहराहून आजवा तलावाकडे जी सडक जाते तिच्यावर दुतर्फा झाडें लावण्याबद्दल महाराजांचा हुकूम झाला होता. नंतर महाराज त्या रस्त्यानें फिरावयाला गेले असतां झाडें मुळींच वाढलेलीं—क्वचित मुळींच लावलेलींही दिसलीं नाहींत, म्हणून त्यांनीं चौकशी करविली. तिच्यांत असें निष्पन्न झालें कीं, झाडांना शिळ्या शेणाचे ऐवजीं ताज्या शेणाचें खत दिल्यामुळें झाडें थाळलीं व कांहीं वाळून पडून गेलीं. ज्यांची कसूर त्या अधिकाऱ्यांना दंड वगैरे झाला हें सांगणें नकोच.

( २ ) एकदां श्रीमंतांच्या स्वाऱ्या निलगिरीस जात असतां कुन्नूर येथें मुक्काम पडला. सकाळीं महाराज फिरावयास निघाले असतां आपल्याच सामानांनीं भरलेल्या १५—२० बैलगाड्या वाटेंत भेटल्या. इतक्या गाडयांत सामान तरी काय काय होतें म्हणून चौकशी करतां महाराजांस कळलें कीं, सध्यां वापरांत नसलेले पण जुने व आवडीचे म्हणून कदाचित एकादेवेळीं महाराज मागतील अशा हेतूनें आणलेले एकटया महाराजांचे फक्त कपडेच १५—२० बैल गाडयांत होते ! चालु पुरतेच कपडे प्रवासांत कुणीही नेतो. त्यांतून राजाचे कपडे म्हणून हवे तर दोन गाडे भरून आणत जा, असा महाराजांनीं हुकूम देऊन हा बेबंदशाही खर्च कमी केला.

+ + + +

( १४ ) जुन्या जमान्यांतल्या एकदोन गोष्टी सांगतों. आतां त्या वाचून हसूं येईल, त्या अशक्य वाटतील, पण त्या प्रत्यक्ष घडलेल्या आहेत. जुन्या नव्याच्या संधिकालांत उगवणाऱ्या थोर पुरुषांना लहानसहान बाबतींतही कसा त्रास सोसावा लागतो, व तो सोसूनही ते किती शांत चित्तानें वागत असतात, हेंच ह्या गोष्टींत पाहण्यासारखें आहे. ( १ ) महाराजांचा मुक्काम मकरपुऱ्यास होता. सन्निधच्या कामगिरीवर मीच होतों. साधी गोष्ट. आपल्याला तहान लागल्याचें महाराजांनीं मला सांगितलें. आतां पाणी तेवढें आणून द्यायचें. मी तें काम नाईकास सांगितलें, नाईकानें हाताखालच्या हुजऱ्यास बोलाविलें, सोन्याचें भांडें हवें म्हणून हुजऱ्या जामदाराकडे दवडला. जामदार म्हणाले, ‘ थांब, आतां कामाठी येईल तो दार उघडील, पेटी उघडील तेव्हां भांडें निघायचें,’ कामाठी—

बुवाचें दर्शन लवकर होईना, अखेर धांवपळ करतां करतां एक पेलाभर पाणी तहान लागल्यापासून तब्बल तासाभरानें श्रीमंतांना मिळालें ! १८९५ मधली ही परिस्थिति. आतां अर्थात् जमाना बदललाच आहे.

( २ ) सूर्याभोंवतीं ग्रहमाला तसे पूर्वीं महाराजासमवेत एक–ना–दोन बारा मानकरी कामाकाजाला असत. एकदां खंडाळ्यास महाराज असतां तेथून ४ वाजतां मुक्काम उठण्याचें ठरलें. तेव्हां एक मानकरी येऊन विचारतात,' काय, महाराज, चाराचे नक्की कां ? ' महाराज, त्यांना उत्तर देऊन दुसरें काम हातीं घेतात तों दुसरे मानकरी येऊन तोच प्रश्न करतात. त्यांची रवानगी होते न होते तों तिसरे मानकरी उपस्थित होऊन तोच प्रश्न उपस्थित करतात ! पाटोपाठ चवथेही तेच करतात. उत्तर देणारा मोठा स्थितप्रज्ञ असला तरी अशा प्रकारानें भ्रमिष्ट बनेल कीं नाहीं ? असे प्रकार नित्यश: होत असतां महाराज कधीं कुणावर क्रुद्ध झाले नाहींत. कुणावर त्यांनीं हात उगारला नाहीं. आपल्याच ठिकाणीं जळफळ किंवा आदळआपट केली नाहीं. इतकेंच काय पण कधींही विकाराच्या भरांत कुणाला त्यांनीं नुसतें अरे, तुरे देखील म्हटलें नाहीं. ' विकार हेतौ सति विक्रियन्ते येषां न चेतांसि त एव धीरा: । ' ही कालिदासाची धीर पुरुषाची व्याख्या महाराजांना यथार्थतेनें लावतां येईल, असें मीं त्यांच्या निकट सहवासांत जी ३०–३५ वर्षे घालविली त्यावरून म्हणूं शकतों.

\+ + + +

( १५ ) मकरसंक्रांतीच्या दिवशीं बडोद्यानजीक डबका येथें महाराज पूर्वीं नेमानें डुकराच्या शिकारीस जात असत. त्यावेळीं शिकारीनंतर रात्रौ गाणें वगैरे करमणुकी होत व महाराज त्यास हजरही राहात. गाणेंबजावणें ऐकून श्रमपरिहार अल्प अवधींत होतो. एकदां शिकारीनंतर रात्रीच्या गाण्यास महाराज हजर राहूं शकले नाहींत, पण इतर मंडळींसाठीं तो कार्यक्रम चालू ठेवावाच असें त्यांनीं सांगून पाठविलें. गाणें सुरू झालें. गाणारणीनें शिकस्त केली. मंडळींनीं तिची वारंवार वाहवा करून तिला जास्त प्रोत्साहन दिलें. मंडळीमधून निघणारे ' वाहवा ' ' खाशी ' वगैरे शब्द त्या प्रशांतसमयीं दूरदूर

घुमूं लागले. महाराजांच्या कानींही ते पडले. पण गलबला करून झोपमोड केल्याबद्दल ते अरसिकाप्रमाणें कुणावरही रागावले नाहींत. उलट मजजवळ म्हणाले, ' आम्ही काल आलों नाहींत--मोठया मजेला मुकलों. ' मीं म्हटलें ' महाराज, आपण येतां तर इतकी मौजही न येती. मग सगळेंच काम बेतशीर होतें. ' महाराजांना तें पटलें व ते म्हणाले, ' खरेंच, शिस्त आपल्या लोकांना आधींच नवीन, तिचाच अनुभव नाहीं, मग मर्यादेंत राहूनही मजा लुटतां येतो हा अनुभव इतक्यांत कसा येणार ? बाकी तुम्ही मौजा करतां त्यांत भाग घ्यावा असें आम्हास फार वाटतें.' महाराजांना तसें पुष्कळ वाटलें तरी त्या वाटण्याचें व त्यांच्या कार्याचें गोत्र जुळत नाहीं. ' श्रियसे लोकहेतोः ' ही राजवृत्ती थोडी दुर्भागीच नाहीं कां ?

\+ + + +

( १६ ) एकदां कै. श्री. राजपुत्र जयसिंहराव यांचें अकस्मात् पोट दुखूं लागल्यावरून महाराज भेटीस आले. त्यावेळीं त्यांच्या पाहण्यांत आलें कीं, नोकर मंडळी उगीच आजाऱ्याच्या खोलींत हेलपाटे घालून, कांहीं कुजबुजून, आजाऱ्याला मधेंच कांहीं विचारून किंवा विनाकारण इकडची वस्तू तिकडे व तिकडची इकडे ठेवून आपण आजाऱ्याच्या शुश्रूषेंत किती गर्क व पटाईत आहोंत तें दाखवित होतीं. महाराजांना हें नाटक पाहवेना म्हणून त्यांनीं मला बोलावून नोकर लोकांस आजाऱ्याच्या शुश्रूषेची नीट कल्पना करून देण्यास सांगितलें. शुश्रूषेची कलमेंही महाराजांनीं सांगितलीं. तीं इथें देण्याचें कारण नाहीं. फक्त महाराजांचें लक्ष किती मूलग्राही असतें, व सोंग तें तात्काळ कसें ओळखतात ( मग चूक ओळखून काढतील यांत नवल नाहीं ) एवढेंच दाखवावयाचें आहे.

\+ + + +

( १७ ) महाराजांना सकाळची सहल बैलगाडीमधून करणें आवडतें हें सर्वांना ठाऊकच आहे. ह्या गाडींमधें महाराज बसले आहेत असा एक फोटो टाइम्स पत्रांत एक दोन वर्षांपूर्वी आलाही होता. ही गाडी आपण खेडेगांवांत पाहतों किंवा अनुभवतों त्याहून अर्थात् पुष्कळ सुखकर आहे. सर्व थाट व्हिक्टो-

रियाचा, पण घोड्याऐवजीं दोन बैल तिला लावलेले असतात एवढाच फरक. मी एक वेळ महाराजांना विचारलें कीं, मोटारगाडी किंवा जोडीची घोडागाडी वगैरे ऐश्वर्यसूचक वाहानाऐवजीं आपण बैलगाडी कां पसंत करतां ? महाराज म्हणाले, ' ऐश्वर्य दाखवित बसणें आम्हांला कधींच आवडत नाहीं. बैलगाडी पसंत करण्याचीं कारणें बरींच आहेत. एकतर मोटार किंवा घोडागाडीपेक्षां बैलगाडी सावकाशीनें जात असल्यामुळें वाऱ्याचा मारा फार लागत नाहीं, हवा मुबलक मिळते, लोकांच्या परिस्थितीचें निरीक्षण सावकाश करतां येतें, आजु-बाजूंस होणारीं कामें, सुधारणा, येणारे जाणारे लोक, नीट न्याहाळून पाहतां येतात. गाडी छोटीशी असल्यामुळें बरोबर जास्त मंडळी घेतां येत नाहींत, व त्यामुळें विचार करावयास निर्वेध वेळ मिळतो. आणि सर्वांत मोठें कारण म्हणजे आसपासच्या खेड्यांत जाऊं म्हटलें तर मोटार वगैरे तिथें नेतां येत नाहीं. गाडी आपली कुठेंही जाते. ' महाराजांना कांहींतरी लोकविलक्षण करायचें असतें म्हणून ते बैलगाडींतून फिरत असतात, असें म्हणणारांना वरची कारणपरंपरा पुरेसें उत्तर देईलच.



# आठवणी

—३—

( लेखकः—वामन कृष्ण फणसळकर. )

( १ ) हिंदु मनुष्य कितीही उच्चभूमिकेवर गेला तरी जुन्या समजुतीचा विटाळ थोडाबहुत तरी त्याच्या मनाला होत असतोच, असें आपल्याला रानडे, गोखले, टिळक वगैरेंच्या चरित्रांवरून दिसतें. पण शकुनापशकुनासारख्या जुन्या धार्मिक (?) कल्पनांचा स्पर्श महाराजांच्या मनाला एका ठळकप्रसंगीं झाला नाहीं, असें माझ्या अनुभवास आलें आहे. तो प्रसंग असाः—सन १९२३ च्या दसऱ्याला महाराज पारिसमुक्कामीं होत. त्या दिवशीं महाराजांचें देशी पोषाखांत छायाचित्र घ्यावयाचें होतें, म्हणून त्यांचे कपडे व तलवार घेऊन आम्ही कांहीं मंडळी आगाऊ चित्रकाराकडे गेलों. पण चित्रालयांत जातांना तलवार मोटर-गाडींतच विसरलों. गाडी भाडयाची होती, ती केव्हांच निघून गेली. तलवार मिळण्याचें लक्षण दिसेना. इतक्यांत महाराजांची स्वारी येऊन थडकली. दसऱ्याच्या दिवशीं पांडवांनीं शस्त्रास्त्रें परत मिळविलीं, मराठयांनीं परत पाजळलीं, आणि आम्ही आज....! मला वाटत होतें, महाराज आज फार रागावणार. पण महाराजांना सर्व हकीकत सादर करतां ते किंचितही विकारवश झाले नाहींत. उलट तलवार परत मिळविण्याचे मार्ग त्यांनीं आम्हांला शांतपणें समजावून दिले, व त्या मार्गानें गेल्यास तलवार ताबडतोब सांपडेल असेंही सांगितलें. त्याप्रमाणें तलवार त्याच दिवशीं परत मिळाली.

(२) १९२३ जुलैमध्यें महाराज आस्ट्रियांत बाडगास्टाईन येथें होत. त्यावेळीं न्युमोनियाच्या तापानें त्यांची प्रकृती चिंताजनक झाली होती. मध्येंच नेहमींचें गुडघ्याचें दुखणेंही जोर करी. एके रात्रीं त्यांचा पाय फार दुखूं लागला म्हणून, त्यांनीं तो जरा दाबून घेण्याकरितां नेहमीच्या इसमास हांक मारली. मी जवळच बसून महाराजांना हरिभाऊ आपटयांची एक कादंबरी वाचून दाखवत होतों. पाय दाबणारे इसम ओ देईनात. तेव्हां महाराजांनीं राहून दुसरी हांक

मारली, तिसरी मारली. मी उठून बाहेर पाहिलें तर ते इसम किंवा दुसरे कोणीही नव्हते. तें मी महाराजांस कळवून विनंती केली कीं, आपण ज्या कामाकरितां त्या इसमांना बोलवतां ( तें काम मला अर्थातच मागाहून कळलें ) तें काम मला करतां येईल तर सांगण्यास अनमान करूं नये. महाराजांनीं प्रथम आढेवेढे घेतले, पण प्रसंगाचा चमत्कारिकपणा पाहून त्यांनीं मोठ्या नाइलाजानें मला तें काम सांगितलें, व काम आटोपतांच म्हणाले, ' फणसळकर, तुम्हांला भलतंच काम करायला लावलं म्हणून मनांत कांहीं आणूं नका हं ? तुमची तत्परता तुम्हांला शोभून दिसली, पण तिनें आम्हांला आज थोडें खजिल केलें. Thank you once more and good night to you आम्हीं निजूं म्हणतों आंता. '

# आठवणी

—४—

## अश्वरोहण कुशलता, डुकरांची शिकार वगैरेबद्दलच्या कांहीं आठवणी

( लेखक—जनरल नानासाहेब शिंदे—बडोदें, )

सन १८९५ सालच्या फेब्रुवारी महिन्यामध्यें मी फौजेंत नोकर झालों व सन १८९७ च्या सुरवातीस: श्रीमंत सयाजीराव महाराजसाहेबांचा मी ए. डी. सी. झालों. त्यामुळें श्री. सयाजिराव महाराजांच्या निकट सहवासांत मी जवळ जवळ ३८ वर्षें घालविलीं आहेत, असें म्हटलें तरी चालेल. मी फौजेंत नोकर झालों त्या वेळीं महाराज साहेब भरज्वानींत म्हणजे ३२–३३ वर्षांचे होते व त्याच वेळीं ते घोडयावर उत्तम बसणारे म्हणून त्यांची ख्याती होती. इंग्रजी फेरापेक्षां घोडयांचा देशी फेर चांगला, अशी महाराजांची दृढ समजूत असल्यानें केशवराव सांवंत, जगदाळे, मी वगैरे नवीन मंडळी रिसाल्याचे राइडिंगमध्यें जरी पास झालों, तरी आम्हांस देशी फेराची माहिती देण्यासाठीं महाराजांनीं खास कै. उस्ताद रहीम मिया यांच्या हाताखालीं शिक्षण घेण्यासाठीं पाठविलें होतें. परंतु आमच्या दुर्दैवानें आम्हीं दोनतीन फेर केला नाहीं, तोंच वस्ताद आजारी पडले व त्याच आजारांत त्यांचा अंत झाला. श्री. राजपौत्र प्रतापसिंह यांस सुद्धां रिसाल्याच्या राइडिंग कोर्सबरोबर देशी फेराचें शिक्षण देण्याबद्दल महाराजांनीं फर्माविलें होतें.

### अश्वरोहण कुशलता ( Horse-man-ship ).

१. महाराजांस घोडयावर बसण्याचें शिक्षण लहानपणापासून प्रसिद्ध चाबुकस्वार वस्ताद रहिममिया यांनीं दिलें. हे वस्ताद श्री. गणपतराव महाराजांपासून खाशांच्या तैनातींत होते, व ते आपल्या कलेंत फार निष्णात होते. भाला, बोथाटी, लगोरचा वगैरे घोडयावरचे खेळ त्यांनीं महाराजांस चांगले शिकविले. एकेरी कावा, दुहेरी कावा, घोडयास थरकावणें वगैरे कामेंही महाराज फार सफाईनें करीत असत. त्यावेळचा महाराजांचा आवडता घोडा "परीरूप" हा होय. या घोडयाचें तैलचित्र मोतीबाग शाळेंत आहे. हा निळ्या रंगाचा

अरब घोडा होता, व यानें महाराजांस पुष्कळ वर्षे काम दिलें होतें. अखेर म्हातारपणीं हा घोडा बगीखान्यांत पेन्शन खात पडला. रहीममिया वस्तादानंतर कासममिया वस्ताद हे त्याच्या जागीं आले. त्यानींही महाराजांची फार वर्षे नोकरी केली. त्यांच्या चांगल्या नोकरीबद्दल महाराजांनीं त्यांस छत्री मशालजीची असामी करून दिली, व दरबारांत त्यांस खुर्ची दिली. कांहीं दिवस हे बगीखाना कामदारही होते. महाराज आपल्या नोकरांच्या चांगल्या नोकरीची बूज करण्यास कधींही चुकत नाहींत.

२. महाराजांस घोडयावर बसण्याचा इतका शोक असे कीं, दररोज सकाळीं घोडयावर बसूनच स्वारी बाहेर फिरण्यास जात असे. घोडदौड, मकरपुरा वगैरे बाजूसच स्वारी फिरून परत आली तर बरोबरचे ए. डी. सी., मानकरी वगैरे मंडळी टिकत असत, परंतु आडरानांत ( crcss country ) महाराजांनीं घोडा घातला कीं, फक्त चाबूकस्वार व एखादा ए. डी. सी. किंवा मानकरी बरोबर टिकत असे. एकदां घोडा आड वाटेंत घातला म्हणजे महाराज मागें पहातहि नसत. कोण आला व कोण मागें राहिला त्याची ते फारशी पर्वाही करीत नसत. बडोद्यास आसपासचे सर्व रस्ते त्यांना चांगले माहित असल्यानें रस्ता दाखविण्यास कोणाचीही जरूरी लागत नसे. अशा वेळीं १५–२० मैल मजल ते सहज लवकर मारून परत येत असत, व परत आल्याबरोबर वाचण्यास बसत असत. गेल्या रस्त्यानें ते केव्हांही परत येत नसत. हा त्यांचा नेहमींचा परिपाठ असे.

३. रयतेची स्थिति पाहण्यास महाराज प्रातांत ज्यावेळीं फिरण्यास जात, त्यावेळीं बहुतकरून सकाळ सायंकाळ घोडयावर बसून आसपासच्या ५–६ खेडयांची स्थिति ते स्वतः जाऊन पहात असत. अशा वेळीं ३०–३५ मैलांचा चक्कर रोज होत असे. प्रांतांतील अंमलदार, सुभे, पोलिस नायब सुभे, वगैरे यांस जर घोडयावर चांगलें बसतां येत नसेल तर त्यांची पुरी फजीती उडत असे. कित्येकांस घोडयावरून उतरल्याबरोबर नीट चालतां येत नसे, कित्येक घोडयावरून खालीं येत असत, कित्येकांच्या पोटांत दुखूं लागे, कित्ये-

कांचे घोडे लंगडे होत, तर कित्येकांच्या जिनांचे तंग अगर रिकाबसोट तुटत असत. या कारणांमुळें बरेच अंमलदार महाराजांबरोबर टिकत नसत, मागें रहात असत.

४. सर्व मुलकी अंमलदारांस घोडयावर चांगलें बसतां आलें पाहिजे व त्यांनीं प्रांतांत घोडयावरून फिरलें पाहिजे म्हणून महाराजांनीं सर्व मुलकी अंमलदारांस घोडयावर बसण्याची परीक्षा आवश्यक ठेविली आहे. इतकेंच नव्हे तर ही परीक्षा पसार केल्याशिवाय तरुण मुलकी अंमलदारास बढती देऊं नये, म्हणून महाराजांचा खास हुकूम आहे. घोडयावरून फिरल्याशिवाय मुल्की अंमलदारांस आपल्या प्रांताची खरी स्थिति पहाण्यास सांपडत नाहीं, हें जाणूनच वरील हुकूम महाराजांनीं केलेला आहे.

५. सन १९०४ सालीं महाराज प्रथमच द्वारकेस गेले. यापूर्वी कोणीही गायकवाड घराण्यांतील राज्यकर्ता पुरुष द्वारकेस गेला नव्हता. मे. समर्थ सरसुभे हे बंदोबस्तास स्वारीबरोबर होते. जामनगरची व आपली जेथें सरहद्द मिळते तें छोटें रण पहाण्याकरितां महाराज गेले. जामनगरच्या हद्दींतून द्वारकेस रेल्वे आणण्याचा त्यावेळीं प्रश्न होता. बरोबर समर्थ व ए. डी. सी. मी होतों. काम संपल्यावर स्वारी परत घोडयावरून निघाली, त्यावेळीं समर्थांनीं विनंती केली कीं, संध्याकाळ होत आली आहे, तरी आतां तांग्यांतून परत गेल्यास बरें. महाराज म्हणाले, " समर्थ, मला जरा थोडी जास्त मेहनत पाहिजे यासाठीं तुम्हीं तांग्यांतून जा व मी घोडयावरून येतों. " समर्थांला हें पसंत पडलें नाहीं. परंतु मालकांची इच्छा तेव्हां त्यांचा नाइलाज झाला. महाराजांस द्वारकेस पोंचण्यास रात्र होणार. यासाठीं परत तांग्यांतून जातांना समर्थांनीं रस्त्यावरील सर्व गांवच्या पाटलास गांवच्या सीमेंत मशाली पेटवून लोक हजर ठेवण्यास सांगितलें. महाराजांबरोबर ए. डी. सी. चाबूकस्वार अमीरअल्ली व रस्ता दाखविण्यास एक पोलिसस्वार याप्रमाणें मंडळी होती. तीन चार मैल आम्हीं गेलों नाहीं तोंच, पोलीसस्वार अमरेळीचा असल्यानें द्वारकेंतील रस्त्यांस अनवाकब, त्यामुळें तो रस्ता चुकला. हें महाराजांच्या लक्षांत येतांच, नीट दिशा लक्षांत ठेऊन

आम्हीं चक्कर मारून पुन्हा पहिल्या रस्त्यावर आलों, इतक्यांत रात्र पडली; तरी पण आम्हीं घोडे दौडवीत चाललों होतों. एका गांवाजवळ आलों तेव्हां आम्हांस मशालीचा उजेड दिसला, तो पाहून सर्वांस बरें वाटलें. " ही समर्थांची समयसूचकता " असें महाराज म्हणाले. ए. डी. सी. नें एक व चाबूकस्वारानें एक, या प्रमाणें दोन मशाली हातांत घेऊन आम्हीं पुढें निघालों. पोलीसस्वाराचा घोडा लंगडा झाल्यानें तो मागेंच राहिला होता. गांवठी मशाल हातांत धरून, अंधाऱ्या रात्रीं घोडा दौडविणें किती अवघड आहे, हें स्वतः करून पाहिल्याशिवाय समजणें शक्य नाहीं. याप्रमाणें दरएक गांवांतून नव्या मशाली घेऊन व जुन्या तेथें टाकून चाललों होतों, व अखेर १० च्या सुमारास द्वारकेस पोंचलों. समर्थ बंगल्याच्या दारांतच महाराजांची वाट पहात उभे होते. त्यांस पाहतांच महाराज म्हणाले, " समर्थ, आमच्या हट्टाचें प्रायश्चित आम्हांस मिळालें, तरी पण तुमच्या मशालींच्या बाबतींतील समयसूचकतेबद्दल तुम्हांस शाबासकी दिली पाहिजे. " ए. डी. सी. कडे वळून घोडयावरून उतरतांना महाराज म्हणाले, " Samarth, is a man of resources."

६. असाच प्रकार सन १९०८ च्या अमरेली प्रांतांतील स्वारींत झाला. कोडीनाराहून वेरावळ बंदर पाहण्याच्या इराद्यानें महाराज सायंकाळीं चार वाजतां कोडीनारहून घोडयावर स्वार होऊन निघाले. कोडीनारहून वेरावळ ८--१० मैल आहे. वेरावळला पोंचल्यावर तेथील मच्छीमार लोकांबरोबर व कच्छी व्यापारी लोकांबरोबर बोलत फिरत असतां, महाराजांस खाडींत एक होडी दिसली. त्या होडीमध्यें महाराज व माशांचा व्यापार करणारे कांहीं कच्छी व्यापारी व कांहीं मच्छीमार ढोलकें वगैरे घेऊन बसले. मच्छीमार ढोलके वाजवून व गाणीं म्हणून महाराजांची करमणूक करीत होते. सायंकाळचा वारा सुटला असल्याकारणानें महाराजांस होडींत बरें वाटत होतें. या गमतीमध्यें महाराजांस वेळेचें भान राहिलें नाहीं. बरोबरचा चाबूकस्वार महाराजांचा घोडा घेऊन कांठाकांठानें चालला होता. अंधार होत आला तरी होडी थांबेना. तेव्हां चाबूकस्वारास काळजी पडली. शेवटीं होडी थांबली व महाराजांनीं तेथून शिटी वाजवितांच चाबूकस्वार घोडा घेऊन तेथें गेला. महाराज घोडयावर स्वार झाले

व चाबूकस्वारास विचारलें कीं, 'रस्ता माहित आहे कीं नाहीं ?' चाबूकस्वारानें तो रस्ता त्याच दिवशीं फक्त एकदांच पाहिला होता. तो काय बोलणार ? तेव्हां तेथील मच्छीमार लोकांकडून एक मशाल हातांत घेऊन चाबूकस्वार पुढें झाला. काळोख्या रात्रीं नुसत्या पायवाटेनें महाराज चाबूकस्वाराच्या मागें जात होते. जेथें चाबूकस्वार भलत्याच दिशेस जात आहे असें महाराजांस वाटे, तेथें त्यास अमक्या दिशेला चल म्हणून महाराज सांगत असत. याप्रमाणें रात्रौ ९ वाजण्याच्या सुमारास महाराज मुक्कामावर येऊन पोंचले. आपणांस तकलीफ झाली तें एके बाजूस ठेऊन, आम्ही होडींत फार मजा केली, म्हणून महाराज मुक्कामावरील मानकरी वगैरे मंडळीस सांगूं लागले.

७. एके सालीं, महाराज अमरेळी प्रांतांत रयतेची स्थिति पहाण्यास गेले असतां, एके दिवशीं सकाळीं धारीहून खांब्यास जाण्याकरितां निघाले. धारीपासून खांबा २४ मैल आहे. रस्त्यामध्यें १२ मैलांवर घोडयांचे टप्पे ठेविले होते. तेथें घोडे बदलून महाराज खांब्यास गेले. खांब्यास काम वगैरे पाहून, जेवण करून थोडा आराम केला. चहा घेऊन स्वारी खांब्याहून परत धारीस येण्यास निघाली. रस्त्यांत टप्पा होता तरी तेथें घोडा न बदलतां, एकाच घोडयावर स्वारी धारीस परत आली. बरोबर असलेल्या ए. डी. सी. स लघुशंका करण्यास सुद्धां वेळ न मिळाल्यामुळें, धारीस परत आल्यावर त्याची फार फजिती झाली. पोलीस—नायब—सुभे यांचा घोडा लंगडाच झाला. महाराजांनीं सर्व कामें वगैरे करून ४८ मैलांची मुशाफरी घोडयावरून केली होती, तरी त्यांस बिलकुल थकवाही आलेला नव्हता. दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुन्हां घोडयावर स्वार होऊन फिरावयास गेल. वरील ३६ मैलांची मुशाफरी महाराजांनीं मुबीन नांवाच्या अरबी घोडयावर केली होती.

८. लांबच्या मुशाफरीमध्यें चाबूकस्वार घोडयांचे टप्पे लावून ठेवीत असत, तरी पण कित्येक वेळां स्वतःच्या स्वारीचे घोडे, चाबूकस्वारानें दमावर चढविले आहेत कीं नाहीं, हें पाहण्याच्या हेतूनेंच टप्प्यावर घोडा न बदलतां एकाच घोडयावर ३०–३५ मैलांची मुशाफरी महाराज सहज करीत असत. ही महाराजांची

संवय चाबूकस्वारांस चांगली अवगत असल्यानें ते महाराजांचे खाशा स्वारीचे घोडे चांगले फिरवून ठेवीत असत.

९. महाराजांना जसा घोडयावर बसण्याचा शोक, तसाच चांगले घोडे ठेवण्याचाही शोक आहे. " परीरूप " नांवाचा निळ्या रंगाचा अरबी घोडा महाराजांचा जवानपणांतील आवडता घोडा होता. " हमदम " नांवाचा सुरंग अरब फारच देखणा असून लष्करी खेळांत व डुकराच्या शिकारींत या घोडयाची बरोबरी दुसरा कोणताही घोडा करीत नसे. " तारा " नांवाची कुमेद रंगाची घोडी होती हीहि फार मजबूत होती. " मतीन " नांवाचा तेलिया कुमेद, व " मुबीन " नांवाचा निळा, असे दोन घोडे रिसाल्यांतील नवीन घोडयांमधून ( Remounts ) श्री. कॅप्टन दादासाहेब गायकवाड यांनीं निवडून बगी-खान्यांत महाराजाकरितां दिले होते. हे घोडे फार जोरदार असून प्रांतांत फिर-ण्याची बहुतेक कामगिरी महाराज या घोडयावर करीत असत. " मतीन " घोडा फार उत्तम ' Trot ' जात असे. " पुखराज " " इकबाल " वगैरेही दुसरे पुष्कळ चांगले अरब घोडे महाराजांच्या स्वारीचे होते. " गुलबार " व " रॉबराय " नांवाचे दोन अस्सल इंग्लिश अवलादीचे घोडे महाराजांजवळ होते. अजूनसुद्धां ज्या ज्या वेळीं महाराज विलायतेस जातात, त्या त्या वेळीं तेथून चांगले अस्सल घोडे खरेदी करून महाराज बडोद्यास पाठवितात. नवीन घोडा आला, व त्यास चाबूकस्वारानें फिरवून महाराजांनीं त्यावर स्वारी केली कीं, महाराज त्या घोडयास कांहींतरी आवडतें नांव देत असत.

१०. ' जो घोडयावर बसेल तो पडेल ' ही म्हण सर्व प्रसिद्ध आहे. या म्हणी प्रमाणें महाराजांस घोडयावरून खालीं पडलेले आम्ही स्वत: ३८ वर्षांत केव्हांही पाहिलें नाहीं. परंतु वस्ताद लोकांकडून समजतें कीं, रिकाबसोट तुटल्यामुळें किंवा Spring मधून निघून गेल्यानें, किंवा घोडयानें ठोकर खाल्यामुळें, किंवा घोडयावर बसले असतां डोक्यांत राजकारभारासंबंधी निर-निराळे विचार चालत असल्यामुळें लगामीचा हात ढिला पडल्यामुळें, अगर घोडा एकाएकीं चमकल्यामुळें महाराज घोडयावरून कित्येक वेळां खालीं आले

आहेत, परंतु त्यामुळें इजा झाली असें केव्हांही झालेलें नाहीं. लगेच उठून त्याच घोडयावर पुन्हां स्वार होऊन महाराज जात असत. घोडयावर बसून जात असतां, घोडयाची गाडी हांकीत असतां, अगर टेनिस खेळत असतां, बहुतेक वेळां, महाराज राज्यकारभाराच्या विचारांत गढून जातात, हें जवळच्या ए. डी. सी. स अगर खेळणारास माहीत असतें, त्यामुळें कित्येक वेळां त्यांस विचारांतून जागें करावें लागतें.

११. सन १९२४ सुरवाती पावेतों महाराज घोडयावर बसून घोडदौडचे चारपांच चक्कर सहज देत असत. संधिवाताचा जास्त जोर झाल्यानें त्यांचें घोडयावर बसणें अलीकडे कमी झालें, त्यामुळें महाराजांस फार वाईट वाटतें. ६० वर्षांच्यावर वय झालें होतें तरी आडरानांतील दौड (Crosscountry ride) घेण्याची महाराजांची इच्छा झाली म्हणजे, शिंदे, सावंत, भाऊसाहेब गायकवाड यांपैकीं कोणातरी कॅव्हलरी अधिकाऱ्यास बोलावून सकाळीं आपल्या बरोबर घेऊन जात असत, व १५—२० मैलांचा चक्कर सहज मारीत असत. घोडयावरून फिरल्यानें महाराजांस थकवा तो कसाही वाटत नसे. अलीकडे महाराज घोडयावर Trot नें कित्येक मैलपर्यंत मेहनत करीत असत. चांगला Trot करणारा घोडा महाराजांस फार आवडत असे.

## डुकराच्या शिकारीमध्यें महाराजांची प्रवीणता.

चाळीस वर्षांपूर्वीं महाराजांची स्वारी जोधपुरास गेली होती. त्यावेळीं जोधपुरचे जनरल महाराजा प्रतापसिंह यांनीं महाराजांस तेथील डुकराची शिकार दाखविली. त्या वेळेपासून महाराजांस डुकराची शिकार फार आवडूं लागली.

२. संक्रांतीनंतर दरवर्षी डबक्यास डुकराच्या शिकारीचा मोठा जलसा होत असे. डबका बडोद्यापासून १८ मैल आहे. या ठिकाणीं मही नदीच्या कांठीं डुकरासाठीं खास जंगल राखून ठेविलेलें आहे. या जंगलाचा बंदोबस्त शिकारखान्याकडून ठेविला जातो. या जंगलांत कोणासही बंदुकीनें शिकार करण्याची मनाई आहे. या जंगलांतील डुकरांची शिकार घोडयावरून केली जाते. श्रीमंत खाशांशिवाय इतरांस या जंगलांत शिकार करण्याची बंदी आहे. शिकारीसाठीं

दरवर्षी क्यांपांतील युरोपियन मेहमान, त्यांच्या मडमा, रेसिडेंट, लष्करी अंमलदार, सरदार, मानकरी, आप्तस्वकीय मंडळी व सर्व खाशांच्या स्वाऱ्या जनान्यासहीत डबक्यास जात असत. रिसाल्याचे दोनशें स्वार हाक्यासाठीं पाठविण्यांत येत असत, दोन हक्के करीत. एक मोठा हक्का व एक लहान हक्का. पहिल्या दिवसाचा मोठा हक्का होत असे व नंतर लहान हक्का होत असे. डबक्यास एक आठवडा मुक्काम पडत असे. सन १९०२ ते १९०८ पर्यंत डबक्याच्या शिकारीची फार मजा येत असे. या सालांत पोलोचा खेळ जोरांत असल्यानें जवळ जवळ पोलोचीं ३२ उत्तम तट्टें होतीं. त्यांचा उपयोग डुकराचे शिकारींत पोलो खेळणारे लष्करी अंमलदार करीत असत. कै. यु. श्री. फत्तेसिंगराव हे निष्णात घोडेस्वार तरुणपणांत होते. डुकराच्या शिकारीमध्यें पितापुत्रांच्या पार्ट्या निरनिराळ्या असत. व मग कोणती पार्टी जास्त डुक्कर मारते याची चढाओढ चालत असे. बहुतकरून महाराजांचीच पार्टी जास्त डुक्कर मारीत असे. कारण त्या पार्टीमध्यें उत्तम घोड्यावर बसणारी व माहितगार मंडळी असे. दुपारीं शिकारीवरून परत आल्यावर महाराजांबरोबर सर्वांचें पंक्तीभोजन होत असे. भोजन झाल्यावर महाराजांची स्वारी राजवाड्याच्या सज्जांत उभी राहून खालीं चौकांत रांगेनें लावलेले डुक्कर महाराज पहात असत. मग कोणी कोणता डुक्कर मारला, कोणाचा डुक्कर मोठा, कोणावर डुकरानें चाल केली, कोणाचा घोडा दुखावला, कोणाचा भाला मोडला, कोण घोड्याखालीं आला, वगैरे गोष्टी मोठ्या आनंदांत हांसत खेळत चालत असत. या सहा वर्षांत दरवर्षी २०–२५ डुक्कर शिकारींत मारले जात. याचें कारण घोडे चांगले, मंडळी एक जुटीची व घोड्यावर उत्तम बसणारी व त्याशिवाय महाराजांमध्यें व युवराजामध्यें शिकारीबद्दल चढाओढ चालत असे. अखेरचे दिवशीं युरोपियन मेहमानाकरितां एक मोठा खाना ( Banquet ) होत असे व नदीमध्यें दारूकाम सोडण्यांत येत असे. असा हा शिकारीचा आठवडा डबक्यास आनंदांत जात असे.

३. सन १८९७ सालीं डुकराच्या शिकारिकरितां आम्ही प्रथमतः श्री. सरकार महाराज साहेबांबरोबर डबक्यास गेलों होतों. शिकारीच्या आदल्या

दिवशी रात्रीं निरनिराळ्या तुकडया वाटण्यांत आल्या. आमच्या पार्टींत केशवराव सावंत, दिनकरराव शिर्के, कै. बाळासाहेब गायकवाड, मी, वगैरे मंडळी होतो. आम्ही नवशिके, कधी जंगल पाहिलेलें नाहीं, किंवा डुकराची शिकारही केलेली नाहीं म्हणून आमच्या पार्टीस अगदीं एका कोपऱ्यांत ठेवण्यांत आलें होतें. हक्का सुरू झाला. डुक्कर जंगलांतून बाहेर पडून त्यांच्यामागें दुसरे लोक घोडे पळवूं लागले परंतु आमच्या बाजूस एकही डुक्कर आला नाहीं. शिकार करण्यास आम्ही सर्वजण अतिशय उतावीळ, परंतु दिलेली जागा न सोडण्याबद्दल शिकार सुपरिन्टेन्डेन्ट यांचा सक्त हुकूम झाल्यामुळें जागेवरच डुकराची मार्गप्रतिक्षा करीत उभे होतों. बारा वाजले तरी आमचा कांहीं योग आला नाहीं. आम्ही अगदीं निराश झालों होतों. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें महाराज त्या बाजूनें हत्तीवरून शिकार करून, परत जात असतां त्यांनीं आम्हांस पाहिलें. हत्ती उभा करून विचारलें कीं, "कां हो मंडळी, कांहीं शिकार केली कीं नाहीं ?" आम्हीं डुक्करच पाहिला नाहीं म्हणून सांगितलें. त्यावरून महाराजांनीं हत्ती मागें फिरविला आणि म्हणाले कीं, "चला, मी तुम्हांस डुक्कर दाखवितों." असें म्हणून त्यांनीं आम्हांस एका पिलुमध्यें बसलेला मोठा डुक्कर दाखविला. तो बाहेर पडतांच आम्हीं सर्वांनीं त्याचे मागें घोडे घातले. आमच्यापैकीं एका गृहस्थास घोडयावर चांगलें बसतां येत नव्हतें म्हणून ते सर्वांबरोबर न निघतां, आपल्या घोडयाच्या लगामा दोन्ही हातांनीं खेंचून त्यास थांबवीत होते, परंतु दुसरे घोडे पुढें गेल्यानें त्यांचाही घोडा त्यांस घेऊन जोरानें निघाला व श्री. मा. महाराणीसाहेबांचा हत्ती उभा होता, त्या हत्तीसमोरच त्यांनीं जमीनीस साष्टांग नमस्कार घातला! महाराणी साहेबांनीं कोण आफिसर पडला, कांहीं लागलें कीं काय, याचा तपास करण्यासाठीं तैनातीतील एक स्वार पाठविला, परंतु त्यास कांही एक जबाब न देतां आमचे हे दोस्त आंग झाडून घोडयावर पुन्हां स्वार झाले व पुढें हळूहळू निघून गेले. आम्ही दोन तीन मैल डुकराच्या मागें गेलों. त्याच्या पुठयावर दोन तीन भाले लागले असतील, परंतु तो फारसा जखमी न झाल्यामुळें समोरच्या कोतरांत

निघून गेला. आम्हीही आमचे घोडे, आम्ही शिकारीस अनवाकब असल्यामुळें त्याच्यामागें कोतरांत घातले. पुढें तो कोतरांत दिसेनासा झाल्यावर आम्ही आमचे घोडे पाठीमागें फिरवूं लागलों, तेव्हां समजलें कीं, घोडयास फिरविण्या-सही पुरी जागा नाहीं. तेव्हां सर्वजण घोडयावरून खालीं उतरलो व हातांत घोडे धरून हळूहळू कोतर उतरलों. या आमच्या मूर्खपणाबद्दल आम्हीं मुकामा-वर परत आल्यावर कै. सरदार ताज महंमद यांनीं फार ठपका दिला. 'ऐसी शिकार करोंगे तो कुत्तेके मोतसे मर जावोंगे' असें ते म्हणाले. आम्ही डुकर मारला नाहीं तरी आमची शिकारीची हौस महाराजांनीं पुरी केली, या आनंदांत आम्ही मुकामावर परत आलों होतो. नवीन होतकरू तरुण अमल-दारांस महाराज डुकराची शिकार करण्यास कसें प्रोत्साहन देत असत, त्याचें हें एक चांगलें उदाहरण आहे.

४. सन १९०३–०४ सालच्या शिकारीची गोष्ट असेल. महाराजांच्या पार्टींमध्यें मेजर भाऊसाहेब गायकवाड, आप्पासाहेब सावंत, एक चाबुकस्वार व मी असे होतों. हका येण्यास अवकाश होता, म्हणून आम्ही एका शेता-जवळ घोडयावरून उतरून उभे होतों. इतक्यांत शेतकऱ्यानें भाजलेले ओले चणे महाराजांस पाहून आणले. महाराजांच्या हुकमावरून ते घेतले व त्यास कांहीं बक्षिस दिलें. आम्ही सर्वजण चणे फोलून खात बसलों होतों व हातांत घोडयांच्या लगामा होत्या. इतक्यांत समोरच्या नदीच्या झीलमधून एक मोठा डुक्कर येतांना दिसला. आम्हीं सर्वजण एकदम घोडयावर स्वार झालें. डुकराच्या एका बाजूस मी व दुसऱ्या बाजूस भाऊसाहेब गायकवाड झाले. झीलमध्यें डुकराच्या जवळ आम्ही जाऊन पोंचलों. परंतु चिखलामध्यें घोडयांचे पाय गुडघ्यापर्यंत जाऊं लागले. डुकराचीही तीच स्थिति होती, त्यामुळें त्यास फारसें पळतां येत नव्हतें. आम्ही दोघांनीं त्यास दोन्ही बाजूंनीं रेटीत कोरडया जागेवर काढलें. झीलच्या बाहेर महाराज तयारीनें उभेच होते. झीलच्या बाहेर डुक्कर निघतांच २५ कदमांच्या आंत महाराजांनीं असा सफाईनें भाल्याचा हात केला कीं, भाला डुकराच्या काळजाच्या आरपार निघून गेला, व डुक्कर तेथेंच धडपड करीत पडला. महाराज फार खुश झाले. हा डुक्कर काळा भोर असून

प्रकार मोठा होता. असा एका भाल्यांत डुक्कर बसविणें, निष्णात घोडेस्वाराशिवाय व शिकारीशिवाय होत नसतें.

५. सन १९०४–०५ सालच्या शिकारींत एके दिवशीं महाराजांच्या पार्टींत केशवराव सावंत, मी व इतर मंडळी होतों. एक मोठा डुक्कर हक्यांतून बाहेर आला. त्याच्या बाजूस आम्ही दोघे झालों, व डाव्या बाजूस महाराजांस ठेविलें. आमचें दोघांचें काम डुकरास उजव्या बाजूनें दाबून महाराजांच्या अंगावर घालावयाचें होतें कीं, ज्यायोगें महाराजांस हात करण्यास मिळावा. आम्हीं जवळ जवळ याप्रमाणें दोन मैलांची जोराची शर्यत चालविली होती, तरी पण डुक्करच उलट आम्हांस उजव्या बाजूस रेटीत व पळत चालला होता, कारण उजव्या बाजूस जंगल असल्यानें दडण्यास जागा होती. व डाव्या बाजूस मैदान असून, महाराजांच्या भाल्यास त्यास बळी पडावयाचें नव्हतें. डुकराला आपल्या उजव्या बाजूला घेऊन भाल्याचा हात करावा लागतो. तो आपल्या डाव्या बाजूस असला तर हात करतां येत नाहीं. त्याला आपलें मरण समजतें कीं काय, किंवा उपजत बुद्धी म्हणून तो नेहमीं मारणाराच्या डाव्या बाजूलाच पळतो व उजव्या बाजूला सहसा पळत नाहीं. वरील शर्यतीमध्यें आमचे घोडे डुकरास ,' Ride off " पाठलाग करून अगदीं थकले होते, व ५० वारांवर बाभूळवन आलें होतें. यावेळीं डुकरावर हात केला तर इतक्या मेहनतीनें इतक्या पल्यावर आणलेला थकलेला डुकर हातचा जातो, असें वाटून केशवराव सावंत यांनीं आपला घोडा हात करण्याच्या हेतूनें एकदम बढविला व त्याचवेळीं महाराजांच्याही लक्षांत वरील गोष्ट एकदम आल्यानें त्यांनींही आपला घोडा बढविला. दोघेही हात करण्याच्या धुंदींत असल्यानें दोन्ही घोडयांच्या पुठयांची टक्कर झाली व दोघांचेही हात चुकले व डुकर बाभूळवनांत घुसला. केशवराव सावंतांस आपली चूक लगेच समजली व ते तसेच डुकराच्या मागें बाभूळवनांत घुसले. त्यांचा साफा तेथेंच बाभळीच्या फांदीस अटकून त्याच्या चिंध्या झाल्या तरी ते तसेच काटयांतून डुकराच्या मागून गेले. मी महाराजांजवळ होतों. आम्हीं तेथेंच थांबलों. महाराज म्हणाले,

कीं, " माझीच चूक, सावंतांची चूक नाहीं. मी फार वेळ थांबलों, यापूर्वीच हात करावयाचा होता, परंतु चांगला अंगावर येण्याची मी वाट पहात होतो. तुम्ही दोघांनीं चांगलें Ride off केलें, परंतु डुकराचें नशिब मरण्याचें नव्हतें." इतकें बोलून आम्ही परत फिरलों व दुसऱ्या डुकराच्या मागें लागलों. केशवराव सावंत मात्र आम्हांस त्या दिवशीं पुन्हा भेटले नाहींत. मुक्कामावर आल्यावर मीं त्यांस महाराजांचे उद्गार सांगितले, तरी पण आपण उतावीळपणा केला याबद्दल त्यांस सारखें वाईट वाटत होतें, परंतु महाराजांनीं या बनावाबद्दल त्यांच्याजवळ एक शब्दही काढला नाहीं. याला म्हणतात खरी खेळाडु वृत्ति ( Sporting spirit )

६. सन १९०६–०७ सालची गोष्ट असेल, महाराजांच्या पार्टींत केशवराव सावंत, भाऊसाहेब गायकवाड, मी वगैरे मंडळी होतों. इतक्यामध्यें एक मोठा डुक्कर निघाला त्याच्या मागें आम्हीं लागलों. त्या डुकरानें पिलूंच्या झाडीचा आश्रय घेतला. डबक्याच्या शिकारीच्या जंगलांत दोन पिलूंच्या रांगामधून घोडे पळविण्यास जागा साफ केलेली आहे, परंतु ही जागा २०–२५ कदमही नसते. महाराजास मध्यें घालून आम्ही मंडळीं दोन्ही बाजूस झालों. डुक्कर एका पिलूच्या रांगेमधून दुसऱ्या पिलूच्या रांगेमध्यें पळून जात असे. तो मस्त असल्यानें फारसा मोठयानें पळत नसे व पळण्याची त्यास जरूरही नव्हती, कारण दडण त्यास नकोच होतें. असा लपंडावींचा खेळ बराच वेळ चालला, परंतु डुकरावर हात करण्यास महाराजांस संधी मिळेना. डुक्कर चांगला मोठा त्यास तसाच पिलूमध्यें सोडून जाण्यास आमचें मन घेईना, त्यामुळें आम्ही त्यास पिलूमध्यें हुसकून महाराजांच्या अंगावर घालण्याचा जोखमीचा प्रयत्न करून करीत होतों. अशा लपंडावींमध्यें तो एका पिलूच्या रांगेमधून निघून दुसऱ्या रांगेमध्यें जाण्याचा प्रयत्न करित असतां, त्याच्या [illegible] महाराजांनीं त्याच ठिकाणीं त्यास पाहिलें व लगेच त्याच्या अंगावर घोडा घालून दुसऱ्या पिलूच्या रांगेमध्यें शिरण्यापूर्वीं हात करून त्यास जमिनीवर लोळविलें. आम्हां सर्वांस मोठा आनंद झाला. मेहनत सफल झाली असें वाटलें. असा दोन

पिल्लच्या रांगेमध्यें हात करून डुक्कर मारणें किती कठीण आहे, हें तज्ज्ञाशिवाय इतरांस समजणें शक्य नाहीं. हा डुक्कर भुऱ्या रंगाचा असून फार मोठा होता.

७. डुकराच्या शिकारीमध्यें महाराजांचें जुने सहाध्यायी कै. कर्नल जनार्दन सदाशिव, कै. सरदार ताजमहंमद, श्री. कै. दादासाहेब गायकवाड, कासममिया वस्ताद वगैरे मंडळी होती. ही मंडळी डुकराची शिकार उत्तम करणारी म्हणून त्यांची ख्याती होती. कै. यु. श्री. फत्तेसिंहराव, कै. राजपुत्र श्री. शिवाजीराव वगैरे तरुण राजपुत्र डुकराची शिकार करूं लागले, तेव्हां त्यांच्या पार्टीमध्यें वरील जुनी मंडळी महाराज घालीत असत, व आपल्या पार्टींत, नानासाहेब शिंदे, केशवराव सावंत, आप्पासाहेब सावंत, भाऊसाहेब गायकवाड वगैरे तरुण मंडळी घेत असत. असें करण्याचा खास हेतु हा असे कीं, तरुण मुलांना जुन्या मंडळीकडून डुकराच्या शिकारीचें चांगलें पद्धतशीर शिक्षण मिळावें.

८. पूर्वीं क्यांपांतील युरोपियन आफिसरांस महाराज आपल्या पार्टींत डुकराच्या शिकारीच्या वेळीं घेत असत, परंतु ते पलटणचे अमलदार असल्याकारणानें घोडयावर चांगले बसणारे नसत, व त्यांचे घोडेही डुकराच्या शिकारीलायक नसत, त्यामुळें बरेच वेळां अपघात होत असत. एके वेळीं एक नवशिका युरोपियन अमलदार महाराजांच्या पार्टींत होता. महाराज डुकराच्या मागें घोडा दौडवीत चालले होते, व हे साहेब महाराजांच्या मागें आपला भाला खालीं धरून घोडा पळवीत होते. डुक्कर एका बाजूस पळतांच महाराज आपला घोडा धिमा करून त्या बाजूस पळवीत होते, इतक्यांत मागील साहेबांचा भाला महाराजांच्या घोडयाच्या पुठ्यांत थोडासा लागला. महाराजांचा घोडा जखमी झाला. साहेबानें महाराजांची माफी मागितली. या दिवसापासून महाराज क्यांपांतील खात्रीची मंडळी आपल्या पार्टींत नेहमीं ठेवीत असत.

९. डुकराची शिकार भाल्यानें करण्याचे दोन प्रकार आहेत. एकास Overhand spear आणि दुसऱ्यास Underhand spear असें म्हणतात. महाराज नेहमीं Underhand spear नें डुकराची शिकार करीत असत. महाराजांचा हात नेहमीं डुकराच्या काळजांत लागत असे, त्याच्या पोटांत अगर

पुठयावर क्वचितच लागत असे. कै. यु. फत्तेसिंहराव हे नेहमीं Overhand spear नें डुकराची शिकार करीत असत. म्हणून त्यांचे शिकारीचे भाले आंखूड असत. त्यांच्याशिवाय बडोद्यांत दुसरा कोणीही शिकारी Overhand spear नें डुकराची शिकार करीत नसे. Overhand spear नें डुकराची शिकार करण्यास डुकराच्या अगदीं जवळ जावें लागतें. व हात फार सावधगिरीनें घोडयास वांचवून करावा लागतो. नाहींतर डुक्करच घोडयाची शिकार करतो, व शिकाऱ्यास जमिनीवर लोळवतो.

१०. सन १९०८ सालीं श्री. यु. फत्तेसिंहराव हें कैलासवासी झाले, तेव्हांपासून महाराजांचा डुकराच्या शिकारीचा शोक कमी झाला. त्यांत संधीवाताचा रोग व श्री. राजपुत्र शिवाजीरावासारख्या उमद्या राजपुत्राच्या अकाली मृत्युची भर पडली. वरील कारणामुळें व साठ वर्षांवर वय झालें असल्यानें, महाराज जरी स्वतः हातांत भाला घेऊन अलीकडे डुकराची शिकार करीत नाहींत तरी घोडयावर स्वार होऊन, शिकारीच्या वेळीं जंगलांत सारखे फिरत असतात, व चांगला मोठा डुक्कर कोणत्या बाजूला जात असला तर, त्यावर नजर ठेवून जवळ असलेल्या पार्टीला त्याची खबर मुद्दाम स्वतः देतात.

## लष्करी खेळांची आवड.

महाराज लष्करी खेळांत दर वर्षीं भाग घेत असत. भाल्यानें ' मेखा घेणें ' (Tent pegging), भाल्यानें कडया घेणें Tilting, तलवारीनें डोकें कापणें ( Head cutting ) वगैरे खेळांत महाराज लष्करी अंमलदाराबरोबर मोठया उल्हासानें कामें करीत असत. मोतीबागच्या घोडदवडीवर महाराज या कामाची कवाईत निष्णात लष्करी अमलदाराच्या देखरेखीखालीं करीत असत.

२. रिसालदार रामचंद्रराव शिंदे ( सेकंड ल्यान्सर्स ) यांनीं कांहीं वर्षांपूर्वी घोडयावर जीन व लगाम न लावतां Tent pegging चें काम वार्षिक लष्करी खेळांत प्रथमच करून दाखविलें. महाराज हें काम पाहून फार खूष झाले. त्यांनीं सदरहु रिसालदारास आपले जवळ बोलावून शाबासकी दिली व म्हणाले कीं, " तुम्ही हेंच काम माझ्या घोडयावर बसून करून दाखवितां

का ? " रिसालदार कांहीं वेळ गप्प बसले व मग म्हणाले कीं, " कांहीं दिवसांच्या कवाइतीनें व सवईनें मी करून दाखवीन. " महाराज हांसले व म्हणाले कीं, " तुमची मख्खी आम्हांस समजली आहे. " महाराजांनीं या रिसालदारास खास बक्षिस दिलें होतें.

३. एका वर्षींच्या खेळांत भाल्यानें मेखा घेण्याचें काम संपल्यावर, महाराजांनीं समितिस फर्माविलें कीं, जमीनीवर लिंबू ठेवावें व तें भाल्यानें घेण्यास सर्वांस सांगावें. हें काम फारच कठीण आहे. महाराज " हमदम " घोडयावर स्वार होते. त्यांनीं पाहिल्या धावेमध्येंच लिंबू उचललें. लष्करी अंमलदारांनीं प्रयत्न केला, परंतु कोणासही भाल्यानें लिंबू नेतां आलें नाहीं.

४. एका वर्षींच्या लष्करी खेळांत Spiral race म्हणजे नागमोडीनें ठरलेल्या जागेंतून घोडा घेऊन जाण्याची शर्यत होती. या शर्यतीमध्यें महाराज हमदम घोडयावर स्वार होउन सामील झाले व सर्वांच्या पुढें पहिले आले. हा घोडा फारच चांगला तयार केलेला होता.

५. कै. श्री. यु. फत्तेसिंहराव यांस Paper-chase या खेळाचा फार शोक असे. दर रविवारीं हा खेळ ठेवण्यांत येत असे व खेळांत महाराज हमेशा सामील होत असत. या खेळांत १५–२० मैलांची आड रस्त्यानें दौड होत असे, त्यामुळें महाराजांस फार आवडत असे. या खेळांत " fox " च्या पाठीमागें शेवटपर्यंत टिकणारी मंडळी फारच थोडी असते, परंतु या थोडया मंडळीमध्यें महाराज हमेशा असावयाचेच असा नियम होता.

६. कै. श्री. यु. फत्तेसिंहराव शिक्षण संपवून विलायतेहून परत बडोद्यास आल्यावर पोलोचा खेळ पुन्हां सुरू करण्यांत आला. हा खेळ महाराज साधारणपणें खेळत असत. धक्काबुक्कीमध्यें ( Hustling ) कधीं जात नसत, किंवा त्यांच्या जवळ धक्काबुकी करण्याकरितां कोणीही खेळाडू जात नसे, असें म्हटलें असतां विशेष शोभेल. तरी पण चारपांच चक्कर ते नेहमीं खेळत असत. या खेळासाठीं पोलोचीं खास तट्टें महाराजांनीं ठेवलीं होतीं.

७. निलगिरीस स्वारी गेली म्हणजे कधीं कधीं Hounds च्या मागेंही महाराज घोड्यावरून जात असत. या खेळांत चुरसाचुरशीनें ते केव्हांही भाग घेत नसत. फक्त चांगली मेहनत व्हावी व मंडळीच्या ओळखी व्हाव्या याच हेतूनें ते सामील होत असत.

## शिकार

मोठमोठ्या जनावरांची शिकार करण्याची महाराजांना आवड आहे. वाघ, सिंह, हत्ती, गेंडे, जंगली पाडे अशा मोठमोठ्या हिंस्र जनावरांची त्यांनी शिकार केली आहे, कित्येक वेळां पायदळ जमिनीवरूनही मोठमोठे पटाईत वाघ त्यांनीं मारले आहेत. एके वेळीं सोनगडच्या जंगलांत एका पटाईत वाघाची शिकार करण्यास महाराज गेले असतां, तो पटाईत वाघ ज्या जंगलांत होता, त्या जंगलांत मचान बांधण्यासारखें झाड नसल्यानें महाराजांना उंच वाढलेल्या गवतामधून वाघ असलेल्या ठिकाणीं पायीं जावें लागलें. वाघाला बाहेर काढण्यासाठीं हाकाटी चालू होती. महाराजांपासून ३०–४० कदमांवर एकदम तो वाघ गवतामध्यें दिसला. त्यानें महाराजांकडे तोंड फिरवून एकदांच पाहिलें, इतक्या अवधींत महाराजांनीं बंदुक सोडून नेमका त्याला ठार केला. ही गोळी त्या वाघाच्या दोन डोळ्यांमध्यें कपाळावर लागली होती. ती जर चुकली असती तर फार भयंकर प्रकार झाला असता, कारण जनावर फार जुनें व मोठें होतें. हरण, बदक, तीतर, बटेर वगैरेचीही शिकार महाराज करतात. बहुतेक फुरसत असेल त्या वेळीं अद्यापही शिकारीस जाणें महाराज साहबांस आवडतें.

---

# आठवणी

— ५ —

लेखकः—गणेश अनंत लेले बी. ए.

**प्रास्ताविकः**—श्रीमंत सयाजीराव ( तिसरे ) महाराज गायकवाड यांनीं सन १८८१ चे अखेरीस राज्यसूत्र हातीं घेतल्या पासून राज्याची सर्व बाजूंनीं प्रगति कशी होत गेली हे दरसालचें राज्याचें वार्षिक निवेदनावरून तसेंच त्यांची जीं चरित्रें प्रसिद्ध झाली आहेत त्यावरून समजण्यास साधन झालें आहे. परंतु ही प्रगति घडवून आणण्यांत प्रत्यक्ष महाराजांनीं स्वतःची उत्पादक प्रेरकबुद्धि चालविली, प्रोत्साहन दिलें, कष्ट घेतले, सर्वांच्या मनांत कर्तव्याची जागृती उत्पन्न केली त्या सर्व प्रयत्नांचा सुपरिणाम आज दिसून येत आहे. महाराजांनीं राज्यसूत्र हातीं घेतल्यापासून दिलेल्या हुकुमांचें स्वतः व मदतनिसांच्या साह्यानें निरीक्षण करण्याचा सुयोग मला आला होता त्यावरून कांहीं निवडक उदाहरणें दाखवून राज्याच्या प्रगतींत महाराजांच्या प्रयत्नांचें थोडक्यांत दिग्दर्शन करणार आहे.

**कारकीर्दीचे चार कालखंड**—प्रथमपासूनच्या हुकुमांच्या व इतर कागदांच्या निरीक्षणावरून व नोकरींतील स्वतःच्या अनुभवावरून महाराजांच्या कारकीर्दीचे मी चार कालखंड समजतों.

१ राज्यकारभाराचें सर्वांगीं शिक्षण सन १८८२ ते १८९५ पर्यंत.

२ स्वतःची कर्तबगारी सन १८९५ ते १९०७ पर्यंत.

३ श्रमाची फलप्राप्ति व कौटुंबिक आपत्ति सन १९०७ ते १९२३ पर्यंत.

४ मुख्य चालकत्व हातीं ठेऊन विश्रांति घेणें सन १९२३ पासून.

**राज्यकारभाराचें सर्वांगी शिक्षण**—महाराज पुस्तकी शिक्षणांतून नुकतेंच बाहेर पडलेले; आणि त्या वेळचे दिवाण दोनतीन ठिकाणीं दिवाणगिऱ्या करून नांव मिळवून ब्रिटिश सरकारच्या पसंतीनें आलेले; व महाराजांच्या अज्ञानपणांत पूर्ण सत्तेनें राज्य कारभार केलेले आणि त्या वेळचे खात्याचे अधि-

कारी वयानें व ज्ञानानें पोक्त, राज्यकारभाराचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेले, इतकेंच नव्हे तर महाराजांचे राज्य कारभाराचे शिक्षागुरु होते. आणि महाराज राज्य कारभार हातीं घेतेवेळीं, केवळ अठरा वर्षे वयाचे होते. अशा स्थितींत त्यांच्या कलानेंच महाराजास आरंभीं कामें करावीं लागलीं.

महाराज खानगी व फौज खात्याची कामें स्वतंत्र रीतीनें बारकाईनें पाहूं लागले; व कांहीं काल लोटल्यावर इतर खात्यांचींहि कामें तपसीलवार पाहूं लागले. तसेंच राज्यांत फिरून लोकस्थिति अवलोकन केली; हिंदुस्थानांत व युरोपांत फिरून तेथील लोकस्थिति व राज्यकारभार यांचे निरीक्षण केलें व अनुभव संपादिला. कालक्रमानें जुने व वयोवृद्ध अमलदार कमी होत गेले आणि महाराजासहि दिवसेंदिवस राज्यकारभाराचा प्रत्यक्ष अनुभव मिळत गेल्यानें, तसेंच ते बालवयांतून बाहेर पडल्यानें अधिकारावर व राज्यकारभारावर त्यांचें तेज प्रभावी होऊं लागलें. या कालांतहि महाराजांनीं प्रगतीची सुरुवात हळूं हळूं केली होती.

आपल्या हातून आपल्या प्रजेचें व सर्व देशाचें कल्याण उत्तमांत उत्तम होणें शक्य असेल तितकें करण्याची पराकाष्ठा करण्याचा निश्चय महाराजांनीं केल्याचें त्यांनीं केलेल्या हुकुमांच्या निरीक्षणावरून स्पष्ट दिसतें.

**स्वतःची कर्तबगारी**—राज्यकारभाराचें ज्ञान व अनुभव पक्व दशेस आल्यामुळें महाराजास आत्मविश्वास पूर्णपणें आला. राज्य कारभारांत उत्पन्न झालेल्या अडचणी महाराजांनीं मोठ्या कौशल्यानें दूर केल्यामुळें पुढील राज्यकारभाराचा मार्ग त्यांस आवरता आला. अनेक प्रकारच्या महत्वाच्या सुधारणा योजून त्या अमलांत आणल्या. या कालखंडांत राजकीय व दैवी परिस्थितीशीं तोंड देऊन मार्ग आक्रमावा लागला. राज्यकारभारांत प्रगतिपर सुधारणा यशस्वी केल्यामुळें राज्यांत व राज्याबाहेर कीर्ति पसरली; रयतेनें त्यांच्या कारकीर्दीचा रौप्य महोत्सव करून गौरव केला; वयास पंचेचाळीस वर्षे होत आलीं; कौटुंबिक स्थिति समाधान वाटण्यासारखी झाली; मुलांचें शिक्षण सुरळीत व समाधानकारक चाललें होतें. युवराज फत्तेसिंगराव यांस राज्यकारभाराचें शिक्षण

दण्यांत येत होतें. नातवंड झाल्यानें महाराज पितामहपदास पोचले. अशी सर्व प्रकारें समाधानाची स्थिति प्राप्त झाली.

या कालखंडांत राज्यांत सुधारणा करण्याचें काम जोमानें चालविलें होतें. शिबंदी पहाऱ्यासंबंधानें एका कामीं ही उत्कट इच्छा होण्याचें कारण दाखविलें आहे ते—

Our ideas and tastes are changing. Things which gave satisfaction in old times now fail to please. The old Shibandi and Sepoys and Swars of other departments were not found equally defective then as now. Their defects are now more glaring, and there is a great desire, and I think rightly, to correct them. The interior of our palaces has given way to a new order of things. We wish that the guards in the palaces should be more decent and efficient than the generality of the guards, we find, are at present. In the old days to a certain extent constant personal attention on the part of the authorities and the love of good soldiery, as well as the hope of reward and fear of punishment in an unexpected manner, may have kept these people to a higher pitch of efficiency, but all these facts have undergone a change.

**श्रमाची फलप्राप्ति व कौटुंबिक आपत्ति**—राज्य सुधारण्याचे प्रयत्न झपाट्यानें चालू होते. राजकीय विषारी वातावरणांतून निभावून महाराज आतां जास्ती तेजस्वी दिसूं लागले. फार परिश्रम केल्यानें विश्रांतीची आवश्यकता भासूं लागली. कांहीं काल पूर्ण विश्रांती घेऊन पुन्हां ताज्या दमानें काम करावें असें करतां करतां वयास साठ वर्षें झालीं. या पूर्वींच युवराज फत्तेसिंहरावांचें निधन व त्यानंतर कांहीं कालानें आणखी दोघे कर्ते पुत्र गत झाल्यानें चर्येवर खिन्नता भासूं लागली; तरी सुधारणांचें काम चालूच होतें आतां हे सुधारणेचें काम महाराजास हातच्या मळाप्रमाणें झाल्यामुळें ते सहज रीतीनें सुचवूं लागले.

**मुख्य चालकत्व हातीं ठेऊन विश्रान्ति**—स्वत: प्रत्यक्ष श्रम न घेतां राज्यकारभार सुरळीत चालावा अशी राज्यकारभाराची घटना घडवून ती अमलांत आणल्यानें तिचा उपयोग करून घेऊं लागले आहेत. सुकाणावर तीक्ष्ण नजर ठेऊन जरूर पडेल तेव्हां कांहीं काळ स्वत: सुकाणूं हातीं धरून पुन्हां विश्रांति घेऊं लागले असा क्रम आतां चालू आहे. हल्लीं महाराज मार्गदर्शकाचें काम करीत आहेत. नातू युवराज प्रतापसिंहराव यांनीं राज्यकारभाराचा धडा घेण्याची सुरवात केली आहे दुसरींहि नातवंडें शिक्षणांत प्रगति करीत आहेत. हल्लीं अशी परिस्थिति असल्यानें त्यांतच महाराज समाधान मानून घेत आहेत. वयास सत्तर वर्षें झालीं. आतां विश्रांतिची खास आवश्यकता आहे.

महाराज स्वभावत:च धटया कटया प्रकृतीचे नाहींत. सन १८९३–९४च्या सुमारास निद्राभंगाचा विकार जडला तो बरेच दिवस होता. शिवाय तीन पुत्रांच्या मृत्युमुळें त्यास मानसिक दु:ख मनस्वी झालें आहे त्यांतच संधिवाताचा विकार जडल्यामुळें शरीरप्रकृति नीट रहात नाहीं. तथापि स्वत: शरीराची योग्य काळजी घेत असल्यामुळें व वारंवार उत्तम हवेंत वास्तव्य करण्यास जाऊन विश्रांति घेत असल्यानें आजपर्यंत महाराजांस काम करतां आलें. असेंच यापुढेंही त्यास दीर्घायुष्य व पूर्ण आरोग्य प्राप्त व्हावें अशी सर्व प्रजाजनांची नोकरवर्गाची व इष्टमित्रांची इच्छा आहे.

**हुकुमांचा विस्तार**—डिसेंबर सन १८८१ पासून आज (जुलै १९३२) पर्यंत पन्नास वर्षांत महाराजांनीं दिलेल्या हुकमांची संख्या सुमोर त्रेपन हजारावर झाली आहे. त्यांत कित्येक एक किंवा अर्ध्या ओळींचे, तर कित्येक चार पांच बंद किंवा त्याहून जास्त बंदाचे आहेत. सरासरी पांचशे पृष्ठांचा एक ग्रंथ दरवर्षीं होईल इतका त्या हुकमांचा विस्तार आहे.

आरंभीं कित्येक हुकूम महाराज स्वत:च लिहित. ते कधीं कधीं एकेक दोन दोन बंद इतके मोठे लिहित परंतु कांहीं कालानंतर कामाच्या व त्याप्रमाणें विचाराच्या गर्दीमुळें स्वत:स विचार करण्यास वेळ मिळाना, व हुकूम

करण्यांत सावधानता रहावी म्हणून किंवा दुसऱ्या अनेक कारणांमुळें स्वतः न लिहितां दुसऱ्याकडून लिहवूं लागले. तरी हीं अजून क्वचित् प्रसंगीं स्वतः लिहितात; अगदींच लिहित नाहींत असें नाहीं.

**सामान्य धोरण ठरविण्याकडे लक्ष**—राज्यकारभार हातीं घेतल्यावर कांहीं दिवसांनीं अशी वहिवाट सुरू केली कीं, रुजू झालेल्या कामाबद्दल हुकूम देतांना त्या हुकुमांत सर्व सामान्य धोरण ठरवितां येईल तर तें ठरवावयाचें, कीं, ज्याच्या योगानें पुनः अशा प्रकारची कामें उपस्थित झालीं असतां तो हुकूम मार्गदर्शक व्हावा या उद्देशानें साधारणतः साधक बाधक अशी समजूत फार बारकाईनें देऊं लागले व नोकरवर्ग सर्वांगीण शिक्षण मिळून चौरस बनेल या हेतूनें हुकुमांत प्रवचनेंहि दाखल करूं लागले. त्यामुळें अशा समजुती व बोधपर इशारे देण्याची महाराजास हमेशाची संवय जडली. एका कामासंबंधी समजुती देतांना दुसऱ्या कामासंबंधी जर सामान्य विचार सुचले तर ते त्याच हुकुमांत लिहवितात. हे विचार निरनिराळ्या ठिकाणीं विखुरलेले एकत्र करवून त्याचे निबंधग्रंथ करविले आहेत. आजपर्यंत असे चार ग्रंथ तयार झाले आहेत.

**प्रजेचें कल्याण करण्याची उत्कट इच्छाः**—सन १८८२ मध्यें राज्यांत फिरून प्रजेच्या स्थितीचें निरीक्षण व सुखदुःखें समजून घेतलीं; व त्यावेळीं निरनिराळ्या बाबतींची टाचणें केलीं. त्या टाचणांचा राज्यकारभाराचे कामीं फार उपयोग झाला. तीं टाचणें पाहिलीं म्हणजे महाराजांची सूक्ष्म दृष्टि, विषय आकलन करण्याची शक्ति, जिज्ञासा व प्रजेचें कल्याण करण्याची उत्कट इच्छा हीं व्यक्त होतात.

**कामाच्या शिस्तीकरितां नियम करविलेः**—प्रत्येक प्रकारच्या कामाबद्दल नियम घडलेला असावा असा प्रथमपासूनच महाराजांचा कटाक्ष होता, त्याप्रमाणें अनेक विषयावर नियम झाले आहेत. बहुतेक नियमांची मूळ सूचना महाराजांकडून झाली आहे.

## महाराजांच्या स्वतःच्या प्रयत्नांचीं कांहीं निवडक उदाहरणें.

**बांधकाम खातेंः**—प्रत्येक काम शिस्तवार व बिनचूक व्हावें या विषयीं प्रथमपासूनच महाराजांनीं कडक नजर ठेविली होती. बांधकाम खात्यांतील

कांहीं कामें सन १८८२ च्या नवंबरांत महाराजाकडे रुजू झालीं त्यावरून कंट-राक्टरा बरोबर रीतसर कबाले झालेले नाहींत, तसेंच जिनसांचे भाव चौकसपणें ठरल्याशिवाय कामाच्या तपशिलांत फेरफार केलेला आहे, इत्यादि गोष्टी निदर्शनास आल्यावरून इशारा केला कीं,—

" Grave irregularites come under my observation in going through two or three other cases of disputes with contractors I hope a recurrence will be prevented It is my earnest desire that strictest regularity should prevail in transaction of public business and that due notice should be taken of any departure from this clear course.

सन १८८३ च्या जून महिन्यांत कामाच्या शिस्तीबद्दल हुकूम दिला कीं,

Some old cases show the great laxity and want of care exhibited in the matter of giving contracts. In some cases contractors were premitted to execute items of work before rates for them had been duly settled. In some cases, large works were carried out on the mere verbal orders of the late Dewan. It is my earnest desire that all irregularities like these should be carefully avoided, that the work should be transacted in a systematic manner and under a formal recognised procedure and that any departure from this clear course should be promptly noticed and corrected. "

केवळ वीस वर्षें वयाच्या राज्यकर्त्याकडून अशाप्रकारें शिस्तीचा पाठ दिल्याबद्दल सानंद कौतुक वाटल्याशिवाय रहात नाहीं, इतकेंच नाहीं तर ह्या पाठाची आवृत्ती पुनः पुनः केल्याचें दिसतें.

" The laxity of system and irregularity of procedure revealed by the papers cannot be passed over in silence as one is hardly prepared to meet with cases of reckless and unauthorised expenditure at a period when istan-

ces of similar expenditure belonging to former regimes often formed the subject of comment."

मस्तुबागेच्या कासाच्या निकालाचे खर्चाच्या मंजुरीच्या कामीं राज्य कारभाराचें एक मुख्य तत्त्व महाराजांनीं दर्शविलें आहे तें

"It is questionable whether such an expenditure as this which had been incurred for mere personal convenience ought to be included in the state expenditure on Public Works. Persons exercising supreme authority for the time being are expected to be very careful in matters involving expenditure for securing mere individual convenience irrespective of any public benefit and when a question has reference to their own personal convenience they should be very punctuous."

देशकल्याणाच्या बाबतींत प्रजेच्या विशेष जरूरीची जीं तलाव पाटबंधाऱ्याची बाबत ती राजसूत्रें हातीं घेऊन लागलीच राज्यांत देशस्थिति अवलोकन करण्यासाठीं फिरले तेव्हां त्यांच्या लक्षात आली व उद्गार काढले कीं.

"I am desirous of seeing irrigational works opened over the country wherever practicable."

पुढें या बाबतींत ( संवत १९५६ च्या दुष्काळ प्रसंगीं ) महाराजांनींच स्वतंत्र खातें निर्माण करून राज्यांतील सर्व भागांत पाहणी करविली, योजना तज्ञ माणसाकडून तयार करविल्या आणि सवडीप्रमाणें अमलांतहि आणिल्या. सन १९०० सालीं झांकरी व छत्रालच्या योजना व साबरमती आणि सरस्वती नदीच्या पाण्याचा उपयोग करण्याची योजना सुचविली, सन १९०२ सालीं हिराण व कादरपूर, सन १९०८ सालीं जामगीर व घाटवड अशा योजना स्वतःच सुचविल्या आहेत.

पोलीस ठाणीं राज्यांतील धर्मशाळेंत, देवस्थानांत, चौऱ्यांत ( चावडींत ) इत्यादि ठिकाणीं पूर्वीच्या राजवटींपासून आहेत; त्यामुळें प्रवाशांस व गांवच्या लोकास अडचण होते. इतकेंच नाहीं तर प्रसंगीं त्रास होत असल्याचें

निदर्शनास आलें. त्या वरोबर पोलीस ठाणीं स्वतंत्र बांधण्याचा हुकूम केला व स्वत: चिकाटी धरून सर्व राज्यांत तीस वर्षांत स्वतंत्र पोलीस चौक्या बांधविल्या. सन १८९० च्या दिलेल्या हुकुमांत " पोलीसना लोको धर्मशाळा, देवळ विगेरे सार्वजनिक उपयोगी जगामां रेहेवाथी लोकोने घणी अडचण वेठवी पडी हती. ए अडचण दूर थवी एवा इरादाथी दरवर्ष बजेटमां वधारे तपसील न जोतां आसरे ४४००० चुवाळीस हजार रुपीयानी रकम मंजूर करवा अमे हुकम आप्यो हतो. पण जे हकीकत रुजू थई छे ते उपरथी जणाय छे के— उपर दर्शावेली स्थितिमां फेरफार थयो नथी अने हजु लगी देवालय धर्मशाळा विगेर जगोए पोलीसना लोको जारी रहेला छे. " लोकोने खरी अडचण दूर करवाना हेतुथी हुजूरथी हुकम आपवामां आव्यो छतां आटले वर्षें ए अडचण हजू जारीज छे, ए केटलुं शोचनीय छे ए कहेवानी जरूर नथी. हुजूरथी हुकम थाय अने वखते वखते जे इच्छा प्रजाना सुखार्थे प्रदर्शित करवामां आवे तेनो वखतसर अने सारी रीते अमल करवो, अने ए रीते हुजुरने संतोष थाय एम करवुं, ए हरेक अमलदारे करवानुं छे. पण ते प्रमाणे यथेलुं जोवामां आवतुं नथी, ए दिलगिरीनी वात छे.

" हुकमनो अमल न थयो ए अधिकारीनी गफलत अने बिन काळजीनो परिणाम छे. कारण अधिकारी पोताना कर्तव्य कर्मनी पुरेपुरी काळजी राखे तो एवो परिणाम थवा वखत आवे नही. प्रजाना सुख अने राज्यनी व्यवस्था माटे काळजी राखी अमे वखते वखते जे हुकमो आपिए छीये तें हुकमो मात्र कागळ उपरज रही तेनो अमल न थायतो पछी ए स्थिति एवी संतोषकारक अने सारी राज्यव्यवस्थाने माटे भयंकर छे. अने आवी स्थिति जारी रहे तो पछी राज्य काम माटे जुदीज व्यवस्था करवा विचार करवानी फरज पडवानी; माटे दिवाण एमणे खाताना तमाम मुख्य अधिकारीओने आसंबंधमा एकवार असरकारक रीते अमारा बिचार जणाववा. "

यावरून महाराजांस स्वत:च वारंवार अधिकाऱ्यांस कसें जागृत करावें लागत होतें तें समजेल !

बडोदें शहरांत पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करण्यासाठीं आजवा येथें तलाव बांधण्याची तपशीलवार योजना सन १८८४ सालीं मंजूर केली. त्या योजने-प्रमाणें सन १८९१ पासून शहरांत पाणी विपुलपणें मिळूं लागलें. हें उदाहरण लक्षांत ठेऊन दुसऱ्या मोठया वस्तीच्या शहरांत व मोठया कसब्यांत पिण्याच्या पाण्याची सोय करण्याच्या योजना स्वत: सुचवून अमलांत आणल्या. सन १८९१ सालीं पाटण, सन १८९८ सालीं सोनगड, भाद्रण, शिनोर हीं कामें सुचविलीं. अशीं बरींच कामें स्वतः सुचवून तीं तडीस नेलीं आहेत.

ज्यांनीं बडोदें शहर चाळीस पन्नास वर्षांपूर्वीं पाहिलें, त्यांना आज त्याची ओळखहि पटणार नाहीं, अशी त्याची उत्तम रचना झाली आहे. आज बडोदें हें आरोग्यशाली व शोभिवंत आहे अशी त्याची ख्याती आहे; त्याचें पूर्ण श्रेय महाराजांना आहे.

सन १८८३ सालीं सुरसागर तलावाच्या भोंवतालचा दाट वस्तीचा भाग मोकळा करून हवाशीर करण्यास स्वत: हुकूम दिला. व त्यानंतर शहराचे निर-निराळे भागांतील रस्ते रुंद करणें, विश्रान्तीसाठीं मोकळ्या जागा राखून ठेवणें व तेथें बाग करणें, इत्यादि तजविजी करविल्या. त्याचप्रमाणें राज्यांतील दुसऱ्या कस-ब्यांतहि आरोग्यकारक व सुंदर अशी रचना करण्याचे वेळोवेळीं स्वत:च हुकूम दिले आहेत. तसेंच त्या त्या ठिकाणीं स्वत: जाऊन जागा मुक्रर करून देऊन समजुती दिल्या आहेत. इंजीनियर चिको व सॅनिटरी कमीशनर डॉ. धुरंधर यांस दुसऱ्या शहरांच्या शहरसुधारणा शिकण्यास पाठवून तयार करून आणिलें व मि. गेडीस या तज्ज्ञ मनुष्यास बडोद्यास बोलावून त्याची सल्ला घेतली.

सन १८८२ सालीं राज्यांत फिरत असतांना कलोलमहाल कचेरी गांवा-बाहेर बांधण्याचें काम चाललेलें पाहिलें. त्यावरून ' इतर महालकचेऱ्या, दवा-खाने, मुलांच्या शाळा वगैरे बांधण्याच्या कामीं स्वच्छ हवा, इमारतीचा देखावा, नजीक रेल्वेस्टेशन इतक्याच गोष्टी पहावयाच्या नसून लोकांची सवडहि ध्यानांत घेतली पाहिजे. ज्या दवाखान्यांत रोग्यास उपचारासाठीं ठेवण्यांत येतें, त्या दवा-

खान्यासाठीं गांवाबाहेर जागा पाहिली तर चांगलें, परंतु ज्या दवाखान्यांतून लोक औषध घेऊन जातात असे दवाखाने, शाळा, कचेऱ्या यासाठीं गांवांतच कंपाउंड करून हवाशीर इमारती बांधल्या म्हणजे लोकांस जास्त सोइस्कर पडेल ' असा हुकूम केला !

याविषयीं पुढें एके प्रसंगीं अशी सावधगिरीची सूचना दिली कीं, नदीकाठचे गांवीं कचेरी बांधणें ती नदीचें पाणी मोठ्या पुरांतहि पोंचूं शकणार नाहीं, अशा सुरक्षित जागीं बांधावी.

**दळणवळणाची साधनें**—देशसमृद्धीसाठीं जीं साधनें पाहिजेत त्या साधनांत दळणवळणाचे मार्ग हें एक साधन आहे. त्यासाठीं रस्ते करण्याबद्दल सन १८८३ च्या जून महिन्यांत इच्छा प्रदर्शित केली, " I am desirous of seeing a regular system of easy communication established. " व हकीकती मागवून रस्ते करविले.

दळणवळणाचें मोठें साधन रेल्वे. त्याबद्दल महाराजांनीं वेळोवेळीं अनेक सूचना केलेल्या आढळतात. खुद्द महाराजांनीं २५–३० ठिकाणीं रेल्वे करण्याच्या सूचना करून, हकीकती मागवून शक्य तीं कामें करविलीं. त्यांपैकीं शिनोर, अमरेळी, झंकवाव, बेचराजी, वाघोडिया वगैरे रेल्वे तयार झाल्या; व कांहीं होऊं शकल्या नाहींत. तथापि जेथें जेथें प्रथम दर्शनीं होण्यासारखा संभव वाटला तेथें तेथें महाराजांनीं स्वतः सूचना केलेली दिसते.

**न्याय व अमलबजावणी खात्याची फारकत**—फौजदारी इनसाफाचें काम मुलकी अमलदाराकडे होतें, त्यामुळें प्रजेस न्याय मिळविण्याच्या कामीं फार त्रास पडतो. मुलकी अमलदार फिरतीवर असला म्हणजे प्रजेस इन्साफाचे कामासाठीं त्याच्या मागें मागें फिरण्यास फार अडचण व त्रास भोगावा लागतो. तसेंच फौजदारी इनसाफाचे कामामुळें मुल्की काम कितीहि महत्वाचें असलें तरी तें न करतां कित्येक प्रसंगीं इनसाफी कामच करणें भाग पडतें, असें राज्यांत फिरतेवेळीं केलेल्या चौकशीवरून महाराजांच्या लक्षांत आलें. तेव्हां या बाबतींत काय केलें असतां प्रजेस सुख होईल, व मुल्की अमलदारासहि स्वतःचें काम

करण्यास सुलभ पडेल, याबद्दल हकीकत मागवून तज्ज्ञ माणसाबरोबर विचार-विनिमय करून विरुद्ध कारणांचा पूर्ण विचार केला; व अधिकारी वर्ग अनुकूल नसतांहि सन १८८६ फेब्रुवारी महिन्यापासून सुरुवात करून क्रमाक्रमानें मुलकी अमलदाराची व फौजदारी इनसाफी कामाची बहुतेक फारकत केली, आणि आपली योजना तडीस नेली.

नामदार व्हॉइसराय लार्ड मिन्टो यांनीं बडोदें शहरास भेट दिल्यावेळीं राज्यकारभारांत श्रीमंतांस यश आल्याबद्दल अभिनंदन करतांना " Your bold attempt to separate the exercise of judicial and executive functions has elicited the warm interest of the Government of India " असें स्पष्ट म्हटलें आहे.

ब्रिटिश हिंदुस्थानांत राष्ट्रीय सभेनें सन १८८६ सालीं डिसेंबर महिन्यांत ठराव करून ज्या सुधारणांची मागणी केली, व जी अद्याप मिळूं शकत नाहीं, ती सुधारणा बडोदें राज्यांत महाराजांनीं केव्हांच सुरू केली आहे, ही कौतुक वाटण्यासारखी गोष्ट आहे.

**संयुक्त राज्यघटना**—हल्लीं हिंदुस्थानांतील इंग्रजी अमलांतील प्रदेश व देशी संस्थानें यांची संयुक्त राज्यघटना करण्याचें घाटत आहे, व त्याविषयीं ऊहापोह होत आहे; अशा एकीकरणाचें स्वप्न महाराजांस फार वर्षांपूर्वीं पडलें होतें असें म्हणतां येईल. कारण ब्रिटिश पोस्ट ॲक्ट बडोदें राज्यास लागू करून घेतला होता ( १५–५–७८ ). त्या कायद्यांत तिकडे फेरफार झाल्यानें त्या फेरफाराप्रमाणें बडोदे राज्यांत अमल करण्याची मंजुरी सन १९०१ सालीं न्यायखात्यानें मागितली. त्यावेळीं महाराजांनीं इशारा दिला कीं, " कायदा बांधनारी धारा सभाओमां देशी राज्यसंस्थानो तरफथी कोई प्रतिनिधि बेसतो होय तो आवा कायदाओमां देशी राज्योना हक्कनुं बराबर प्रतिपालन थई शके एम लागे छे. "

**उत्तम ग्रंथांचीं भाषांतरें व नवीन ग्रंथ**—महाराजांनीं सन १८८५ सालीं पाटण येथील जैन ग्रंथसंग्रहालय पाहिलें, तेव्हां त्यांतील महत्त्वाच्या ग्रंथांचें

भाषांतर करण्याचा हुकूम दिला. त्यानंतर इंग्रजी, संस्कृत व पर्शियन भाषांतील अनेक विषयांवरील उत्तम ग्रंथांचीं भाषांतरें पारितोषिकें देऊन करविलीं व छापविलीं; कित्येक ग्रंथांचीं नांवेंहि स्वतःच सुचविलीं, या गोष्टी सर्वांस माहीत आहेत. तथापि थोडक्यांत दिग्दर्शन करावयाचें तें इतकेंच कीं, बालविवाह, पोवाडे, पाकशास्त्र, कुत्रा व घोडयाची मशागत, पाश्चात्य व देशी खेळ, मुलामुलींचे खेळ, इत्यादि विषयापासून ते वेदान्त, तत्त्वज्ञान, संस्कार, नागरिकांचीं कर्तव्यें, निरनिराळ्या देशांचे इतिहास, सगुणोपासना, बुद्धधर्मीय ग्रंथ, बालज्ञानमंजूषा इत्यादि निरनिराळे विषय स्वतः सुचवून त्यावर ग्रंथ लिहविलेले आहेत.

**वेरे अथवा लागवी कमी करून आयपतवेरा बसविला**—राज्यांतील दर एक महालांत निरनिराळ्या बाबतींचे अनेक प्रकारचे लहान लहान वेरे घेण्यांत येत असत. त्यांत सुधारणा करण्यास जागा आहे, असें एका कामावरून महाराजांच्या प्रथम ( सन १८८५ ) लक्षांत आलें. तेव्हां अशा वेऱ्यासंबंधीं अनेक वेळां प्रश्न काढून हकीकत मागविली, व ती एकत्र करून त्याबद्दल विचारविनिमय करून हे भिन्न भिन्न प्रकारचे वेरे बंद केले, व त्या सर्वांबद्दल आयपत वेरा ( इन्कम टॅक्स ) लागू केला. आणि त्याचा निबंध—नियमहि करविला.

**अधिकार मुक्रर केले**—क्षुल्लक कामें महाराजांकडे येऊं नयेत तर त्यांचा निकाल खात्यानें किंवा दिवाणांनीं करावा, महाराजांस अशा कामीं हुकूम देण्याचा किंवा तशा बाबती सुचविण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून दिवाणापासून ते महालच्या अधिकाऱ्यापर्यंत इतकेंच नव्हे तर गांवच्या पाटील तलाटयापर्यंतच्या नोकरांचे अधिकार निश्चित् करण्याचे वेळोवेळीं हुकूम देऊन अधिकारपत्रकें तयार करविलीं. तथापि कारणपरत्वें कामकाज पहातांना किंवा अन्य प्रसंगीं बारीकसारीक गोष्टी महाराजांच्या निदर्शनास आल्यास व त्यासंबंधीं कांहीं हुकूम किंवा समजुती देण्यासारख्या आहेत असें वाटलें, किंवा अमलदाराचे अशा कामीं दुर्लक्ष झालेलें दिसलें तर, तसे प्रसंग न चुकवितां किंवा क्षुल्लक गोष्टी बिन

महत्वाच्या न समजतां जेव्हांचे तेव्हां समजुती देत असतात. It is trifles that make up our life and their due execution leads to perfection. असे विचार महाराजांनीं एके ठिकाणीं प्रदर्शित केले आहेत.

बारिकसारीक कामें सुद्धां प्रथम महाराजांच्या हुकुमासाठीं रुजू होत, म्हणून सर्व कामांचा तपशील सेगतवार समजून घेतां आला व खात्यांच्या सर्व कारभाराची खडान्खडा माहिती सहज मिळाल्यानें पुढें महत्वाच्या कामीं फार उपयोग झाला.

**सावधानता व दूर दृष्टि**—कामाचें निरीक्षण बारकाईनें करण्याची संवय झाली त्याचप्रमाणें हुकूम देतांना सावधानता ठेवण्याची पद्धत अंगवळणी पडली. " I am writing this without full knowledge of circumstances." " I hope I have grasped this question " असे शेरे कांहीं कांहीं कामावर केले आहेत. याचें कारण मागाहून हकीकत निराळ्या स्वरूपाची असल्याचें आढळून आलें, व हुकूम फिरवून घेण्याची आवश्यकता वाटली तर पुन्हा काम रुजू करण्यास हरकत नसावी. योग्य वाटल्यास हुकूम बदलूं असेंहि कांहीं काहीं प्रसंगीं लिहिलें आहे. " Government and Rulers are not perfect, and it would be a help to them to point out the facts and the way in which their actions and motives are interpreted. " असा इशारा एका कामीं सन १८९८ सालीं दिला आहे. अमरेली प्रांतांत नव्या पक्या सडका केल्या. त्यावर बसविलेला टोल बंद झाला होता तो टोल पुन्हां सुरू करण्याची मंजुरी देतांना लिहिलें कीं, " केवळ सडक ओलांडून गाडे नेल्यास त्याच्याकडून टोल घेऊं नये. "

वाघेर लोक जर्मन महायुद्धाचे कामीं रिक्रूटमध्यें गेले, तेव्हां त्यांस कित्येक सवलती देण्यासाठीं काम रुजू झाल्यावर हुकूम देतांना सुचविलें कीं, " जे वाघेर या राज्याच्या मार्फतीनें रिक्रूटमध्यें जातील त्यांसच या सवलती घाव्या. परभारे गेले त्यांस देऊं नयेत. "

अमरेळीच्या राजमहालच्या बागेंत स्थानिक ऑफिसरासाठीं टेनिस कोर्ट करण्याची परवानगी मागितली, तेव्हां हुकुमांत इशारा दिला कीं, " अमरेळी येथें

महाराजांची स्वारी उतरली असेल त्या मुदतींत ही जागा वापरण्याची परवानगी समजू नये. "

अशा सूचनांवरून महाराजांची दूर दृष्टि दिसून येते, व कामावर हुकूम देण्याच्या ओघांतच अशा गोष्टी सुचतात हें विशेषत: पहाण्यासारखें आहे.

यंत्राप्रमाणें राज्यचक्र चालवितांना राजास केवळ व्यवहारिक गोष्टींवर नजर ठेवावी लागते, तथापि निसर्गास अनुसरून जेव्हां सुखदु:खाचे प्रसंग येतात तेव्हां त्या प्रसंगानुसार राजाचेंहि अंत:करण भावनावश होतें. यास महाराज अपवादरूप नाहींत असें कित्येक उदाहरणावरून दिसतें--डॉ. बटुकराम मेहता हे वैद्यकीय सल्लागार व सोबती ( कम्पॅनियन ) पुष्कळ वर्षे महाराजांजवळ होते. ते प्रसंग पडेल त्याप्रमाणें स्वारीकामदार, मानकरी, ए. डी. सी., सेक्रेटरी वगैरे हुद्याचीं कामें करीत. केव्हांहि काम अडूं देत नसत, किंवा हें काम माझें नाहीं असेंहि म्हणत नसत. वेळप्रसंगीं वाटेल तें काम करीत असत. ते नोकरींतून निवृत्त झाल्यावर जुलई स. १९०३ मध्यें युरोपांत वारले. त्या वेळीं महाराजांनीं लिहिलेल्या पत्रांत खालीलप्रमाणें आपले भाव व्यक्त केले:

" His Highness had special occasions to become acquainted with his character and personality. In that character there were some fine qualities which His Highness can never afford to forget. One of these was the sincere and steadfast interest he took in the welfare of His Highness and the State; he was a friend with whom His Highness could always converse and interchange views freely, a thing which is very rare amongst our countrymen and particularly in these days when the personality of the Raja is being detached from the administration and the interest of the servants are being secured by rules and regulations.

As a personal physician His Highness had great confidence in him; he was, he thinks, prudent,sympathetic

and strong, able to withstand influences which are not uncommon in a place and surroundings such as obtain in a Native State. "

व्यंकटेश विठ्ठल ऊर्फ भाऊ मास्तर हे महाराजांचे शिक्षक होते, त्यांना निवृत्तिवेतन ( पेन्शन ) मिळत होतें. ते सन १९१३ सालीं परलोकवासी झाल्यावर त्यांच्या कुटुंबानें महाराजांकडे निर्वाहास कांहीं मिळावें म्हणून मागणी केली. त्या वेळीं स्वारी सेन्ट मारिटझ्ला होती तेथून पत्र लिहविलें त्यांत " भाऊ मास्तर निवर्तल्याचे वांचून महाराजांस फार दिलगिरी वाटली. अलीकडे बरींच वर्षे भाऊ मास्तर यांचे सुखदुःखाचें वर्तमान महाराजांस कळत नसे. तें येथपर्यंत कीं, ते पुण्यास किंवा बडोद्यास आहेत हें देखील समजत नसे. इतके दिवस कांहींच वर्तमान न समजल्यामुळें पुण्यास पत्र पाठवून त्यांची खबर विचारण्याचें एक दोनदां नुकतेंच मनांत आलें होतें, इतक्यांतच ही खेदकारक बातमी कळली. तूर्त स्वारी बडोद्यास येईपर्यंत दरमहा पंचवीस पेनशन बांधून देण्यांत येत आहे. मागाहून कायमचा हुकूम देण्यांत येईल. "

**उपसंहार**—राज्यकारभार चालविण्यास आवश्यक असे गुण महाराजांच्या अंगीं वास करीत असल्याचीं शेंकडो उदाहरणें केवळ त्यांच्या हुकुमांचे वरून मिळण्यासारखी आहेत. परंतु विस्तारभयास्तव वरप्रमाणें थोडेसें दिग्दर्शन करून हा लेख पुरा करतों.

# आठवणी

— ६ —

( लेखक-- श्रीमंत रा. रा. संपतराव गायकवाड, बार-अॅट -लॉ. )

---

## १. कवळाणा.

जी. आय. पी. रेल्वेच्या मनमाड स्टेशनापासून कांहीं अंतरावर कवळाणें नांवाचें एक खेडेगांव आहे. हेंच गांव श्रीमंत सयाजीराव महाराज ( तिसरे ) याचें जन्मस्थळ होय. मनमाड स्टेशनापासून जी पक्की सडक जाते, त्या सडकेपासून सुमारें एक मैल अंतरावर हें गांव वसलेलें आहे. पूर्वीं मालेगांवाजवळ ब्रिटिश सरकारची एक छावणी असे, त्यामुळें या सडकेवर माल व माणसें यांचा विशेष वापर असे. सुमारें दोनशें वर्षांवर आमचे एक पूर्वज या कवळाणा गांवीं जाऊन राहिले. दुसऱ्या दमाजीरावांचे एक पुत्र प्रतापराव हे आमचे प्रथम पूर्वज होत. कवळाणा गांवीं पाटिलकीचें वतन आमच्या कुटुंबाकडेच आहे.

## २. वंशावळीची माहिती.

गायकवाड राजघराण्याचा वंश नंदाजीपासून प्रसिद्ध आहे. नंदाजी—केरोजी—दमाजी—पिलाजी ( दत्तक )—दमाजी ( दुसरे ) व पांचवे पुत्र प्रतापराव हे होत. हेच प्रतापराव आमचे मुख्य पूर्वज होत. यांच्या नंतरचा वंश पुढीलप्रमाणें आहे. प्रतापरावाचे पुत्र काळोजीराव होत. पुढें गबाजीराव-भिकाजीराव. या भिकाजीरावास गबाजीराव, बाबुराव, **काशीराव,** उखाजीराव व सखारामराव असे पांच पुत्र होते. यांतील काशीराव हेच आमचे तीर्थरूप होत. आमच्या मातुश्रीचे नांव **उमाबाईसाहेब** होतें. आनंदराव, गोपाळराव व मी स्वतः ( संपतराव ) असे तिघे बंधु. यांतील मधले गोपाळराव हेच आपले महाराजसाहेब होत.

## ३. ओढ्याची माहिती.

श्रीमंत महाराजसाहब यांचा जन्म केव्हां झाला, हें सांगणें आतां फार कठीण आहे. तथापि फाल्गुन वद्य ६ सोमवार, तारीख २३ माहे फेब्रुवारी

सन १८६३ रोजीं त्यांचा जन्म झाला असें कळतें. लहानपणापासूनच महाराजांचा स्वभाव सारासार विचारी, दूरदर्शी व शांत आहे. आमच्या कवळाणा गांवापासून जवळच एक ओढा आहे. हा ओढा एरवीं कोरडाच असतो. पावसाळ्यांत मात्र याला बरेंच पाणी येते. कित्येक प्रसंगीं या ओढयांत पाणी फारच झाल्यास जवळच्या पुलावरून पुढील रहदारी सुरू होते. एरवीं या कोरडया ओढयांतून रस्ता नजीकचा वाटतो.

### ४. पोहण्याची आवड व खळगडी.

नदी किंवा ओढयाच्या कांठीं राहणाऱ्या मुलांना पोहण्याचा बराच नाद असतो व त्या नादामुळें तीं मुलें पोहण्याच्या कलेंत तरबेज असतात. श्रीमंत महाराज साहेबांना लहानपणीं पोहण्याची आवड फार असे. कैलासवासी दिवाण बहादुर गणपतराव हे आमचे चुलत चुलत बंधु होत. महाराज, गणपतराव व मी ( संपतराव ) स्वतः असे तिघे जवळ जवळ सारख्याच वयाचे असल्यामुळें आम्हीं नेहमीं एकत्रच खेळत असूं.

### ५. खंडूचा अपघात.

वर सांगितलेल्या ओढयांत पोहण्यासाठीं सुद्धां आम्हीं तिघेजण बरोबर जात असूं. एकदां आम्हीं त्रिवर्ग पोहत होतो. इतक्यांत खंडू नांवाच्या एका खेळगडयानें वरून पाण्यामध्यें उलटी उडी मारली. परंतु ज्या ठिकाणीं त्याची उडी पडली त्या ठिकाणीं ओढा उथळ असल्यानें तेथें पाणी अर्थात् कमी असून खालीं खडक होता. तो खंडूच्या डोक्यास जोरानें लागला व खंडूचें डोकें त्या खडकावर सडकलें गेलें. त्याचा परिणाम अर्थातच भयंकर होऊन खंडूच्या डोक्यांतून रक्ताच्या चिळकांड्या उडूं लागल्या. तें पाहतांच आम्हीं सर्व मुलें अगदीं घाबरून गेलों व पुढें काय करावें हें कांहीं आम्हांस सुचेना. आमच्यापैकीं कांहीं तर भीतीनें अगदीं गांगरून गेले. परंतु महाराज साहेबांनीं मात्र घाबरून न जाता, प्रसंगावधान ठवून सर्व मुलांस धीर दिला व खंडूस धरून ओढयाबाहेर काढून घरीं पोंचविलें. हा एकच प्रसंग महाराजांचें मनोधैर्य व प्रसंगावधान दाखविण्यास पुरेसा आहे. संकटकाळीं गांगरून न जातां त्यांतून मार्ग काढण्यांत त्यांचा हातखंडा आहे

